









## चांदोबातील नवलाई



### इंग्रजी जाणणारा चिंपांझी

अटलांटाचा चार वर्षांचा बुटका चिंपांझी इंग्रजीचे काही शब्द शिकला आहे. इंग्रजी मधून विचारल्या जाणाऱ्या प्रश्नांची उत्तरे तो तोंडाने देता आली नाहीत तरी त्याचे शब्द संकेत गणितांच्या चिन्हांने देऊ शकतो.

### प्रचंड नक्षत्रमंडळ

अमेरिकेच्या अरिजोना विटपीक नॅशनल ऑबजरवेटरीच्या संबंधीत वैज्ञानिकांनी आजपर्यंत एका नक्षत्रमंडळाचा शोध लावला आहे. आकाशातील सर्वात मोठे असे हे नक्षत्रमंडळ पृथ्वीपासून एक लाख करोड प्रकाश वर्षांपासून दूर आहे. ह्या गोष्टी संबधी खुलासा जाकब नावाच्या खगोल शास्त्रज्ञांनीं दिला आहे.





### बोलणारा पैसा

कॅनडातील आंधळ्या माणसांना आपल्या हातातील पैसे किती आहेत हे समजण्याकरीता बोलणारे एक अपूर्व यंत्र निर्माण करण्याचा प्रयत्न चालू आहे. हा प्रयोग सफल झाला तर तो पैसा इंग्रजी व फेंच भाषेतून बोलू शकेल.

## तुम्हांला माहीत आहे कां ?

१. भारतीय संगित व नृत्य ह्यांना परदेशी नेऊन त्याची लोकप्रियता वाढविणारा नेता कोण ?
२. पन्नालाल घोष ह्यांनी कोणत्या वाद्य वादनात प्राविण्य संपादन केले आहे ?
३. शहनाई वाद्य वाजवणारे सुप्रसिद्ध कलाकार कोण ?
४. बेगम अख्तर कोणती गाणी म्हणण्यात प्रसिद्ध आहे ?
५. १९६६ मध्ये जेव्हां संयुक्त राष्ट्रसंघाचा शुभारंभ झाला. तेव्हां संगित संमेलन करणारी भारतीय गायिका कोण ?

[ उत्तरे पान ६५ वर पहावीत ]

पुराणातील कथा :

# इंद्रद्युम्न

इंद्रद्युम्न नावाच्या राजाने आपला बराच काळ इंद्रलोकात घालवला. एक दिवस देवतांनी त्याला सांगितले की. स्वर्गलोकातील तुझे यश संपले. त्यामुळे तू आता यापुढे इंद्रलोकात वास्तव्य करण्यायोग्य राहीला नाहीस. म्हणून त्याला पृथ्वी लोकात पाठवून दिले.

इंद्रद्युम्न एका जंगलातून जात असतांना त्याला समोरून येणारे मार्कंडेय मुनी दिसले त्याने त्यांना विचारले–"काय हो आपण मला ओळखले नाहीत का ?"

"मी आपणास ओळखले नाही." मार्कंडेयनी म्हटले–"काय हो आपल्याहूनही महान व्यक्ति कोणी आहे ?" राजाने विचारले. "माझ्याहूनही महान म्हणजे प्रवाकर्ण अस्वल आहे. चला आपण त्यालाच जाऊन विचारू या." असे म्हणून मुनीने राजाला बरोबर घेतले व ते त्या अस्वलाजवळ आले.

अस्वल म्हणाले–"मला माहित नाही. तुम्ही कोण आहात ? परंतु माझ्या पेक्षा महान म्हणणे नालीकजंघ नावाचा एक बगळा आहे. चला, आपण त्यालाच जाऊन विचारू या." त्याचे म्हणणें ऐकून तो बगळा म्हणाला–"मला आठवत नाही तुम्ही कोण आहात ?" माझ्यापेक्षा मोठा असलेल्या आकूपार नावाच्या कासवाला जाऊन विचारु या." असे म्हणून ते तिघे चालू लागले.

कासव राजाला पहाताच प्रसन्नतापूर्वक म्हणाला–"हे राजा, मी आपल्याला कसा विसरेन. आपण ज्या गाई दान दिल्या आहेत. त्यांच्या खुराच्या दाबामुळेच हा तलाव झाला आहे. ह्याच कारणाने ह्याला इंद्रद्युम्नाचे तळे म्हणतात.

दुसऱ्याक्षणी इंद्रलोकातून एक दिव्य रथ त्यांच्या समोर येऊन थांबला. त्यावर देवदुतांनी म्हटले–"महाराज, आपले यश अजून पर्यंत पृथ्वीलोकांत पसरले आहे. त्यामुळे आपण इंद्रलोकात येऊ शकता. ह्यानंतर राजाने त्या चौघांची प्रेमाने भेट घेऊन त्यांना पाठवून स्वतः इंद्रलोकात परत आला.





# चोराचे उपकार

एका गावात रमानाथ व रमाबाई नावाचे एक जोडपे रहात होते. त्यांची नावे जशी एकमेकांना साजेशी होती. तशीच मने एकमेकांना जुळणारी होती. दोघांना चोरी करायला फार आवडे. लग्नानंतर रमाबाईने नवऱ्याजवळ नवीन साडी विकत घेण्याचा हट्ट धरला. तेंव्हा रामनाथने मोठ्या हुषारीने कपड्याच्या दुकानातून साडी चोरून आणली. हि गोष्ट समजताच रमाबाईला स्वर्ग दोन बोट उरली.

त्या दिवसांपासून दोघांनी एकमेकांशी विचार विमर्श करून लहान मोठ्या चोऱ्या करण्यास आरंभ केला. त्या करीता ते दर वेळेस एक भाड्याचे घर घेऊ लागले आणि जर त्या मालकाला आपण चोरी करतो हा मागोवा लागलाच तर तो कळण्यापूर्वीच ते ती जागा सोडून जात. रमाबाई जेव्हा नविन भाड्याच्या घरात आली. तेव्हां तिने परसदारी उगवलेल्या फुलांची एक माळ बनवली व ती घेऊन शेजारणीला देऊन म्हणाली–"आज, तुम्ही तर साक्षात् महालक्ष्मीसारख्या दिसता म्हणून हि माळ ओवून मी तुम्हांला द्यायला आले आहे. हि तुम्हांला दिली तर मला पुण्य लागेल. असे म्हणून त्यानी वस्तू कुठेकुठे ठेवल्या आहेत हे हेरून ठेवत व दुसऱ्या खेपेस येऊन वस्तू लुगड्यात लपवून पलायन करीत.

आता ज्या ज्या नव्या घरात तीने प्रवेश केला होता. तेथील आजुबाजुच्या सर्व घरातून तिने काहीबाही चोऱ्या केल्या होत्या. एक दिवस दुपारी एकीच्या सोप्यात आजुबाजुच्या बायका गप्पाटप्पा करीत बसलेल्या असतांना रमाबाई तेथे जात त्यांना उद्देशुन म्हणाल्या–"अग बायांनो ऐकलेत का आम्ही जेव्हां इथे नविन नविन

विमल मराठे



रहायला आलो तेव्हां कधी चोरीचे नाव ही ऐकले नव्हते परंतु आता चारपांच दिवसापासून पहाते तो माझ्या नवऱ्याचे घोतर चोरीस गेले आणि काल तर विहिरीवर ठेवलेला पितळेचा तांब्या गायब!"

हे ऐकताच तिथे उपस्थित असलेल्या सर्व बायकांनी आपापल्या घरात झालेल्या चोऱ्यांचा किस्सा ऐकवला.

त्यावर रमाबाई म्हणाल्या—"अशा चोऱ्या होत राहिलेल्या पाहून आपण गप्प रहाता कामा नये. आपण आपल्याकडून डोळ्यात तेल घालून जागरूक राहिले पाहिजे. त्या चोराला तर एका महिन्याच्या आत मी पकडून दाखविन."

रमाबाईचा अंदाज होता की, आपण अशा प्रकारे नाटक केले की आपल्यावर चोरीचा आरोप कोणी उघडउघड करणार नाही. कोणी आपल्यावर शंका घेणार नाही. रमानाथ त्या चोरलेल्या वस्तू घेऊन जाऊन दुसऱ्या गावी नेऊन विकत असे व त्या पैशाने जुगार खेळत असे व दोन-तीन दिवसाने परत येत असे.

एक दिवस रागाच्या आवेशात येऊन रमाबाई नवऱ्याला म्हणाल्या—"तुम्ही तर एक नंबरचे आळशी होऊ लागला आहात मला एकटीलाच कमवावे लागते."

"ठीक आहे, मग सांग बर! मी काय करू?" रामनाथ चिडूनच म्हणाला.

"हे पहा आपली शेजारीण पार्वतीबाई ह्यांच्यापरसातल्या सोनकेळ्याच्या झाडाला चांगला भरघोस केळ्यांचा घड लागलेला आहे. आज रात्री तुम्ही जाऊन तो तोडून आणा." रमाबाईनी उपाय सांगितला.

हात्तिच्या एवढेच. नां! मी कापून आणतो घड." रामनाथ उत्साहाने म्हणाला.

त्या दिवशी मध्यरात्री रामनाथ कोयता घेऊन पार्वतीच्या घरात परसात गेला. त्याने केळ्याचा घड कापला व पलीकडे उभ्या असलेल्या रमाबाईच्या हातात दिला व परत उडी मारून आपल्या घरात परत आला. नंतर दोघांनी मिळून तो घड उचलून घरात आणला व दार बंद केले. नंतर रमाबाईने तो केळ्याचा घड एका पोत्यात घालून ते पोते माळ्यावर ठेऊन दिले व ते दोघे शांतपणे झोपी गेले.

पहाटे रामनाथच्या किंचाळून ओरडण्याने रमाबाईंना आश्चर्य वाटले त्या उठून बसत आश्चर्य करू लागल्या त्यांनी चोहो-बाजूला नजर टाकली तेव्हां घरात सर्वत्र सामानसुमान विखरून पडलेले होते. घराचे दार सताड उघडे होते. घरात चोरी झाली ते लक्षात आले. गळ्यातील सोन्याची माळ गायब झालेली पाहून त्यांनी किंकाळीच फोडली.

तेव्हां रामनाथ कपड्यांनी भरलेली पेटी उघडून उलटून पालटून पहात होता व आतील पैसा न पाहून ओरडला—"अग ऐ, मी ह्या कपड्यांच्या खाली तीन हजार रुपये लपवून ठेवले होते ते सुद्धा चोरांनी पळवून नेले ग! त्यांचा आरडाओरडा ऐकून शेजारीपाजारी धावत तेथे आले.

तेव्हां रमाबाई स्वत:चेच डोके बडवत म्हणू लागली—"हाय रे देवा, माझे सर्व घर लुबाडले एक पैसापण मागे ठेवला नाही. आम्ही तुझे काय वाईट केले होते.

तेथे जमलेल्या लोकांच्यात पार्वती सुद्धा होती. खोलीच्या कोपऱ्यात सटून ठेवलेल्या पोत्यातील सोनकेळ्याच्या घडाकडे पाहून तिला आश्चर्याचा धक्काच बसला. ती म्हणाली—"मी सकाळी उठून पाहिले तो माझ्या केळ्याचा घडच गायब मला खूपच



वाईट वाटले. पण हे सांग ग हा घड तुझ्या घरात कसा काय आला ?"

रामनाथ व रमाबाई यांना समजेना की, माळ्यावर ठेवलेला हा घड खाली कसा काय आला. दोघांनी आपले चेहरे वाकडे केले.

पार्वतीने पाहिले तो केळ्याच्या घडातील एका केळ्याला एक चिठ्ठी अडकवून ठेवली होती. ती काढून पार्वतीने प्रथम वाचली नंतर तिथे जमलेल्या सर्व लोकांना वाचून दाखविली त्यातील मजकूर असा होता.

"आजपर्यंत मी बेकार होतो. पण चोर नव्हतो. नोकरीच्या शोधार्थ गावभर भटकून शेवटी काल रात्री ह्या बोळातून जात होतो. तेव्हां ह्या घरातून कोणी केळ्याचा घड चोरून घेऊन जात असलेले मी पाहिले व त्या क्षणी मी त्या घरात घुसलो व स्वयंपाक घरात दडून बसलो. ह्यानंतर मी त्या दोघांच्या मध्ये झालेले संभाषण ऐकले आणि तुमचे चोरी करण्याचे कारस्थान सर्वांना समजावे ह्या कारणाने मी हा केळ्यांचा घड माळ्यांवरून खाली उतरवून दाराला सटून ठेवला. हे सर्व धन तर आपल्या कष्टाचे नाही. ते चोरीचे आहे. त्यामुळे कपड्याच्या खाली लपवून ठेवलेले तीन हजार रुपये मी घेऊन जात आहे. ह्या पैशाने मी काहीतरी व्यापार धंदा सुरू करून प्रतिष्ठापूर्वक आपले आयुष्य घालविन ह्या विचारात आहे."

पार्वतीने ती चिठ्ठी वाचून दाखविली त्यावर सर्वजण तुच्छ नजरेने रामनाथ व रमाबाईकडे पहात त्यांना झिटकारून टाकत रागाने ओरडून म्हणाले–"तुम्हांला दोघांना तर तुरुंगाची हवा खायला पाठविले पाहिजे पण तुम्ही तुमचा पैसा घालवलात त्यामुळे तुमच्यावर दया दाखवून दण्ड केल्याशिवाय सोडून देतो. पण यापुढे तरी आपले आयुष्य ईमानदारीने घालवा." असे म्हणून सर्वजण आपापले चोरीस गेलेले सामान उचलून घेऊन गेले.

ह्यापुढे रामनाथ व रमाबाई ह्यांना त्या घरात राहणें अशक्य झाले त्यांनी रातोरात ते घर सोडून दिले.



# पुरस्कार देणारा राजा

चंद्रनगरचा राजा सुंदरवर्माला प्रारंभापासूनच बक्षिसे देण्याचा अत्यंत शौक होता. जसजसे त्याचे म्हातारापण जवळ येऊ लागले तशी ही त्यांची सवय आवाक्याबाहेरच वाढू लागली त्यामुळे मंत्री नेहमी राजाबरोबर राहून त्याच्या ह्या सवयी मध्ये नेहमी विघ्न आणत असे.

एकदा राजा इतर सेवक बागेत हिंडत होते. तेव्हां राजाचे लक्ष एका सुंदर विचित्र तऱ्हेच्या पक्षाकडे गेले. राजाने सेवकांकडे त्या पक्षाची मागणी केली व तो मागवून घेतला. व त्या नोकराला विचारले–"ह्या पक्षाचे नाव काय ?" कोणालाही त्या पक्षाचे नाव सांगता आले नाही. परंतु त्यातील एकजण म्हणाला–"सरकार हा नविन पक्षी आहे त्याचे नाव त्यालाच विचारा ना !

"अरे वा काय बरोबर सांगितलेस !" असे म्हणत राजाने आपल्या हातातले सोन्याचे कंकण काढून त्याला बक्षीस देऊन टाकले. नंतर पक्षाला त्याचे नांव विचारले परंतु पक्षाने काही सांगितले नाही. तेव्हां त्याच्यातील एकजण म्हणाला–"महाराज, ह्या पक्षाला कान दिसत नाहीत. त्याला ऐकू येईल तर ना !"

त्याचे उत्तर ऐकून राजा प्रसन्न झाला व दुसऱ्या हातातील कंकण काढून त्याने दुसऱ्या एकाला देऊन टाकले. मंत्र्याने विचार केला की, पक्षाचे कारण पुढे काढून तेथे आलेले सर्वजण काहींना काही भेटी वसूल करून राजाचे सारे दागिने हडप करतील मग काय मंत्र्याने एका सेवकाला संकेत करून तो पक्षी उडवून लावला.

पक्षी उडून गेलेला पाहून राजा अत्यंत व्याकुळ झाला. त्यावर मंत्री त्याला म्हणाला–"महाराज, हा पक्षी तर आपले नावही जाणत नाही की, आपले म्हणणे ऐकू पण शकत नाही. असा पक्षी आपल्या काय कामाचा उडून गेला तर छानच झाले."





# महान व्यक्ति

कपुर देशात राजा माणिक्यवर्मा राज्य करीत होता. त्यांच्या दरबारात गंगाधर मिश्र नावाचा एक कवी होता. तो राजाचा अत्यंत प्रेमी होता.

एकदा राजा माणिक्यवर्मानें आपल्या जन्मदिवशी अनेक श्रेष्ठ कवींना भूदान व संपत्ती भेट देण्याचा विचार करून सन्मानित होणाऱ्या व्यक्तिची नावे एक आठवडा आधीच घोषीत केली.

ह्या घटनेनंतर काही दिवसातच दरबारी कवी गंगाधर मिश्रनी आपल्या घरी काही मित्रमंडळीना बोलावले. गप्पा मारत असताना त्या संदर्भामध्ये सुधाकर नावाच्या पंडीताने सांगितले—"मी असे ऐकले आपला राजा विरंची नगरच्या स्वर्णकुंतल नावाच्या कवीचा सत्कार करणार आहे. महाराजाने तसा निरोप आपल्या दूतांकरवी त्याच्याकडे पाठविला आहे की, आपला जन्म दिवशी दरबारात येऊन हजर रहावे. हि गोष्ट तर अशक्य आहे. कारण गंगाधर कवी राजाचा अत्यंत गाढ मित्र आहे. त्याला सुद्धा हि बातमी कळली नाही तर तुम्हाला कशी काय कळली? दुसऱ्या एका कवीने विचारले.

"महाराजांनीं विरंची नगरात ज्या सेवकाला पाठविले होते. त्याची बायको आमच्याकडे काम करणाऱ्या मोलकरणीची मैत्रिण आहे." सुधाकर म्हणाला.

हे सर्व ऐकताच गंगाधर मिश्रना अत्यंत राग आला. ते ताड्ताड् उठून राजाकडे गेले व म्हणाले—"महाराज राजधानी मधे अशा गोष्टींचा उदोउदो चालला की, आपण आपल्या जन्म दिवसाला दुसऱ्या कोण्या एकाचा सत्कार करण्यास आमंत्रित केले आहेत. काय मला त्या माणसाचे नावगाव समजू शकेल कां?"



राजा माणिक्यवर्मा मंदहास्य करीत म्हणाला—"तू तर माझा जिवलग मित्र आहेस. त्यामुळे तुला हि सुचना तर मी आधीच देणार होतो. मी विरंचि नगरचा रहाणारा स्वर्णकुंतल नावाच्या कवीचा सत्कार करण्याची योजना आखली आहे.

गंगाधर मिश्र क्षण-दोनक्षण शांत राहिले व म्हणाले—"महाराज, नगरातील सर्व लोकांचा विश्वास होता की सत्कार व सन्मान माझा केला जाईल. मी आपल्याला उलट प्रश्न करीत नाही. पण आपल्या दोघां-मध्ये जी मैत्री आहे. त्या आधाराने मी आपल्याला विचारत आहे? मी ह्याचे काय कारण जाणू शकतो कां? कां माझा सन्मान केला जाणार नाही?"

माणिक्यवर्माला जोरात हंसू आले ते म्हणाले—"मी एका कवीची तुलना दुसऱ्या कवीच्याबरोबर करून ह्या निर्णयाला येऊन पोहोचलो आहे. तू तर नेहमी करीताच माझ्या दृष्टीने महाकवी आहेस. इथे काही काही दिवसापूर्वी कवी स्वर्णकुंतल कवीची काही काव्ये वाचण्याची मला संधी मिळाली. ते एक प्रतिभाशाली कवी आहेत. अशी महान व्यक्ति राजाश्रय मिळविण्याची इच्छा मनात न आणता गावाच्या कुठल्या टोकाला आपले आयुष्य कंठीत आहे. गंगाधर मिश्र त्यावर काही बोलणार तितक्यात एका राजभटाने प्रवेश करीत म्हटले—"प्रभू! विरंचि नगरातून स्वर्ण-कुंतल नावाचे एक कवी आले आहेत. ते आपले दर्शन करू इच्छितात!"

त्यावर गंगाधर मिश्र परिहासपूर्वक म्हणाले—"महाराज पाहिलेत नां? जमिन व जहागिरदारी मिळण्याची सुचना मिळताच कवी धावत धावत कसे आले?"

राजाने राजभटांना आज्ञा केली की, स्वर्णकुंतल कवींना भेटीस घेऊन यावे. स्वर्णकुंतल कवीने प्रवेश करताच राजा त्यांना म्हणाला—"कवीवर, आपण इतकी घाई करून राजधानीला यायचे काय कारण? आपला सत्कार करण्याची तारीख

गणेश भट







तर अजून पंधरा दिवसाने आहे. हा निरोप आमच्या दुताकरवी आपल्याला समजला नां ?"

हे उत्तर ऐकून स्वर्णकुंतल कवींना आश्चर्य वाटले—"महाराज, माझ्या येण्याने काही चुक झाली असली तर मला क्षमा करा. परंतु मी हे जाणण्या करीता आलो आहे की कोणत्या कारणासाठी तुम्ही माझा सत्कार करणार आहात ?"

स्वर्णकुंतल कवीचे बोलणे ऐकताच राजाला आश्चर्य वाटले तो म्हणाला—"आपल्या सारखे विचारणारे विरळच असतात की, हा सन्मान कशा करता केला जात आहे. मलाच समजेनासे झाले की, अशा व्यक्तिच्या बाबतीत मी काय विचार करू ?"

ह्यावर स्वर्णकुंतल कवी विनयपुर्वक म्हणाले—"प्रभू आपल्या दरबारात गंगाधर मिश्र नावांचे सुप्रसिद्ध महाकवी आहेत. मी तर एक साधारण कवी आहे. आपल्याला नेहमी करीता मी एक अपरिचित असा आहे. तुम्ही जर माझा सन्मान करू पहाती तर तुम्ही माझा सन्मान कां करता ह्यांच्या कारणाने जर माझे मन संतुष्ट झाले तरच मी आपल्या सन्मानाचा स्विकार करेन. नाहीतर नाही."

माणिक्यवर्मा ह्यावर विचार करू लागला की ह्याला काय उत्तर द्यावे ! तितक्यात गंगाधर मिश्र स्वर्णकुंतल कवींना म्हणाले—"आपण महाकवी म्हणून ज्या गंगाधर मिश्र ह्यांचा उल्लेख करता ती मीच आहे. मी एक कवी असून सुद्धा आपल्या प्रतिभा न समजलेला असा आहे परंतु तुम्ही जे विचार महाराजांसमोर व्यक्त केलेत त्यानेच मला समजले की माझ्यापेक्षा आपण कितीतरी अधिक पटीने महान आहात. त्यामुळे आपण ह्या सन्मानाला योग्य आहात.

राजा माणिक्यवर्मा गंगाधर मिश्र ह्याचे हे बोलणे ऐकून अत्यानंदीत झाले. त्यांनी आपल्या वाढदिवसाच्या दिवशी स्वर्णकुंतल कवीं बरोबर गंगाधर मिश्र ह्यांचा सुद्धा मोठा सत्कार केला.






[१२]

[चंद्रवर्मा व कापालिनी शंखू मांत्रिकाचे मंत्र-गृह असलेल्या पहाडावर चढून गेले. तेथे कापालिनी करीता चंद्रवर्माने व कालकेतुने मिळून एक छोटीशी झोपडी बांधली. त्यानंतर दुसऱ्या दिवशी पहाटे चंद्रवर्माने जंगलात प्रवेश केला. तेथे त्याला एक लोखंडी साखळी सांपडली. तेवढ्यात एक प्रचंडकाय कुत्रा त्याच्यावर भुंकत त्याच्याजवळ येऊ लागला. नंतर]

तो प्रचंड राक्षशी कुत्रा आपला जबडा आवासत चंद्रवर्माचा गळा पकडण्याच्या उद्देशाने त्याच्यावर तुटून पडला. तेव्हां त्यानें ताबडतोब आपल्या कमरेची तलवार उपसली व उगारत त्या कुत्र्याच्या नरडीपाशी आणली. तितक्यात न कळत त्याच्या डाव्या हातातील लोखंडाची साखळी सटकन त्याच्या डोक्याला लागली. तेव्हां तो कुत्रा होलपटत जाऊन दोन तिन फुटावर उलटा होऊन पडला. चंद्रवर्मा विजेच्या गतीने गरकन पाठीमागे वळून त्या भयंकर रूप असलेल्या कुत्र्याच्या अंगावर धावून गेला. तेव्हां ते कुत्रे ताडकन उठून उभे राहिले व चंद्रवर्माच्या हातातील साखळीकडे दृष्टी टाकून धापा टाकीत तेथेच स्तब्ध उभे राहिले नंतर पाठीमागे वळून थोडे लांब झाडीत पळाले व तेथून त्याच्याकडे पहात शेपटी हलवित उभे राहिले.











त्या प्रचंड राक्षसी कुत्र्यामध्ये क्षणार्धात झालेला बदल पाहून चंद्रवर्माला एकदम आश्चर्य वाटू लागले. त्याने आपल्या हातातील लोखंडी साखळीकडे दृष्टी टाकली व त्या राक्षसी कुत्र्याच्या बाजूला फेकली. त्या कुत्र्याने जवळ येत ती साखळी हुंगून पाहिली व तोंडांत धरून त्याने ती चंद्रवर्मा पाशी आणली व शेपटी हलवित त्याच्या समोर उभा राहिला. तो सर्व प्रकार पाहून चंद्रवर्माला मनोमन वाटू लागले की नक्कीच ह्या लोखंडाच्या साखळीमध्ये काहीतरी प्रभाव आहे. त्याने कुत्र्याच्या तोंडातून ती साखळी ओढून घेतली व तिचे एक टोक त्या कुत्र्याच्या गळ्यात बांधले.

कुत्र्याने चौफेर एकदा नजर फिरविली व जोरात भुंकत त्याने झाडाझुडपाच्या बाजूला चंद्रवर्माला खेचित आणले. चंद्रवर्माला समजले की, ह्या कुत्र्याला आपल्याला कुठेतरी न्यायचे आहे. तो धाडसाने त्या कुत्र्याच्या पाठोपाठ चालू लागला. तेव्हां त्याच्या मनामध्ये असा एक विचार आला की, हे कुत्रे म्हणजे कोणी कुत्ररूपी राक्षस तर नाही नां! कां खरोखरी कुत्रे आहे?

कुत्र्याने थोडा वेळ बऱ्याच कांटया-कुटयातून चालत नेऊन सरते शेवटी चंद्र-वर्माला एका पहाडाच्या टोकावर आणून सोडले. त्या डोंगरावरच्या थोडया माळ-रानासारख्या जागेत एका झाडाखाली एक झोंपडी त्याच्या दृष्टीस पडली. त्याला वाटले की, एखादे वेळेस कुत्र्याचा मालक त्या झोपडीत रहात असावा व तो त्याच्या-पाशी आपल्याला घेऊन जात असावा. असे वाटताच त्याने ती साखळी त्याच्या गळयात अडकवून टाकली व तो त्या डोंगरावरून खाली उतरून त्या झोपडीच्या जवळ जाऊ लागला.

झोपडीजवळ पोहोचल्यावर सुद्धा कोणी ही झोपडी बाहेर आले नाही. तेव्हां कुत्रा जोरात भुंकत झोपडीत घुसला व दुसऱ्या क्षणी बाहेर येऊन इकडे तिकडे पाहू लागला त्याच्या पहाण्यावरून असे वाटत होते की



कोणी माणूस ह्या झोपडीत रहात असावा तो उत्सुकतेने झोपडीच्या आत गेला. परंतु आत तर कोणी सुद्धा नव्हते एका कोपऱ्यात एक मोडकी तोडकी खाट पडली होती. दुसऱ्या भिंतीला लागून एक चुलाणे होते. त्याच्या जवळपास दोन चार भांडी उलथी पालथी पडलेली होती. त्या भिंतीला लागूनच काही मातीची मडकी सुद्धा होती त्याच्या बाजूला एक काठी व एक कांबळे व काही फाटके तुटके कपडे पडलेले होते.

ती वस्तुस्थिती पाहून चंद्रवर्माला कोणी गरीब माणूस येथे रहात असावा असे वाटले परंतु इतक्या भयंकर जंगलात गरीब माणसाला रहाण्याची जरूर काय? कां हा दुसरा कोणी भयंकर मांत्रिक आहे.

चंद्रवर्माला जशी शंका आली तसे झटकन त्याने भिंतीला लागून असलेल्या भांडयातून वाकून पाहिले त्याला वाटत होते की जर तो नरमांस भक्षक असला तर त्या भांडयात काही हाडेमांस नक्कीच दिसेल.

चंद्रवर्मा त्या विचारात गुंग होता. तेवढयात त्याला दरडावून बोलल्याचा आवाज ऐकू आला—"खबरदार! तू आपल्या जागेवरून हललास किंवा हलण्याचा प्रयत्न केलास तर हा भाला तुझ्या पाठीतून आरपार जाईल. पाठीमागे पाहिल्या-शिवाय माझ्या प्रश्नांना उत्तरे दे?"

चंद्रवर्माला दरदरून घाम फुटला. त्याला समजले सुद्धा नाही की, आता आपल्याला कोणत्या कठीण प्रसंगाला तोंड द्यावे लागणार आहे. खरे तर आपल्या पाठीमागे उभ्या असलेल्या दुष्टाने आपल्या पाठीवर भाल्याचा नेम धरला असेल तर पाठीमागे पहाण्यात अर्थ नाही. चंद्रवर्माने आपली भीती लपविण्याचा आटोकाट प्रयत्न केला व त्याला म्हणाला—"अरे, मी तर तुझा मित्र आहे. तू माझा चेहरा पाहिलास तर तुला हि गोष्ट नक्की समजले!"

"छी: छी: तू माझा मित्र" चंद्रवर्माच्या पाठीमागे उभा असलेला माणूस दरडावून बोलला. नंतर क्षणभर शांत राहून म्हणाला—

"तर मग सांग, तुझ्याबरोबर आलेले राजभट कुठे आहेत?"

"राजभट! हे तुम्ही काय म्हणता आहात?" चंद्रवर्माला त्यांच्या बोलण्याचे आश्चर्य वाटले. तो म्हणाला–"अहो, मी तर ह्या जंगलात एकटाच केव्हांपासून भटकत आहे. देवाची कृपाच समजा तुमच्या ह्या राक्षसी कुत्र्यापासून ह्या साखळीनेच मला वाचवले. नंतर ह्या कुत्र्याने मला तुमच्यापाशी येण्याचा रस्ता दाखवला. म्हणून तर मी इथं येऊन पोहोचलो."

"हे तर खरेच आहे की ह्या लोखंडाच्या साखळीमुळेच तुझे प्राण वाचले. ह्याच लोखंडी साखळीने ह्या कुत्र्याला बांधून माझा मुलगा हिंडत असे. आता ते राजभट त्याला पकडून घेऊन गेले. तेव्हां हि साखळी तुटून जंगलात कुठेतरी पडली. तुमच्या हातात ही साखळी पाहून ह्या कुत्र्याला वाटले की त्याच्या मालकाचे तुम्ही कोणी मित्र असाल. म्हणून तुम्हाला जीवानिशी त्याने सोडून दिले. आता हे सांग की माझा मुलगा जिवंत आहे का राजाने त्याला ठार मारले?" त्या माणसाने त्याला विचारले.

चंद्रवर्माला हे सर्व बोलणें विचित्र वाटले तो मनात विचार करू लागला की, हा माणूस आपल्याला राजभट समजून राहिला आहे. त्याच्या मुलाला कैद करून नेणाऱ्या लोकांपैकी आपण एक आहोत असा त्याचा गैरसमज होऊन त्याने आपल्या पाठीला



भाला टेकून ठेवला आहे. आता ह्या कठीण पेचातून कसे सुटावे."

तेवढ्या कठीण समस्येतून सुद्धा त्याला एक उपाय सुचला. त्याने आपल्या कमरेची लटकती तलवार त्याला हाताने दाखवित म्हटले–"महाशय, तुम्ही तर माझ्या बाबतीत गैरसमज करून घेतलेला आहेत. तुमच्या मुलाला पकडून नेणाऱ्या लोकांपैकी मी नाही. तुम्ही ज्या राजाचे नाव सांगता तो मला माहीत सुद्धा नाही. माझ्या कमरेची हि लटकणारी तलवार पाहिजे तर तुम्ही काढून घ्या. नंतर आपण ह्या गोष्टींचा विचार करू!"

चंद्रवर्माचे बोलणे संपत नाही तोच त्या म्हाताऱ्याने त्याच्या हातातील तलवार झटक्यात स्वताच्या हाताने ओढून घेतली व तो म्हणाला–"आता तुम्ही पाठीमागे वळून पाहा आणि त्यातून तुम्ही काही दगाफटका करण्याचा प्रयत्न केलात तर तुमचे मरण निश्चित समजा."

चंद्रवर्माने एक दिर्घश्वास घेतला व वळून पाठीमागे पाहिले त्याच्याजवळ एक सत्तर वर्षाचा म्हातारा उभा होता. त्याच्या दाढीचे डोक्याचे केस सफेद पांढरे झालेले होते. चेहऱ्यावर सुरकुत्यांचे जाळे पसरलेले होते त्याने आपल्या लटपटत्या हातात एक लांब भाला घेतला होता दुसऱ्या हातात तलवार घेऊन तो उभा होता. त्याचे डोळे पेटत्या निखाऱ्यासारखे लालबुंद होते."





"मी कोणी राजाचा माणूस नाही. मी तर ह्या जंगलात वणवण भटकत राज्य घालवून बसलेला एक राजा आहे. सांग तुझ्या मुलाला कैद करून घेऊन जाणाऱ्या राजाचे नाव काय?" चंद्रवर्माने विचारले.

"काय रे तुला हे तरी माहीत आहे कां की तू कोणत्या राज्याच्या सरहद्दीवर येऊन उभा आहेस?" म्हाताऱ्याने आपली शंका प्रकट करीत त्याला विचारले.

चंद्रवर्माने नकारात्मक मान हलविली म्हाताऱ्याने चंद्रवर्माच्या डोळ्यात निरखून पाहिले आणि म्हटले–"तुझ्या कपड्यावरून व बोलण्या चालण्यावरून तर वाटते तुला हा प्रदेश नविन आहे. तू खरोखरी राज्य गमावून ह्या रानावनात भटकत असलास तर मी तुला नक्कीच सहाय्य करीन परंतु त्याच्या बदल्यात तू मला मदत करण्याचे वचन द्यावयास पाहिजे?"

"तू माझ्याकडून कोणत्या मदतीची अपेक्षा करतोस?" चंद्रवर्माने विचारले.

"माझ्या मुलाला रुद्रपुरचा राजा पकडून घेऊन गेला आहे. त्याच्या शिपायांनी येऊन त्याला कैद करून नेले आहे. मी त्याच्यापासून स्वतःचा बचाव करून घेऊन इकडे ह्या जंगलात भटकत आहे. मला तर मनापासून आता असे वाटू लागले आहे की, त्या राजाची दुश्मनी प्राप्त करून आपण काही जास्त दिवस जगू शकत नाही. जर आतापर्यंत राजाने माझ्या मुलाला ठार केले असेल तर मी काहीच करू शकत नाही. परंतु तो अद्याप पर्यंत ठार झाला नसेल तर त्या राजाशी काही सलोखा प्राप्त करून त्याला कांशाच्या किल्यापर्यंत घेऊन जाण्याचा नकाशा मी त्याला देईन." म्हाताऱ्याने उत्तर देत म्हटले.

"काय म्हणता? कांशाचा किल्ला?" चंद्रवर्माने अत्यंत आश्चर्यचकित होत त्यांना उद्देशुन म्हटले–"तुम्ही ज्या कांशाच्या किल्ल्याची गोष्ट सांगता आहात ती मी माझ्या बालपणी कित्येकांच्या तोंडून ऐकली आहे. ते लोक सांगत की, तो कांशाचा किल्ला पश्चिम दिशेकडच्या समुद्र किनाऱ्या-पाशी आहे आणि तुमच्या तोंडून हे ऐकून तर मला अतिशयच आनंद झाला आहे की तेथे पोहोचण्याचा मार्गाचा नकाशा तुमच्या पाशी आहे?"

"हो, हो! हि तर खरी आश्चर्याची गोष्ट आहे असे म्हणत तो म्हातारा थोडा विचार करीत मान खाली घालून गप्प बसला नंतर मान वर करीत म्हणाला– "कांशाच्या किल्ल्याचे ठिकाण माहीत करण्याच्या कामी आजपर्यंत कित्येकांनी आपले प्राण खर्ची घातले आहेत. हि गोष्ट तर तुला माहीत असेलच नां?"

"हो, हि सर्व माहिती आम्हांला आमच्या पूर्वजांकडूनच कळली आहे." चंद्रवर्मा म्हणाला.

चंद्रवर्माचे बोलणे ऐकूनच म्हाताऱ्याला हंसू आले तो म्हणाला–"मला अशी शंका येते की, तुम्हांला कांशाच्या किल्ल्याची चांगली कल्पना असावी व त्या किल्ल्या-पर्यंत जाण्याच्या वाटेचा नकाशा माझ्या-पाशी आहे. तो माझ्या आज्यापंज्यापैकी एकाने हस्तगत केला होता आणि हि गोष्ट रुद्रपुरच्या राजाच्या कानावर घालण्याच्या हेतूने मला इथे पाठविले परंतु मी त्याच्या डोळ्यात धूळ फेकून इकडे पळून



आलो. परंतु माझा मुलगा देवल मात्र त्याच्या तावडीत सांपडून कैद झाला. जर कां कांशाच्या किल्ल्यातील मिळणारे धन थोडेफार तें मला देतील तर मी तो नकाशा त्या राजाला द्यावयास तयार आहे. परंतु ह्या कामा करीता मध्यस्थी करावयास हवी त्याच बरोबर माझा मुलगा देवल ह्यालाही त्यांच्या हातून सोडवून आणावयास हवे. तू जर ह्याकामात मला मदत केलीस तर मला मिळणाऱ्या संपत्ती मधील काही वाटा मी तुला देईन त्या संपत्तीने तू आपल्याला आवश्यक असलेले सैन्य जमवून परत लढा देऊन स्वतःचे राज्य प्राप्त करशिल." म्हातारा म्हणाला.











म्हाताऱ्याचे बोलणे चंद्रवर्माने शांततेने ऐकले त्याला वाटू लागले म्हातारा म्हणजे असा तसा साधा माणुस वाटत नाही. त्याचबरोबर म्हातारा आपले काम साध्य करून घेण्याकरीता स्वत:चे डोके उत्तम पैकी चालविण्यात काही कसूर बाकी ठेवत नाही.

"तुम्ही ज्या अटी घातल्यात त्या सर्व मला मंजूर आहेत. आता तरी मला त्या कांशाच्या किल्ल्यापाशी जाणाऱ्या वाटेचा नकाशा दाखव ना?" चंद्रवर्मा म्हणाला.

म्हाताऱ्याने संतोषाने एक वार चंद्रवर्माकडे पाहिले व त्यावर तो काही बोलणार इतक्यात बाहेर बराच आरडाओरडा व गोंधळ ऐकू आला म्हातारा एका डांगेत उडी मारून दारातून डोकावून बाहेर पाहू लागला व फिरून चंद्रवर्माला म्हणाला– "ते पहा, राजाचे शिपायी ह्याच बाजूला येत आहेत. आता तू मला वचन दे की त्यानी माझ्या मुलाची सुखरूप सुटका केली व किल्ल्यातील मिळणाऱ्या संपत्तीतील अर्धा वाटा मला द्यायला कबुल झाले तरच मी त्यांना कांशाच्या किल्ल्यापर्यंत वाट दाखविणाऱ्या मार्गाचा नकाशा देईन. तसे तू मला वचन दे" असे म्हणून म्हातारा झोपडीच्या बाहेर आला व पळून जंगलातल्या झाडाझुडपात गायब झाला.

क्षणार्धात हे सर्व घडलेले पाहून चंद्रवर्माला अचंबा वाटला तो विचार करू लागला की खरोखरी एक असाधारण माणूस वाटतो आहे. मला संकटाला तोंड द्यायला सांगून स्वत: गुपचूप जंगलात पळून गेला. आता काय करावे बरे?

चंद्रवर्माला समजेनासे झाले की ह्या क्षणाला आपण काय करावे? तेवढ्यात तलवार व भाले घेतलेल्या सैनिकानी झोपडीला चारी बाजूनी घेरले व दरडावित म्हणाले–"आत जे कोणी आहे त्यांनी ताबडतोब बाहेर यावे. नाहीतर त्यांना भाल्याने खुपसले जाईल." राजाच्या सैनिकाने दरडावून म्हटले.

चंद्रवर्मा बळ एकवटून धैर्याने झोपडीच्या बाहेर आला (क्रमश:)



# नत्कीरचा नोकर

**वि**क्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–" राजा या जगात कोणत्याही गोष्टीचे मुल्य ठरविणे अशक्य आहे. हेच पहां ना! तू एवढे श्रम करीत आहेस. त्याचे काय झाले. मला तर अशी शंका येत की, तू कोणत्यातरी अपरणीय व हितैषीचा सल्ला ऐकलेला दिसतोस अशाच चुकीमुळे राजसन्मान मिळालेल्या नत्कीर ह्या महाकवीला आपल्या स्वाभिमानाला वंचित होणे भाग पडले मी ह्याची गोष्ट तुला सांगतो लक्ष देऊन ऐक" असे सांगून तो गोष्ट सांगू लागला.

नत्कीर त्रिमलगीरी राज्याचा दरबारी कवी होता. राजाचा तो अत्यंत प्रिय होता.



एक दिवस जर त्याची भेट झाली नाही तर राजाला चैन पडत नसे.

नत्कीर जवळ असा एक खास गुण होता की, तो कोणाजवळही बोलत असला तरी दुसऱ्याला त्याचे ते बोलणें एक प्रकारे काव्यात्मक वाटत असे. आपल्या कुटुंबात पत्नीजवळ मुलांजवळ व इतर नोकरचाकरां बरोबर तो काव्य शैलीतच बोलत असे. त्या कारणामुळे सर्व नगरात त्याचा गवगवा होत असे.

जर कां दुसरा कोणी माणूस त्याच्या प्रमाणेंच बोलावयास लागला तर, चटकन् दुसरे लोक अवहेलना करीत त्याला म्हणत– "वाघाचे कातडे ओढून शेळी काही वाघ बनत नसते." हे वागणें फक्त नत्कीरलाच शोभून दिसते.

नत्कीरच्या घरी केशव नावाचा एक नोकर होता. त्याला साहित्याची अभिरुची होती. दुसऱ्या ठिकाणी त्याला जास्त पगाराची नोकरी सुद्धा उपलब्ध पण होती. नत्कीरचे बोलणे ऐकावे ह्या एकाच उद्देशानें तो त्यांच्या घरी नोकरी करीत होता. तो खुप कष्टाळू व हुषार होता.

केशवला जेव्हां केव्हां कामातून मोकळा वेळ मिळे तेव्हां तो साहित्याचे अध्ययन करण्यात घालवे नत्कीरच्या मुखातून जे जे बाहेर पडे ते तो मन लावून ऐके. नत्कीरला ते पाहून त्याचे खूप कौतुक वाटे व तो त्याला समजावून सांगे. अशा प्रकारे केशव सुद्धा कविता रचू लागला. तो जेव्हां घराबाहेर पडे तेव्हां भाजीवाल्यांशी जाणाऱ्या येणाऱ्या लोकांशी काव्य शैलीत बोलू लागे. काही लोक त्याच्या वाक्चातुर्यावर खुष होऊन त्याला म्हणत– "शेवट काय तू आहेस नत्कीरचा नोकर तुला काव्य आले नाही तर कोणाला येणार."

एक दिवस नत्कीर अचानक आजारी पडला. त्यामुळे तो राजदरबारात जाऊ शकला नाही. नत्कीरला वाटू लागले कि आपण गेलो नाही तर राजा वाट पहात राहील. तसा विचार करून त्यानें केशवला बोलावले व म्हटले– "अरे केशव, तू राजदरबारात जाऊन राजाला असे सांग की, आज चकोराकरीता अमावास्या आहे!"

कवी लोक म्हणत– "चकोर पक्षी नेहमी चंद्राची वाट पहात असतो. व चांदण्याना नेहमी आपले खाद्य बनवित असतो." इथे नत्कीर चंद्र आहे आणि राजा चकोर आहे. अमावास्येच्या दिवशी चंद्र दिसत नाही. ह्याचा अर्थ नत्कीर येणार नाही. हि गोष्ट त्यानें काव्य रुपात प्रकट केली केशवला ती ताबडतोब समजली.

केशवने राजाचे दर्शन घेत म्हटले– "हे चकोर आज तुमच्या करीता आमावास्या आहे. हि गोष्ट आपल्याला सांगण्याकरीता चंद्रमाने मला पाठविले आहे."

राजाला समजले की केशव नत्कीरच्या घरुन आला आहे त्यावर राजाने त्याला म्हटले– "तू जाऊन चंद्रमाला सांग की, मी अत्यंत आनंदी आहे."

केशवने समजुन मान डोलावली ते पाहून राजाने त्याला विचारले– "काय तुला माहित आहे कां? मी कोणत्या गोष्टी करीता आनंदी झालो आहे."

"कां नाही? तुम्ही स्वार्थी आहात!" केशवने झटक्यात उत्तर देत म्हटले.



ते उत्तर ऐकून राजाचा चेहरा रागाने लाल बुंद झाला. तो म्हणाला– "तू नत्कीरच्या घरी काम करतोस त्यामुळे तुला माझे बोलणे समजले असावे. पण मला असे वाटले नाही की तू माझ्या बोलण्याचा उलटा अर्थ लावशील. हे बघ माझ्या स्वार्थी-पणाचा बरोबर अर्थ सांगितला नाहीस तर तुला तुरुंगाची हवा खावी लागेल.

केशवने विनयपूर्वक निवेदन करीत म्हटले– "महाराज, आपण अमावस्येच्या बाबतीत विचार केला नाहीत. आता येणारा महिना शुक्लपक्ष आहे. त्यामुळे आपण असे समजुन खुष झाला आहात नां? की आज पासून चंद्राची दिवसेंदिवस वाढ होत

जाईल. ह्याकारणास्तव मी आपल्याला स्वामी म्हणून संबोधले.

केशवचे बोलणे ऐकून राजा प्रसन्न झाला व म्हणाला–"तू खराखुरा नक्कीरचा योग्य नोकर आहेस. तुझे बोलणे ऐकून मला खूप आनंद झाला. तू तर प्रथमच दरबारात आला आहेस. मग तू एवढे बोलण्याचे धाडस कसे काय केलेस ?"

"जर ते असे बनले तर माझा हात वरच राहील नां ! मला भीती कशाची वाटेल." केशवने उत्तर देत म्हटले.

राजाला त्याच्या बोलण्यातला संदर्भ लागला नाही राजा म्हणाला–"स्पष्ट सांग ते असे बनले म्हणजे काय ?"

"खरे म्हणजे आपण ह्या राज्याचे राजा आहात, पण सध्या माझा मालकच राजा बनला आहे. त्यामुळे माझा हातच उंच राहिला नां !" केशव म्हणाला.

त्याला माहित होते की, राजा ह्या शब्दाचा अर्थ सुद्धा चंद्रमा होतो. नक्कीरने सांगून पाठविले की, आपण चंद्रमा आहात.

राजाने केशवच्या हुषारीवर प्रसन्न होऊन त्याला योग्य ते चांगले बक्षिस दिले व म्हटले–"अमावास्येला दिव्याची जरूर असते. त्यामुळे तू येत जा."

केशवने घरी येऊन सर्व घडलेली हकीगत नक्कीरला सांगितली. नक्कीर रागाने म्हणाला–"काय रे तू काय माझ्याकडे काम करता करता स्वतःला पंडीत समजू लागलास कां? आजपासून तुझी मला जरूर नाही. तू ह्याक्षणी चालू लाग."

नक्कीरच्या रागापाठीमागे एक योग्य कारण होते. ते म्हणजे आजपर्यंत राजाने नक्कीर शिवाय दुसऱ्या कोणाची स्तुती केली नव्हती. त्यामुळे केशवची राजाने प्रशंसा केलेली ऐकताच नक्कीरच्या मनात त्याच्याविषयी ईर्ष्या उत्पन्न झाली.

केशवने नक्कीरच्या पाया पडत त्याला विनविले–"जर आपली आज्ञा असेल तर यापुढे मी कोणासमोर तोंड उघडणार नाही. पण कृपा करून मला ठेऊन घ्या."

थोड्या वेळाने नक्कीरचा राग शांत झाल्यावर तो म्हणाला–"एक आजपासून मी सांगितल्याशिवाय तू कोठेही तोंड उघडता कामा नये.

दुसऱ्या दिवशी सुद्धा नक्कीरला बरे वाटत नव्हते. त्यामुळे त्याने त्या दिवशी आपल्याकडील एका अर्धवट नोकराला निरोप देऊन पाठविले. राजाने त्या नोकराजवळ केशवच्या बाबतीत चौकशी केली. त्या नोकराने ती गोष्ट नक्कीरला येऊन सांगितली. ते पाहून केशवविषयी नक्कीरच्या मनात दुप्पट द्वेष निर्माण झाला.

अशातऱ्हेने चार दिवस होऊन गेले पांचव्या दिवशी तब्येतीला आराम वाटल्यावर नक्कीर राजदरबारात गेला. राजाने त्याच्या तब्येती विषयी चौकशी न करता केशवची खुशाली विचारली.

त्याच्या उत्तरावर त्याने खुषामतीने त्याला म्हटले–"सुंदर चंदनवृक्षाला आपल्या समोर ठाकलेले पाहून सुद्धा आपण चिंता कां करता चंदन तर आमच्या देहाला फासला जातो."

इथे नक्कीरला असे स्पष्ट करावयाचे होते की–आपण एक सुगंधीत चंदनवृक्ष आहोत आणि केशव त्याचा गंध प्राप्त झालेला एक माणुस आहे.

राजाला नक्कीरचे बोलणे ऐकून अत्यंत आश्चर्य वाटले. तो म्हणाला–"माणुस जे चंदन आपल्या अंगाला फासतो. तो तर त्या वृक्षाचे यश सर्वत्र पसरवत असतो. आपण तर अस्वस्थ होऊन मला भेटायला आला आहात !"

नक्कीर राजाची आज्ञा घेऊन चुपचाप तेथून निघून घरी आला व केशवला बोलावून घेत म्हणाला–"केशव, आजपर्यंत तुझी प्रतिभा मी जाणून घेण्याचा प्रयत्न केला नाही. मी आजपासून तुला माझ्या तोडीचा पंडीत बनवण्याचा प्रयत्न करेन. मागचे चार दिवस तुला माझ्याकडून जे दुःख सहन करावे लागले त्याची मला क्षमा कर."

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा ! नक्कीरसारख्या महान कवीने








आपल्या पदरी असलेल्या केशव नोकराजवळ क्षमा मागणे म्हणजे किती लाचारीचे आहे. परंतु एक गोष्ट मात्र खरी आहे की राजाने केशवची केलेली प्रशंसा पाहून नत्कीरच्या मनामध्ये त्याच्याविषयी द्वेषभावना जागृत झाली. हि गोष्ट महाकवी व केशव ह्याच्याशिवाय दुसऱ्या कोणास समजणे शक्य नाही जरी कोणी दुष्ट डाकू किंवा चोर कां असेना पण हा असा भाव त्यांच्यामधे दिसत नाही. परंतु तसल्या गोष्टी इतर लोकांच्या समोर प्रकट झाल्या तर मात्र लाज व भीती ह्याने मन कुंठीत होते. अशा स्थितीत महाकवी नत्कीर ह्याला आपल्या स्वभावाची लाज वाटू लागली व त्यामुळे त्याने नोकर कां असेना पण त्याच्याजवळ क्षमा मागितली. पण ही गोष्ट हास्यास्पद नाही कां? राजाने नत्कीरच्या जवळ जे बोलणे काढले त्यावरून नत्कीर इर्ष्या करणारा आहे हे स्पष्ट झाले. त्यामुळे त्याला केशवची क्षमा मागणे बरोबर आहे. या शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"असे समजणे चुक आहे की नत्कीरची ईर्ष्या तिसऱ्या माणसाला समजली असेल. परंतु राजाने हि गोष्ट टाळली नत्कीरने आजारी आहे हि गोष्ट सांगण्याकरीता केशवच्या ऐवजी दुसऱ्या अर्धवट माणसास धाडले आणि जेव्हां नत्कीरने उद्या सांगितले की चंदन वृक्ष व ते लावणारी व्यक्ति तेव्हां राजाला माहित होते तो स्वस्थ झाल्यावर दरबारात आला आहे. परंतु त्याने त्याला अस्वस्थ स्थितीत भेटावयास आला हे म्हटले आहे. त्या गोष्टीवरूनच समजते की नत्कीरने कां आपल्या नोकराची केशवची क्षमा मागितली.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# शापापासून मुक्ति

चंद्रमुख नावाचा एक गंधर्व पृथ्वी लोकात आला व जंगलात भटकू लागला. भटकतांना चुकून त्याचा पाय एका ऋषीच्या कमंडलूला लागला. त्या आवाजाने त्यांची तपस्या भंग झाली. त्यांनी अत्यंत क्रोधाने चंद्रमुखची निंदा करीत म्हटले—"अरे गर्विष्ठा, गंधर्वा तू माझ्या तपाचा भंग केलास. त्यामुळे तू राक्षस होशील आणि यापुढील आयुष्य नैमिषारण्यात घालवशील."

मुनींची शापवाणी ऐकताच चंद्रमुख उभा थरथरू लागला व मुनींच्या पाया पडत आपल्या अपराधाची क्षमा मागू लागला. त्यावर मुनी शांत होत म्हणाले—"तू ह्या जंगलात भटकत आहेस ह्या रस्त्यावरून जाणाऱ्या माणसांना पाहून तू कर्कश किंकाळी फोड तुझा आवाज ऐकूनच तो माणूस जागच्या जागी ठार होईल. नंतर तू त्याचे भक्षण कर. तुझे ओरडणे ऐकून सुद्धा जो कोणी माणूस न घाबरता जिवंत राहिल त्याच्या पासूनच तुझ्या शापाची मुक्ति होईल.

चंद्रमुख एक ब्रह्मराक्षस झाला व तो नैमिषारण्यातील मार्गावरच्या एका दाट झाडाच्या ढोलीत राहू लागला.

एका संध्याकाळी तो भुकेने कासावीस झाला असताना एक माणूस त्या रस्त्याने जाताना त्यानी पाहिला. त्याक्षणी तो जोरात किंचाळून ओरडला. ते ऐकताच तो माणूस घाबरून जाऊन धाडकन जमिनीवर कोसळला व मरण पावला. ब्रह्मराक्षसाने त्याला खाऊन टाकले व आपली भुक भागविली.

त्या घटनेनंतर तेथील आजुबाजुच्या गावातील लोकांना समजले की, ह्या जंगलात एक ब्रह्मराक्षस रहात आहे. त्यामुळे लोकांनी त्या रस्त्याने येणे जाणे बंद केले.

मुकुंद गोरे









ब्रह्मराक्षसाने ते झाड सोडले व तो तेथून निघून दुसऱ्या जंगलात गेला. तेथील एका झाडाचा आसरा घेऊन राहू लागला. परंतु तेथे त्याला बराच काळ मनुष्याचे मांस खावयास मिळाले नाही. त्यामुळे त्याची भुक खूप वाढली.

त्यामुळे त्याने दुसऱ्या एका जंगलात जाण्याचा विचार मनात आणला तितक्यात दुपारच्या सुमारास एक माणूस त्या पायवाटेने येत असतांना दिसला.

ब्रह्मराक्षसाला अत्यानंद झाला. तो एकदम किंचाळत त्याच्यासमोर येऊन उभा राहला तरी सुद्धा तो माणूस न घाबरता खाली मान घालून जाऊ लागला.

मुनीच्या सांगण्याप्रमाणे तो गंधर्व शापापासून मुक्त झाला व त्याला आपले पूर्वरुप मिळाले. त्याच्या बद्दल आपली कृतज्ञता प्रकट करण्याच्या उद्देशाने त्या आगंतुकाला भेटून त्यानी त्याला आपला वृतांत कथन केला. जर कां काही त्याला आपली मदत हवी असेल तर निसंकोच आपल्याकडे मागावी म्हणून सांगितले. त्या आगांतुक व्यक्तिने चंद्रमुखकडे एकदा पाहिले व विस्मयपूर्वक त्याला म्हणाला–"मी एक अव्वल दर्जाचा बहिरा आहे. तू माझ्या अगदी जवळ येऊन बोल. तेव्हांच मला ऐकू येईल.

हे उत्तर ऐकताच चंद्रमुखला समजले की, आपण इतके कर्णकर्कश ओरडलो तरी सुद्धा हा शांत कसा व मेला कसा नाही. ते पाहून गंधर्वाला हंसू आले. त्याच्या शापमुक्तिचे कारण म्हणजे तो यात्री बहिरा होता. तेव्हां त्याने त्याला चांगले ऐकू यावे ह्याची योजना केली व त्याला सर्व घडलेली हकीत सांगितली.

आपल्याला बहिरेपणापासून मुक्ति मिळाल्यामुळे तो माणूस चंद्रमुखच्या पाया पडला व त्याला साष्टांग नमस्कार घालत म्हणाला–"महाराज आपले दुर्भाग्य माझे भाग्य ठरले."

चंद्रमुखने स्विकृती सुचक मान हलवली व तो गंधर्व लोकात निघून गेला.





आपली देवळे :

## मीनाक्षीचे देऊळ

कोण्या एकाकाळी देवराजा इंद्र पृथ्वी-लोकात आला. व एका सुंदर रानातून हिंडू लागला. तेथे असलेल्या एका सुंदर रमणिय जागेत त्याने परमेश्वराची ध्यान-धारणा केली व त्या प्रदेशाला पवित्रता मिळवून देऊन तेथून निघून गेला.

ह्या गोष्टीनंतर थोडथा दिवसाने एक राजा शिकार करण्याकरीता त्या ठिकाणी आला परंतु त्याचा शिकार करण्याचा उत्साह हळूहळू मावळू लागला. त्याचे मन शांती व देवाची भक्ति ह्या भावनाने उंचबळून आले. त्याने मनामध्ये आपली राजधानी त्या जागेत आणण्याचा विचार केला.





त्या दिवशी रात्री राजाला एक स्वप्न पडले. स्वप्नात त्याने त्या जागेत भयंकर पाऊस कोसळत आहे व शंकर पाऊस पाडतो आहे असे पाहिले दुसऱ्या दिवशी राजाने आपली पूर्व राजधानी तेथे नेली. व त्या नवीन राजधानीचे नामकरण मदुरा केले.












काही काळानंतर त्या राजाला एक मुलगी झाली. तीचे अतिशय सुंदर टपोरे माशाच्या आकाराचे डोळे होते म्हणून तिचे नाव त्यानी मिनाक्षी असे ठेवले. राजाची ती एकुलती एक मुलगी होती.

लहान वयातच राजकुमारी मीनाक्षीने सर्व विद्यात प्राविण्य संपादन केले. तारुण्य प्राप्त होताच राजाने तिचा राज्याभिषेक केले. आपल्या वडिलांच्या मृत्यु पर्यंत राजकुमारीने मोठ्या दक्षतेने सर्व राज्यकारभार नीट सांभाळला.





मीनाक्षीराणीचे वैभव पाहून आजु-बाजुच्या देशांचे राजे तिच्या वैभवावर जळू लागले व ईर्ष्या करू लागले. पूर्वी ज्या ज्या लोकांच्या मनात शंका होती की एक बाई राज्यकारभार काय करणार ते लोक सुद्धा तोंडात बोटे घालू लागले. व तिची प्रशंसा करू लागले. ते पाहून आजुबाजुच्या राजांनी तिच्या राज्यावर हल्ला केला.

राणी मीनाक्षीने स्वत: जातीने सैन्याचे नेतृत्व करून शत्रू सैन्याला सळोकीपळो करून सोडले. तीने विजेच्या गतीने सैन्यांशी मुकाबला केला. त्यामुळे कोणी तिच्या समोर टिकाव धरू शकला नाही. सर्व शत्रू सैन्य वावटळी सारखे इकडे तिकडे सैरावैरा पळून गेले.





शत्रू सैन्यांशी हल्ला करीत करीत मीनाक्षी आपल्या राज्याची सरहद्द पार करून जवळच्या जंगलात आली. तिथे तिची एका अपरिचीत माणसाशी गांठ पडली. तिने त्याला डोळे विस्फारून पाहिले व आपल्या घोड्याला लगाम घालून थांबवले.

मीनाक्षीची ज्या अपरिचीत माणसाशी गांठ पडली ते साक्षात् परमेश्वरच होते. शंकराचे दर्शन होताच. तिला मनोमन साक्षात्कार झाला की आपण पार्वतीचा अंश आहोत. लगेचच मीनाक्षी व सुंदरेश्वर ह्यांचा विवाह थाटामाटात पार पडला.














जेव्हां जनतेला समजले की, राणी मीनाक्षी पार्वतीचाच अवतार आहे. तेव्हां सर्वजण तीची पुजा करु लागले. जेव्हां तीने आपल्या शरिराचा त्याग केला. तेव्हां तिची प्रतिमा बनवून लोक तिची पुजा करू लागले. मदुरा मीनाक्षीच्या देवळाच्या आत बाजुलाच सुंदरेश्वराच्या मूर्तीची सुद्धा प्रतिष्ठापना केली आहे.

मदुरा मीनाक्षीचे देऊळ अतिशय प्रचंड आहे. उंच उंच गोपुरे हजारो खांब, मांण्डव व त्यात सुप्रसिद्ध अनेक शिल्पकृती याने हे देऊळ अत्यंत शोभायमान झाले आहे.





आपल्या देशातच नाही तर सर्व विश्वातील अत्यंत प्राचिन शहरातील प्रसिद्धी पावलेले हे मदुराई मधील मीनाक्षीचे देऊळ आहे. वर्षभर देशदेशातून यात्रेकरु ह्या गावांत येतात. भक्तांच्या भक्ति एवं रसपूर्ण गीतांच्या ध्वनीने हे देऊळ सदा दुमदुमलेले असते.



# आदर्श व्यक्ति

राजापुर नावाच्या गावात राधाबाई व गोविंद नावाचे एक जोडपे रहात होते. गोविंदचा गावांत चांगला गवगवा होता. परंतु राधाबाईची सर्वजण घृणा करीत असत. ह्याचे एकच कारण होते ते म्हणजे तिची बडबड मुर्खपणा व हट्टी स्वभाव.

राधाबाईची मोठी मुलगी लग्नायोग्य झाली होती. परंतु लग्न काही जमत नव्हते. हुंडापांडा व मानपान करणारे हे संपन्न कुटूंब असून सुद्धा मुलीला कोणी मुलगा बावयास तयार होईनां ! त्यामुळे राधाबाईना अत्यंत वाईट वाटे त्या मनांत म्हणत. आपल्या एका उपवर मुलींचे लग्न ठरत नाही तर इतर अनेक तरुण मुलींचे काय हाल होत असतील.

राधाबाईना ठाऊक होते की, आपल्या पतीचे गावात बऱ्यापैकी नाव आहेत. व सर्वजण त्याचा आदर करीतात. फक्त आपला सर्वजण द्वेष करतात. जर आपण आपल्या नवऱ्याप्रमाणे वागलो असतो तर मुलींच्या लग्नाची विवचना आपल्याला पडली नसती व सहजतेने लग्न जमले असते.

ह्याच विचाराने तिने आपल्या पतीस म्हटले–"अहो, तुम्हांला तर सर्व गावातील लोक मान देतात. तुमचा नाव लौकीक सुद्धा आहे. माझ्या मनात सुद्धा तुमच्यासारखे नाव कमावण्याची इच्छा आहे. तेव्हां मला काय करावयास पाहिजे. काही उपाय सांगा नां !"

पत्नीच्या मुखातून पडलेले उद्‌गार ऐकून त्याला एकदम अमृताहुनी गोड वाटले कारण मागची कैक वर्षे तो तिच्या तोंडाळ पणाला पुरता वैतागला होता. गावकऱ्यांकडून तिला बसलेल्या अनेक शिव्या तो बायकोच्या वागण्यामुळे ऐकून घेऊन गप्प बसत होता.

सविता पाठक



गोविंदने अत्यंत आनंदाने तिला म्हटले– "काय ग कोणत्या अज्ञात देवतेने तुझ्यात इतका बदल घडवून आणला पण एक मात्र लक्षात ठेव सर्वांशी मैत्री करताना जर कां आपल्या यथाशक्ति प्रमाणें तू सर्वांना मदत करीत गेलीस तर आपोआप तुला लोक मान देऊ लागतील.

राधाबाईना आपल्या नवऱ्याप्रती अत्यंत गाढ विश्वास होता. तिला ठाऊक होते की नवरा व्यवहारज्ञानात चाणाक्ष आहे. त्यामुळे तिने दुसऱ्याच दिवशीपासून आजुबाजुच्या लोकांबरोबर नोकरांबरोबर शांततेने वागण्याचे ठरविले. त्याचबरोबर तिने दुसऱ्यांना मदत करण्यांचा हातखंडा सुरू केला. असे बरचे दिवस उलटले परंतु तिला आपल्याबद्दल लोकांची काय प्रतिक्रिया झाली हे पाहण्याची उत्सुकता वाटू लागली. तिला प्रथम शेजारीपाजारी आपल्याबद्दल काय बोलतात हे पहायचे होते. कारण तिने मागेचे बरेच दिवस शेजाऱ्यांना खूप मदत केली होती.

राधाबाईच्या शेजारी कामाक्षी नावाच्या बाईचे घर होते तिच्या घरी आजुबाजुच्या सर्व बायका दुपारी एकत्र जमुन गप्पाटप्पा करत होत्या एक दिवस स्वतःच्या नावाचा उल्लेख झालेला पाहुन राधाबाई भितीला कान लावून संभाषण ऐकू लागल्या.

त्यातील एकजण म्हणत होती–"राधा-बाईच्या वागण्यात एकदम एवढा बदल कसा घडून आला समजत नाही कारण काय माहीत आहे ? त्या दिवशी चुकून गरम कॉफी माझ्या हातावर सांडली व मी अत्यंत वेदनेन विव्हळत होते तेव्हांच त्या माझ्या घरात शिरल्या माझ्या हाताला फक्त औषधच लावले नाही तर माझा सर्व स्वयंपाक पण करुन गेल्या.

दुसरी बाई म्हणाली–"अग, तेवढेच काय ! काल तर सर्व लहान मुले खेळत खेळत त्यांच्या दारापाशी गेली व जोर-जोरात आरडाओरडा करू लागली. तेव्हां तीने नुसते बाहेर डोकावले व हसत आत निघून गेली. ह्यापूर्वीतर मुलांनी तिच्या दारासमोर दंगा केला तर ती त्याच्या पाठीमागे काठी घेऊन धावत असे. हे तर मोठे विलक्षणच आहे म्हणावयाचे."

अशा प्रकारे त्याचे बोलणें चालू होते. तेव्हां त्यातील एक म्हातारी हळू आवाजात म्हणाली–"हे सारे प्रकार पाहून तर वाटू लागले आहे की, ह्यात काहीतरी गुढ असावे. आपल्याला सावध राहीले पाहिजे. तिच्या मुलीचे लग्न जमवणें म्हणजे एक कठीण काम झाले आहे. आणि त्याच बरोबर सध्या त्यांच्या शेतात पिक सुद्धा चांगले होत नाही.

हे ऐकल्यावर क्षणभर राधाबाईना डोक्यावर कोणीतरी धोंडा मारल्या सारखे झाले. आणि विचार करु लागल्या की, आपण आजपर्यंत शेजारपाजऱ्यांना जी फुकट मदत केली ती सर्व पाण्यात गेली.

शेजाऱ्यांचे बोलणें ऐकल्यानंतर तिला आता नोकरचाकरांच्यात व लहान मुलाच्या मनात आपल्या विषयी काय भाव निर्माण झाला हे जाणण्याची उत्सुकता लागून राहीली.

आणि कर्मधर्म संयोगाने तिला आपल्या परसात मोलकरीण सखू व तिचा नवरा सखाराम ह्यांचे बोलणें ऐकावयास मिळाले. ते ऐकून ती क्षणभर आवाक् झाली.



मागच्या ऐके दिवशी मोलकरीण सखूनी तीचे एक सुंदर कांचेचे भांडे खाली पाडून फोडले होते. ह्यापूर्वी ती असे करती तर राधाबाईनी आकाशपाताळ एक केले असते परंतु तसे न करता तीने समजुतीने घेऊन मोलकरीणीला न रागावता सोडून दिले होते.

सखूने जाऊन हे घडलेले आपल्या नवऱ्यास निवेदन केले व विचारले–"काय हो, मालकिणीच्यात हा एकदम बदल कसा काय झाला ?"

सखाराम थोडा विचार करीत म्हणाला– "गडगडण्यापूर्वी ढग खूप सुंदर दिसतात ह्याच आठवड्यात मी एक-दोन चुका केल्या तरी मालकीण काही बोलली नाही.








नाहीतरी कशी खवळून अंगावर येते तिचा काही भरवसा नाही. त्यापेक्षा आपल्याला दुसरी नोकरी शोधणे योग्य आहे. ह्यातच आपला चांगुलपणा आहे.

राधाबाईना आपल्या मुलाचे वागणें सुद्धा असेच विचित्र वाटले. ह्यापूर्वी तर ती कोणत्याही छोटयाश्या गोष्टी करीता त्यांना मारझोड करी. पण आता एकदम शांत झाली होती. त्यामुळे मुलाना तर वाटले आता कुठला पहाड आपल्यावर कोसळणार आहे. आणि ती आपल्या आई पासून दूर दूर राहू लागली होती.

राधाबाईने ह्यावर खूप मनांत विचार केला. पण तीला काही उलगडा झाला नाही. तिने हे सर्व आपल्या नवऱ्यास बोलून दाखविले.

सर्व घडलेले ऐकून गोविंद आपल्या पत्नीस म्हणाले–" अग ऐक, निराश होऊ नकोस व्यवहार करतानांच चांगले नाव व यश तुझा शोध काढीत येतील. त्याचा शोध काढावयास तुला जायचीं जरूरी नाही. आणि एक गोष्ट पण सत्य आहे. जो जो कामे तू करत रहाशिल त्याचे तावडतोब यश मिळावे असे जर मनात आणेलस तर निराशाच पदरी येईल. सर्वात चांगली गोष्ट अशी आहे की, चांगले काम करताना त्याच्या बदली काही मिळेल ह्याची आशा कधी ठेऊ नकोस.

आपल्या पतीचे म्हणणे ऐकून राधाबाई चांगल्या वागू लागल्या व त्यानी आपल्या चांगल्या वागण्यावर लोक काय म्हणत असावेत हा विचार करणे सोडून दिले, त्याच बरोबर दुसऱ्यांना अडी-अडचणीला मदत करू लागल्या.

ह्याच कारणांनी काही दिवसांनी हळूहळू लोकांची पण राधाबाई प्रती शंका दूर होऊ लागली. व गोविंद बरोबर राधाबाईना सुद्धा सर्वजण आदर्शव्यक्ति म्हणू लागले.

आणि ह्याचा एक फायदा झाला की, त्यांच्या मुलीचे लग्न चांगले स्थळ मिळून थाटामाटात पार पडले.






शंकर व विष्णू दोघांनी आपल्या आयुधांची अदलाबदल केली आणि जलंधराची वाट पाहू लागले.

नारदाला ती गोष्ट कळली तेव्हां तो जलंधराला भेटून म्हणाला–" जलंधरा ! अरे शिव व विष्णू मानस सरोवरात लपून बसले आहेत."

तेव्हां जलंधर लगेच मानससरोवरात शिरून शंकर व विष्णू दोघांना शोधू लागला. ते कळताच ते दोघे पाण्यातून बाहेर आले आणि मानस सरोवराच्या काठावर जलंधराची वाट पहात बसले. त्या वेळी शंकराच्या हातात चक्र आणि विष्णूच्या हातात त्रिशूल होते. दोघांनी आपापली आयुधे धारण केली.

मानस सरोवर हुडकल्यावर देखील जेव्हां शंकर व विष्णू दिसले नाहीत तेव्हां जलंधर बाहेर आला. त्याने काठावर दोघांना पाहिले. व तो त्यांना मारायला धावला. त्यांनी दोघांनी मिळून जलंधरचे दोन तुकडे करून टाकले. जलंधरचा वध झाल्यावर त्रिलोकात सर्वत्र आनंदीआनंद पसरला.

कश्यप प्रजापतीला विप्रजित नावाचा एक राक्षस मुलगा होता. विप्रजिताला दंभ नावाचा मुलगा होता. दंभ हा विष्णूचा भक्त होता. त्याला बरेच दिवस मुलबाळ नव्हते. म्हणून तो बद्रिकाश्रमात विष्णूचे स्मरण करून तपश्चर्या करू लागला.

## ११. शंखचूडाचा राज्यकारभार












विष्णूने त्याच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन वर मागायला सांगितले तेव्हां तो म्हणाला–"देवा! मला आपल्या बरोबरीची शक्ति व सामर्थ्य असलेला पुत्र होईल असा वर द्यावा, विष्णुने 'तथास्तु' म्हटले.

त्रिलोक जिंकण्याची शक्ती त्याच्या अंगी असावी. तो अजिंक्य असावा सर्वगुण संपन्न असावा त्याच बरोबर आपला परमभक्त असावा आणि अंतर्धान पावला. दंभ आपल्या घरी परतला व ती शुभवार्ता त्याने आपल्या पत्नीस सांगितली. त्यानंतर यथासमयी त्याच्या बायकोस एक पुत्ररत्न झाले. त्याचे नाव शंखचूड असे ठेवण्यात आले. मुलाचे सर्व लाड आईवडिलांनी पुरविले. शंखचूडने शुक्राचार्याकडे सर्व विद्या शिकून घेतल्या. वयात आल्यावर तो विन्ध्य पर्वतावरील अरण्यात राहू लागला. त्याने ब्रह्मदेवाचे स्मरण करून निर्जल अनशन व्रत घेतले आणि एका पायावर उभा राहून तपश्चर्या करू लागला. तेव्हां प्रसन्न होऊन ब्रह्मदेवाने त्याला वर मागून घेण्यास सांगितले.

तेव्हां शंखचूड म्हणाला–"हे भक्तश्रेष्ठा, तू बदरिकाश्रमात जाऊन रहा. तेथे तुला तुलसी नामक कन्या तपश्चर्या करीत असलेली दिसेल. तू तिच्याशी विवाह करून घेऊन सुखपूर्वक आपले पुढील आयुष्य घालव." असे सांगून ब्रह्मदेव अंतर्धान पावला.

ब्रह्मदेवाकडून वर मिळाल्यानंतर शंखचूड त्याच्या आज्ञेप्रमाणे बदरिकाश्रमात आला आणि तेथे त्याने तपश्चर्या करीत असलेल्या तुलसीला पाहिले. तिला पाहून तिच्या सौंदर्यावर तो भाळला देहभान विसरला आणि तिच्याजवळ जाऊन त्याने तिला विचारले–"हे सुंदरी! तू कोण? कोणाची मुलगी? आणि तू या रानावनात एकटी कशी?" मला सविस्तर सांग.





तुलसी देखील शंखचूडच्या रूपलावण्यावर मोहित होऊन त्याच्याकडे आकृष्ट झाली आणि कौतुकाने पाहू लागली. थोड्यावेळाने भानावर येत ती म्हणाली– "मी धर्मध्वज नावाच्या राजाची कन्या आहे. माझे नाव तुलसी. एक थोर पुरुषाशी विवाह व्हावा व एक पतिव्रता असा कीर्तिलाभ व्हावा म्हणून मी तपश्चर्या करीत आहे. परंतु आपण कोण ?" हे सुद्धा मला समजले पाहिजे.

"मी दंभ नामक दानव राजाचा मुलगा आहे. माझे नांव शंखचूड असे आहे. मी ब्रह्मदेवाचे स्मरण करून तपश्चर्या केली. आणि त्रिलोक जिंकण्याच्या वर मिळविला आहे. ब्रह्मदेवानेच मला तुझ्याशी विवाह करून घेण्यास आज्ञा केली आहे. आपण दोघे लग्न करून घेऊ व सुखाने पुढील आयुष्य घालवू."

त्यानंतर दोघांनी गांधर्व विवाह करून घेतला आणि काहीकाळ त्यांनी दऱ्याखोऱ्यात व रानावनात विहार करून घालवले. नंतर शंखचूड तुलसीला बरोबर घेऊन आपल्या घरी गेला आणि त्याने सर्व वृत्तांत आपल्या आई वडिलांना सांगून त्यांचा व गुरू शुक्राचार्यांचा आशिर्वाद घेतला.

नंतर दंभ राक्षसाने शुक्राचार्यांच्या सल्ल्याने त्याचा मुलगा शंखचूड याचा राज्याभिषेक केला. शंखचूड शुक्राचार्यांच्या सल्ल्याप्रमाणे राज्य कारभार करू लागला. त्याच्या कारकीर्दीत प्रजा सुखी झाली आणि 'बापसे बेटा सवाई' अशी कीर्ति शंखचूडला मिळाली.

एकदा काही दानव वीर आणि थोर मंडळी शुक्राचार्यांना पुढे करून शंखचूडकडे आली आणि म्हणाली–"हे दानवराज! ब्रह्मदेवाने तुला अनेक वर दिले आहेत. तुझ्या पूर्वजांवर इंद्राने आणि देवांनी अनेक अत्याचार केले आहेत. ते 'शत्रु ऋण' फेडण्याची जबाबदारी तुझ्यावर आहे. म्हणून स्वर्गावर स्वारी कर आणि इंद्राचे आसन हस्तगत करून घे."

शंखचूड शुक्राचार्यांना म्हणाला– "गुरुवर्य! स्वर्गावर स्वारी करण्यासाठी शुभ मुहूर्त ठरवावा." शुक्राचार्यांनी सांगितलेल्या मुहूर्तावर शंखचूडने स्वर्गावर स्वारी केली.

इंद्राला त्याच्या हेरांकरवी शंखचूड स्वारी करण्यास येत असल्याचे वृत्त कळले होते. म्हणून इंद्राने कुमारस्वामी व इतर देवांच्या सल्ल्याने युद्धाची तयारी सुरु केली.

देव व दानव यांच्यामध्ये लागोपाठ चाळीस दिवस युद्ध चालू होते असे वाटू लागले की देव माघार घेणार कारण काय तर दानवांचा उत्साह तर वाढतच होता. म्हणून देवांनी पाय काढायला सुरवात केली.

आपले सैन्य पळू लागलेले पाहून व आपला पराभव होणार हे ओळखून इंद्राने ब्रह्मदेवाकडून शंखचूडला मिळालेल्या वराचे स्मरण करून आपले सैन्य मागे घेतले आणि शंखचूडाकडे जाऊन म्हणाला–"तू कश्यप मुनींच्या रूपाने जन्मला आहेस. मी तुझ्या शौर्य पराक्रमावर संतुष्ट झालो आहे, तूच त्रिलोकावर राज्य कर. आम्ही सर्व तुला मदत करू."

तेव्हां शंखचूड म्हणाला–"इंद्रा! तूच आजपासून माझा प्रतिनिधि म्हणून माझ्या आज्ञेप्रमाणे स्वर्गाचा राज्यकारभार पहात जा."

त्यानंतर शंखचूडने तो त्रिलोकाचा अधिपति झाल्याची घोषणा केली आणि आपली राजधानी शोणितपुर येथे परत आला. तेथूनच तो त्रिलोकावर आपली सत्ता गाजवू लागला. इंद्रादिक देव त्याच्या आज्ञेप्रमाणे त्याचे सेवक म्हणून राज्य कारभार पाहू लागले.

परंतु यज्ञयाग चालूच होते आणि यज्ञात इंद्राच्या नावानेच हवि देणे चालू होते. म्हणून शंखचूडने आपल्या दानव अनुयायांना आज्ञा केली की ब्राह्मण यज्ञाचा हवि इंद्राऐवजी दानवांना समर्पित करीत नाहीत








तोपर्यंत त्यांना नानाप्रकारे त्रास देऊन त्यांच्या यज्ञांचा भंग करावा.

आपल्या राजाच्या आज्ञेप्रमाणे राक्षसांनी यज्ञकार्यात विघ्ने आणून हाहाकार उडविला. तेव्हां ऋषी मुनी विष्णूकडे गेले आणि विनंती केली–"भगवन्! शंखचूड राक्षसांच्या अत्याचारामुळे पृथ्वीवर हाहाकार उडाला आहे. त्याचे पारिपत्य करण्यास तूच एक समर्थ आहेस. तूच आमचे रक्षण कर." आम्ही तुला शरण आलो आहोत.

विष्णू म्हणाला–"शंखचूडचा जन्म माझ्या अंशरुपाने झालेला आहे. तुलसीचा जन्म लक्ष्मीच्या अंशरूपाने झाला आहे. म्हणून शंखचूडाचा वध करणें मला शक्य नाही. तुम्ही शंकराला शरण जावे. तेव्हां सर्व ऋषीमुनी धावत शंकराकडे गेले व याचना करत म्हणू शरण आले.

विष्णूच्या सल्ल्याने ऋषी शंकराच्या दर्शनासाठी कैलास लोकी गेले आणि हात जोडून शंकराला विनंती केली–"देवाधिदेवा, महादेवा! शंखचूडाच्या अत्याचारांपासून तूच आमचे रक्षण कर."

शंकराने शंखचूड आदि दानवांचे पारिपत्य करण्याचे वचन देऊन त्यांना निरोप दिला. व सर्वांना पाठवून दिले.

ते कळल्यावर कळीचा नारद शंखचूडाकडे गेला व म्हणाला–"शंखचूडा! शंकराने तुझा वध करण्याचे वचन ऋषिमुनींना दिले आहे. रुद्रगण तुझ्यावर स्वारीला येतील त्यापूर्वी तू कैलासावर स्वारी करून शंकराचा पराभव कां करीत नाहीस?" लवकर लढा देण्याची तयारी कर.

शंखचूडाने नारदाच्या सल्ल्याप्रमाणें कैलासावर ससैन्य स्वारी केली. त्याला पाहून शंकराने नंदाला पाठवून भद्रकाली, भद्रगण तथा कुमारांना बोलावून घेतले. सर्व आल्यावर रुद्र व दानव यांचे युद्ध सुरू झाले.





# वजीरांची गुप्तचाल

कोण्या एका सुलतानाच्या दरबारात दहा वजीर होते. ते सदान्‌कदा एकाच विचारात मग्न असत की, सुलतानाच्या खजिन्यातील संपत्ती कोणत्या तऱ्हेने हडप करावी. त्याच बरोबर जनतेचे शोषण करण्याचा सदा प्रयत्न करीत. त्यामुळे हळूहळू राज्यात अंधाधुंदी माजू लागली.

त्या संधीचा फायदा घेऊन शेजारच्या राजाने सुलतानावर हल्ला केला. त्या हल्ल्यात सुलतानाच्या काही वजीरांनी शेजार देशच्या राजाला गुप्तरूपाने मदत सुद्धा केली.

किल्ला जेव्हां शत्रूसैन्याच्या ताब्यात गेला हि बातमी सुलतानाला समजली तेव्हां लाचार होऊन सुलतान आपल्या बायकोला व दोन वर्षाच्या लहान मुलाला बरोबर घेऊन गुप्तमार्गाने किल्ल्याच्या मागील दाराने बाहेर येऊन घोड्यावर बसून पळून गेला.

एक रात्र व एक दिवस प्रवास केल्यानंतर सुलतान एका वाळवंटी भागांत एका टोकाला असलेल्या झाडाझुडपात येऊन बसला व थकल्यामुळे तेथेच विश्रांतीसाठी थांबला जवळ असलेल्या वहात्या ओढ्यावर त्याने आपली तहान भागविली.

तेव्हां त्याला लांबवरून घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकू येऊ लागला. त्याक्षणी सुलतानाला काय करावे सुचेनासे झाले. त्याने आपल्या दोन वर्षाच्या मुलाला झोपलेले तसेच तिथे ठेवले व तो बायकोला ओढत घेऊन जाऊन झाडीत लपून बसला. सुलतानाने असा विचार केला की, डाकू असू दे, किंवा शत्रू सैन्य ते ह्या लहान मुलाला काही घेऊन जाणार नाहीत. त्यातून तो असा विचार करून घाबरला











की, मुलाला नेले व तेथे तो रडू लागला तर आपण लपलो ती जागा त्यांना कळेल व ते आपल्याला पकडतील.

क्षणात् काही डाकू तेथे येऊन पोहोचले व तेथे झोपलेल्या बालकाला पाहून त्या डाकूचा नायकाला अत्यानंद झाला अशा निर्जन प्रदेशात बालकाला पाहून त्याला त्याची दया आली. त्यांनी त्या मुलाला उचलले व ते निघून गेले.

थोड्यावेळाने तो सुलतान व त्याची बायको घाबरत झाडीतून बाहेर आले व तेथील आपले मुल नाहींसे झालेले पहाताच चकित झाले. सुलतानाची बायको उर बडवून घेत रडत सुटली. तेव्हां सुलतान बायकोची समजूत घालीत म्हणाला–"अग, आताच्या स्थितित तर आपल्या ठाऊक सुद्धा नाही अशा तऱ्हेने आपण किती दिवस जिवंत राहू ह्या वाईट स्थितीत आपल्या मुलाला कोणीतरी उचलून नेले आता एकच उपाय आपण आपल्या मुलाकरीता देवाकडे सांकडे घालू की देवा, आमचा मुलगा जिथे असेल तिथे सुखरूप राहू दे. दुसरे आता आपण काय करणार!"

नतंर थोड्या दिवसानी सुलतान आपल्या बायकोला बरोबर घेऊन आपल्या एका नातेवाईकाकडे गेला. तो सुद्धा भरपुर सैन्य बाळगुन असलेला एक सुलतानच होता. तेथे त्याने काही वर्षे घालवली नंतर त्या सुलतानाचे सैन्य घेऊन आपल्या राज्यावर हल्ला केला व गमावलेले राज्य परत मिळविले.

नंतर सुलतानाने आपला हरवलेल्या मुलाचा शोध करण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु काही उपयोग झाला नाही.

एकदा काही व्यापारी उंटावरून त्या वाळवंटी भागातून प्रवास करीत असताना दरोडेखोरांनी त्यांच्यावर हल्ला केला. व्यापाऱ्यांनी आपले प्राणपणास लावून युद्ध केले. त्या हल्लयात दोन्ही-बाजूचे बरेच लोक मरण पावले. तरी सुद्धा काही व्यापाऱ्यांनी दरोडेखोरांना कैद केले. व त्यांना सुलतानाच्या हाती सोपवले.

व्यापाऱ्यांच्या साहस व पराक्रमावर सुलतान बेहद्द खुष झाला. त्यांना मौल्यवान वस्तू भेटी दाखल दिल्या व त्या दरोडेखोरांना मृत्यु दंड फर्मावला.

त्या लुटारूना जेव्हां वधस्तंभाकडे घेऊन जाण्यात आले तेव्हां सुलतानाची दृष्टी त्यातील एक गौर वर्णाच्या तरूणावर पडली. त्याचे सौदर्य व रूप पाहून सुलतान त्याकडे आकृष्ट झाला. त्याने त्या तरूणाला स्वतःजवळ बोलावून घेऊन विचारले–"तू कोण आहेस? तुझे नाव काय?"

"मी दरोडेखोरांच्या नेत्यांचा मुलगा आहे. माझे नाव अजरूद्दीन आहे.

मी माझ्या दरबारात तुला नोकरी देईन तू तयार आहेस कां? सुलतानाने विचारले.

"मी जरूर करीन. यापुढे मी चोरी करणार नाही. आपली मोठी कृपा होईल माझ्यावर." अजरूद्दीन म्हणाला.

ह्यानंतर अजरूद्दीन सुलतानाच्या दरबारात काम करू लागला. बऱ्याच दिवसापर्यंत त्याचा कृपापात्र बनला व हळूहळू दरबारात मानाचे स्थान मिळवत शेवटी खजिनदार बनला. आता त्याच्या संमती शिवाय खजिन्यांतून एक पैसा सुद्धां बाहेर जाऊ शकत नव्हता.

हे सर्व पाहून दरबारातील इतर वृद्ध वजिर त्याच्यावर भयंकर नाराज झाले तो



येण्यापूर्वी ते सर्वजण मन मानेल तसे खजिन्यातील पैसे खर्च करीत होते. आता अजरूद्दीनमुळे त्यांच्या कामात व्यत्यय येऊ लागला त्यामुळे त्यानी त्याचा काटा वाटेतून काढण्याचा विचार केला.

सुलतान एकदा महालात नसलेला दिवस पाहून वजिरांनी त्याला जेवणाचे निमंत्रण केले व मेजवानी नंतर त्याला द्राक्षाची दारू पाजविली ती इतकी कि तो बेशुद्ध पडला. वजीरांनी त्याला उचलून नेले व सुलतानाच्या गादीवर नेऊन झोपविले व ते निघून गेले.

अर्ध्यारात्रीनंतर सुलतान बाहेरून शयननगृहात आला. व आपल्या गादीवर



दुसऱ्या कोणाला तरी झोपलेले पाहून रागाने लाल झाला. व त्यांनीं नोकरांना आज्ञा केली. की हा जो कोण इथे झोपला आहे त्याचा ठावठिकाणा काढा.

नोकरांनी सांगितले-"हुजूर कोणी तरी दारू पिऊन बेशुद्ध होऊन पडलेला आहे.

वजीराच्या मनांत होते की, त्याला तेथे झोपवून लपून पहावे की अजरुद्दीन बरोबर सुलतान कशा प्रकारे वागतो.

"हुजूर आपल्या गादीवर कोणी बेशुद्ध होऊन पडलेला दिसतो आहे. हा तर खरा अपराध आहे. ह्याला चांगलीच शिक्षा मिळाली पाहिजे." सर्व वजीर एकसुरात म्हणू लागले.

"ह्या दुष्ट माणसाला ठार मारा." सुलतान ओरडून म्हणाला.

"हो, हो, हेच न्यायाला अनुसरून आहे." मुख्य वजीर म्हणाला.

"हो हो! इतर सर्वजण मुख्य वजीराच्या म्हणण्याला दुजोरा देत म्हणाले.

अजरुद्दीन अद्याप बेशुद्धावस्थेत होता. काही जणांनी त्याला सुलतानाच्या पलंगा-वरून खाली काढले.

"आपल्यालाच सुलतान म्हणवून घेणा-ऱ्यांची चांगली अद्दल घडली जहांपनाह!" वजीर प्रसन्न होत म्हणाले.

अजरुद्दीनच्या चेहरा दिसताच सुल-तानाला अत्यंत आश्चर्य वाटले. तरी सुद्धा त्या स्थितीत त्यांना आपले म्हणणे मागे घेता आले नाही.

दुसऱ्या दिवशी पहाटे वधस्तंभापाशी सर्वजण जमा झाले. नोकरांनी अझरुद्दीनला बांधून तेथे आणले. तेवढ्यात जमावातून एक म्हातारा ओरडत ओरडत पुढे आला. व गद्गदलेल्या स्वरात त्याला म्हणाला- "काय रे, ह्या अवस्थेत तुला पहाण्याकरी-ताच कां मला देवाने जिवंत ठेवले." असे म्हणत उर बडवून घेत धाय मोकलून रडू लागला. व त्याला मिठी घालू लागला.

त्यावेळी ते दहा वजीर तेथे उपस्थित होते. त्यांनी जाणले की बहुदा हा म्हातारा त्या लुटारूंचा नेता असावा. त्याला बंदी करण्याची आज्ञा देऊन मुख्य वजीर धावत पळत सुलतानाजवळ आला. ते ऐकून सुलतानसुद्धा वधस्तंभापाशी आला.

सुलतानाला तेथे आलेले पहाताच तो लुटारूंचा नेता त्याच्या हातापाया पडत रडू भेकू लागला व म्हणाला-"हुजूर, मी एक डाकू आहे. मला मारून टाकून माझ्या मुलाला सोडून द्या. माझा मुलगा देवदूत आहे! तो मला देवाकडून मिळालेला आहे."

"प्रत्येक बापाला आपला मुलगा म्हणजे देवाची देणगीच वाटत असते" मुख्य वजीराने चेष्टेच्या सुरात म्हटले.

"हुजूर, जर का तो देवाची देणगी नसता तर मला तो निर्जन पहाडी प्रदेशात कसा काय मिळाला? अजरूद्दीन माझा मुलगा नाही तो मला पहाडी प्रदेशात सांपडला" डाकूच्या सरदाराने म्हटले.

"पहाडी प्रदेशांत? केव्हां आणि कोणत्या पहाडी प्रदेशात?" सुलतानाने विस्मयाने विचारले.

"डाकूच्या सरदाराने सुलतानाला सविस्तर सांगितले की, वीस वर्षापूर्वी हा दोन वर्षाचा मुलगा आपल्याला कसा मिळाला. सरदाराची गोष्ट ऐकल्याबरोबर सुलतानाला समजले की, अजरुद्दीन आपला हरवलेलाच मुलगा आहे. सुलतानाने त्याला आलिंगन केले तेव्हां त्याच्या डोळयातून आनंदाश्रू पाझरू लागले. त्याला आपल्या सर्व वजीरांनी केलेला कट समजला.

नंतर सुलतानाने आज्ञा केली की- "ह्या वजीरांना दुष्टांना उंच पहाडावरून खाली ढकलून मारून टाका."

"हुजूर! ह्या लोकांच्या अशा कट रचण्याचा आपल्याला चांगलाच फायदा झाला." अजरुद्दीनने आपल्या वडिलांना समजावत म्हटेल.

"तर मग ह्या वजीरांना तुरुंगात बंद करून ठेवा." सुलतानाने आज्ञा फर्माविली.

ह्यानंतर बापलेकांनी मिळून बरीच वर्षे जनतेच्या हिताच्या गोष्टी करून राज्य-कारभार केला.





# मुका

(मागील अंकावरून पुढे)

राजानी पुन्हां ज्योतिषांना बोलावले व विचारले–"मला जेव्हां मुलगा झाला तेव्हां तुम्ही त्या मुलाची जन्मकुंडली करून मला सांगितले की, ह्या मुलाच्या कुंडलीत सर्व शुभ लक्षणें आहेत. काहीही अशुभ होणार नाही. तुमच्या लोकांचे भविष्य शंभर टक्के खोटे निघाले. ह्याला तुमच्यापाशी काय उत्तर आहे?"

"महाराज, आपण अनेक व्रते करून पुत्रप्राप्ती मिळवलीत व त्या आनंदात आपला मुलगा अभागी आहे असे सांगणें आमच्या मनाला पटले नाही. त्यामुळे आम्ही खोटे बोलली." ज्योतिषि म्हणाले.

"मग आता काय करावयास पाहिजे?" राजाने विचारले.

"प्रभू! ह्या मुलगा जिवंत राहीला तर आपली राणीची व राज्याची हानी होईल. त्यामुळे एखादा अशुभ अशा रथाला अमंगल घोडे बांधून त्या रथात ह्या मुलाला बसवून पश्चिमेकडच्या दाराने स्मशानात घेऊन जाऊन तेथे ह्या मुलाला पुरा." ज्योतिष्यांनी सांगितले.

संकटाना घाबरून जाऊन राजाने त्यांचा सल्ला योग्य मानून शिपायांना आज्ञा केली.

हि गोष्ट ऐकून चंद्रादेवी राजापाशी जात म्हणाली–"महाराज, आपण काही वर्षांपूर्वी मला एक वर देण्याचे वचन दिले होतेत. तेव्हां कृपा करून आता मला वर द्या." माझ्या मुलाचा राज्याभिषेक करा!"

"हे कधीच शक्य होणार नाही. कारण तुझा मुलगा अनिष्ट जन्मकुंडली असलेला आहे." राजा म्हणाला.

"बर पण नेहमी करता नाही तर कमीत कमी सात वर्षे तरी त्याला राज्य करू दे." राणीने राजाला विनवित म्हटले.





राजाने राणीचे म्हणणे मान्य केलं नाही परंतु त्याला सात दिवस राजा बनवायचे कबुल केले.

चंद्रादेवीने तावडतोब आपल्या मुलाला राजोचित वस्त्रालंकार घालून सर्व नगराला सुशोभित केले. ह्यानंतर दवंडी पिटविण्यात आली की आज पासून तेमिय राजाचा राज्यकारभार सुरू होईल.

त्या दिवशी रात्री चंद्रादेवी आपल्या मुलाला जवळ बसवून घेत म्हणाली– "बाळ, मी तुझ्याकरीता सोळा वर्षे डोळ्यात तेल घालून जागत आलें आहे. डोळे मिटले सुद्धा नाहीत. तू काही नाही तर माझ्याकरीता तरी चांगला उठून हिंडू फिरू लाग नां बाळ! परंतु तेमियने काहीं सुद्धा चालना दिली नाही.

अशा प्रकारे सहा दिवस संपले त्यावर राजाने आपला सारथी सुनंद ह्याला बोलावून आज्ञा केली. तू उद्या एका अशुभ रथाला घाणेरडे घोडे जोडून तो रथ घेऊन ये. ह्यानंतर तू पश्चिमेकडच्या मार्गाने तेमियला त्या रथात बसवून स्मशानात घेऊन जा. तेथे एक चौकोनी खड्डा खणून त्यात तेमियला टाकून दे. नंतर तू नदीवर स्नान करून राजमहालात परत ये.

त्या दिवशीं रात्री चंद्रादेवी मुलाच्या अंगावर पडून रडत म्हणाली–"बाळा राजाने तुला मारून टाकण्याची आज्ञा केली आहे."

हा समाचार ऐकताच बोधिसत्वांना अत्यंत आनंद झाला. त्यांनी विचार केला की आजपर्यंत सोळा वर्षे जी आपण साधना केली ती लवकरच सफळ होणार. त्याची आई छाती पिटून रडत होती तरी सुद्धा त्याने तिच्या सांत्वना करीता सुद्धा तोंड उघडले नाही.

सकाळ होताच सुनंद रथ तयार करवून घेऊन आला व महालाच्या समोर उभा करून तो महालात गेला. राणीला म्हणाला–"महाराणी, हि गोष्ट तर तुमच्या पासून लपलेली नाही. राजाच्या आज्ञेचे पालन करणें माझे कर्तव्य आहे?".














त्यावर चंद्रादेवी राणी आपल्या मुलाच्या अंगावर पडून रडू लागली सारथीने तेमियला आपल्या हाताने उचलले व रथात ठेवून तो पश्चिमेकडच्या दाराने जाणार तेवढ्यात घोडे पूर्वेकडच्या दिशेने पळू लागले.

पूर्वेकडचे द्वार पार करून रथ तिन योजने लांब गेला. तोपर्यंत कोठेही थांबला नाही. तेथे गेल्यावर सुनंदला भ्रमत पडला की जवळच एक जंगल व रुद्रभूमी आहे. तो तावडतोब तेथे रथातून खाली उतरला त्याने तेमियचे सर्व अलंकार काढून एका फडक्यात बांधले व तेथेच एक चौकोनी खड्डा खणू लागला. बोधिसत्वांना मनात वाटू लागले की, आजपर्यंत सोळा वर्षं आपल्या कोणत्याच अवयवांना चालना मिळाली नाही. त्यामुळे ते उठून उभे राहीले व एकमेकांवर त्यांनी हात चोळले खाली वाकून पाय घासले व रथातून उतरून स्वतःचीच परिक्षा घेतली की आपण इथेतिथे चालू शकतो कां? आपल्या ताकदीची परिक्षा घेण्याकरींता त्यानी रथाच्या पाठीमागे जाऊन रथ हाताने उचलून पाहिला तो रथ चेंडू सारखा उचलला गेला.

त्यानंतर खड्डा खणणाऱ्या सुनंदला बोधिसत्वांनी विचारले–"काय हो, तुम्ही मोठ्या तन्मयतेने हा खड्डा खणता आहात. कशाकरीता?"

"आमच्या राजाचा मुलगा वेडा व अपंग आहे व मुका आणि बहिरा आहे. त्यामुळे त्याला येथे पुरून टाकण्याची मला राजाने आज्ञा केली आहे." सुनंदने पाठीमागे वळून कोण आहे हे न पहाताच उत्तर दिले.

"तू मला चांगले पहा, मी बहिरा नाही किंवा अपंग. तू मला पुरून टाकलेस तर तुला पाप लागेल." बोधिसत्व त्याला म्हणाले. सारथीने मान वर करून राजकुमारला पाहिले व तो आश्चर्य चकित होऊन त्याच्याकडे एकटक पहातच राहिला.

बोधिसत्वानी खरी खरी गोष्ट सांगितली तरी सुद्धा सारथी सुनंदचा त्यावर विश्वास बसला नाही. तो रथाच्या जवळ जात पाहू लागला परंतु तेथे राजकुमार किंवा त्याचे दागीने नसलेले पाहून त्याला खरे वाटू लागले. नंतर तो बोधिसत्वाच्या पाया पडत रडत म्हणू लागला. "अशा ह्या अवस्थेत महाराज आपल्याला ह्या भयानक जंगलात येण्याची आवश्यकता कां पडली? राजधानीला चला तुम्ही आमच्या राज्यावर वैभवाने राज्य करू शकता.

"मला राज्याची अजिबात जरुरी नाही. त्या करीता मला अनेक पापे करावी लागतील." बोधिसत्व म्हणाले.

"महाराज! आपल्याला बरोबर घेऊन गेलो तर आपले आई वडील अत्यंत आनंदित होतील. मला मौल्यवान भेट देतील." सारथी म्हणाला.

"वेड्या, मला कोणाच्या आनंदाची पर्वा नाही. आज माझ्या जन्माचे सार्थक झाले. मी संपूर्ण मनुष्य झालो आहे." बोधिसत्व म्हणाले.

"तर मग, महाराज आजपर्यंत आपण मुक्याचे बहिऱ्याचे नाटक कां केलेत?" सारथीने विचारले.

कोण्या एका काळात मी राजपदाचा नरकवास भोगला आहे. पुन्हां ते राजपद मिळून नरकयातना होतील ह्या भीतीने मी मुका बनलो माझ्या समोर माझ्या पित्याने चार लोकाना निरर्थकतेने कठोर शिक्षा केल्या त्या ऐकून माझे कान बहिरे झाले. मी एकदम बावळट बनलो. जो माणूस ह्या जिवनाला बुळबुळीत व दुःखमय समजतो. तो काय हे राज्य मिळविण्या करीता संतापेल. किंवा कोणाला दण्ड करेल. हे सत्य काय समजल्या शिवाय मानव अज्ञानी बनतो." बोधिसत्वानी त्याला समजावले.

ह्यावर सारथी म्हणाला–"महाराज, मला सुद्धा आपल्या बरोबर घेऊन चला."

"असे चालणार कसे हा रथ राजाचा आहे. हा राजाचा हाती सोपवा ते कर्तव्य पूर्ण करा. ते पूर्णकरून मग संन्यास घ्या. तोपर्यंत तुम्ही स्वतंत्र नाहीत." बोधिसत्व म्हणाले.





सारथी असा विचार येताच घाबरून गेला की आपण राजधानीला निघून गेलो तर बोधिसत्व जंगलात निघून जातील तेव्हां तो म्हणाला–"स्वामी, आपण मला असे वचन द्या. कीं, मी परत येई पर्यंत इथेच रहाल. मी राजाला जाऊन आपल्याला बरोबर घेऊन येईन. ते आपल्याला पाहून आनंदीत होतील.

"बोधिसत्वांनी सारथ्याच्या म्हणण्या-प्रमाणे तो नगरात जाऊन येई पर्यंत तेथेच थांबण्याचे वचन दिले." सारथ्यानीं बोधिसत्वांच्या पायाला स्पर्श केला व तो तेथून निघाला. खिडकीतून चंद्रादेवी राणींने पाहिले की रथ रिकामा परत येत आहे. तीं छाती पिटत रडू लागली. तिने सारथ्याला जवळ बोलावून घेत विचारले–"काय रे, माझ्या मुलांनी शेवटच्या घटकेपर्यंत सुद्धा तोंडातून एक शब्द देखिल बाहेर काढला नाही का? काय त्याने हातपाय सुद्धा हलवले नाही का?"

"महाराणी सरकार, राज्यपद मिळेल ह्या भीतीने त्यांनी तसे ढोंग केले. त्यांचा आवाज तर मधुर आहे. ते विवेकशिल व बुद्धिमान आहेत. त्यांनी साधारण जिव-नाचा त्याग करून दिव्य जिवनाचा मार्ग अवलंबला आहे. तुम्ही आता प्रत्यक्षच जाऊन पहा!" असे म्हणत चंद्रादेवीला सारी गोष्ट सांगितली. तिचे अश्रु आपो-आप बंद झाले. तिने तावडतोब जाऊन हा समाचार राजाच्या कानावर घातला.

राजाला क्षणभर देखिल राहवले नाही त्यांनी मोठा परीवार बरोबर घेतला व ते मुलाला पहाण्या करीत निघाले. ते लोक तेथे पोहोचण्या पूर्वीच इंद्राने बोधिसत्वा-करीता एक सुंदर पर्णशाला बांधण्याचा विश्वकर्माला आदेश दिला. राजा सर्व परिवारासह त्या पर्णशाळेपाशी पोहोचला.

बोधिसत्वांनी आपल्या पित्या करीता बसण्यास एक आसन बनविले. परंतु राजा त्याच्यावर बसला नाही. त्यांनी कोणत्या ना कोणत्या कारणाने राजकुमाराला राजधानीत घेऊन जाण्याचा मनाशी संकल्प केला व त्याला म्हटले–"बाळ, तू ह्या पर्णशाळेत कशाला रहातोस? जमिनीवर झोपणे. कंदफळेमुळे खाणे हे सर्व काय आहे? तुझ्या करीता अनेक महाल आहेत. नोकर-चाकर आहेत. विशाल राज्य आहे. त्यामुळे तू राजधानीला परत येऊन राज्यकारभार कर."

"बाबा, तुम्ही ज्या सुखभोगाची आशा ठेवता ती एक क्षणभगुंर आहे. मला तर त्या सुखसोईची अजिबात आवश्यकता नाही. आपण तर सदानकदा राज्य, सिंहा-सन ह्याच विषयी विचार करता परंतु आपल्या दृष्टीने एक गोष्ट मात्र आपली वाट पहात असते. एक तर आपण आपले काम करत राहातो. तिसरी गोष्ट संधी पाहून तीच आपल्यावर आक्रमण करते. स्थिर होऊन रहाणारी वस्तू म्हणजे वृद्धावस्था आहे. जी आपले काम आपण करते. ती एक वेळ आहे. प्रहार करणारी वस्तू मृत्यु आहे." बोधिसत्वानी सांगितली.

"बाळा, तुझ्या गोष्टी ऐकून तर माझ्या मनात जिवनाबद्दल विरक्ति निर्माण होऊ लागली आहे. मला राज्याचीं आवश्यकता नाही. मी तपश्चर्या करीन. तू माझ्या जागेवर राज्य कर" राजाने म्हटले.

मी सर्वस्वाचा त्याग केला आहे. अशा स्थितित मला आपले राज्य कशाकरीता असे सांगून तिथे जमलेल्या सर्व लोकांना त्यानी जिवनाचा काय अर्थ याचा बोध करून सांगितला. त्यांचा उपदेश ऐकून हळूहळू सर्वांनी संन्यास घेण्यास सुरवात केली व सारे नगर उजाड पडले.

काशी राजाचा संन्यास घेण्याचा वृत्तांत ऐकून दुसरा एक राजा तेथे आला त्या राजासह सर्व नगरवासी सुद्धा तेथे आले व सर्वांनी संन्यास घेतला अशा प्रकारे तीन राज्ये नाहीशी झाली. त्या राज्यातील सर्व प्राणी जंगली प्राण्यामध्ये बदलून गेले. तेथील सर्व संपत्ती माती समान झाली. काही कोणत्याही गोष्टीला किंमत राहीली नाही.















# राजाचा सत्कार

एका गावात गोविंद नावाचा एक तरुण रहात होता. तो खुप हुषार व चलाख होता. खेड्यातील जिवनात शाररिक कष्टाला अधिक प्राधान्य असायचे त्यामुळे गोविंदला सर्वजण गावातील नालायक समजत. त्याचा भाऊ व भावजय सुद्धा त्याच्या असल्या वागण्यावर चिडत असत. तरी सुद्धा गोविंद गावकऱ्यांना योग्य तो सल्ला देत असे. त्या सल्ल्यानुसार फायदा-सुद्धा होत असे. ती माणसे गोविंदच्या भावाला म्हणत–"तुझा धाकटा भाऊ गोविंद खुपच समजुतदार व गुणी आहे!"

आपल्या भावाच्या गुणांचे पोवाडे गाव-कऱ्यांच्या तोंडी ऐकून मोठा भाऊ अतिशय त्रासून जात असे. असेच एक दिवस गावकरी त्यांच्या संदर्भात सांगत असता त्याचा मोठा भाऊ त्यांना उद्देशुन म्हणाला– "गोविंद जर तुम्ही म्हणता तसा खरोखरीच बुद्धीमान असला तर राजदरबारात जाऊन राजसन्मान कां नाही मिळवित." "असाच योग्यतेचा तो माणुस आहे तर आम्हांला कसली आली आहे काळजी." त्याची वहिनी दादाच्या म्हणण्याला दुजोरा देत म्हणाली.

हि गोष्ट गोविंदने ऐकली त्याच्या मनात राजदरबारात नोकरी मिळविण्याची आशा कोंब धरू लागली. दरवर्षी वर्षाच्या सुरवा-तीच्या पहिल्या दिवशी राजा दरबारात उपस्थित असणाऱ्या अनेक नागरीकांना कैक प्रश्न विचारण्याची प्रथा होती. हा रिवाज कित्येक वर्षापासून चालत आलेला होता. त्या दिवशी राजा बऱ्याच वस्तू भेट, बक्षिस म्हणून पण देत असे. तो दिवस जवळच आला होता. म्हणून गोविंद राज-धानीला निघाला व बरोबर त्या दिवशी जाऊन पोहोचला व राजदरबारात गेला. राजाच्या प्रश्नांना समाधान कारक उत्तर देणाऱ्या माणसांना एका वेगळ्या जागेत बसवले होते. राजाने त्यांना सरळ प्रश्न विचारले.

"आपल्या राज्यात सत्याचरण करणारे किती लोक आहेत?" हा राजाने पहिला प्रश्न विचारला.

"राज्यात एकूण एक लाख सत्यवादी असावेत" एकाने असे सांगितले तर दुसरा म्हणाला–"आताच्या घटकेला दहा प्रतिशत लोक आहेत."

"महाराज, आपल्या अधीन काम करणारे पांचशे नोकर सत्याचरण करणारे आहेत" गोविंद म्हणाला.

"तू कसे काय सांगू शकतोस राजा म्हणाला.

"महाराज, जर कां त्यातील कोणी सत्याचरण करणारा नसता तर तुम्ही त्याना दरबारातून केव्हांच हाकलवून लावले असतेत!" गोविंद म्हणाला.

राजाने दुसरा प्रश्न विचारला–"माझ्या पसंतीचे वस्त्र मला कसे मिळू शकेल?

"जनता आपल्याला भेटी दाखल देईल!"

"कापसापासून मिळू शकेल!" अशा तऱ्हेने! प्रत्येकाने आपापल्या परीनें उत्तरे दिली.

"कुशल विणकर आपल्याला पसंत पडेल असे कापड आपल्याला विणुन देईल"



गोविंद म्हणाला. "तुम्ही तर असे खोटे बोला की, त्यावर कोणी विश्वास करणार नाही." राजा उत्तरला.

"माझे भयंकर डोके दुखते आहे." एक म्हणाला. "मी हवेत अधांतरी उडत होतो." दुसरा म्हणाला. "माझे पायतुटले आणि पुन्हां जोडले गेले." तिसराम्हणाला.

"ह्या सभेत उपस्थित असलेली सर्व माणसे म्हशी आहेत!" गोविंद म्हणाला.

अशा प्रकारे थोडा वेळ करमणुकीच्या गप्पा होत राहिल्या. नंतर राजाने बऱ्याच सभासदांना बक्षिसे दिली. त्यांच्या बरोबर गोविंदला सुद्धा बक्षिस देण्यात आले व विशेष रूपाने त्याला जेवणाला आमंत्रित

करण्यात आले. त्यात गोविंद बरोबर इतरानां पण आमंत्रणे होती.

राजदरबारातील सभा समाप्त झाल्यावर गोविंदने राजाकडून भेटी दाखल मिळालेले वस्त्र दुसऱ्या कोण्या एकाला देऊन टाकले व तो स्वत:चे वस्त्र धारण करून भोजनाला आला. तेथे राजाकडून प्राप्त झालेले कपडे परिधान करून इतर सर्वंजण उपस्थित होते. जेवतानां सुद्धा त्याने नेहमीचे साधे जेवण म्हणजे " भात भाजी चटणी ताक असेच घेऊन जेवण केले चांगली पक्वान्ने ह्याला हातही लावला नाही.

गोविंदच्या अशा विचित्र वागण्याचा समाचार तावडतोब राजाच्या कानावर गेला. त्याने गोविंदला बोलावणे घाडले व त्याला विचारले–" मी तुला भेटी दाखल दिलेली वस्त्रे तू परिधान कां केली नाहीस? भोजनाच्या वेळी तू पक्वान्ने खाल्ली नाहीस राजाला हे अपमान कारक नाही कां?"

" महाराज, मी गरीब आहे. आपल्याकडून मिळालेले हे उंची वस्त्र मी आता नेसले तर ह्यानंतर मला साधे कपडे घालण्याची इच्छा होणार नाही. त्यामुळे मी ते कपडे दान करून टाकले मी रोज भात भाजी खाऊन त्याची पेज पितो. अशा माणसाला पक्वान्नाची चटक लागली तर आमच्या मनात अनेक तऱ्हेच्या वैभवी लालसा उत्पन्न होऊ लागतील. त्यामुळे मी माझ्या प्रतिष्ठेप्रमाणे व्यवहार केला. ह्याकारणाने राजाचा अपमान करावा अशी वाईट बुद्धी माझ्या मनात अजिबात नाही" गोविंदने सांगितले.

" मी तुला सोन्याचे जे नाणे दिले ते सुद्धा तू दान करून टाकलेस कां?" राजाने विचारले.

" महाराज, मला सांभाळणाऱ्या माझ्या मोठ्या भावाला देण्याकरीता ते सोन्याचे नाणे मीजपून ठेवले आहे." गोविंदने उत्तर देत म्हटले. गोविंदच्या बुद्धीमत्तेवर अत्यंत प्रसन्न होत राजाने त्याला एक हजार सोन्याची नाणी बक्षिस म्हणून दिली व राजदरबारात त्याला एक चांगली नोकरी पण दिली.





# अमरोकी राकून

उत्तर अमेरिकेतील राकून प्राण्याच्या आहारा संबंधी म्हणजे अत्यंत मनोरंजन वाटण्या सारखे आहे. अस्वलाच्या जाती सारखी असणारी हि राकून स्वत:च्या खाण्याच्या शोधार्थ बाहेर पडतात. हे प्राणी छोटे छोटे पक्षी पक्षांची अंडी उंदीर मेंडक यांना पकडून खातात जंगलात जर भक्ष मिळाले नाही तर रान कोंबड्याच्या खुराड्यांवर झडप घालतात. त्यावेळी कोणत्याही संकटाची चाहूल लागली तर विजेच्या गतीने उडून झाडावर चढून जातात.

ह्या प्राण्यांचे पाय अतिशय निमुळते लहान असतात. त्यांच्या बोटांच्या मधे मांस अजिबात असत नाही. तरी सुद्धा ही वेगाने पोहू शकतात. नदीत डुबक्या मारून आपल्या पायांनी मासे पकडून वर येतात कोणतीही खाण्याची वस्तू असू दे मासे किंवा इतर पक्षी हे पाण्यात त्यांना घुतल्या शिवाय खात नाहीत हे त्यांचे वैशिष्ट्य आहे.

शेपटी सकट एक मिटर लांबी असलेली हि जनावरे कोण्या एका काळात अमेरीकेमध्ये खूप पहावयास मिळत होती. आजपर्यंत गरम कपड्यांकरीता उपयोगात आणली जाणारी कातडी ह्या राकून प्राण्यांचीच सर्वात मुख्य मानली जातात. शंभर वर्षांपूर्वी मिससीसी घाटात संपत्तीच्या बदल्यात ह्या राकून प्राण्यांची कातडी देण्याची वहिवाटी होती.

साधारणपणे झाडांच्या ढोलीत रहाणारे हे प्राणी केव्हां केव्हां इतर प्राण्यांप्रमाणे जमिनीतील भुयारात सुद्धा आपले वास्तव्य करतात.

शरद्ऋतुमध्ये अनुकुल अशा जागेचा शोध काढून थंडीच्या दिवसात तेथे हे प्राणी जातात व दिर्घकाळ झोपेच्या आधीन होऊन संपूर्ण थंडीचा काळ तेथे घालवतात. जेव्हां उन्हाळा सुरू होऊ लागतो तेव्हां पाण्याच्या गरम वाफेने जाग येऊन हे प्राणी मातीच्या भुयारातून बाहेर पडतात.



# चांदोबा

संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी

मनुष्याचे चांगले व वाईट गुणांचे कारण एकच असू शकत नाही. कारण एकाच तऱ्हेच्या कापडामध्ये वावरलेल्या काही माणसांचे स्वभाव चांगले असतात अगर वाईटही असतात. ह्याचे उदाहरण आपल्याला "पतन" ह्या गोष्टीत वाचायला मिळेल. त्याच बरोबर 'धाडसीसत्यपाल' ही गोष्ट वाचा.

## अमर वाणी

उद्धरत्युत्तमो वंशं, मध्यमः समुपेक्षते,
अधमस्तु कुले जातः, नाशयत्यखिलं कुलम् ॥

[उत्तम स्वभावाचा मनुष्य आपल्या वंशाची उन्नति करतो. मध्यम स्वभावाचा मनुष्य आपल्या वंशाविषयी कसलाही विचार करीत नाही. अधम स्वभावाचा माणूस आपल्या वंशाचा सर्वनाश करतों.]

वर्ष : ३५ फेब्रुवारी १९८६ अंक : ८

एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००



# चांदोबातील नवलाई



### उडत्या तबकड्या

ग्रहमंडळातून उडणाऱ्या तबकड्या (उडणाऱ्या वस्तू) नावांच्या काही वस्तु पृथ्वी जवळ येत आहेत कां? परंतु आपल्याला हि गोष्ट अद्यापपर्यंत निश्चितपणें सांगता येत नाही. तरी सुद्धा अमेरिकेतील एल्लेन क्रिस्टलचे असे म्हणणे आहे की अशा प्रकारची उडणारी वस्तु नेहमी तेथे दिसण्यात येते. ह्या वस्तूंचे कांठ लोखंडाचे बनवलेले आहेत व ती आपल्या भोव-ताली मेघांचे जाळे निर्माण करते त्याकारणामुळे आपण त्याचा फोटोही काढू शकत नाही.

### सोलार शक्तिच्या द्वारे चालणारी बोट



जपानच्या मिचहोरी नावाच्या एका नावाड्याने प्रथमत: सूर्याच्या शक्तिवर चालणाऱ्या नावेत बसून प्रशांत महासागर पार केला. होनोलूलू पासून ६,३०० किलोमिटर दूरवर असलेल्या चिचिजिमा च्या भागांत जायला एकूण ६५ दिवस लागले.

### एशियातिल सर्वांत मोठा पुल



एशियातील सर्वांत मोठा व जगातील लांबीत तिसरा नंबर येणारा हा पुल सध्या मलेशियात निर्माण केला आहे. १३.५ किलोमिटर लांबीचा हा पुल उत्तर पेनांग राज्याला मुख्य भुखंडाशी जोडला जातो.

## तुम्हांला माहीत आहे कां?

१. जगात सर्वात मोठी बुद्धाची प्रतिमा कोठे आहे?
२. बुद्धाचे दांत सुरक्षित ठेवलेले देऊळ कोठे आहे?
३. "पृथ्वी सूर्याभोवती फिरते" हा सिद्धान्त खरा दाखवून देण्याचा कामामध्ये धार्मिक अंधविश्वास ठेवून लोकांनी कोणत्या वैज्ञा-निकाला अपराधी बनवण्याचा प्रयत्न केला?
४. विलियम विलबर फोर्स नावाच्या मानवतावादीने कोणत्या हेतूने कार्यकेले?
५. एशियातिल कोणत्या देशात ख्रिश्चन लोक जास्त संख्येने रहातात?

# अंगारक

पुरातन काळात अंगारक नावाचा एक राक्षस रहात होता. त्याने अनेक राज्यात शिरून तेथील राजमहालातील अनेक स्त्रियांचे अपहरण केले. व कोण्या एका लांबवरच्या जंगलातील मध्य भागतील गुहेमध्ये बंदी केले.

त्याच सुमारास उज्जयिनीचा युवराज महासेन ह्याने पराशक्तिची घोर तपश्चर्या करून वराच्या रूपाने एक शस्त्र प्राप्त केले होते.

एकदा महासेन शिकारी निमित्ताने जंगलात गेलेला असतांना एका अस्वलाने त्यांची वाट अडवून त्यांचा रथ उलटवला. ते पाहून महासेनला आश्चर्य वाटले. त्याने रथातून उडी मारली अस्वलावर बाण सोडला परंतु अनेक बाण सोडूनही अस्वल जखमी झाले नाही. पळून गेले.

महासेनने संध्याकाळपर्यंत त्या अस्वालाचा शोध काढला. व शेवटी एका गुहेत पोहोचला. गुहेंच्या आत काही कुजबुज ऐकून तो क्षण दोन क्षण तेथेच थांबला.

"पिताजी, आपण जोपर्यंत अस्वलरूपाने रहाता तों पर्यंत कोणीही तुमची हानी करु शकणार नाही. परंतु आणखी काही काळाने तुम्ही स्वत:ला कसे काय वाचवू शकाल." एकाने बाईच्या आवाजात विचारले.

"तुला काळजी करण्याचे काही कारण नाही. कारण कोणत्याही शस्त्रांचा माझ्यावर काहीही परिणाम होणार नाही कारण हे शरिर दगडांचे आहे. माझा उजवा हात फक्त असुरक्षित आहे. त्यामुळे मी फक्त त्यावर रत्नांचे कवच घातलेले आहे." अंगारकाने उत्तर देत म्हटले.

तेव्हां महासेनाला सकाळ होईपर्यंत तेथेच वेळ काढला व पहाटे अंगारक जेव्हां गुहेच्या बाहेर पडला तेव्हां संधी साधून त्याने त्याच्या उजव्या हातावर वार करून तो कापून टाकला तो कापल्या बरोबर राक्षस मरण पावला.

ह्यानंतर महासेनने सर्व राजकुमारींना बंदीवासातून मुक्त केले. व अंगारकच्या सुंदर मुलीबरोबर लग्न केले.





# विनाशकाले विपरित बुद्धी

अरवली पर्वताच्या जवळ कृष्णचंद्र नावाच्या गुरूंचा आश्रम होता ते आपल्या पाठशाळेत अनेक विद्यांचे शिक्षण देत. त्या गुरूंनी सर्व तऱ्हेचे शिक्षण संपादन केले होते. ते स्वभावानी अत्यंत उदार होते. त्यांच्यांकडे शिक्षण घेण्याकरीता आजूबाजूच्या देशातून अनेक विद्यार्थी येत असत.

एके दिवशी संध्याकाळी आश्रमाच्या जवळच्या वडाच्या झाडापाशी गडबड चाललेली पाहून कृष्णचंद्र तेथे गेले. तेव्हां एका विद्यार्थ्याला इतर चौघेजण रागावून दम भरत होते. ते पाहून त्यांनी विद्यार्थ्यांना रागावण्याचे कारण विचारले.

एका मुलाने पुढे होत म्हटले-"गुरूदेव, आम्ही झाडाचे आंबे तोडून लपवून ठेवतो. ते हा रोज चोरून खातो. आम्ही त्याला सांगितले की आमच्याकडे मागून घे. परंतु त्याने एकदाही ऐकले नाही. व नेहमी अशीच चोरी करतो.

कृष्णचंद्रानी त्या अपराधी मुलाकडे पाहिले. तो जमिनीकडे मान खाली घालून स्थिर नजरेने पहात होता. आचार्यांनी सर्वांना आपल्या बरोबर आश्रमात येण्याची आज्ञा केली. सर्वजण आश्रमात येऊन बसल्यानंतर आचार्यांनी सर्वांना उद्देशून म्हटले-"निसर्गत: अत्यंत चंचल असे पाणी आहे. त्याला थोडी जरी संधी मिळाली तरी ते पाणी वाहून जाण्याचा प्रयत्न करते मनुष्याचे पतन सुद्धा काहीसे असेच आहे. एकदा माणसाचे मन काहीसे दुर्बल झाले तर ते नाशास कारणीभुत होते. आणि त्याचा संपूर्ण नाश होण्यास जास्त काळ लागत नाही. ह्याचे उदाहरण म्हणून तुम्हांला मी श्यामल नावाच्या मुलाची गोष्ट सांगतो.

आशा जोशी



श्यामल जात्याच अत्यंत हुषार व गुणवान होता. त्याच्या आईवडिलांनी व इतर मोठ्या माणसांनी त्याला चांगले उपदेश दिले परंतु त्याचा काही उपयोग झाला नाही. तो अभ्यास सोडून मुलांच्या बरोबर भटकण्यात वेळ घालवे. हळूहळू त्याला छोट्यामोठ्या चोऱ्या करण्याची सुद्धा सवय लागली.

श्यामल रहात असलेल्या देशाच्या राजाची देवावर अत्यंत श्रद्धा भक्ति होती. त्याने आतोनात पैसा खर्च करून तेथे एक देवीचे देऊळ बांधवले होते. ते पूर्ण संगमरवर दगडात बांधवले होते. त्या देवीकरीता त्याने अनेक सोन्यांचे मोत्यांचे अलंकार बनवले. त्यात एक रत्नहार अत्यंत मौल्यवान होता. त्या हाराच्या मध्यभागी एक अमुल्यरत्न बसवले होते. त्याची किंमत अनेक कोटी रुपये होती. आणि असा सर्वत्र गवगवा होता की, त्या रत्नामुळे त्या देशाचे नेहमी कल्याण होई.

दरवर्षी नवरात्रीत नऊ दिवस देवीचा उत्सव अत्यंत भक्तिपूर्वक आनंद सोहळ्यात केला जात असे. त्या करीता अनेक देशांचे राजा, प्रधान, प्रमुख मंत्री व गावकरी तेथे जमत असत.

एकदा उत्सवाचे वेळी शेजार देशचा राजा कालनाथ तेथे आला असतांना त्यांची दृष्टी त्या रत्नहाराकडे गेली. तो एकदम आश्चर्यचकित झाला. त्याला त्या हिऱ्यांची किंमत काय असावी ह्याचा आपोआप अंदाज लागला.

उत्सव समाप्ती नंतर कालनाथ आपल्या देशात परत गेला. काही दिवसाने त्याने आपल्या गुप्तचरांपैकी प्रमुखाला तो हार चोरून आणण्यासाठी पाठविले. कालनाथच्या बक्षिसांच्या प्रलोभनाला बळी पडून त्याने तो हार चोरून आणण्यास संमती दर्शविली. तो आपल्या घरातून बाहेर पडून शेजार देशात निघाला व तेथील देवीच्या देवळात पोहोचला त्याने तेथील पुजाऱ्याला बक्षिसाचे अमिष दाखवून आपल्याकडे वळविले तेव्हां पुजाऱ्याने त्याला हार चोरून नेण्याच्या बाबतीत मदत करण्याचे आश्वासन दिले.

दोघांनी दुसऱ्या दिवशी तो हार चोरण्याचा निश्चय पक्का केला. बरोबर त्याच सुमारास रात्री उशिरापर्यंत श्यामल आपल्या मित्रांच्या बरोबर गप्पाटप्पा करीत घरी परतत होता. नेमकी त्यावेळी त्याला तहान लागली त्यामुळे पाणी पिण्याकरीता देवळापाशी थांबला. तेव्हां त्याला पुजारी व गुप्तहेर तेथून बाहेर पडतांना दिसले. श्यामलला समजेना की, अर्ध्यारात्री हे दोघे इथे काय करीत असावेत.

पुजाऱ्याबद्दल त्याच्यामनांत शंका निर्माण होऊ लागली. त्यामुळे तो झटक्यात देवळात शिरला व एका खांबाआड जाऊन लपून राहिला. थोड्या वेळाने पुजारी देवळात शिरला व देवळाच्या गाभाऱ्याचे दार उघडून आत गेला. त्याच्या पाठोपाठ त्याला न कळू देता श्यामलसुद्धा आत घुसला व त्याच्या पाठीमागे उभे राहून त्याने पुजाऱ्याला प्रश्न केला–"गुरुजी, ह्यावेळी तुम्ही इथे काय करता आहात?"

पुजारी एकदम घाबरला व त्याच्या हातून देवीच्या गळ्यातील रत्नहार खाली पडला. श्यामलने तो रत्नहार उचलून स्वतःच्या हातात घेत म्हटले–"गुरुजी, घाबरू नका! तुम्हाला हा रत्नहार हवा आहे कां? तुमच्या बरोबर आलेली ती व्यक्ति कोण आहे?"

पुजाऱ्याने घडलेली सर्व हकिगत त्याला सांगितली. श्यामलने तो रत्नहार पारखीत












त्याला म्हटले–"पुजारी हा हार कोण्या परदेशी माणसास देऊन टाकून संपत्ती मिळविण्याची अपेक्षा ठेवण्यापेक्षा जर कां तो आपणच ठेऊन घेतला तर काय चांगले होणार नाही कां?"

पुजाऱ्याने खुशीने त्याच्या म्हणण्याला होकार दिला. ह्यानंतर दोघांनी तो हार घेऊन देवळाच्या दाराला कुलूप लावले. नंतर बाहेर येऊन तेथे पहारा देणाऱ्या गुरवाच्या डोक्यावर त्यांनी काठीने प्रहार केला. तेव्हां तो गुरव कोलमडून खाली पडला. तेवढ्यात पुजाऱ्याने देवळाच्या गाभाऱ्याच्या किल्ल्या त्याच्यापाशी टाकल्या व ते दोघे तेथून पसार झाले. व गावाबाहेर निघून गेले. गावाची सरहद्द पार केल्यानंतर दोघांच्याही मनांत तो हार स्वतः घेण्याची लालसा उत्पन्न झाली. दुसऱ्या दिवशी दुपारपर्यंत ते दोघे एका जंगलात येऊन पोहोचले. वाटेतून येताना त्यांनी एका धर्मशाळेतून थोडे खाण्याचे पदार्थ बरोबर घेतले होते. ते त्यांनी एका सावलीच्या झाडाखाली बसून खाऊन घेतले. परंतु त्यापूर्वी त्यांनी एकमेकांचा डोळा चुकवून त्या खाण्याच्या पदार्थामधे विष कालवून ठेवले होते. त्यामुळे ते खाता क्षणी दोघेजण मरण पावले.

ह्यानंतर कृष्णचंद्र आपल्या शिष्यांना म्हणाले–"श्यामल आणि पुजारी जात्याच स्वभावाने वाईट नव्हते. परंतु त्याच्या मनामध्ये क्षणिक आलेल्या अभिलाषेमुळे त्यांचा सर्वनाश झाला.

सर्व शिष्य अश्रू भरल्या डोळ्यांने तेथे उठून उभे राहिले. चोरी करणारा विद्यार्थी डोळे पुसत कृष्णचंद्रांना नमस्कार करीत म्हणाला–"गुरुवर्य, मी माझ्या नाशाचे कारण समजू शकतो. आता यापुढे मी असले कोणतेही काम करणार नाही.

शिष्य निघून गेल्यानंतर कृष्णचंद्र आत वळून गेले. तेव्हा त्यांची पत्नी डोळे पुशीत त्यांना म्हणाली–"तो विद्यार्थी तर सुधारला परंतु श्यामल व पुजारी मात्र दुर्दैवी निघाले.

कृष्णचंद्र हसून तिला म्हणाले–"पुजारी तर खरोखरी अभागी निघाला परंतु श्यामल मात्र नाही.

"अहो हे काय तुम्हीं सांगता आहात?" त्यांची पत्नी विस्मयाने म्हणाली.

"श्यामल त्यावेळी मेला नाही परंतु वार्धक्यामुळे पुजारी ताबडतोब मरून गेला परंतु श्यामल जिवन मरणाच्या वाटेवर तडफडत राहिला. त्यावेळी आयुर्वेदाचे एक महापंडीत तेथून जात होते त्यांनी श्यामलला वाचविले. व त्यांची सर्व गोष्ट ऐकल्यानंतर सुद्धा त्यांनी त्याची घृणा केल्या शिवाय त्याला ज्ञानदान दिले." कृष्णचंद्र म्हणाले.

"एका दिवसाच्या आत श्यामलला दोन मृत्युंना सामोरे जावे लागले. पूर्वजन्मींच्या पापांचे प्रायश्चित त्याला आता भोगावे लागले ते त्याला अनुसरून होते." कृष्णचंद्राच्या पत्नीने त्यांना सांगितले.

"त्याला त्याचे प्रायश्चित्त मिळाले आहे. त्यांनी श्यामलला त्यांचा शिष्य बनवले खरे परंतु त्याला गुरुकुलात एक वर्षापर्यंत न रहाण्याची शिक्षा दिली. व त्याला आश्रमाजवळ असलेल्या अंधेरी गुहेमध्ये एक वर्ष रहावे लागले. परंतु काही झाले तरी तो जात्या बुद्धीमान होता. त्यामुळे त्यांनी त्या गुरुवर्याकडे ज्ञानार्जन प्राप्त करून पुढे तो कृष्णचंद्र बनला.

"काय! तुम्हीच श्यामल आहात?" कृष्णचंद्राच्या पत्नीने आश्चर्यचकित होत विचारले नंतर म्हटले–"मग तो रत्नहार कोठे गेला?"

तो तर तेव्हांच राजापाशी पोहोचवला गेला. आमच्या गुरूंच्या कृपेमुळे राजाच्या शिक्षेपासून माझी मुक्तता झाली. पाण्याच्या गतीप्रमाणे वहात जाणाऱ्या मला माझ्या गुरुदेवांनी यशाच्या शिखरापर्यंत नेऊन सोडले. अशा प्रकारे मला त्याने पुनर्जन्म मिळवून दिला. त्यांचा शिष्य होण्याचे भाग्य मला लाभले कृष्णचंद्रानी दिर्घश्वास घेत म्हटले.





# बदल

गजपतीनगरात गोकुलदास व गौरी नावाचे जोडपे रहात होते. गोकुलदास गावातल्या शेतात मजुरीचे काम करीत असे परंतु गौरी काही कामधंदा करीत नसे. परंतु दिवसभर आजुबाजूच्या बायकांबरोबर फुकटच भांडण तंटा मात्र ओढवून घेत असे. दुसऱ्यांच्या कामाना नावे ठेवी व त्यांना शिव्यागाळ करे.

बायकोच्या अशा घमेंडी स्वभावाला घाबरून तो तिला अखेर काहीच बोलत नसे.

एके दिवशी गौरीच्या म्हशींनी शेजाऱ्यांच्या घराच्या परसदारी जाऊन त्यांचा लावलेला भाजीपाला सर्व खाऊन टाकला. त्यामुळे शेजाऱ्यांचे बरेच नुकसान झाले. परंतु शिव्यागाळीला घाबरून जाऊन त्यांनी गप्प रहाणेच पत्करले. परंतु शेजाऱ्यांनी मनोमन निश्चय केला कीं ह्यागोष्टीचा गौरीला चांगला धडा शिकविला पाहिजे. त्यामुळे त्यांनी त्यांच्या परसदारी काही विषारी झाडे लावून टाकली.

काही दिवसांनी ती झाडे पाहून गौरीच्या मनांत पुन्हां आपल्या म्हशी सोडण्याची इच्छा निर्माण झाली. तीला माहित नव्हते की ती विषारी आहेत. त्यामुळे तिने पुन्हां आपली म्हैस त्यांच्या परसदारी सोडली. शेजारी रंगनाथच्या कल्पनेप्रमाणे ती झाडे खाऊन तिची म्हैस मरण पावली.

दोन शेर दुध देणारी म्हैस मेल्याच्या दुःखाने गौरी आपल्या नवऱ्याला म्हणाली–"आता आपण काही ह्या गावात राहू नये. आपण सुखाने जगत असलेले लोकांना पहावत नाही ते आपला द्वेष करतात. त्यामुळेच आपल्या म्हशीवर कोणी-तरी करणी करून तिला मारून टाकली.

"अग, जे व्हायचे झाले आता उगाच त्रागा करून घेण्यात काय फायदा?" गोकुलदास शांत स्वरात तिला म्हणाला. ते ऐकून तिला जास्तच संताप आला ती म्हणाली–" हे काय गांव आहे कां स्मशान! उद्या सकाळीच आपण माझ्या माहेरच्या गावीं जाऊ. तेथे तुम्हांला नक्कीच काहीतरी काम मिळेल.

गोकुल आपल्या बायकोचे म्हणणें डावलू शकला नाही. त्यामुळे दुसऱ्या दिवशी दोघे नवराबायको रामपुर गावात जायला निघाले. ते दोघे गावच्या तळ्यापाशी येऊन पोहोचले नाहीत तितक्यात त्यांच्या गावचा रमाकांत मासेमारी त्यांना तळ्या-कांठी मासे पकडीत असतांना दिसला. तो त्यावेळी गळाचा मासा हातानें काढून टोपलीत टाकीत होता.

गौरीला ते दृश्य पाहून आश्चर्य वाटले ती आश्चर्याने तोंडात बोट घालीत म्हणाली खरे तर दोन्ही हाताने पैसा कमावण्याचा हाच एक उपाय दिसतो आहे. हा रंगनाथ तर ऐदद्या प्रमाणें तळ्याकांठी बसून मासे गळात पकडून आपल्याला वाटेल त्या किंमतीला विकतो व पैसा कमावतो पाहू तरी तो माशाची काय किंमत सांगतो." असें म्हणत गौरीने झटक्यात टोपलीत हात घातला.

त्या टोपलीत माशांच्या बरोबर काही खेकडे सुद्धा होते. त्यातील एक खेकड्यांने गौरीच्या बोटाला कडकडून दंश केला.



त्या वेदनेने ती विव्हळू लागली. व चिडून म्हणाली–"अरे रंगनाथ, तू कसला रे मासेमारी? मासे व खेकडे काय एकाच टोपलींत ठेवतात." असे म्हणत त्याला शिव्या हासडू लागली.

मासेमारी रंगनाथ ती शांत होईपर्यंत गप्प राहिला. नंतर म्हणाला–"ताई, हे खेकडे व मासे ह्या तळ्यातूनच निघाले आहेत. जसे हे पाण्यांत एकत्र राहीले होते तसेच ह्या टोपलींत पण आहेत. तू तुझ्या माशांच्या गप्पा सोड त्या खेकड्यानें तर माझ्या बोटाचा चांगलाच तुकडा पाडला." गौरीने तक्रारीच्या सुरात म्हटले.

रत्ना दुधभाते







रंगनाथ स्मित करीत म्हणाला– "दुसऱ्याना उगाच टोकरीत राहून भांडण उकरून काढण्याची काहींना वाईट खोडच असते. खेकडे पण काहीसे अशाच स्वभावाचे असतात. ते पाण्यात राहो अगर पाण्या बाहेर त्यांचा गुण बदलत नाही.

खरे म्हणायचे तर गोकुळला हे गांव सोडून जायचे अजिबात मनांत नव्हते त्यामुळे त्याने आपल्या बायकोला समजावत म्हटले–"अग, रंगनाथ जे काय सांगतो त्यात काहीतरी तथ्य आहे. तो काय म्हणतो त्याचा अर्थ तुला समजतो नां! खेकड्यां-सारखा आपला पण स्वभाव जो पर्यंत बदलत नाही तो पर्यंत आपण कोणत्याही गांवी गेलो गजपतीनगरला किंवा रामपुरला तरी तेथील लोक आपला द्वेषच करतील. तू त्या खेकड्याला उगाच डिवचलेस म्हणूनच त्याने तुला डंख मारला हे तर खरे नां!"

"होय हो तसेच? पण माझ्या बोटाच्या वेदना काहीं कमी होत नाहीत नां! त्याचे काय." गौरी म्हणाली.

"तर मग, मीं सांगतो ते लक्षपूर्वक ऐक. त्या रंगनाथच्या म्हणण्याचा अर्थ होता. आपण चांगले वागलो की सारे जग आपो-आपच चांगले वागते. ह्या गावांत आपण इतके वर्षे रहात आलो. परंतु भांडणतंट्या शिवाय एक दिवस तरीं गेला कां? असे असतांना आपण दुसऱ्या कोणत्याही गावात गेलो तरी शांततापूर्वक राहू शकत नाही. सगळ्यात आपण आपला स्वभाव बदलला पाहिजे काय मान्य आहे कां?" गोकुलदासने समजुतीच्या स्वरात विचारले.

गौरी थोडे थांबून म्हणाली–"बरं तर मग आपण आपल्या गावीच परत जाऊं या! खेकडा प्राणी आहे. त्यामुळे त्याला त्याचे गुण बदलता येणें शक्य नाही. परंतु मी तर मनुष्य आहे त्यामुळे मी माझ्या स्वभावात बदल करून यापुढे सर्वांशीं प्रेमळपणाचा व्यवहार करेन.

आपल्या बायकोच्या स्वभावांत पडलेला फरक पाहून गोकुळला अत्यानंद झाला त्याचा आनंद गगनात मावेनासा झाला.




[१४]

[चंद्रवर्मा झोपडीपाशी पोहोचला. त्याची एका म्हाताऱ्याशी भेट झाली. म्हाताऱ्याला तो राज्यातील एक असावा असे वाटले. पण खरे समजल्यावर त्याने स्वतःजवळ कांशाच्या किल्ल्यापाशी जाणाऱ्या मार्गाचा नकाशा असल्याचे सांगितले. तेवढ्यात सैनिक आले. त्यांना पाहून म्हातारा पळून गेला. नंतर–]

चंद्रवर्माला झोपडीतून बाहेर पडतांना पाहून सैनिकांना आश्चर्य वाटले. त्यांना तो म्हाताराच फक्त ठाऊक होता. त्यांना वाटले होते की, बऱ्याच दिवसांने म्हातारा आयता हाती सांपडला. आता त्याला बंदी करून नेऊन राजासमोर उभे केले की, राजा आपल्याला खूप सारे धन देईल. परंतु तेथे चंद्रवर्माला पाहून त्यांची घोर निराशा झाली. "तू कोण आहेस? तो म्हातारा कुठे गेला?" त्या सैनिकांच्या सरदाराने तलवार उपसून डोळे फाडफाडून त्याच्याकडे पहात विचारले.

"तुम्ही ज्या म्हाताऱ्याबद्दल चौकशी करीत आहांत नां! त्याविषयी मला समजले पाहिजे." चंद्रवर्माने स्वतःची तलवार बाहेर खेचीत म्हटले.

चंद्रवर्माचा निर्भयपणा व त्यांची म्यानेतून तलवार काढण्याची दब






पाहून सैनिकांचा सरदार क्षणभर चकित होऊन गेला. ते पाहून चंद्रवर्माने-जवळ जात विचारले–"मला सांगा, तुम्ही कोणत्या राज्याचे सैनिक आहात. मला पकडून माझा अंत करण्याचा जर प्रयत्न केलात तर तो तुमच्या विनाशासच कारण होईल. माझ्या पाठी-मागे माझे रक्षण करणारी हि झोपडीची दारे आहेत. इथे राहून तुम्हीं माझ्याशी लढू शकत नाहीत त्यामुळे पाहिजे तर एक एक करून तुम्ही माझ्याशी लढा. हा घ्या माझ्या तलवारीचा वार वाचवा." असे म्हणत चंद्रवर्माने एक पाऊल पुढे टाकले.

सैनिकांच्या सरदाराला मनोमन वाटू लागले की, चंद्रवर्मा म्हणतो ते खरे आहे. आपण त्यातून एकाएकाने त्याच्याशी लढा दिला तर तो एकेकाला मारून यमलोकात पाठवून देईल. त्याची हावभावाची शैली पाहिली तर तो एक कुशल योद्धा असावा असे दिसते.

"सरकार, आपण एक कुशल योद्धा असावात असे वाटते. मीं सुद्धा एक योद्धा आहे. तेव्हां हे विनाकारण युद्ध कशा करीता. मी आमच्या राजाच्या आज्ञेनें ह्या जंगलात एका म्हाताऱ्याच्या शोधाकरीता भटकत आहे. परंतु अचानक आपली भेट झाली. आता जे झाले ते झाले. आपण आपापल्या वाटेने निघून जाऊ. असे समजुती दाखल सरदार चंद्रवर्माला म्हणाला.

आपल्या कर्तबगारीवर मनोमन चंद्रवर्मा प्रसन्न झाला. परंतु वरवर त्याने ढोंगीपणाने त्यांना विचारले–"काय हो तुमचा राजा कोण ?"

"काय! आपल्याला आमच्या राजाचे नाव सुद्धा माहित नाही? मला तर अचंबा वाटतो आहे. तुम्ही ज्या सीमेवर उभे आहात त्या राजाचे नावही तुम्हांला माहित नाही!" सरदाराने त्याला विचारले.

सरदाराचे बोलणे ऐकून चंद्रवर्माला हंसू आले तो म्हणाला–"मी राज्य, राज्याच्या सीमा व राजांची नांवे लक्षात ठेवणें हे कधीचेच विसरून गेलो आहे. आमच्या गुरुदेवनी त्यांच्या मृत्युपूर्वी मला एका राजाला भेटण्याची विनंती केली होती. त्या राजाचे नांव आहे "शिवसिंह" त्यांना भेटण्याच्या इच्छेने मी पूर्ण भारताच्या ह्या टोकांपासून त्या टोकांपर्यंत प्रवास करीत आहे. मधे तुमची भेट झाली. आता तुम्हीं आपल्या वाटेने जाऊ शकता." असे म्हणत चंद्रवर्मा झटक्यात वळला.

चंद्रवर्माचे बोलणें ऐकून सैनिक व त्यांचा सरदार थक्क झाले. पाठीमागे वळून झोप-डीत जाण्याचे नाटक करणाऱ्या चंद्रवर्माला अडवत सरदार म्हणाला–"सरकार आपण तर कोणी महापुरुष वाटता आपल्या गुरुदेवनीं आपल्याला ज्या राजाला भेटण्याची आज्ञा केली आहे. तो राजा शिवसिंह ह्याच देशाचा राजा आहे."

चंद्रवर्माने आश्चर्य प्रकट करीत म्हटले–"अरे वा, मी धन्य झालो म्हणावयाचे धन्य आहे मी. कित्येक वर्षानंतर माझे काम सफल झाले. मी तर असा विचार करून थकलो होतो की गुरुंनी सांगितलेले काम पूर्ण होत नाही. आत्ताच्या आत्ता मला राजाचे दर्शन करायचे आहे!"



सैनिकांच्या सरदारानी आपल्या अनु-चरांकडे क्षणभर नजर टाकीत दुसऱ्याक्षणी चंद्रवर्माकडे शंकेखोर नजरेने पहात विचारले–"गुरुदेवांनी आमच्या राजाचे दर्शन करण्याकरीता आपल्याला कशाला सांगितले आहे ?"

"ते एक अद्भुत रहस्य आहे. गंधर्व रहस्यापेक्षां गुप्त आहे!" असे म्हणत चंद्र-वर्माने आकाशाकडे नजर टाकली व मान वर करीत उच्च स्वरात म्हणाला–"अरे वा! कांशाचा किल्ल्या! आता तू माझ्या मुठीत आला आहेस हं?"

"कांशाचा किल्ला! नाव ऐकताच सरदाराला भयंकर विस्मय वाटू लागला



त्याने विचारले–"महाशय, आपल्याला ह्या कांशाच्या किल्ल्याचे रहस्य कसेकाय ठाऊक?"

"त्या कांशाच्या किल्ल्याविषयी समाचार फक्त मला व माझ्या गुरुंनाच माहित आहे. परंतु तुमच्या विचारण्याच्या ढंगावरून तुम्हांला पण त्याविषयी थोडीफार माहिती असावी असे वाटते आश्चर्य! अद्भुत् आहे!" असे म्हणत चंद्रवर्माने आपले बोलणें थांबवले.

"ह्यात आश्चर्य करण्यासारखे काय आहे? त्या कांशाच्या किल्ल्याचे रहस्य जाणून घेण्याकरीताच आम्ही त्या चलाख म्हाताऱ्याला ह्या जंगलात शोधतो आहोत." सैनिकांचा सरदार म्हणाला.

चंद्रवर्माने आपला डावा तळहात उघडून त्यात पाहिल्या सारखे केले व म्हणाला–"हो, आता मला कळले तुमच्या राजाला अशी शंका आहे की, त्या म्हाताऱ्याजवळ कांशाच्या किल्ल्यापर्यंत जाणाऱ्या मार्गाचा पुरावा आहे. व म्हाताऱ्याचा मुलगा देवल तुमच्या राजाच्या तुरुंगात आहे. मी म्हणतो ते खरे आहे नां! तुमचा राजा पण कितीं भोळा आहे?" सैनिकांच्या सरदारने क्षणभर चंद्रवर्माच्या तळहाताकडे पाहिले आणि म्हटले–महाशय, आपण तर सर्वज्ञच दिसता. आपल्या तळहातावर हे लिहीलेले आहे काय? हे तर आश्चर्य म्हणावयाचे."

"आश्चर्य! ते कोणाला तुम्हांला की मला?" असे म्हणत चंद्रवर्माने सरदाराकडे रोखून पहात म्हटले–"तुम्ही ताबडतोब इथून निघून जाऊन त्या डोंगराच्या पाठीमागे जाऊन माझी वाट पहा मी काही वेळातच तिथे येऊन तुम्हांला भेटतो. त्यानंतर आपण सर्वमिळून तुमच्या राजाला भेटण्यास जाऊ."

सरदाराला त्यांचे बोलणें विचित्र वाटले तो भ्रमात पडला की, चंद्रवर्माला काही अपूर्व शक्ति मिळाल्या असाव्यात. तो होय! आपण तसेच करू म्हणत आपल्या साथीदारासह त्या डोंगराच्या पाठीमागे निघून गेला. ते जेव्हां दृष्टीपथातून नाहीसे झाले तेव्हां ताबडतोब चंद्रवर्मा झाडी जवळ गेला व म्हणाला–"जांबवंत, तू कुठे आहेस? मी सर्व गोष्टींची चौकशी केली. देवलवर काही संकट नाही आणि तो अगदी सुरक्षित आहे.

ती हांक ऐकताच म्हातारा लगबगीनें झाडाच्या बुंध्या पाठीमागून बाहेर आला चंद्रवर्माच्या समोर येत म्हणाला–"काय रे बाबा, हा जांबवन्त कोण आहे?"

"तुम्हीच जांबवन्त आहांत हो! तुम्हांला म्हाताऱ्या म्हणणें बरोबर दिसत नाही नां! म्हणून मीच हे नांव सुचवून तुम्हांला त्या नावाने हांक मारले. मी शिवसिंह यांच्या कडे जात आहे. तुमच्या मुलाला लवकरच सोडवून घेऊन येईन. आणि कांशाच्या किल्ल्यांच्या संपत्तीमधील वाटा तुम्हाला मिळवून देण्याची योजना करीन. तेथे पोहोचण्याच्या मार्गाचा नकाशा कुठे आहे?" चंद्रवर्मा विचारले.

"तुझ्या बोलण्यावर मी किती विश्वास ठेवायचा?" शंकाकुल होत म्हाताऱ्याने विचारले.

"विश्वास न ठेऊन तू काय करू शकतोस? विश्वास ठेवलास तर तुझे व तुझ्या मुलाचे कल्याण होईल. जेव्हां मला हे कळले की पश्चिमेकडेच्या समुद्रकिनाऱ्याकडे



कांशाच्या किल्ल्यात जाणारा मार्ग आहे. तेव्हां तेथे पोहोचण्याकरीता काही कठीण संकटे येणार नाहीत समुद्राच्या कांठाकांठाने चालत तेथे पर्यंत पोहोचता येईल." चंद्रवर्मा म्हणाला.

चंद्रवर्माचा स्पष्टवक्तेपणा पाहून म्हातारा चकित झाला. नंतर त्याने आपल्या अंगवस्त्रातून एक ताडपत्राची भेंडोळी बाहेर काढली व ती पंख्यासारखी गोलाकार फिरवित म्हणाला–"चंद्रवर्मा, ह्या पहा कांशाच्या किल्ल्यापर्यंत जाणाऱ्या मार्गाचा नकाशा."

चंद्रवर्माने काळजीपुर्वक नकाशा पाहिला त्यात डोंगर दऱ्याखोऱ्या नदीनाले अरण्ये व



वाळवंटे स्पष्ट दिसत होती. समुद्राच्या किनाऱ्यावर एक उंच किल्ला स्पष्ट दिसत होता. त्या किल्ल्याच्या भिंतीच्या वर दिसणाऱ्या मोठमोठ्या महालावर धुक्यासारखे काहीतरी पसरलेले दिसत होते.

चंद्रवर्मा ते पाहून मनांतून घाबरून गेला. ते मनांतल्या मनात दाबत तो विचार करू लागला–"अरे बापरे! हि जंगले पहाडे नदि नाले पार करून कोणी माणूस तेथें पोहोचू शकेल कां?

"ह्या कांशाच्या किल्ल्याला माझ्या पूर्वजांपैकी एकाने कोणी तरी पाहिले आहे. मी तर म्हातारा झालो. नाहीतर मीच तेथे जाऊन पोहोचलो असतो." म्हातारा म्हणाला.

म्हाताऱ्याचे बोलणें ऐकून चंद्रवर्मा मंद हसत व म्हणाला–"ठिक आहे, हा नकाशा मला द्या. मी स्वतः कांशाच्या किल्ल्याच्या शोधार्थ जातो. बरोबर तुमच्या मुलाला देवलला सुद्धा बरोबर घेऊन जाईन. तोपर्यंत तुम्ही ह्या झोपडीत आरामात राहू शकता. रुद्रपुरच्या राजा शिवसिंहा बरोबर सविस्तर बोलाचाली करून मी इथे परत येई तो पर्यंतची तुमचीं सर्व सोय करून ठेवतो.

म्हाताऱ्याने थोड्या अनिच्छेनेच आपल्या हातातील नकाशा त्याच्या हातात दिला. व विचारले–"ह्यात काही दगाफटका तर नाही नां! ऐक जर म्हाताऱ्याला धोका दिलास तर मोठे पाप लागेल तुला.

मी तुम्हांला व तुमच्या मुलाला धोका देणार नाही. राजा शिवसिंह सुद्धा जर सज्जन माणूस असला तर त्याला सुद्धा मी धोका देणार नाही. पण तो तसा नसला तर...."

चंद्रवर्मा आपले बोलणें पुरे करत नाही तोच त्याला घोड्यांच्या खिकाळण्याचा आवाज ऐकू आला. त्याने झाडांच्या फांद्यातून डोंगराच्या जवळ निरखून पाहिले तेव्हां सैनिकांचा सरदार आपल्या घोड्याला पिटाळत झोपडीच्या दिशेने घेऊन येत असलेला त्याला दिसला. तेव्हां चंद्रवर्मा म्हाताऱ्याकडे वळून पहात म्हणाला–"मी त्या राज सैनिकांना घेऊन रुद्रपुरला जाऊन राजाचे दर्शन करेन. तोपर्यंत तुम्हांला ह्या झोपडीत रहाण्यास हरकत नाही. मी लवकरच नगरात तुम्हांला बोलावून घेईन. त्यावेळी तुम्ही शहरात आपले उर्वरित आयुष्य सुखाने घालवू शकाल." असे म्हणत तो सरदार येत होता तिकडे वळून चालू लागला.



चंद्रवर्माला आपल्याच रोखाने येत असलेला पाहून सरदार थांबला व तो जवळ येताच म्हणाला–"महाशय, आपण बराच वेळ झाला आला नाहीत म्हणून मी पहायला परत आलो. हा घोडा आपल्या करताच आणला आहे. मी राजाकडे संदेश पाठविला आहे की, आपण त्यांना भेटावयास येत आहात."

"मी काही अपूर्व शक्तिचे आवाहान करण्याच्या हेतूनें जंगलात गेलो होतो. तुमच्या राजाबद्दल माझ्या शक्तिने कोणतेच उत्तर दिले नाही. काय आपला राजा स्वभावाने दुष्ट आहे कां?" चंद्रवर्मांनी विचारले.

"महाशय, कोणता राजा दुष्ट किंवा चांगला हे त्यांच्या सेवकांना कोणत्या गोष्टीवरून समजणार?" हि गोष्ट प्रजेतील लोकांना अगर शेजारच्या राजानांच ठाऊक असणार आमचे काम फक्त सेवा करून दर महिना पैसा मिळवणे हेच आहे. जो राजा दरमहा आम्हाला पैसा देतो तो चांगलाच असावा. जो राजा देत नाही. तो दुष्ट असावा." सैनिकांचा सरदार म्हणाला.

ह्या गोष्टी ऐकल्यावर चंद्रवर्माला समजले की राजा शिवसिंहाच्या बरोबर सावधानीनेच वागायला पाहिजे. जर कां कांशाच्या किल्ल्याजवळ जावयाचे असले तर सैनिकांच्या छोट्या तुकडीची आपल्याला आवश्यकता आहे. तसे सैनिक आपल्याला

शिवसिह् राज्याकडूनच प्राप्त करून घेता येतील. एकट्यानेच किल्ल्यापर्यंत जाणे म्हणजे आत्महत्येसारखे होईल. कारण वाटेत काय काय कठिण संकटे येतील न जाणो. त्यामुळेच कोणी तेथेपर्यंत जाण्याचे धाडस करीत नाही. परंतु आता शिवसिह् राजाला खरे कारण न सांगणें म्हणजे स्वत: धोका पत्करण्यासारखे होईल आपण राजाच्या सैनिकांना महान मांत्रिक असल्याचे खोटे सांगितले व त्याचा विश्वास संपादन केला त्याचप्रमाणे राजाचा पण विश्वास संपादन करून घ्यावयास पाहिजे.

"काय हो! आता आपण राजधानीत जायला निघावे? असे म्हणत सरदारानीं त्याच्या घोड्यांचा लगाम हातात धरून खेचला व ते पाहून चंद्रवर्मा सुद्धा घोड्यावर जाऊन बसला.

थोड्या दूरवर जंगले व डोंगडऱ्या पार करून दोन तासाने राजसैनिक व चंद्रवर्मा रुद्रपुरला पोहोचले. नगरद्वारावर राजमार्गावर तोरणेंमाळा बांधून सुशोभित केलेले होते. दोन्ही बाजूला नगरवासी ओळीने उभे होते. जेव्हां राजसैनिकांच्या सोबत चंद्रवर्मा आत आला तेव्हां सर्वांनी टाळ्या वाजवून स्वागत केले व आपला आनंद प्रकट केला. व जोरजोरात घोषणा केल्या. "महामंत्रिकाचा जय असो."

तो आवाज ऐकून चंद्रवर्मा बावचळला काय आपण मांत्रिक आहोत कां? त्याला ते मोठे विचित्र वाटू लागले. तेवढ्यात त्याला सरदाराचे बोलणें लक्षात आले. त्याने आपल्याला. कां मांत्रिक म्हटले हे त्याने तळहात पाहून म्हाताऱ्याने सांगितलेले जे कांशाच्या किल्ल्याचे रहस्य सांगितले. ते सरदाराला अद्भुत व विशेश वाटले. त्यामुळे त्यांने राजाकडे आपण एक महामांत्रिक असल्याचे कळवले दिसते. त्यामुळे आपल्या सत्कारा करीता व आपल्या अघिन बनवण्याच्या आशेने राजाने हि सर्व आपल्या आगमनाची तयारी केली असावी.

(क्रमश:)



# स्वप्नांचा परिणाम

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणें मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! ह्या मध्यरात्रीच्या वेळी हे अतोनात श्रम तू करीत आहेस त्या पाठीमागे काय कारण समजत नाही परंतु तुझ्या सारख्या शूर व धाडसी माणसाला कोणत्याही कार्याची पूर्ती करावयाची म्हणणे विवेकशिलता व जाणीव हवी ह्याच्या अभावी सांधले जाणारे कार्य म्हणजे स्वप्नच राहीले जाते. ह्यांचे उदाहरण म्हणून मी तुला विशाख नावांच्या माणसाची गोष्ट सांगतो लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

प्राचीन काळी पाटलीपुत्र गावांत जयनंद नावाचा एक श्रीमंत व्यापारी रहात होता.









त्याच्या घरात विशाख नावाचा एक तरुण मुलगा होता. तो त्याचा लांबचा नातेवाईक होता. तो अनाथ असल्यामुळे जयनंदने त्याला सांभाळले होते.

तसा विशाख बुद्धीमान व हुषार व सुंदरही होता. परंतु नाईलाजाने त्याला जयनंदकडे नोकरासारखे रहावे लागत होते. त्यामुळे तो मनांतल्या मनांत स्वतःच्या दुर्भाग्याला दोष देत होता. तो नेहमी विचार करे की जयनंदसारखे आपण केव्हां श्रीमंत होवू त्यामुळे तो मनांत नेहमी श्रीमंत बनण्याची विचित्र स्वप्ने रंगवित बसे.

एके दिवशी दुपारच्यावेळी विशाख रिकाम्या वेळी बसून पेंगत होता. तेव्हां त्याने एक स्वप्न पाहिले की, जयनंदच्याहून दुपटीने आपण करोडपती बनलो आहोत. आणि जयनंद आपला सारा पैसा घालवून भिकारी बनला आहे. व तो आपला नोकर होऊन काम करीत आहे. त्या स्वप्नांतच तो जोरात ओरडला—"अरे जयनंद! तू कुठे तडफडलास! इकडे ये ना लवकर!"

दुर्दैवाने जयनंद त्यावेळी तेथेच जवळपास होता. त्याचे बोलणे ऐकून त्याला अत्यंत संताप आला. त्याने विशाखला बदडून घराबाहेर हांकलून लावले.

ते दृश्य पाहून जयनंदच्या घरातली सर्व माणसे व नोकरचाकर त्याची चेष्टा करून हंसू लागले. तो अपमान विशाखला सहन झाला नाही. त्यामुळे त्यांनी ते गांवच सोडले व तो जंगलात निघून गेला.

तो जंगलात चालत खूप दूर गेला. तेथे एका दाट झाडाखाली त्याला एक मुनी तपश्चर्या करीत असलेले दिसले. त्यानी त्या मुनींना साष्टांग नमस्कार केला.

मुनीने डोळे उघडून विशाखला पाहिले व अरण्यात येण्याचे कारण विचारत म्हटले—"बाळा, तुला माझ्याकडून काय हवे आहे?"

विशाखने घडलेली सर्व हकीकत मुनींना सांगितली व म्हटले—"गुरुदेव, मला असा वर द्या की, जयनंद माझ्या पाया पडेल.



मुनीने अंतर्ज्ञानाने जाणले की, जयनंदने आपल्या कष्टाने योग्यतेने व बळाने हा मोठेपणा मिळविला आहे. तू कोणतेही कष्ट कामधंदा न करता कशाला फुकटची श्रीमंत बनण्याची स्वप्ने पहातोस! झोपेत स्वप्ने पहाणे जसे सहज आहे. तसेच त्या वस्तू प्राप्त होणे अशक्य. आजपासून तू कष्ट करून श्रीमंत बनण्याचा प्रयत्न कर."

मुनींचे ते बोलणे ऐकून विशाख निराश झाला. व त्यांना म्हणाला—"गुरुवर्य, आपण जे काय सांगितले त्यात मला काही नविन नाही. ह्या गोष्टी सर्वांनाच माहीत असतात. जर आपण काही महीमा जाणत असाल तर एवढाचा माझ्यावर अनुग्रह करा. की मी पाहीलेली स्वप्ने खरी होतील.

मुनी स्मित करीत म्हणाले—"हि तर अगदी साधी गोष्ट आहे. तू मंत्र म्हणून मनात असे सहा वेळा म्हण की, माझे स्वप्न खरे ठरू दे. म्हणजे ते स्वप्न खरे ठरेल." असे म्हणत मुनींनी त्याच्या कानात काही मंत्र सांगितला.

विशाख अत्यानंदाने जाऊ लागला. तेव्हां मुनीने त्याला अडवत म्हटले—"मुला मी तुला एक गोष्ट सांगावयास विसरून गेलो. ह्या मंत्राचा फक्त तीनदाच उपयोग तुला करता येईल. तेव्हां अत्यंत सावधपणे ह्याचा उपयोग कर. आणि हे लक्षांत ठेव की, ह्याच्या उपयोग योग्य लोकांच्यावर उपकार होतील असा कर.

विशाख जेव्हां पाटलीपुत्रला परत आला. तेव्हां रात्र पडू लागली होती. तो गावातल्या कोणाच्या तरी ओसरीवर झोपून मुनीने सांगितलेल्या स्वप्नांच्या मंत्राची आठवण करीत होता. थोड्यावेळात त्याला झोप लागली. झोपेत त्याने एक स्वप्न पाहिले. त्यात फक्त जयनंदने त्यांची क्षमाच मागितली नाही तर स्वतःच्या मुली बरोबर त्याचे लग्नही थाटामाटात लावून दिले.

विशाख दचकून जागा झाला. व आपल्याला पडलेल्या स्वप्नाचा विचार करु












लागला. परंतु अशी स्वप्नें पडणे म्हणजे त्याला काहीं नविन नव्हते. परंतु आपल्याला मिळालेल्या मंत्राचा खरोखरी प्रभाव आहे कां ? हे पहाण्याकरीता स्राहून चांगली संधी केव्हां मिळणार असा विचार करून विशाखने मनांतल्या मनात सहादा त्या मंत्राचा जप केला व तसाच झोपू लागला. त्याने ओढून ताणून डोळे मिटले तितक्यात त्याला थोडया दूरवर पाऊलाची चाहूल लागली. चाहुलीने तो ताडकन उठून बसला व ते दृष्य पाहून त्याचा आनंद गगनात मावेनासा झाला. कारण जयनंद सहपरिवार बँडबाजा घेऊन त्याला सामोरा येत होता. विशाखने आपण शुद्धीवर आहोत नां ! हे पहाण्याकरीता हाताला चिमटा काढून पाहिला. तेव्हां जयनंद त्याला म्हणाला– "बाळ, जे काही झाले ते विसरून जां ! चल पाहू आपल्या घरी. तू गावात येण्यापूर्वीच कुलदेवीने मला दृष्टांत देऊन तुझा पत्ता सांगितला व त्याच बरोबर आज्ञा केली की तुला मानाने आदराने नेऊन स्वत:चा जावई कर ! "

प्रथम घरी न जाण्याकरीता विशाखने खोटे खोटे आढेवेढे घेतले. परंतु जयनंदने अगदीच पाय धरून विनवणी केल्यावर तो जावयास निघाला. व एका आठवडयाने जयनंदने आपल्या मुलीबरोबर विशाखचे लग्न थाटामाटाने लावुन दिले.

काही दिवस आपल्या सासऱ्याच्या घरी विशाखने आनंदाने घालवले. परंतु हळूहळू त्याच्या समोर काही कठीण समस्या उत्पन्न होऊ लागल्या कारण जयनदच्या मेहुण्याला अगदी सहन होत नव्हते की हाच विशाख काही दिवसापूर्वी आपल्याकडे एक नोकर म्हणून होता. त्याचा एवढा आदर करणे कसे शक्य आहे. तसेच इतर नोकरचाकराचे पण झाले. अचानक विशाखला जे ऐश्वर्य मिळाले ते पाहून त्यांच्या मनांत द्वेषभावना उत्पन्न होवू लागली.

जयनंदनी ती वस्तुस्थिती पाहिली व एक दिवस विशाखला म्हटले–" लोकांना वाटते की तू माझा जावई आहेस परंतु त्याहीपेक्षा जास्त आनंद मला वाटतो की मी तुझा सासरा आहे. मी तुला काही पैसा देतो त्या पैशाने तू स्वत: काही व्यापार कर लक्षाधिश हो. जयनंदचे बोलणे विशाखने मान्य केले. जयनंदने व्यापारा करीता लागणाऱ्या सर्व गोष्टी विशाखला देऊ केल्या.

एक दिवस विशाख आपल्या बायकोला मालिनीला म्हणाला–" अग, ऐकलेस कां माझ्या सासऱ्याला मनांतून मी खूप मोठा कोटयाधिश व्हावे असे वाटते. मला माहीत आहे की, त्यांची इच्छापूर्ती कशी काय करायची ते."

मालिनीने हसत म्हटले–" आपण जर असे ऐश्वर्यवान बनलात तर मला त्याहून जास्त काय हवे ? "

त्याच रात्री विशाखने एक स्वप्न पाहिले–त्यांचा व्यापार गावात चांगला नावाजला गेला आहे.















विशाखने अत्यानंदाने आपल्याला पडलेल्या स्वप्नाचा समाचार तावडतोब बायकोला सांगितला तो ऐकून ती निश्वास घेत नवऱ्याला म्हणाली–"नुसती स्वप्ने पाहून काय मिळणार माझ्या वडिलांनी जे कष्ट श्रम करून व्यापार वाढवून जो पैसा कमावला आहे. ती गोष्ट साऱ्या पाटलीपुत्रातील जनतेला ठाऊक आहे."

त्यावर विशाखने आपल्या बायकोला मुनींकडून मिळालेल्या मंत्राची गोष्ट सांगितली. तीला वाटले की, नवऱ्याची काहीतरी बनवाबनवी असावी. त्यावर विशाखने मनात सहादा मंत्राचा जप केला व आपले स्वप्न सफल व्हावे अशी मनोकामना केली.

तीन महिन्याच्या अवधीत त्याचा व्यापार खूप जोरात फळला व त्याची पाटलीपुत्र गावातील श्रीमंतात एक अशी गणना होवू लागली. मालिनीला हा सर्व प्रकार विचित्र वाटू लागला.

विशाख थोड्या अवधीतच कोट्याधीश तर बनला परंतु ते त्याच्या दृष्टीने एक संकट बनले गावातील लोक उगाच अफवा उठवू लागले की, विशाख बनावटी वस्तु विकून पैसा मिळवतो. व खोटा नाटा हिशोब करून राजाला न्यायपूर्वक कर देत नाही.

ह्या अफवा हळूहळू राजाच्या कानावर गेल्या. त्यांनी विशाखवर असा आरोप लावला की तो अयोग्य मार्गाने धन संपत्ती मिळवून सुद्धा राज्याचा कर भरत नाही. तो त्याचा अपराध सिद्ध करून त्यांनी त्याला तंबी दिली की, त्यांनी आत्तापर्यंत मिळवलेल्या धनावर व्याजासकट कर चुकवावा जर असे काही घडले नाही तर त्याला तुरुंगवासाची शिक्षा करण्यात येईल.

विशाख आता अशा कठीण पेचात अडकला असतानांच त्याच्या सासऱ्याचा जयनंदचा मृत्यु झाला. त्याला आता खराखुरा मार्ग दाखविणारा कोणी उरला नाही. आता राजाने दिलेली तारीख जवळ आली. विशाख मनातून तडफडू लागला. त्याच रात्री त्याने एक स्वप्न पाहिले. तो त्या देशाचा राजा बनला आहे. व त्यांनी त्याच्या विषयी खोट्या अफवा उठविणाऱ्यांना कठोर दंड दिला आहे.



स्वप्नाची गोष्ट त्याने आपल्या बायकोजवळ बोलून दाखविली. ती अत्यानंदाने म्हणाली–"हे तर भाग्यच म्हटले पाहिजे की, असल्या कठीण प्रसंगी आपल्याला असे सुंदर स्वप्न पडले. जर का आपण खरेच ह्या देशाचे राजा बनलात तर ह्या कठीण गोष्टी आपोआप सुटतील. हे स्वप्न खरे ठरण्याकरीता तावडतोब मंत्रपाठ करा.

परंतु विशाख तर विचार करण्यात मग्न होता. तो म्हणाला–"मला आत्ताच्या आता असेच जाऊन मुनींचे दर्शन केले पाहिजे. असे म्हणून त्याक्षणी तो बराबाहेर पडला.

जंगलात जाऊन विशाखने मुनींचे दर्शन घेतले व घडलेला सारा समाचार ऐकवला व म्हटले–"गुरुदेव आपण मला जो वर दिलात तो कृपा करून परत घ्यावा किंवा तो मंत्र निरुपयोगी करावा.

मुनींनें मंदहास्य करीत म्हटले–"मला वाटले नव्हते की, तुला इतक्या लवकर ज्ञान येईल. जसे तू म्हणालास तसा तो मंत्र मी निरुपयोगी केला आता तू जाऊ शकतोस! असे म्हणत विशाखला आशीर्वाद देऊन पाठवून दिले.

विशाखने घरी येऊन आपली सर्व जमिन जायदाद विकून टाकली व त्या पैशांने राजाचा सर्व कर चुकता केला. त्यानंतर तो आपल्या बायकोला घेऊन एका छोट्याशा गावांत आला. व तेथे छोटासा धंदा सुरू करून त्यात जो काही फायदा होत होता त्यावर संतुष्ट राहून आपले आयुष्य आनंदाने चालवू लागला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा! तुला वाटत नाही कां विशाखने हा सर्व मुर्खपणाच केला. कारण त्याने जर कां तो मंत्र जपला असता तर तो राजा नसता कां बनला? अशी सुंदर संधी त्याने कां गमावली? खरे तर त्याने राजा बनून










स्वतःला दोष देणाऱ्यांना चांगली शिक्षा देऊन त्या संकटातून वाचून आनंदाने आपले आयुष्य घालवायचे होते. त्याने असे कां केले नाही. या शंकाचे समाधान कारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर परिणाम माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील.

ह्यावर विक्रमादित्य म्हणाला–"विशाख लोभी होता. परंतु मूर्ख नव्हता. जे कोणी स्वप्ने पहातात व त्याची स्वप्ने खरी ठरतात तेव्हांच मनुष्याला, त्यापासून उद्भवलेल्या कठीण संकटांना सामोरे जावे लागते. आपल्याला असे अनुमान काढावे लागेल की, त्या स्वप्नाच्या यथार्थाची जाणीव करून देण्याकरीताच मुनींने त्याला तसा वर दिला. त्यामुळेच तर विशाखला काही योग्यता नसतांना सुद्धा तो लक्षाधिशाच्या मुलीबरोबर लग्न करू शकला व त्याच्याकडे असलेल्या लोकांना त्यामुळे त्यांच्याबद्दल इर्ष्या वाटू लागली. तशाच प्रकारे धंद्यातील अनुभव नसतांना सुद्धा कोट्याधिश बनला व इतर लोकांच्या अफवांना कारण बनून राजाच्या शिक्षेला घाबरला ह्या अनुभवाने त्याला पटले की मुनींकडून प्राप्त झालेल्या वरांनी फक्त स्वप्नाच खरेपण प्राप्त होते परंतु त्या स्वप्नाचा दुष्परिणाम सोडविण्यास मात्र त्याचा काही उपयोग होत नाही. ह्या अनुभवाचा त्यांनी विचार केला की, राज्य कारभारा विषयी काही माहीती नसलेले आपण जर कां राजा बनलो तर एकवेळ आपण आपल्या बाबतीत अफवा उठवणाऱ्यांना दंड देऊ पण त्यानंतर जनतेच्या समस्या सोडविण्याकरीता किंवा त्याचे रक्षण करण्याकरीता आपण नक्कीच अयशस्वी होवू. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून विशाखने मुनींच्यापाशी परत जाऊन ते वर परत घेण्याविषयी विनविले.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





आपली देवळे :

## काशी

जगातील प्राचिन शहरापैकी एक स्थळ आहे. काशीचा अर्थ प्रकाशीत स्थान किंवा जास्त संख्येने काश पुण्य मिळणारे ठिकाण. गंगेच्या उपनद्या वरूणा व असि ह्यामध्ये वसलेला हा भाग त्यामुळे ह्या काशीला वाराणसी म्हणूनही संबोधले जाते.

प्राचिन काळापासून ह्या शहरात शंकराचे देऊळ आहे. त्यामुळे ह्या शहराला पवित्र स्थळ मानले जाते. ह्या शिवालयाचे निर्माण सर्वात प्रथम कोणी केले हे आजतागायत अज्ञातच राहिले आहे.





फार पूर्वीच्या काळी राजा दिवोदासने राज्य केले. त्यांनी जनतेचे कल्याण मनापासून करून न्यायाने राज्यकारभार केला. व ते करताना तो शंकराची भक्ति करण्यास पूर्ण विसरून गेला. राजसभेतील थोरामोठ्यांनी सुद्धा राजाला सुचविले नाही.




राजाच्या ह्या उपेक्षेने शंकराला अत्यंत राग आला. तरी सुद्धा त्यांनी कोणत्याही प्रकारे राजाचे नुकसान केले नाही. परंतु त्याचे शहर सोडून निघून गेला हि गोष्ट फक्त शंकराचे भक्त सोडले तर इतर अन्य लोकांना माहित नव्हती. राजा जनतेच्या कल्याणाच्या गोष्टी करण्यातच मग्न राहिला.

कैक वर्षे लोटली एकदा शंकराच्या मनात आले कि आपल्या अनुपस्थितीत नगराची स्थिती कशी आहे ते पहावे. काशी नगराची स्थिती पहाण्याकरीता त्यांनी आपल्या काही प्रमुख गणांना काशी नगरात पाठविले. ते रुद्रगण तेथील शोभा पाहून तन्मय होऊन परत न जाता तेथेच राहिले.





एकदा विष्णूनी ब्राह्मणांचा वेष धारण करून दिवोदासची भेट घेत समजावत म्हटले–"राजा, माणुस जर उत्तम चरित्रवान बनला तर काही उपयोग नाही. त्याच्या मध्ये अध्यात्मिक चिंतन व भक्तिची आवश्यकता असते. ह्याकरीता तू शंकराचे ध्यान कर.

राजाने आपल्या अध्यात्मिक कर्तव्याचे पालन करण्याचा निश्चय केला. एक शंकराचे नविन सुंदर देऊळ बांधवले व त्यात शिवलिंगाची प्रतिष्ठापना केली. ते पाहून शंकर प्रसन्न झाले व काशी नगराला परत आले.






कालमानाप्रमाणे जुने शंकराचे देऊळ नाहीसे झाले. सध्याचे जे काशीमध्ये शंकराचे देऊळ आहे त्याचे निर्माण त्यावेळी इंदुरची राणी अहिल्याबाई हिने केले त्या देवळाच्या गोपुराला पंजाबचा राजा रणजीत ह्याने सोन्याचा मुलामा करविला.

विश्वनाथ किंवा विश्वेश्वर नावाने संबोधले जाणारे हे शिवाचे मंदिर पहाण्याकरीता दररोज कैक माणसे कित्येक लांबलांबच्या देशातून तिथे येतात. शंकराची पुजा विशेष प्रकाराने काही काही पुण्य दिवस पाहून केली जाते.





वाराणसीच्या जवळून वहाणाऱ्या गंगा नदीत स्नान करणे म्हणजे भक्त लोक अत्यंत विशेष मानतात. काही यात्रेकरू काशीमध्ये मृत्यु आला म्हणजे अत्यंत पुण्य प्राप्त झाले असे समजतात. मेलेल्या माणसांचे क्रियाकर्म काशी येथे करणें म्हणजे अत्यंत पुण्यकार्य मानले जाते. काहीजण मृत माणसांचे अस्थि विसर्जन गंगेत करतात.

काशी गाव हे शास्त्रीकरून पौराणिक कथाने जोडले आहे. हरिश्चंद्र ज्यावेळी स्मशानाची राखण करत होता तेव्हां त्याच्या पत्नीने आपल्या मृत मुलाचे शव अग्नीसंस्कार करण्यासाठी येथेच आणले होते असे म्हणतात.





कैक वर्षापासून अनेक भक्तगणांनी काशी येथे येऊन शिवाचे दर्शन घेतले आहे. त्यात गौतम बुद्ध, आदिशंकर, रामानुज, कबीर, गुरुनानक, तुलसीदास, चैतन्यप्रभु इत्यादी अनेक मोठ्या पुरुषांनी येऊन इथे दर्शन घेतले आहे. हजारो वर्षांचा इतिहास समोर ठेवणारे हे काशी शहर आज सुद्धा तितकेच नित्यनविन रुपाने शोभायमान आहे.



# पुत्र-वात्सल्य

पोतनम नगरात राजा सोमचन्द्र राज्य करीत होता. त्यांना प्रसन्नचंद्र नावाचा एक मुलगा होता. एकदा धारीणी आपल्या पतीचे केस विंचरत होती. तेव्हां तिने आपल्या पतीच्या केसांतील एक पांढरा केस दाखवून त्याची थट्टा केली.

"मी आता राजत्याग करतो. त्या आधी मला राज्यकारभारापासून मुक्ति मिळाली पाहिजे. मी जंगलात जाऊन महामुनी सारखी तपश्चर्या करून माझे आयुष्य घालवतो" राजा तिला म्हणाला.

धारिणी आपल्या नवऱ्यापासून दूर राहू शकत नव्हती त्यामुळे ती म्हणाली–"जर कां आपण जंगलात जाण्याचा निश्चय केलाच असलात तर मी सुद्धा आपल्या बरोबर येते."

राजानें आपला मुलगा प्रसन्नचंद्रचा राज्यभिषेक केला व तो आपल्या बायकोसह जंगलात निघून गेला व तेथे तपश्चर्या करण्यास आरंभ केला. धारिणी त्यावेळी गरोदर होती. काही काळाने तिने एका मुलाला जन्म दिला व त्याचे वल्कलचीरि असे नामकरण केले.

काही दिवसाने धारिणीचा स्वर्गवास झाला. तेव्हां सोमचंद्रनी त्या मुलाला म्हशीचे दुध पाजवून त्याचे पालन पोषण केले. मुलाला जेव्हां समज आली तोपर्यंत तो ऋषी मुनींच्यात सानिध्यात होता.

प्रसन्नचंद्रला जेव्हां समजले की, आपले वडिल जंगलात ऋषीमुनींच्या सानिध्यात आपल्या लहान भावाला घेऊन आपले उर्वरित आयुष्य घालवित आहे. तेव्हां त्याने निश्चय केला की, कोणत्याही तऱ्हेने आपण आपल्या धाकट्या भावाला राजमहालात आणले पाहिजे.



ह्याकामाकरीता प्रसन्नचंद्रने नर्तकींना बोलावणे पाठविले व त्यांना आश्रमवासिय मुलीचे वेष धारण करावयास सांगितले व हातात फळे व पक्वान्न घेऊन वल्कलचीरिला आकृष्ट करून कशाही प्रकारे त्याला बरोबर घेऊन येण्याकरीता त्यांना जंगलात पाठविले.

त्या नर्तकी वल्कलचीरिला जंगलात एकांतात भेटल्या व त्यांनी त्याला फळे-मेवामिठाई खायला घातले वल्कलचीरिला त्यांच्या वेषावरून वाटले की, त्या सुद्धा आश्रमावासी तपस्वीनी असाव्या.

नर्तकींनी त्याला समजावत म्हटले—"आमचा आश्रम पोतनम नावाच्या ठिकाणी आहे. आमच्या आश्रमात मोठे स्वास्थ मिळते. आमच्या बरोबर आलात तर अशाच प्रकारचा आहार खायला मिळेल. त्यावर वल्कलचीरिला पोतनम आश्रम पहाण्याची प्रबळ इच्छा उत्पन्न झाली. तितक्यात सोमचंद्रला त्या ठिकाणी येत असलेले पाहून त्या सर्वजणी झटक्यात जंगलात निघून गेल्या.

वल्कलचीरि त्यांना शोधण्याकरीता थोडा दूर त्याच्या मागे आला. तेव्हां त्याला तेथून एक बैलगाडी जाताना दिसली. त्याने गाडीवाल्याला विचारले—"हे मुनिवर, पोतनम आश्रमाला जावयास रस्ता कुठून आहे? गाडीत बसलेली गाडी-वाल्याची बायको हळूच हसू लागली.

"पोतनमला जायचे असले तर ह्या गाडीत बस, मी सुद्धा तिकडेच जावयास निघालो आहे." गाडीवान म्हणाला. वल्कल-चीरि गाडीत जाऊन बसला तेव्हां पासून तो एकच विचारात मग्न राहला—तेथे कोणत्या ऋषींचा आश्रम आहे ? तेथील आश्रमात कोणते मुनी रहातात ? त्या आश्रमाचे नाव काय आहे ? त्याचा भोळेपणा पाहून त्यांना हंसू येऊ लागले.

रस्त्यात एका दरोडेखोराने त्यांची गाडी थांबविली. परंतु तो गाडीवान अत्यंत शुर होता. त्याने काठी घेऊन त्या चोराच्या डोक्यावर ठाणकन् मारली. चोर खाली पडला. गाडीवानाने त्या चोराजवळची सर्व संपत्ती घेतली. व तो सरळ गाडीत बसून गाडी हांकू लागला. व पोतनम शहरी येऊन पोहोचला.



तेव्हां गाडीवानाने वल्कलचीरिला विचारले—"बाळ, हाच तो पोतनाश्रम आहे. ह्या गावात तुला काही हवे असले तर पैशांची जरूर भासेल तेव्हां हे पैसे ठेऊन घे." असे म्हणत त्याने त्या मुलाच्या हातात थोडे पैसे दिले. व परत गाडीवर स्वार होऊन गाडी हांकीत घेऊन गेला.

वल्कलचीरि ते शहर पाहून आश्चर्य-चकित झाला. त्याने स्वप्नात सुद्धा असा विचार केला नव्हता की असे सुद्धा आश्रम असतात. तो रस्त्यातून सर्वत्र फिरला व जो कोणी समोर दिसेल त्याला म्हणू लागला—"महामुनी, नमस्कार ! शेवटी एका घराच्या अंगणात येऊन पोहोचला. ते घर एका राजनर्तकीचे होते.

वल्कलचीरिने त्या नर्तकीला पाहून म्हटले—"हे देवी, मला रहावयास एक झोपडी देववा." असे म्हणत त्याने गाडीवानाकडून मिळालेले पैसे काढून तिच्या हातात दिले.

"ठिक आहे, बाळ ! असे म्हणत त्या राजनर्तकीने त्याला न्हाऊ घातले व कपडे बदलावयास दिले व आपल्या मुली बरोबर त्याचे लग्न लाऊन देण्याकरीता तयारी सुरु केली. वल्कलचीरिने काहीही त्रास न देता जे सांगितल ते केले. परंतु जशी लग्नाची शहनाई वाजू लागली तसे त्याला आश्चर्य वाटू लागले. ते वाद्याचे सुर ऐकून त्याच्या मनात भीती उत्पन्न झाली.

नर्तकींनी प्रसन्नचंद्रच्यापाशी जाऊन सारा समाचार राजाला सांगितला. त्यांच्या बरोबर आपला धाकटा भाऊ आला नाही पाहून त्याचे मन दुःखाने व्याकुळ झाले. तो प्रथमत: दु:खी होता. तेवढ्यात राजनर्तकीच्या घरी वाजणाऱ्या मंगल गीताचे सुर ऐकून त्याला सहन झाले नाही.

राजाने शोध करण्याकरीता शिपायांना धाडले तेव्हां त्यांना खरी गोष्ट माहीत पडली राजनर्तकीचा जावई होणारा राजाचा धाकटा भाऊच होता.

प्रसन्नचंद्रने त्याला बोलावून आणून राजमहालात ठेवले. व त्याने राज्यातील थोडा हिस्सा त्याच्या नावे करून एका सुंदर राजकुमारी बरोबर त्याचे लग्न थाटामाटाने लावून दिले.

वल्कलचीरि आपल्या मोठ्या भावाकडे गेल्यानंतर चार दिवसांनी राजाच्या शिपायांनी गाडीवानाला चोर म्हणून पकडून राजाच्या समोर आणले. भावाच्या शेजारी बसलेल्या वल्कलचीरिने गाडीवानाला ओळखले व खरी घडलेली गोष्ट सांगून त्याची सुटका केली.

वल्कलचीरि आपल्या भावाच्या महालात बारा वर्षे सुखाने राहिल्यानंतर त्याला आपल्या वडिलांची आठवण आली. तेवढ्या अवधीत तो म्हातारा बाप मुलाच्या आठवणीने रडून रडून आपले दोन्ही डोळे घालवून बसला. बाकी इतर मुनींनी त्यांची देखभाल केली. वल्कलचीरिच्या बातमीतली माहिती काढून ते सोमचंद्रला म्हणाले– "आपण मुलाची अजिबात चिंता करू नका. वल्कलचीरि आपल्या मोठ्या भावाकडे आनंदाने आपले दिवस घालवित आहे.

आपल्या वडिलांची आठवण येताच वल्कलचीरि पश्चातापाने तडफडू लागला व आपल्या वडिलांना पहाण्याच्या इच्छेने निघाला. त्याच्या बरोबर प्रसन्नचंद्र सुद्धा त्याच्याबरोबर निघाला. रस्त्याने जाताना आश्रमाची सर्व ठिकाणे त्यानी भावाला दाखविली. जी जी त्याला माहीत तितक्यात सोमचंद्रला आपली मुलगा आपल्या भेटीला येत असल्याचे समजले व त्याच्या डोळ्यातून अखंड अश्रुधारा वाहू लागल्या. त्या अविरत अश्रूमुळे त्याची गेलेली दृष्टी परत आली हे विचित्र दृष्य पाहून सर्वजण आश्चर्य चकित झाले.






रूद्र व दानव यांचे युद्ध सुरु झाले.

कित्येक दिवस युद्ध चालू राहले तरी शंखचूडाचे सैन्य माघार घेत नसलेले पाहून शंकराला आश्चर्य वाटले. त्याने विष्णूचे स्मरण करून त्याला बोलाविले व शंखचूडाचा पराभव न होण्याचे कारण विचारले व म्हणाला–"कित्येक दिवस युद्ध चालू आहे पण शंखचूडाचे सैन्य कमी होत नाही. याचे कारण काय ?"

तेव्हां विष्णू म्हणाला–"शंखचूड राक्षसाची पतिव्रता पत्नी आपल्या पातिव्रत्याच्या बळावर त्याचे रक्षण करीत आहे. मी तिचे पातिव्रत्य भंग करून तुझा मार्ग मोकळा करतो. तू त्याचा वध कर." त्यानंतर विष्णू शंखचूडाचे रूप धारण करून तिच्या घरी गेला अणि तुलसीला म्हणाला–"मी शंकराशी युद्ध करीत आहे, आजपर्यंत कोणालाच जयलाभ झाला नाही. तुला सोडून कित्येक दिवस लोटले. म्हणून तुझ्याकडे आलो आहे." तुलसीनें विष्णूला ओळखले नाही. आणि पति समजून त्याच्या सहवासात कित्येक दिवस राहली. अशा तऱ्हेने तिचे पातिव्रत्य भंग झाले. तिकडे शंखचूडच्या सैन्यांचा संहार होऊ लागला व शेवटी शंकराने शंखचूडाचा वध केला.

त्याच दिवशी रात्री विष्णूला आपल्या बरोबर एकाच शय्येवर झोपलेला असताना तुलसीने ओळखले. शंखचूडाचा वध झाला होता आणि विष्णूचे मायावी रूप उघडे



पडले तिची फसवणूक केली होती. म्हणून तिने विष्णूला "दगड हो" असा शाप दिला.

तू गंडकी नदी होऊन मी शाळिग्राम होऊन शाश्वत राहू. तुझ्या नावाने एक पतिव्रता नारी म्हणून तुळशीच्या झाडाची पूजा होत राहील." असा आशीर्वाद देऊन विष्णूने तुलसीला घेऊन वैकुंठ लोकी प्रस्थान केले.

प्राचीन काळी सालंकायन नावाचे एक ऋषी होते. त्यांना शिलाद नावाचा मुलगा होता. शिलादला अपत्य नव्हते. म्हणून तो कैलासावर तपश्चर्या करू लागला. पार्वती परमेश्वरांनी त्याच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन त्याला दर्शन दिले व त्याच्या मनातली इच्छा ओळखून मोठ्या दुःखाने म्हणाले शिलाद ! तुझ्या नशिबी अपत्य नाही रे पण तुला निराळ्या तऱ्हेने पुत्रप्राप्ती होईल." तो आपल्या आश्रमात परत आला. परंतु त्याला कित्येक दिवस पुत्रप्राप्ती झाली नाही. म्हणून त्याने यज्ञारंभ करण्याचे ठरविले व यज्ञकुंडासाठी खड्डा खणू लागला. तेव्हां त्याला एक सुंदर मुलगा दिसला. त्या मुलाला त्याने स्वतःचा मुलगा मानून त्याचे नंद असे नामकरण केले आणि त्याचे सर्व प्रकारे लाड पुरवू लागला.

एकदा मित्र व वरुण नावाचे दोघे मुनी आश्रमात आले. नंदला पाहून दोघे म्हणाले–"शिलाद ! तुझा हा मुलगा अल्पायु दिसतो आहे. म्हणून शिलादचे मन दुःखी व हताश झाले.

नंदला वडिलांच्या दुःखाचे कारण समजले त्याने केदार पर्वतावर जाऊन पार्वती परमेश्वराची आराधना सुरू केली. शंकर पार्वतीने त्याच्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन त्याला वर मागून घेण्यास सांगितले–

"भगवान् ! मी दीर्घायु होऊन सर्वदा आपली सेवा माझ्या हातून घडेल आणि मला शिवभक्त म्हणून कितिलाभ होईल असा वर द्यावा" नंद म्हणाला.



पार्वती परमेश्वरांनी त्याला तसा वर दिला. आणि त्याचे नंदीश्वर असे नामकरण केले. त्याला गणाधिपति म्हणून देखील नेमून शंकराने नंदीश्वरचा अभिषेक आपल्या जटेतल्या गंगाजलाने केला व ते गंगाजल त्रिस्त्रोत, जटोदक, स्वर्णोदक, जंबू व वृषध्वज या पंच नद्यांच्या रूपे वाहू लागले.

त्यानंतर काही काळ लोटल्यावर नंदीश्वरने मरुतपुत्री सुकीर्ती हिच्याशी विवाह करून घेतला. नंदीश्वर शंकराच्या आज्ञेने रुद्रगणात सामील झाला.

सृष्टीच्या प्रारंभकाली त्रिमूर्ती उत्पन्न झाले, ब्रह्म विष्णु व महेष. तेव्हां ब्रह्मदेव विष्णु व महेषाला म्हणाला—"मीच परब्रह्म स्वरूप आहे. तुम्ही दोघे माझी सेवा करा."

ते ऐकून शंकराने रौद्ररूप धारण केले आणि हुंकार केला. त्याबरोबर एक महाकाय निर्माण झाला. त्याला तीन डोळे होते आणि त्याचे अंग गौर होते. त्याच्या हातात त्रिशूल आदि आयुधे होती. त्याने डमरू वाजविल्या बरोबर ब्रह्मांड दुमदुमले. तो म्हणाला, हे परमेश्वरा! आपण माझी सृष्टी कशासाठी केली आहे?"

"तू ब्रह्मदेवाला दंड दे" शंकर म्हणाला. ते ऐकून त्या महाकाय पुरुषाने ब्रह्मदेवाच्या पांच डोक्यां पैकी मधले डोके आपल्या बोटाच्या नखाने उपटून दूर फेकून दिले. ब्रह्मदेवाचे ते डोके जेथे पडले तो प्रदेश ब्रह्मकपाल झाला आणि ज्या महाकाय पुरुषाची सृष्टि केली त्याला कालभैरव नांव पडले व शंकराने त्याला आपला अंगरक्षक म्हणून नेमले.

परंतु कालभैरवाने ब्रह्महत्या केली होती म्हणून ते पाप एक भयंकर रूप धारण करून कालभैरवाच्या पाठीस लागले. ते पाहून शंकर म्हणाला—"हे कालभैरवा! ब्रह्महत्येच्या पापातून मुक्ती मिळावी म्हणून तीर्थाटन करीत काशीला जा." कालभैरव तीर्थाटनास निघाला व काही काळ लोटल्यावर काशीला पोचला. तेथे त्याने गंगास्नान केले आणि पापमुक्त होऊन तेथेच क्षेत्रपाल म्हणून राहू लागला व लोक त्याची पूजा करू लागले.

प्राचीनकाळी व्याघ्रपाद नामक एक मुनी होते. त्याच्या पत्नीचे नाव विमला. दोघांनी शंकराची आराधना केली तेव्हां त्यांना पुत्र प्राप्ती झाली त्या मुलाचे नांव त्यांनी उपमन्यु असे ठेवले.

विमलाच्या माहेरची मंडळी विमलाला व तिच्या मुलाला माहेरी बोलावून घेऊन गेली. आणि काही काळ माहेरवास करून विमला आपल्या मुलाबरोबर व्याघ्रपादकडे परत आली.

उपमन्यु पांच वर्षाचा झाला असेल. एकदा तो आपल्या आईला म्हणाला—"आई, मला दूध पाहिजे!"

"बाळ, आपण गरीब आहो. तुझे मामा श्रीमंत आहेत म्हणून तुला दूध खूप खूप मिळत होते पण आपल्या घरी दूध कोठून मिळणार?" विमला मुलाला म्हणाली.

त्यानंतर विमलाने पाण्यात सातूचे पीठ कालवून मुलाला दिले. पण मुलगा ते प्याला नाही व रडू लागला.

"बाळ! मी तुला किती सांगितले की, आपण गरीब आहों, तरी तू रडतो आहेस



तर मी तरी आता काय करू?" आईने विचारले.

"आई! आपले दारिद्र्य दूर व्हायला काही उपाय आहे का? उपमन्युने विचारले. तेव्हां विमला मुलाला व्याघ्रपाद मुनीं-जवळ घेऊन गेली आणि सर्व काही थोडक्यात सांगितले.

व्याघ्रपाद मुनींनी मुलाला शिवपंचाक्षरी मंत्र दिला आणि म्हणाले—"मुला! तू कैलास पर्वतावर जाऊन या मंत्राचा जप कर. तुला पार्वती परमेश्वराचे दर्शन घडेल."

त्याप्रमाणें उपमन्यु कैलास पर्वतावर जाऊन पंचाक्षरी मंत्राचा जप करू लागला.



Restore







शंकराने एक विकृत रुप धारण केले आणि उपमन्यूला दर्शन देऊन विचारले– "मुला! तू या निर्जन स्थानी एकटा कां रहातो आहेस? हिंस्त्र पशू तुला खाणार नाहीत कां? म्हणून परत जा."

मी आपला सल्ला मागितला नव्हता. एक भयंकर अरण्य आहे. हे मला कळते माझे मन परावृत्त करणे कोणालाही शक्य नाही. कारण पार्वती परमेश्वराचा माझ्यावर अनुग्रह आहे." उपमन्यू म्हणाला आणि डोळे मिटून जप करू लागला.

उपमन्यूची ती भक्ति पाहून पार्वती व परमेश्वरांनी त्याला दर्शन देऊन वर मागायला सांगितले.

उपमन्यु म्हणाला–"भगवन्! आपण पार्थिव लिंगरूपे माझी पूजा ग्रहण करावी आणि मला सर्व प्रकारे ऐश्वर्य प्रदान करावे."

शंकर पार्वतीने त्याला ते दोन्ही वर दिले आणि उपमन्यू घरी गेला. त्यानंतर त्याचे पुढील आयुष्य सुखी झाले.

आदि काळात देव आणि दानव यांची आपसात युद्धे होत असत. तेव्हां देवांचा पराभव होई आणि अनेक देव मरून जात. म्हणून देव मेरु पर्वतावर वैकुंठ लोकी विष्णूच्या दर्शनाला गेले. आणि हात जोडून म्हणाले–"हे देवाधिदेव! आम्हांला अमरत्व येईल असा एखादा वर दे."

विष्णु विचार करून म्हणाला–"तुम्ही व राक्षस दोघे मिळून सर्व वनस्पती व द्रव्य क्षीरसागरात टाका आणि मंदर पर्वताची रवी करून क्षीरसागराचे मंथन करा, म्हणजे अमृत प्राप्ती होईल ते सेवन केल्यास तुम्हांला अमरत्व लाभेल.

देवांनी विष्णूचा निरोप घेतला आणि मंदर पर्वत उपटून आणण्याचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. परंतु मंदर पर्वत जागचा हालेचना. तेव्हां देव पुन्हां विष्णू-कडे गेले आणि म्हणाले–"हे देवाधिदेवा! मंदरपर्वताची रवी कशी काय होणार? तो पर्वत जागचा हालत देखील नाही तेव्हां विष्णूने शेषनागाला आज्ञा केली.





# जसाच तसे

एकदा चार खेडूत काही कामाकरीता बगदाद शहरात गेले व तेथे एका धर्मशाळेत उतरले. थोड्यावेळाने ते आपल्याला हव्या असलेल्या वस्तू खरेदी करण्याकरीता बाजारात गेले. त्या संधीचा फायदा घेऊन एका चोराने त्या लोकांचे सुकत घातलेले जुनेकपडे चोरले व पळून गेला.

चोरांनी ते कपडे बाजारात जाऊन विकण्याचा विचार केला. परंतु ते अगदी जुने झाले होते. त्यामुळे ते कोणी विकत घेतले नाहीत त्याने असा विचार केला आणि ते कपडे एका गाठोड्यात बांधून आपल्या खाकोटीला लावले व तसाच बसून राहिला. त्याचा विचार होता की, कोणी भोळाभाबडा माणूस नक्कीच आपल्या जाळ्यात अडकेल.

तितक्यात एक माकड उड्या मारीत वेडेवाकडे पळत त्याच्या समोर आले. ते हावभाव करीत त्याच्या समोर नाचू लागले तो नाच पहाण्यात चोर दंग झाला असतां-नाच माकडवाल्याने त्याच्या खाकोटीचे गाठोडे ओढले व तो पळून गेला. माकडांचा खेळ दाखवून चोरी करणारा तो आणखी एक चोरच होता.

पहिल्या चोराला थोड्यावेळाने समजलें की, आपल्या खाकोटीचे कपड्याचे गाठोडे कोणीतरी चोरून नेले आहे. तो ओरडा आरडा करीत किंचाळू लागला. ते पाहून आजुबाजूचे लोक गोळा झाले. तितक्यात तो चोर पळाला.

दुसऱ्या दिवशी नगरातील एका भागात पहिल्या चोराने पाहिले तो समोर एका बंद खोक्यात काही कपडे ठेऊन तो ओरडत होता–"सरकार, कपड्याच्या धंद्यात माझे नुकसान झाले. त्यामुळे मी माझे दुकान बंद करून हे उरलेले कपडे








स्वस्तात विकत आहे. लवकर या. लवकर खरेदी करा."

पहिल्या चोराला त्या कपड्यांची किमत अतिशय कमी वाटली त्याने त्या खोक्याला हात लावला. ते पाहून बजाज खवळला व त्याला म्हणाला– "महाराज, पैसा दिलात तरच तुम्हाला ह्याला हात लावता येईल. माझे नशिब फुटके आहे. म्हणून मी हे कपडे अगदी स्वस्तात विकत आहे. तुम्हांला समजत नाही कां?

पहिल्या चोराला तो म्हणतो त्यात काहीतरी गुढ वाटू लागले त्याने विचार केला की, हे विकत घेऊन दुसऱ्या ठिकाणी थोडा फायदा मिळवून विकता येतील म्हणून त्याने बजाजला पैसे देऊन तो कपड्यांचा खोका घेतला व तो तेथून ताबडतोब, निघून गेला.

चोराने खोक्याला बांधलेली दोरी सोडली आतले कपडे पाहून थक्कच झाला. ते कपडे म्हणजे पूर्वी धर्मशाळेतून त्यांनी चोरलेले कपडेच होते. बाकीच्या पेट्या पण त्याने उघडून पाहिल्या तेव्हां त्याने चोरलेले सर्व कपडे देऊन आपल्याला दगा दिला.

चोर त्याच्या हुषारीवर चकावून गेला. धर्मशाळेतून ते कपडे चोरतांना तो इतका घाबरला होता की, कपडे चोरतांना आपल्याला कोणी पाहिले तर नाही नां! तेच कपडे दुसऱ्याने चोरले तर त्याला खूप दु:ख झाले. पण तेच कपडे परत त्याने पैसे देऊन खरेदी केले. छे: छे: हे काय! त्या खेडूतानी आपल्याला दिलेला शापच असावा. त्यातून जर हे कपडे मी माझ्या जवळ ठेऊन घेतले तर न जाणो आणखी कोणकोणती संकटे येऊन पडतील.

त्यानंतर त्यांनी सर्व कपडे एका गाठोड्यात बांधले व नंतर अंधार पडल्यावर तो ते घेऊन धर्मशाळेत आला त्या चौथऱ्यावर झोपलेल्या एका खेडूताच्या शेजारी ठेवून तेथून पसार झाला.



# देवावरची भक्ति

श्रीपुर गावात एक कृष्णशास्त्री नावाचे पंडीत रहात होते. ते दरवर्षी नवरात्री उत्सवात प्रवंचन करीत असत. त्यावेळी ते गावकऱ्यांना देवावरच्या भक्ति व श्रद्धेविषयी उपदेश करीत. ते एक चांगले ज्ञानोपदेशक होते. त्याकारणाने गांवकरी प्रचंड समुहाने एकत्र जमत. त्यांची प्रवंचने अत्यंत उत्साहाने सफल होत असत.

कृष्णशास्त्रींना हरिदास नावाचा एक मुलगा होता. त्याने सर्वशास्त्रांत प्राविण्य संपादन केले. व वडिलांप्रमाणेच तत्वज्ञानात तो सर्वतऱ्हेने उत्तिर्ण झाला.

असेच एका वर्षी नवरात्रीच्या उत्सवात दोन दिवस कथा किर्तनात मजेत पार पडले परंतु तिसऱ्या दिवशी अचानक कृष्णशास्त्री आजारी पडले. त्याकारणाने कृष्णशास्त्रीने पुढच्या दिवसांचा कार्यक्रम आपल्या मुलाला पार पाण्याकरीता सांगितला.

तिसऱ्या दिवशी बैठकीच्या ठिकाणी कृष्णशास्त्रीच्या ऐवजी हरिदासला पाहून बरेच गावकरी उठून जाऊ लागले. ते पाहून हरिदास तेथे उपस्थित असलेल्या सर्वांना उद्देशून म्हणाले– "भक्तगणांना माझी एक विनंती आहे. आजारी पडल्यामुळे कृष्णशास्त्री आजच्या सभेला काही उपस्थित राहू शकले नाहीत. त्यामुळे जे लोक कृष्णशास्त्रींना पहाण्यासाठी आले आहेत ते जाऊ शकतात पण जे देवावर भक्ति करण्यासाठी आले आहेत त्यांनी कृपया खाली बसावे.

ते निवेदन ऐकताच सर्वजण गुपचुप खाली बसले.





# सौंदर्याची उपेक्षा

सुवर्णदेशची राजकुमारी मोहना अत्यंत लावण्यवती होती. तिला सुंदरते बरोबर तिच्या लावण्याची घमेंड होती. त्याकारणाने राजापुढे तिच्या लग्नाची मोठी विवंचना पडली. तिला कोणत्याही देशाच्या सुंदर राजकुमाराचे चित्र दाखविले तरी त्याला ती स्पष्ट नकार दर्शवित असे व आपल्यापेक्षा तो सुंदर नसल्याचे सांगत असे.

असेच एक दिवस ती राजोद्यानात फिरत असतांना अचानक काही दरोडेखोर तिला उचलून घेऊन पळून गेले. त्यांच्यात पाखंड नावाचा एकजण त्या चोरांचा नायक होता. त्याने राजकुमारीला पहाडी गुहेमध्ये आणले.

त्यातील एका गुहेमध्ये चोरांचा नायक आपल्या कुटुंबासह रहात होता. त्याच्या बायकोचे नाव पातकी होते व त्याना एक मुलगी होती. तिचे नाव रोता होते. त्या सर्वांच्या सेवेला दोन नोकर व एक बरीच वयस्कर बाई पण होती.

पाखंडने राजकुमारी मोहनाला म्हटले– "हि माझी गुहा आहे. इथे फक्त माझे कुटुंबच रहाते. मी चोरांचा सरदार आहे. माझे सारे साथीदार इथे येण्याचे धाडस कधी करीत नाहीत.

"पण मला इथे घेऊन येण्याचा काय अर्थ ? मला इथे कां आणलेत ?" मोहनाने अत्यंत रागाने विचारले.

पाखंडने शांत स्वरात म्हटले–"माझ्या पत्नी करीता मी साऱ्या सुखसोई ह्या गुहे मध्ये करून ठेवल्या आहेत तरी ती नाराज असते व मला त्रास देते. मी तीला कित्येकदा सांगून पाहिले मी, मला त्रास देत जाऊ नको तू सांगशिल ते मी तुला आणून देईन तेव्हां तिने मला तुला पळवून आणून माझी सेवा करावयास लावण्यास सांगितले त्याकारणामुळे मी तुला घेऊन आलो."



हे उत्तर ऐकून तिला अत्यंत आश्चर्य वाटले. तिने कुतुहलाने पाखंडच्याकडे निरखून पाहिले तेव्हां तो चांगला सहा फूट उंच होता. त्याचे शरिर तगडे होते व वर्ण गोरापान होता. त्याचा चेहरा अत्यंत सुंदर होता. परंतु तिने जेव्हां त्याच्या बायकोकडे पाहिले तेव्हां ती दिसावयास अत्यंत कुरूप, बुटकी, काळी जाडी होती. तिची मुलगी रोता अगदी आईचाच अवतार होती.

पाखंड व मोहनाचे काही बोलणें चालू होते. तेवढ्यात एक वृद्ध सेवक तेथे टपकला व मध्ये तोंड खुपसून म्हणाला– "आता ह्या सुवर्णसुंदरीने गुहेत पाय ठेवला आहे. म्हणजे नक्कीच आपला सरदार हिच्या बरोबर लग्न करणार.

ते ऐकताच पाखंडला अत्यंत संताप आला क्रोधाने त्याने त्या वृद्ध सेवकाच्या थोबाडीत ठेऊन दिली–"अरे गाढवा, मी एकपत्नीव्रत पाळले आहे. परत फिरून कधी तोंडातून असला शब्द काढलास तर याद राख. तुझ्या शरीराचे तुकडे करून टाकेन.

नाईलाजास्तव मोहनाला त्या गुहेमध्ये रहाणे भाग पडले. सुरवातीला तिने पातकीची सेवा करण्यास नकार दिला परतु इतर नोकरचाकरांनी जेव्हां तिला सांगितले की, जर तिची सेवाचाकरी केली नाहीस तो काय तर शिक्षा करेल ते ऐकून घाबरून तिने पातकीची सेवा करण्यास सुरवात केली.

एका वृद्ध सेवकाला दिपकला राजकुमारी मोहनाची अत्यंत किव आली तो तिची सात्वंता करीत म्हणाला–"तू तर अप्सरे प्रमाणे सुंदर आहेस. तुला तर अशा गोष्टी करण्याचे काही कारणच नाही. त्यातून तुला जर येथून सुटका मिळवायची असली तर एकच मार्ग आहे. तू आपल्या रूपालावण्याने आमच्या सरदाराला आपल्याकडे आकृष्ट करून घेण्याचा











प्रयत्न कर. त्याची योग्य पत्नी तर तुचबनू शकतेस. ते तुझ्या बरोबर विवाह करतील तर तुझी सारी संकटं दूर होतील.

"छी! छी! असे तोंडातून शब्दही काढू नकोस. मी तर एका देशची राजकुमारी आहे. काय मी चोरांच्या सरदारा बरोबर लग्न करू? तुम्ही काय मूर्खासारखे वरळता आहात?" अत्यंत संतापाने मोहना त्यांना म्हणाली.

आमचे सरदार तसे चोरांचे सरदार असतील परंतु संसारात कोणताच राज-कुमार त्यांची बरोबरी करू शकणार नाही. बर सध्या लग्नाचे सोड पण माझ्या म्हणण्याप्रमाणे त्याना स्वतःकडे आकृष्ट-करण्याचा प्रयत्न तरी कर. नाहीतर तुला इथून बाहेर पडणे शक्य होणार नाही" दिपकने समजावत म्हटले.

लाचारीने मोहनाने छान स्नान करून चांगले कपडे परिधान केले व ती उगाचच पाखंडच्या समोरून इकडे तिकडे करू लागली. पाखंड तेव्हां विचारात मग्न होता. त्याने तिच्याकडेपाहिले सुद्धा नाही.

जेव्हां त्याचे लक्ष मोहनाकडे गेले तेव्हां त्याने तिला आपल्या जवळ येण्याची खूण करीत म्हटले–"तू छान दिसतेस, पण तू निळ्या रंगाचे कपडे घाल! म्हणजे तू ह्यापेक्षा जास्त सुंदर दिसशिल."

"तुम्हांला कसे काय माहित? मोहनाने विस्मयाने विचारले. "मला माझ्या बायकोने सांगून पाठविले तिला जितकी सुंदरतेची जाण आहे तेवढी दुसऱ्या कोणाला नसेल!" पाखंड तिला म्हणाला.

मोहनाला अत्यंत संताप आला. तरी सुद्धा नाईलाजाने गप्प राहिली. त्यानंतर एक दिवस तिने निळ्या रंगाचे कपडे घातले व ती श्रीकृष्णाचे भक्ति गीत गात इकडे तिकडे हिंडू लागली.

"तू कृष्णाचे भक्तिगीत म्हणू नकोस शिवस्तुतीचे एखादे गाणें म्हण. कारण माझ्या बायकोची शंकरावर जास्त भक्ति आहे" पाखंड म्हणाला.

तिचा चेहरा एकदम काळवंडला तिला वाईट वाटले. त्यानंतर एकदा ती आनंदाने नाचत असतांना पाखंड तिला नाराजीनेच म्हणाला–"तू माझ्या बायकोने सांगितल्या शिवाय नाचावयाचे नाही.

एकदा मोहनाने पाखंडला विचारले–"काय हो! तुमचे सेवक सांगत होते. तुम्ही धाडसी शूर व पराक्रमी आहांत! मला तरी एकदा तुमचा पराक्रम पाहू दे."

"त्या करीता जंगलात जावयास हवे. आणि तुला घेऊन जावयाचे म्हणजे माझ्या बायकोची अनुमती घ्यावयास हवी. तिची मर्जी संपादन करण्याकरीता तुला तिला प्रसन्न करावयास हवे" पाखंड तिला म्हणाला.

मोहनाला आता असे बोलणें ऐकण्याची सवय झाली होती. त्यामुळे तीने पाखंडच्या म्हणण्याचा राग दर्शविला नाही. परंतु पातकीच्यापाशी जात तिने आपली इच्छा प्रकट केली व म्हटले–"अगर, जर तुझ्या महनामधे अशी भीती असेल की, मी माझ्या सौंदर्याने तुझ्या पतीला प्रभावित करेन. व तर ते खरे आहे.

पातकी हसत तिला म्हणाली–"तू आमचे प्रेम समजू शकणार नाहीस, ठिक आहे. तू त्यांच्या समवेत जंगलात जाऊ शकतेस. मोहना पाखंडच्या बरोबर जंगलात



गेली. तेथे पाखंडने आपल्या सर्व विद्या-मधले शौर्य तिला दाखविले. ते पाहून ती खरोखरी आश्चर्यचकित झाली.

एका ठिकाणी चालत जात असतांना एका नागाने तिला दंश करण्याचा प्रयत्न केला परंतु त्याने त्वरेने त्याची शेपटी पकडून त्याला गरगर फिरवून लांब फेकून दिले. धनुष्याला बाण जोडून त्याने एका हरणाची शिकार केली व त्याला न मारता आपल्या बाणांचे चोहो बाजूला जाळे तयार केले. त्यातून हरीणाला बाहेर पडणे मुश्किल झाले.

मोहना आश्चर्याने तोंडात बोट घालीत म्हणाली–"काय हो, तुम्हांला तर कोणत्या-











तरी देशचा राजकुमार व्हावयास पाहिजे होते. तुमचे शौर्य व पराक्रम अदभुत आहे!"

"तू माझी प्रशंसा केलीस." पण मी काही संतुष्ट नाही कारण काय मी माझ्या पत्नी कडून अपेक्षा केली होती. तीने अद्यापपर्यंत माझे कधी कौतुक केले नाही ती नेहमी उलट असे म्हणत माझी टिंगल करत असते. की, तुम्ही काही अर्जुनासारखे बाण सोडून पाताळगंगेला आणू शकत नाहीत." पाखंड म्हणाला.

पाखंडच्या मनात आपल्या बायको विषयी एवढा आदर पाहून तिला त्याचे अत्यंत कुतुहल वाटले. तिने त्याला विचारले—"मी तुमच्या सर्व शौर्यकलांचे दर्शन केले. आता तुम्ही माझ्या विचारांचे करा."

"तुझ्या शौर्यकलेंचे प्रदर्शन मी माझ्या बायकोला बरोबर घेऊनच पाहिन." पाखंड म्हणाला.

ते ऐकताच तिला अत्यंत क्रोध आला. तरी तीने आपल्या रागाला आवर घातला व ती म्हणाली—"मी अत्यंत सुंदर आहे. ह्याचाखरेपणा मलाच काय पण इतर अनेक राजकुमारांना माहित आहे. माझ्या बरोबर लग्न करावयास सुंदर राजकुमार अत्यंत उत्सुक होते. त्या सर्वांचा मी तिरस्कार करीत आले. तुमच्या बायकोच्या बाबतीत हि गोष्ट मी तुमच्या समोर सांगणे चांगले नाही. परंतु तरीही मी कळवळून तुम्हांला सांगते तुमची बायको अत्यंत कुरूप आहे. तरीही तुम्हांलाबायको बद्दल इतकी अस्था कां? व माझी अवहेलना उपेक्षा कां करीत आहात?

पाखंडने मोहनाकडे एकवार निरखून पहात तिच्याकडे स्मित करीत म्हटले—"मी वरच्या बाह्य सौंदर्यपेक्षां अंतर्यामी सौंदर्याकडे जास्त आकृष्ट होतो. त्याला अधिक महत्व देतो; ह्याच कारणामुळे माझ्या बायकोवर जास्त प्रेम आहे. गुहेत परतल्यानंतर तिने हा सर्व वृतांत दिपकला सांगितला व म्हटले मला तर इथून बाहेर पडण्याचा काहीही मार्ग सांपडत नाही."

"तुझ्या पुढे एकच मार्ग आहे. तू आमच्या सरदाराच्या पत्नीला प्रसन्न कर. तिच्या शिवाय तुझे संरक्षण कोणी करू शकणार नाही." दिपकने उपाय सांगत म्हटले.

ह्यानंतर दुसऱ्या दिवशी दिपकने पातकी ज्या वाटेतून चालत जाते तेथे केळचांची साले टाकून ठेवली. नेमका तिचा पाय सालावरून घसरून पातकी खाली पडणार तेवढयात मोहनाने तिला धरले.

पातकीला खूप आनंद झाला ती म्हणाली—"तू राजकुमारी होऊन सुद्धा माझी सेवा करत आहेस. परंतु मी इथे तुला बोलावून घेण्याचे कारण तर वेगळेच आहे मी तुला एका अटीवर सोडून द्यावयास तयार आहे त्यापूर्वी तू मला एक वचन दिले पाहिजेस. माझ्या पतीला ह्या पहाडातील गुहांमधील जिवनांपासून मुक्त करावयास हवे. ह्या करीता तू काहीतरी आम्हांला मदत करावीस.

मोहनाने विचार केला की, राजमहालात परत जाण्याकरीता हिच एक चांगली संधी आली आहे. त्याकरीता तिने लगेच पातकीचे म्हणणें मान्य केले.

पातकीने आपल्या पतीस बोलावित म्हटले—"राजकुमारीला सुरक्षितपणें राजा-



ज्या हाती सोंपवा. हि आपल्या वडिलानां सर्व समजावून सांगून तुमच्या पूर्व अपराधांना माफ करावयास सांगेल.

पाखंड राजासमोर जात म्हणाला—"महाराज, हि आपली मुलगी हिला आपल्या स्वाधिन करीत आहे. हि सारा वृत्तांत आपल्याला सांगेलच."

तितक्यात मोहनाच वडिलाना म्हणाली—"बाबा, माझ्या एका इच्छेची पूर्तता तुम्हांला करावयास हवी. कसेही करून ह्या तरुणाला इथे थांबवून तुम्ही त्याच्या बरोबर माझा विवाह करून द्या.

ते ऐकताच पाखंड तेथून पळून जाऊ लागला. परंतु ते पहाताच काही सैनिकांनी

     

त्याला पकडून बंदिस्त केले. त्यामुळे त्याला पळून जाता आले नाही.

"मुली, बरेच दिवसाने तू लग्नाला तयार झाली. आहेस हिच आमच्या दृष्टीने अत्यानंदाची गोष्ट आहे." असे म्हणत राजाने अंतपुरात गुप्तरूपाने जबर्दस्तीने पाखंडचा मोहनाशी विवाह लावला.

लग्नानंतर मोहनाने पाखंडला म्हटले— "तुम्ही मला क्षमा करा. तुम्हीं तर चोरांचे सरदार आहात. त्यातून विवाहित पण आहात. तुम्ही माझी उपेक्षा केलीत. तरी सुद्धा मी तुमच्याशी जबरदस्तीने लग्न लावून घेतले. आता तुम्ही माझे पती आहात. जर कां मी तुम्हांला आवडले नसेन तर तुम्ही इथून जाऊ शकता. परंतु मी मात्र तुमची वाट पहात राहिन की, तुम्ही केव्हांना केव्हांतरी नक्कीच परत माझ्यापाशी याल." असे म्हणून मोहना पाखंडचे पाय धरून रडू लागली.

पाखंडने तिला हाताला धरीत उठवित म्हटले—"अग, आता जर मी गेलो तर तुला घेऊनच जाईन. तुझ्या मनावर तर अशी गोष्ट बिंबविण्याकरीताच व गर्वभंग करण्या करीताच तर मी असे राजाज्ञेने केले. ह्या गुहेत रहाणारे सर्व लोक तुझ्या वडिलानींच पाठविलेली माणसे आहेत. माझे नाव शौर्यसेन आहे. मी प्रतापदेशचा राजकुमार आहे. तुझ्या मनांत स्वतःच्या सौंदर्याविषयीच्या अहंकारामुळेच मी तुझी उपेक्षा केली. आता तू सांग माझ्या बरोबर माझ्या राज्यात तू यावयास तयार आहेस कां नाही?"

हे ऐकून मोहनाला अचंबा वाटला. ती स्वतःला सावरीत म्हणाली कोणीतरी आपल्याला महत्व देत आहे हे समजले तरच सुंदरतेची किंमत असेत. परंतु माणसाचे सौंदर्य म्हणजे त्यांची सज्जनता व विवेकशिल विनयता ह्याची सत्यता तर मला तुमच्या गुहेतील वास्तव्यानेच माहित झाली मी तुमची पत्नी बनून तुमची सेवा करीत माझे मला सुधारण्याचा प्रयत्न करीन. ह्यानंतर त्या दोघांनी आपले आयुष्य आनंदाने घालविले.





# धाडसी सत्यपाल

कोंकण डोंगराळ भागातील एक डोंगर भुतांचा डोंगर नावाने प्रसिद्ध होता. त्यांच्या चोहोबाजूच्या गावातील गुराखी आपापल्या गुरांना त्या डोंगरावर चरायला जाऊ देत नसत. त्यातुनही एखाद दुसरी गाय डोळा चुकवून त्या डोंगरावर जर गेलीच तर तीला परत आणण्यांचा कधी प्रयत्न करीत नसत. कारणं अद्याप पर्यंत अशा गाईंना आणणारे जेवढे म्हणून पर्वतावर गेले ते कधी फिरून परत आले नाहीत.

त्या भुतांच्या डोंगरावर अनेक गाई चरायला जात होत्या त्या सकाळी इतर गाईसह गोठ्यांतुन बाहेर पडत व सर्व पहाडावर चढून चारा खात हिंडत व संध्याकाळच्या सुमारास आपोआप घरी परत येत. कोणी गुराखी त्यांच्या पाठोपाठ जात नसे. त्यांना कळत नव्हते की डोंगरावर त्यांना कोण खायला प्यायला घालत होते. कोण त्यांचे दुध काढत होते. त्या पहाडावर माथ्यावर गुराख्याची झोपडी होती. रोज संध्याकाळी त्यातुन अशा तऱ्हेने धुर निघत असे की आत कोणीतरी चुलच पेटवली असावी. तरी सुद्धा त्या पहाडावर अद्याप पर्यंत कोणीही मनुष्यप्राणी पाहिला नव्हता.

लोकांमध्ये अशी वंदता होती की, त्या पहाडावर भूते रहातात. व ती संधी सापडतांच आजुबाजुच्या गाईंना हांकून घेऊन जातात. व ज लोक आपल्या गांईना पहायला त्या पहाडावर जात त्यांना ती भुते मारून खाऊन टाकतात त्यामुळे त्या पहाडावर जाण्याचे अद्याप पर्यंत कोणी धाडस केले नव्हते.

एकदा त्या गावात एक सत्यपाल नावाचा गुराखी आला. त्याने तेथे घडणाऱ्या सव



      

गोष्टी ऐकल्या. भुतांविषयीच्या लोकांच्या तोंडी सर्व गोष्टी ऐकल्या तो खुप शूर व धाडसी होता. त्यामुळे त्याला मनोमन त्या पर्वतावर जायची इच्छा निर्माण झाली. व असे वाटले की प्रत्यक्षच जाऊन त्या पर्वतावर काय आहे हे पाहून यावे.

इतर गुराख्यानी त्याला न जाण्याविषयी किती समजावले व असे धाडस करू नको म्हणून सांगितले. परंतु सत्यपालने त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. तेव्हां लोकांनी परत समजावत म्हटले–"तू पर्वतावर जाणारच म्हणतोस तर जा परंतु तेथे असलेल्या झोपडीच्या आत मात्र जाऊ नकोस आजपर्यंत जो माणुस झोपडीच्या आत गेला. तो परत आला नाही. आणि हट्टाने गेलासच तर तुझी पण तशीच दुर्गति होईल.

परंतु सत्यपाल त्यांच्या बोलण्यानें घाबरला नाही. तो धाडसाने त्या पहाडावर चढून गेला. व त्या झोपडीपाशी जाऊ लागला. तो डोंगर इतर डोंगरांसारखाच होता. कोणतेही भयंकर दृष्य त्याला कोठेही दिसले नाही. चोहोबाजुलां निरव शांतता होती. सत्यपाल झोपडी जवळ गेला व त्यानें आत डोकावून पाहिले. त्याला ती झोपडी आतून अशी वाटली की, कोणीं मनुष्य आत रहात आहे. सत्यपालनें बाहेरून हांक मारली–"आत कोण आहे ?" परंतु आतुन काही एक उत्तर आले नाहीं.

तेव्हां तो धाडसाने झोपडीच्या आत शिरला. एका बाजुला भांड्यातून सर्व जेवणाचे पदार्थ तयार होते. दुसऱ्या बाजुला भांड्यातून सर्व जेवणाचे पदार्थ तयार होते. दुसऱ्या बाजुला एक पलंग होता. त्यावर गादीवगैरे घालून ठेवलेले होते.

सत्यपालला वाटले इथे नक्कीच कोणीं मनुष्यप्राणी रहात असावा. बहुतेक कुठे बाहेर गेला असावा. आता जो असेल तो येई पर्यत आराम तरी करावा. असे मनांत म्हणत तो गादीवर झोपला.

तितक्यात झोपडी बाहेर काहीतरी गडबड ऐकू आली. एखाद्या राक्षसासारखा माणूस आत आला व सरळ स्वयंपाकाच्या भांड्याच्याजवळ गेला विचारू लागला "काय पलंगावर झोपलेल्या माणसाकरीता पण स्वयंपाक केला आहे कां ? त्यानंतर तो सत्यपालच्या जवळ गेला व त्याला म्हणू लागला–"उठ खाऊन घेऊया."

त्याच्याजागी दुसरा कोणी असता तर नक्कीच घाबरून गेला असता परंतु सत्यपाल न घाबरता त्याला म्हणाला–"जो कष्ट करतो त्यानेच खाणें बरोबर असते मी काही कष्ट केलेच नाहीत नां !"

तो राक्षस गुपचुप स्वयंपाकाच्या भांड्यांजवळ गेला व एका मिनिटांच्या आत सर्व अन्न संपवून उठला. नंतर भितीजवळची कुदळ व फावडे उचलून घेऊन सत्यपालच्या जवळ येत त्याला म्हणाला–"पलंगावरून उतर आणि ह्या वस्तू घेऊन तळघरात चल माझ्या बरोबर."

तळघरात कां ? मी तेथून कोणतीच गोष्ट आणली नाही. त्यामुळे मला तेथली कोणतीच गोष्ट उचलून आणावयाची नाही." सत्यपालने सरळ उत्तर देत म्हटले.

राक्षसाने कुदळ व फावडे घेतले व तो म्हणाला–"तू चल माझ्या बरोबर."

"तू पुढे चल, मी तुझ्या मागोमाग येतो." सत्यपालने उत्तर देत म्हटले. ह्यानंतर त्या दोघे तळघरात पोहोचले



राक्षसाने सत्यपालला म्हटले–"हे बघ इथे खण."

"तेथे मी कोणतीच गोष्ट पुरून ठेवली नाही. सत्यपाल म्हणाला. राक्षसाने तेथे खणले व थोड्यावेळातच एक हंडा त्या खड्ड्यातून बाहेर आला.

राक्षस त्याला म्हणाला–"हा वर उचलून घे."

"मी काही तो आत ठेवला नाहीं असे असतांना मी कां म्हणून तो वर उचलून घेऊ ?" सत्यपाल त्याला म्हणाला.

मग राक्षसाने गुपचुप तो हंडा उचलून वर ठेवला व त्याला म्हटले–"आता ह्या हंड्याचे झांकण उघड."








"मी झांकण ठेवलेच नाहीं मग मी कां उघडू सत्यपाल धैर्याने म्हणाला.

राक्षसाने त्या हंड्याचे झांकण उघडले. त्यात पूर्ण सोन्यांची नाणी भरलेली होती. त्या राक्षसाने ती सर्व नाणी बाहेर उधळून दिली. व नंतर त्याचे तीन ढिग करीत त्याला म्हणाला–"तू आता ह्यातील तुझा ढिग शोध तू बरोबर जर सांगितलास तर तुझे सर्व काही बरे होईल व मी शापातून मुक्त होईन. आणि चुकून तू बरोबर ढिग सांगितला नाहीस तर मी तुझी राख रांगोळी करून आजच्या सारखेच माझे दिवस घालविन. जोपर्यंत माझे रक्षण करण्यासाठी कोणी येत नाही तोपर्यंत. आणि मी जर ह्या शापातून मुक्त झालो तर त्या ढिगापैकी एक तुझा व एक गरिब लोकांचा व माझ्या हातून मेलेल्या लोकांच्या बायकामुलांचा समजले !"

सत्यपालने आपल्या हातांनी सोन्यांच्या नाण्यांच्या ढिगाचे गोल बनविले आणि म्हटले–" ह्या ढिगातील एक माझा आहे."

दुसऱ्याक्षणी विज चमकून कडकडाट व्हावा तसा प्रकाश झोपडीच्या आत पसरला तो राक्षस नाहीसा झाला. त्याच्या जागी गंधर्वा सारखा दिसणारा एक माणुस उभा होता. त्याने सत्यपालला म्हटले–"तुझ्या कृपेने आज मी शापापासून मुक्त झालो आहे. मी येथून आता निघून जाणार आहे. तेव्हां आजपासून हा डोंगर येथील गाई हे सर्व सोने सगळे तुझे आहे." असे म्हणत ती व्यक्ति एकदम् अदृस्य झाली.

त्या भुताटकीच्या पहाडावरून जिवत परत येत असलेल्या सत्यपालला पाहून इतर सर्व गुराखी आश्चर्याने तोंडात बोटे चालू लागले. त्यांनी जवळ येत सर्वांना घडलेली घटना सांगितली.

त्यानंतर त्या भुतांच्या पहाडावरच सत्यपालने आपले रहाण्याचे ठिकाण केले. व होत्या त्या संपत्तीने आपले उर्वरित आयुष्य सुखाने आनंदाने घालवले ह्या गोष्टीनंतर गावातील लोकांनी त्या डोंगराला भुतांचा डोंगर म्हणणे सोडून दिले.





# 'उडणाऱ्या' खारी

बदलणाऱ्या परिस्थितीला अनुरूप असे रंग बदलणारे हे प्राणी कैक वर्षे आपले आयुष्य सुखाने जगू शकतात. तसे झाले नाही तर कालक्रमाने ते मरण पावतात. आपल्या अवती भोवतीच्या जागेनुरूप रंग बदलण्याची उपजत शक्ति आपोआप त्यांना प्राप्त असते. असे हे प्राणी म्हणजे खारी. त्या उडू शकतात. युरोप व अमेरिका आणि उत्तर अमेरिका येथे जिकडे तिकडे ह्या पहावयास मिळतात. ह्या अशा खारींचे एकूण छत्तीस प्रकार आहेत.

ह्या खारी झाडांच्या उंच टोंकावर आपले निवासस्थान बनवतात. जर कां काही संकट आले किंवा कोणत्या दुसऱ्या पक्षाने हल्ला केला तर ह्या आपले पंजे पसरवून उडत खाली येतात. जमिनीवर पडलेले धान्य अगर फळे सुद्धा त्या अशाच प्रकाराने त्याचे लक्ष करून उडत येऊन खातात. पुढच्या व मागच्या पायांना जोडणारी कातडी ह्यांना उडण्याच्या कामी उपयोगात येतात.

ह्या खारी उडण्यापूर्वी आपली मान उंचावून जेथे खाणे पडले असेल त्याचा अंदाज घेऊन मग त्यावर झेप घालतात. जमिनीवर उतरण्यापूर्वी आपली झुबकेदार शेपूट उंचावतात. ह्यांच्या बोटाच्या बेचक्यातून लांबले जाणारे कातडे असते. त्यामुळे इतर साधारण खारींच्या पेक्षां ह्या हळू चालतात. उडणे पण हळूवार असते. म्हणणे ६,५ किलोमीटर ह्या वेगाने उडतात.

ह्या दिवसभर झाडांच्या फांद्यावर झोपून आपला दिवस घालवतात. व रात्रीच्या प्रहरी आपले भक्ष शोधण्याकरीता निघतात त्यांचा रंग पण त्या रहात असलेल्या झाडाच्या रंगासारखाच होतो.

फिलिपाईन्स व मलेशिया मध्ये पण ह्या प्रकारच्या खारींचे दोन प्रकार आढळून येतात. ह्या जवळजवळ मांजरीच्या आकाराच्या असतात. ह्यांची नखे टोकदार असतात व दांत छोटे पण मजबुत असतात.

ऑस्ट्रेलियात रहाणाऱ्या ह्या खारीसारखे प्राणी आपल्या पिल्लांना कांगारू जसे पिल्लांची काळजी वहातात. तशी पोटाच्या पिशवीत ठेऊन त्यांची काळजी घेतात.





# चांदोबा

मार्च 1986



## अनुक्रमणिका





एक प्रत : २-५०

वार्षिक वर्गणी : ३०-००

# चांदोबा

संस्थापक : 'चक्रपाणी'

संचालक : नागिरेड्डी

जे लोक केवल स्वार्थच आपला परमार्थ समजतात. असे लोक विवेक, न्याय, अन्याय किंवा चांगले वाईट याला अजिबात महत्व देत नाहीत. अशा व्यक्ति आपल्या कामाच्या दुष्परिणामाचा थोडासुद्धा विचार करीत नाहीत. ह्यांचे उदाहरण आपल्याला "देवीचे अलंकार" ह्या कथेत पहावयास मिळेल.

### अमर वाणी

द्रव्यं लब्धं द्यूतेनैव, दारा मित्रं द्यूतेनैव ।
दत्तं भुक्तं द्यूतेनैव, सर्वं नष्टं द्यूतेनैव ॥

[जुगार खेळून पैसा कमावता येतो. त्याच पैशाने पत्नी व मित्र मिळवले जातात. दुसऱ्यांना दान देणे किंवा त्याचा भोग घेणे त्याच धनाने प्राप्त होते. परंतु ह्यांच जुगाराने माणसाचा सर्वनाश होतो.]

वर्ष : ३५ मार्च १९८६ अंक : ९

एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००





## शोध लागलेले मोठे जहाज

१५ एप्रिल १८१२ साली सर्वात मोठे जहाज 'टिटानिक' समुद्रात बुडाले होते. त्या जहाजात २२२४ यात्रेकरू प्रवास करीत होते. त्यातील १५१३ माणसे समुद्रात बुडून गेली. सध्या अमेरिकेतील एका नौका अनुसंधान संस्थानाने असा शोध लावला आहे की, ते जहाज उत्तर अटलांटिक समुद्रात अडीच मैल खोलीत रुतलेल आढळले आहे.

## समंता हीरा



अमेरिकेत रहाणाऱ्या समंता नावाच्या विद्यार्थीनीने रूसीनेत्यांच्या नावाने एक पत्र लिहीले की, विश्वशांतीकरीता त्यानी आवश्यक कारवाई करावी त्या मुलीच्या मनोकामनेवर मुग्ध होऊन रूसी नेत्यांनी तीला १९५३ ला रूसला येण्याचे निमंत्रण केले. परंतु १९५३ मध्ये विमानाच्या दुर्घटनेमुळे समंताचा अकाली मृत्यु झाला. त्यामुळे त्या मुलीचे स्मृती चिन्ह म्हणून सैबेरियाच्या खाणीमधून प्राप्त होणाऱ्या हिऱ्यांमधील सर्वात मोठ्या हिऱ्याचे त्यांनी तिच्या नावे 'संमन्ता' हे नामकरण केलेले आहे.



## चालणारा पर्वत

पाकिस्तानचा रहिवासी आलमचक्श नावाच्या एका प्रतिष्ठीत व्यक्तिने न्युयार्कच्या गल्लीतील जाणाऱ्या येणाऱ्या लोकांचे क्षण-भर देहभान हरपून टाकले होते. आठ फूट तीन इंच उंची असलेला चक्श तेथील येणाऱ्या जाणाऱ्या लोकांच्यात ताडामाडा सारखा दिसत होता. त्याला पहाताच सर्व लोकांनी मोठ्या उत्सुकतेने त्याला चारी बाजूने घेरले. ह्या विचित्र घटनेला टि. व्हीच्या लोकांनी चित्राच्या रूपाने प्रसारित केले.

# तुम्हांला माहीत आहे कां?

१. हिन्दी महासागराच्या द्वीप समुहामध्यें सर्वात मोठे बेट कोणते?

२. भूमध्य सागराच्या टापूच्या मध्ये सर्वात मोठा भाग कोणता?

३. १९६१ मध्ये अग्नी पर्वतामध्ये विस्फोट होण्यामुळे कोणते बेट रिकामे करण्यात आले होते?

४. फिजी बेटांच्या समुहांची संख्या किती आहे?

५. फिलिपाईन्स गणतंत्रात किती बेटे आहेत?

[उत्तरे पान ६५ वर प्रकाशित]

# अंबा

काशी राज्यावर होत्रवाहन नावाचा राजा राज्य करीत होता. त्याला अंबा, अंबिका, व अंबालिका नावाच्या तीन कन्या होत्या. त्या तिघी जेव्हां उपवर झाल्या तेव्हां राजाने त्यांच्या स्वयंवराची घोषणा केली. भीष्म आपल्या छोट्या भावाला विचित्रवीर्यला घेऊन त्याचे लग्न करण्याकरीता तेथे आला व इतर सर्व राजकुमारांना हरवून त्या तिघी राजकुमारींना जबरदस्ती हस्तिनापुराला घेऊन गेला.

अम्बाने भीष्माला सांगितले की तिने ह्यापूर्वी साल्व ह्याला मनापासून वरले आहे. त्यावर भीष्माने तिची मनोकामना पूर्ण होण्याकरीता तिला साल्व राजाकडे पाठवून दिले. परंतु त्या अपहरण झालेल्या राजकुमारीच्या बरोबर लग्न करण्यास साल्वाने नकार दिला.

अम्बा दुःखी होऊन भीष्माकडे परत आली. व तिने भीष्माला स्वतः बरोबर लग्न करण्यास सांगितले. परंतु भीष्माने तिचा अस्विकार केला. शेवटी भीष्मच्या गुरूनें परशुरामाने आदेश दिल्यावर त्यांनी स्पष्ट सांगितले की, ते आपली प्रतिज्ञा भंग करू शकत नाहीत.

अम्बाने शुद्ध भावनेने त्याची प्रतिज्ञा भंग करण्याच्या इच्छेने शंकराची घोर तपश्चर्या केली. त्या तपश्चर्येवर प्रसन्न होऊन शंकराने तिला वर दिला की दुसऱ्या जन्मी तुझ्या इच्छेची पूर्ती होईल.

त्याच वराच्या प्रभावाने अम्बाने द्रुपद राजाच्या मुलींच्या रूपाने जन्म घेऊन लहानपणीच राजाला योग्य असणाऱ्या सर्व विद्यांचे शिक्षण प्राप्त केले. महाभारत युद्धाच्या पूर्वी यक्षिणीची प्रार्थना करून पुरुष लक्षण प्राप्त करून शिखंडी बनली. कुरुक्षेत्रात चालू असलेल्या महाभारतातील युद्धाच्या वेळी अर्जुन जेव्हां भीष्मासमोर युद्धालाउभा राहिला. तेव्हां अर्जुनाच्या रथावर शिखंडीला पाहून त्याना एका बाईवर अस्त्रप्रयोग करणें अनुचित वाटले. व त्यांनी शस्त्र सोडले नाही. ती संधी पाहून अर्जुनाने भीष्माला खाली पाडले. ह्या प्रकाराने अम्बाची प्रतिज्ञा सफल झाली.





# बिकट समस्या

दिर्घकालीन आजाराने गिरीनाथच्या वडिलांचे देहावसान झाले. तो अनाथ झाला. त्याच्या वडिलांनी जेवढे काय म्हणून कमावलेले शेत होते. ते त्याने विकून टाकले व त्या पैशांने वडीलांवर उपचार केला होता. नंतर उधारी चुकती करून तो शहरात काही कामधंदा मिळेल ह्या विचाराने गाव सोडून निघाला.

गिरीनाथ छोटेसे गाव पार करून एका निर्जन रस्त्याने जाऊ लागला. तेव्हां तेथील दाट झाडाच्या सावलीत बसलेला एक म्हातारा त्याला दिसला. गिरीनाथला पहाताच त्या म्हाताऱ्याने त्याला जवळ येण्याकरींता खुणावले व म्हटले–"बाळ, तू शहरात जात आहेस कां? मला सुद्धा शहरात जायचे परंतु भाड्याच्या गाडीची मी वाट पहात आहे. तू सुद्धा माझ्या बरोबर येत असलास तर मला तुझी सोबतच होईल. कारण मी हृदयविकाराने आजारी असतो. गिरीनाथ त्यापूर्वी बराच पायी चालून थकला होता. त्यामुळे त्यालाही त्याने भाड्याच्या गाडीतून येतोस कां? विचारल्यावर हायसे वाटले.

तेवढ्यात त्याला अडवित तो म्हातारा म्हणाला–"बाळ, तुला कळले नसेल, परंतु गाडीचे भाडे मी देई मी काही दिवसा पासून मी आजारी आहे तेव्हां पासून माझे मन नेहमी दुसऱ्यांसाठी व्याकुळ होते. त्यामुळेच तुला मी माझ्या बरोबर येण्याचा आग्रह करीत आहे.

थोड्यावेळातच एक भाड्याची गाडी आली. म्हाताऱ्याने गाडीवाल्याशी भाड्याची बोली केली व तो गिरीनाथला म्हणाला–"बाळ, तुला संकोच वाटेल पण तुझ्या बाजूला तो पेटारा आहे नां! तो तेवढा गाडीत उचलून ठेव कारण मला वजन उचलायचे नाही.



त्याचवेळी गाडीवान बैलांना खाण्यां-करीता गवत तोडून आणण्यांसाठी गेला होता. गाडीवानाने परत येतांना गिरीनाथला तो पेटारा गाडीत उचलून ठेवत असतांना पाहिले होते त्या पाठोपाठ त्यानें म्हाताऱ्याला हाताला धरून वर गाडीत बसवलेले पाहिलें. जेव्हां गाडी शहराच्या हद्दीत येऊन पोहोचली तेव्हां सूर्यास्त झाला होता.

गाडी मुख्य रस्त्याला लागली. तेव्हां दोन शिपायांनी गाडी अडविली व ते गाडीवानास विचारू लागले—"तुम्ही कोणत्या गावचे आहात? गाडीत असलेल्या मालाची झडती घ्यायची आहे!"

ते ऐकताच म्हाताऱ्याचा चेहरा पांढरा फटक झाला. तो घाबरून म्हणाला—सरकार, मी हृदयविकाराचा रोगी आहे. उपचारा करीता मी शहरात आलो आहे. मला लवकर सोडून द्या.

"तुमच्या जवळ असलेल्या वस्तूंची झडती घेतल्यानंतर तुम्ही खुशाल जाऊ शकता." असे म्हणत त्या शिपायांनी गाडीत चढवलेली पेटी खाली उतरवून ठेवली व त्याचे कुलूप पाहून त्याची चावी मागितली."

तितक्यात म्हातारा झटक्यात म्हणाला—"हि पेटी माझी नाही. ह्या तरुणाची आहे." असे म्हणून विस्मयानें आपल्याकडे पहात असलेल्या गिरीनाथला रागाने म्हणाला—"अरे मुर्खा, माझ्याकडे डोळे फाडफाडून काय पहात बसलास त्या पेटीची चावी त्यांना दे नां!

"चावी माझ्याकडे कुठे आहे?" आश्चर्य वाटून त्यांने विचारलें.

"तुझ्या पेटीची चावी तुझ्याकडे नाही तर आणखी कोणाकडे असणार रे?" म्हातारा चिडीने म्हणाला.

तितक्यात गाडीवान मधे तोंड खुपसत गिरीनाथला म्हणाला—"ह्या पेटीची चावी द्या. लवकर नाहीतर मी तुम्हांला इथेच उतरवून निघून जातो. गिरीनाथने पेटी उचलून गाडीत ठेवतांना गाडीवानाने स्वतःच्या डोळ्याने पाहिले होते.



गिरीनाथला काहीच समजेनासे झाले. त्याला चिंता लागून राहिली. शिपायांनी रागारागाने त्या पेटीचे कुलूप तोडले व झांकण उघडले. पेटीच्या आत जुनेपुराणे कपडे ठांसून भरलेले होते. त्यांनी ते भराभर उपसून बाहेर काढले आणि पहातात तो काय तळाला एक बांधलेली पिशवी दिसली. त्यांनी ती उघडून पाहीली तेव्हां आत अनेक सोन्यामोत्यांचे दागिने होते. शिपायांनी गिरीनाथची मानगुट पकडीत त्याला दम भरीत विचारले—"अरे चोराच्या लुच्च्या! जुन्या कपड्याच्या ढिगारवाली दागिने लपवले म्हणजे ते काय लपून रहातात होय. त्या मिर्जापुरच्या जमिनदाराच्या घरी तूच दरोडा घातलास."

गिरीनाथ उभा थरथरू लागला व कळवळून त्यांना म्हणाला—"सरकार, मी चोर, दरोडेखोर नाही. ही पेटी सुद्धा माझी नाही. ह्या म्हाताऱ्याची आहे. माझ्या सांगण्यावर कृपा करून विश्वास करा!"

त्यावर म्हातारा रागीट चेहरा करून त्याला म्हणाला—"अरे बदमाश लुच्च्या! तू माझ्यावर चोरीचा आरोप लावतोस.

त्या दोघांचे वागणे पाहून शिपायांना गहन प्रश्न पडला. शेवटी ते चिडून म्हणाले—तुमच्यातील खरे कोण व खोटे कोण ते काही आम्हांला समजत नाही. तुम्ही सर्वजण



चावडीवर चला तेथेच काय तो न्याय निवाडा होईल."

गाडीवान कोत्वालाच्या माहितीतील होता. त्यामुळे कोत्वालाने गाडीवानाला सोडून दिले. त्यानंतर त्याने म्हातारा व गिरिनाथ ह्यांच्याकडे घडलेल्या गोष्टींची चौकशी केली. ते पूर्वी जसे म्हणत होते तसेच सांगू लागले—"ही पेटी माझी नाही."

कोत्वालाने शिपायांना आज्ञा केली की, ह्या दोघांना चौकीत बंद ठेवा नंतर म्हाताऱ्याला व गिरीनाथाला कोत्वाल म्हणाला—"तुमच्या दोघांमध्ये एक अट्टल चोर आहे. ह्याच्या निवाडा मी उद्यासकाळी करेन." असे म्हणून तो आपल्या घरी गेला.



त्या रात्री जेवताना तो विचारात मग्न असलेला पाहून त्याच्या बायकोने त्याला विचारले. असे काय घडले आहे ?

कोतवालाने घडलेला सारा समाचार तिला ऐकवला व म्हटले–मी इतकी वर्षे ही नोकरी करीत आलो आहे परंतु इतकी बिकट समस्या कधी माझ्यासमोर आली नाही.

कोतवालाची बायको म्हणाली–"आपण तर हि फारच कठीण परिस्थितीं आली समजून संकटात पडलेले दिसता आहांत. माझ्या म्हणण्याप्रमाणे करा." असे म्हणून तिनें नवऱ्याच्या कानांत काहीतरी सांगितले.

कोतवालाने दुसऱ्यादिवशी चौकीत येत गिरीनाथला म्हटले–"अरे ऐक, शिपायांनी चुकीने तुला पकडून आणले. मला अचानक समजले की, जमिनदाराच्या घरात चोरी करून पळून गेलेला चोर माला सहित आत्ताच सांपडला आहे. तेव्हां तू आत्ता जाऊ शकतोस. असे मनात म्हणून त्याने ती पेटी त्याच्या हातात दिली.

पेटी पाहून घाबरून जात गिरीनाथ त्यांना म्हणाला–"सरकार, ही पेटी माझी नाही. ह्या म्हाताऱ्याचीच आहे. ती मला कशाला देता. मी तर तुम्हांला प्रथमच तसे सांगितले नां !

"गाडीवानाच्या साक्षीने तर ती पेटी तुझी आहे घे आणि कुठेही चालू लाग." कोतवाल दरडावीत त्याला म्हणाला.

त्या तरुणाने असा विचार केला की, जर ही पेटी घेऊन चौकीतून बाहेर पडलो तर म्हाताऱ्याला देऊन टाकता येईल.

गिरीनाथचा तेथून जाताच कोतवाल म्हाताऱ्याला म्हणाला–"तुम्ही खरोखरी निर्दोष आहात. आमची चुक झाली आम्ही तुमच्यावर उगाच शंका केली. आत्ताच आम्हांला शोध लागला की, तुम्ही व तो दोघे चोर नाहीत म्हणून मी ती पेटी त्या तरुणाला देऊन टाकून त्याला जायला सांगितले. आत्ता तुम्ही सुद्धा येथून जा.

म्हाताऱ्याला जेव्हां तो तरुण पेटी घेऊन गेला हे कळले तेव्हां तो एकदम निराश झाला. व आता कसेही करून त्या तरुणाला पकडलेच पाहिजे.

म्हातारा जेव्हां गल्लीतील कोपऱ्याला वळला. तेव्हां त्याला समोरच्या एका घराच्या ओसरीत गिरीनाथला बसलेले पाहिले. तो घाईघाईने गेला व त्याच्या जवळून झटक्याने ती पेटी खेचून घेतली व त्याला दटावू लागला– "अरे नालायका, दहा हजाराचे दागिने गुपचूप हडप करायला बघतोस काय ?"

"नाही साहेब, मी तर तुमची पेटी तुम्हांला परत द्यावी ह्या हेतूनेच तुमची वाट पहात इथे कितीवेळ बसलो आहे. कोतवालाने सांगितले की, ह्यापेटीत जे दागीने आहेत ते काही चोरीचे नाहीत तरी सुद्धा तुम्हीं शिपायांना असे कां सांगितलेत की ही पेटी माझी नाही ह्याची आहे. त्याचे काय कारण मला अजून समजले नाही. मला नोकरीच्या शोधार्थ जायला पाहिजे." असे म्हणत तो पायऱ्या उतरुन जाऊ लागला.

कोतवाल तेवढ्यात पाठीमागुन पुढे येत म्हणाला–"अहो, हृदय विकाराचे दादाजी थोडे थांबा. ह्या पेटीत दागीने नाहीत जुनें पुराणें कपडे आहेत. असे म्हणत त्यांनी म्हाताऱ्याला पकडले व शिपायांना आज्ञा केली–"हा एक नंबरचा अट्टल चोर आहे. ह्याच्या पेटीत जे दागिने मिळाले ते जमिनदाराच्या घरचेच दागिने आहेत. ह्याला आताच्या आत्ता तुरुंगात बंद करा.

हे ऐकताच गिरीनाथ चकित झाला म्हणाला–"म्हणजे ह्याचा अर्थ असा की, खरा चोर तावडीत सांपडला. मला ह्याच गोष्टीचा आनंद वाटलो की आपला माझ्यावर विश्वास बसला की, मी निर्दोष आहे.

कोतवालाने पुढे येत त्याच्या खांद्यावर थापटत म्हटले–"तुझ्यातील निर्दोषपणाच नाही. ईमानदारी सुद्धा सिद्ध झाली. तुला मीं चौकीत नोकरी देववतो."

"सरकार, मला अधिक आनंदाची गोष्ट आणखी काय असणार. आपल्या कृपेचा मी अत्यंत ऋणी आहे." गिरीनाथ आनंदाने म्हणाला.





# विचित्र परिक्षा

श्रीपुरचा राजा विद्याधर याच्याकडे सुदर्शन नावाचा मंत्री होता. श्रीपुर तसे छोटेसे राज्य होते. त्याच्या आजुबाजुच्या काही राज्यात सैन्य बळ जास्त असले. तरी सुद्धा सुदर्शनची तल्लखबुद्धी व राज्य कारभारातील निपुणता ह्यामुळे श्रीपुरवर अद्याप पर्यंत कोणःही अचानक आक्रमण केले नव्हते.

सुदर्शनचे वय वाढत गेले व तो म्हातारा झाला व वारंवार आजारी पडू लागला. दरबारी वैद्यांनी त्याला सल्ला दिला कीं मंत्री पदाचा राजीनामा देऊन आराम करावा.

हीं बातमी समजताच राजा विद्याधरने सुदर्शन मंत्र्याला दरबारात बोलावले व म्हटले—"मंत्री महाशय, आपल्याकडे पाहून असे वाटते की आपण विश्रांती घ्यावी. परंतु त्या आधी आपण आपल्या पदाकरीता एखाद्या चांगल्या माणसाची निवड करावी.

सुदर्शनने राजाचे म्हणणें मान्य केले. व मंत्रीपदाच्या जागी योग्य व्यक्ति निवडण्याकरीता दवंडी पिटविली. ती दवंडी ऐकून अनेक शिक्षित माणसे मंत्र्याच्या भेटीला गेली. त्यांनी सर्वांच्या समोर अनेक परिक्षा ठेवल्या. व त्यातील तीन माणसांना वेगळे काढले. आता त्यातील एका माणसाची मंत्री पदाकरीता निवड करावयाची होती.

विनय, चंद्रकांत व श्रीधर अशा तीन माणसांचा परीचय त्यांनी राजाला व सभेत जमलेल्या सर्व सदस्यांना करून दिला. शिपायांकरवी प्रत्येकाला एक एक अशक्त मांजरी दिली. व त्यांना म्हटले—"तुम्ही तीन महिने तुमच्या आवडीनिवडीनुसार ह्या मांजरीचे पालनपोषण करा. ह्या कामाकरीता राज्यातील खजिन्यांतून प्रत्येकाला एक हजार सोन्यांची नाणी देण्यात येतील. तिन महीन्यानंतर तुम्ही प्रत्येकाने आपली मांजरी घेऊन दरबारात हजर रहा.

अक्षय दाते



तीन महीन्यानंतर तिघे आपापली मांजरी घेऊन दरबारात हजर झाले. विनयची मांजरी चांगली गुबगुबीत धष्टपुष्ट व तजेलदार दिसत होती. ती पाहून दरबारातील इतर सदस्य कुजबुजू लागले की, "अरे, ही मांजरी आहे कां वाघाचे पिल्लू!" श्रीधरची मांजरी सुदृढ सशक्त व आकर्षक दिसत होती परंतु चंद्रकांतची मांजर दुबळी कमजोर मरतुकडीं दिसत होती.

सुदर्शनने तिघांना उद्देशून म्हटले की, प्रत्येकाने मांजर पाळण्याचे आपापले रहस्य सांगावे.

सर्वात प्रथम विनयने सांगितले—"आपण मला जे हजार रुपये दिले होते. त्यातील पाचशे रुपये खर्च करून मी दूध व पक्वान्ने लोणी वगैरे विकत घेऊन मांजरीला खायला घातले बाकी पांचशे रुपये उरलेले हे घ्या."

श्रीधर म्हणाला—"मांजर जात्याच मांसभक्षक असते. त्यामुळे मी माझ्या अशा मित्राकडे तिला सोडून दिले की, ज्याच्या घरी जास्त उंदीर व घुशी आहेत परंतु तरी सुद्धा मी शंका येऊन तिला रोज दुध नेऊन देत होतो कारण जर एखादेवेळेस उंदीर मिळाला नाही तर. तो खर्च सोडला तर हे नऊशे रुपये उरले आहेत. हे आपण परत घ्या."

शेवटी चंद्रकांत म्हणाला—"खरे पाहिले तर मी आहारासाठी. मांजरा करीता म्हणून कसलाच खर्च केला नाही. ती तिचे तिचे खाणें शोधून काढून माझ्या घरात रहात होती. मांजरी सारख्या निकामी प्राण्याकरीता खर्च करणे मुर्खपणा आहे, हे घ्या आपण मला दिलेले हजार रुपये ह्या पैशांने आपण जनतेकरिता काही कल्याणाच्या गोष्टी करू शकता.

सर्व सभासदांना वाटू लागले की, मंत्र्याच्या पदासाठी बहुदा चंद्रकांतची निवड केली जाईल. परंतु सुदर्शन राजा व सर्व सभेतील सदस्यांना उद्देशुन म्हणाला– "श्रीपुर राज्याच्या मंत्री बनण्यायोग्य श्रीधर ही एकच व्यक्ति योग्य आहे."

हि निवड राजा विद्याधर व इतर जनतेला पण आश्चर्यकारक वाटली. हि गोष्ट जाणून सुदर्शन म्हणाला–"आपण सर्वांनी ऐकलेच आहे की ह्या तिन्ही मांजराना कसे पाळले आहे. विनयच्या अंगी व वेळेचे किंमतीचे महत्व ह्यांचा अभाव आढळून येतो. त्याने एका मांजरीला तिन महिने पाळायला पांचशे रुपये खर्च केले. मांजर कितीही धष्टपुष्ट व गुबगुबीत असो. ती फक्त उंदीर पकड़ण्याशिवाय काहीच काम करू शकत नाही.

आता राहीली चंद्रकांतची गोष्ट ह्याच्या मनांत विवेकापेक्षा लोभी वृत्ती जास्त दिसते नावाला सुद्धा सहानुभुती नसलेल्या अशा गुणाचा माणुस राज्याच्या मंत्री पदाचे कार्य कधीही सफल करू शकणार नाही. मांजर जेव्हां अशक्त होऊ लागले तेव्हां तरी ह्या गोष्टीवर लक्ष ठेऊन तिला खायला घालणे त्याचे कर्तव्य होते.

ह्या परिक्षेत शंभर टक्के गुण श्रीधरला मिळाले. त्याने मांजरीचा खरा आहार उंदीर हे जाणून तीला आपल्या मित्राच्या घरी सोडले. त्यामुळे एकतर मांजराला उंदीरांचा आहार मिळाला व त्यापाठोपाठ त्याचा मित्र उंदराच्या त्रासापासून सुटला तरी सुद्धा उंदीर मिळेल किंवा नाही. ह्या-करीता रोज तिला दूध पाजत राहीला. त्यामुळे कोणतीही शंका नाही राज्याचा सांभाळ करण्या करीता ज्या गुणांची आवश्यकता असते ती त्याच्या विवेक, प्रसंगावधान, पूर्णरूपाने भिनलेली आहे. त्याकारणामुळेच मंत्री पदाच्या जागेकरीता त्याची निवड योग्य आहे.

मंत्र्याचे बोलणे ऐकूण सर्व दरबारी जनतेने सहर्ष नादाने आपला आनंद प्रकट करीत टाळ्या वाजविल्या.






[१५]

[चंद्रवर्माला पहाताच राजाच्या सैनिकांना क्षणभर भ्रम पडला की तो मांत्रिक तर नसेलनां ! चंद्रवर्माने म्हाताऱ्या जवळून खुबीने नकाशा काढून घेतला. ह्यानंतर तो त्या सैनिकांबरोबर रुद्रपुरला पोहोचला. नगरातील लोकांनी त्याला पहाताच जल्लोषाने ओरडण्यास सुरवात केली "महामांत्रिकाचा जय असो" व त्याचे मोठे थाटाने स्वागत केले... या पुढे वाचा]

चंद्रवर्मा जेव्हां राजमहालाजवळ पोहोचला तेव्हां राजमहालाच्या प्रवेशद्वारा-जवळच राजा शिवासिंह मंत्री व त्यांच्या अधिकाऱ्यांनी त्याचे सहर्ष आनंदाने स्वागत केले. चंद्रवर्मा घोड्यावरून खाली उतरला तेव्हां राजा शिवासिंह त्याच्या जवळ येत त्याला प्रेमभराने थोपटत म्हणाला– "चंद्रवर्मा मला ठाऊक आहे की, एवढ्या तरूण वयात अद्याप पर्यंत कोणीही मानव असा महान मांत्रिक बनलेला नाही. माझ्या राज्याच्या सरहद्दी जवळच आपले कायमचे स्थान करून वास्तव्यकरीत असलेल्या दुष्ट शंखू मांत्रिकाचा तू नायनाट केलास. त्यामुळे मी व माझी प्रजा तुझ्यावर अत्यंत संतुष्ट आहोत.

राजा शिवासिंहच्या तोंडून ते उद्गार ऐकताच चंद्रवर्माला अत्यंत आश्चर्य वाटू लागले. परंतु त्याने आपले आश्चर्यभाव



लपवित हसत म्हटले–"तो शंखू मांत्रिक अत्यंत दुष्ट व पापी होता. त्याला यमसदनी पाठवून दिले.

"मांत्रिक शंखू निवास करीत असलेल्या ठिकाणी तुझा मित्र कालकेतू रहात आहे. त्याच्या कडूनच तुझ्याविषयी सर्व गोष्टी आम्हांला समजल्या. त्याच्या सल्लानुसारच तुला इथे आणण्याची मी सैनिकाना आज्ञा केली. तुला एकदा त्या कांशाच्या किल्ल्यापाशी पाठवून काही गुप्त गोष्टी पूर्णकराव्या" शिवसिंह म्हणाला.

"कांशाचा किल्ला! त्यात काय बुवा नाविन्य आहे!" असे म्हणत चंद्रवर्मा खुदखुदू हंसू लागला. तेवढयात मंत्र्याने राजापाशी जाऊन कानात काहीतरी सांगितले. राजा महालाच्या आत जाता जाता चंद्रवर्माला म्हणाला–"चंद्रवर्मा, इतक्या लांबवरचा प्रवास करून तुम्ही थकला असाल तेव्हां आता खाणेंपिणे करून थोडी विश्रांती घ्या. त्यानंतर सावकाशीने ह्यासंबंधी आपण गप्पा गोष्टी करू.

चंद्रवर्माच्या रहाण्यासाठी राजमहालात अनेक सुखसोई उपलब्ध करण्यात आल्या त्याचे स्नान आटोपताच त्याला मिष्टान्न भोजन वाढण्यात आले. त्याला झोपण्यासाठी मऊ मऊ रेशमी गाद्यांची सोय केली, परंतु एवढे असून सुद्धा त्याला बराच वेळ आराधना करून झोप आली नाही. शंखूच्या पहाडावर रहात असलेल्या कालकेतू व कापालिनी द्वारा शिवसिंहला आपली बरीच माहीती मिळाली असावी कारण कालकेतूने शिवसिंहला सांगितले असावे की, चंद्रवर्माच फक्त काय तो कांशाच्या किल्यापर्यंत जाऊ शकतो. ह्यामागे काय बरे गुढ असावे?"

ह्यासंबधी चंद्रवर्माने खोल विचार केला. तेव्हां त्याला कालकेतूची चाल काय असावी हे समजले. कालकेतूला स्वतःचे राज्य पुनः प्राप्त करण्याकरीता धन व सैन्याची जरूरी आहे. तेव्हां हे काम फक्त त्याला किल्यात लपवून ठेवलेल्या संपत्ती द्वारेच पूर्ण करून घ्यावे लागणार.



चंद्रवर्मा ह्याच विचारात गुंग होता. तितक्यात राजाच्या एका सेवकाने महालात प्रवेश करीत. राजा व मंत्र्याने आपल्याला बोलावून घेऊन येण्याविषयी सांगितले. थोडया वेळाने चंद्रवर्मा तेथे येऊन पोहोचला.

चंद्रवर्माला पहाताच राजा शिवसिंह म्हणाला–"चंद्रवर्मा, मी कांशाच्या किल्लयात लपविलेल्या धनाची अजिबात आशा करीत नाही. हे स्पष्ट पणे मी प्रथमच तुला सांगून टाकतो.

ह्यावर चंद्रवर्मा मान हलवित गप्प बसला.

त्यानंतर राजा शिवसिंह चंद्रवर्माला म्हणाला–"हे असे म्हणताच तुला माझ्या विषयी एक दाट शंका आली असेल नां! की मला पैशाचा लोभ नसतांना मी कांशाच्या किल्लयाच्या विषयी माहिती जाणण्यासाठी कां उत्सुक आहे?" तर ऐक ह्याचे उत्तर म्हणजे विचित्रच आहे! परंतु ते सत्य आहे! तुला तर माहीतच आहे की, तो कांशाचा किल्ला समुद्र-किनाऱ्यावर आहे?"

"हो, हो! ते मला चांगले माहीत आहे. पश्चिमिकिनाऱ्याला लागून आहे. परंतु एक हजार वर्षापासून तो कोणी अद्यापपर्यंत पाहिला नाही!" चंद्रवर्मा त्याला म्हणाला.



हे उत्तर ऐकून मंत्र्याने राजाकडे विस्मयाने पाहीले. राजाने मान हलवित होकार दिला व म्हटले–"तसे असेल, काही लोकांचा तर असा विश्वास आहे की, समुद्राच्या भरतीचे पाणी किल्लयाच्या भिंतीना स्पर्श सुद्धा करते हो नां!"

"हो, मी पण असेच ऐकले आहे!" चंद्रवर्मा त्याना म्हणाला.

आमच्या पूर्वजांचा तर असा विश्वास होता की, किल्लयाच्या भिंतीच्या समोरच्या समुद्राच्या पाण्याच्या आंत मांत्रिकाने कांशाच्या मोठया भांडयांमधे काही अदभुत प्राणी कैद करून ठेवलेले आहेत. माझ्या वडिलांनी ते शोधण्यांचा अतोनात प्रयत्न

केला. परंतु काही उपयोग झाला नाही. परंतु तुझा मित्र इच्छेनुरूप मानव असून कालनाग रूप धारण करून आहे. त्याच्याकडून तू ती कांशाची भांडी इथे आणवू शकतोस." राजा शिवसिंह त्याला म्हणाला.

राजाच्या ह्या गोष्टी ऐकून त्याला वाटू लागले ह्या पाठीमागे नक्कीच काही गुढ आहे. हा अपूर्व प्राणी असलेल्या तांब्याच्या भांड्याविषयी सांगत आहे. त्या करीता कोणताही माणूस एवढे कष्ट व साहस करणार नाही. शिवसिंहला खरे पाहिले तर त्या किल्लयात लपविलेले धन पाहिजे आहे. ते प्राप्त करणे त्याला शक्य झाले नाही त्यामुळे त्याने हि चाल चालविली असावी की, मी मंत्र-तंत्र जाणणारा आहे. माझी त्याला मदत नक्की मिळेल. परंतु आता तर कांशाच्या किल्लयात लपविलेल्या धनाचा सांठा त्याच्यापासून वाचविण्या साठी त्याला काहीतरी धोका देऊन ती संपत्ती हडप केली पाहिजे. आता असा विचार चंद्रवर्माच्या मनामधे येऊ लागला.

"माझ्या सारखे मांत्रिकच साहसाची कामे करण्याचा प्रयत्न करतात. मी कांशाच्या किल्यापर्यंत जाईन. माझ्या बरोबर आपले थोडेसे सैन्य द्या. त्यांच्या मधे देवल नावाचा तरूण असला पाहिजे असे म्हणत चंद्रवर्माने तळहात निरखून पहाण्याचे नाटक केले.

राजा शिवसिंह व मंत्र्यानें एकमेकांडे पाहिले नंतर क्षणभर थांबून राजाने चंद्रवर्माकडे पहात म्हटले—"देवलचा म्हातारा बाप जंगलात कुठेतरी भटकत आहे. तू त्याला भेटला आहेस काय?"

"कोण? तो म्हातारा? ओहो!" असे म्हणत तो आपल्या तळहाताकडे जास्तच निरखून पाहू लागला. नंतर म्हणाला— "हो, हो, आता माझ्या लक्षात आले. तो जंगलात एका झोपडीत राहातो. त्याच्याकरीता तुम्ही योग्य वस्तू देववा. त्याला जर नगरात रहावयाचे असले तर त्याला इथे रहाण्याकरीता सर्ववस्तूनी सुसज्ज असे घर द्या. माझे कांशाच्या किल्लयापर्यंत जाणे तो म्हातारा व त्याच्या मुलावरच निर्भर आहे!" चंद्रवर्माचे बोलणे ऐकून राजा व मंत्र्यानें काहीच प्रतिक्रिया व्यक्त केली नाही— "ठिक आहे, तसे करू तू देवलल तुझ्याबरोबर घेऊन जा. मी तुझ्या संरक्षणासाठी एक हजार सैन्य देतो." राजा म्हणाला.

ते ऐकताच चंद्रवर्मा खदखदून हसत म्हणाला—"मी काही कोणाबरोबर युद्ध करावयास जात नाही. आणि त्यातुन मला युद्ध करावेच लागले तर त्या दुष्ट शक्ति बरोबरच करावे लागेल. ज्या माझ्या पासून लपून राहून माझ्यावर हल्ला करू पहातील. तेव्हां त्याला मला माझ्या मंत्र शक्तिचाच उपयोग करावा लागेल. तुमच्या सैनिकांचा काही उपयोग होणार नाही. माझ्या खाण्यापिण्याच्या







वस्तू लादून नेण्याकरीत काही गाढवे व एक दहा अनुचर असतील तर माझे काम कसेही पार पडेल त्यात सैनिकच असावे अशी काही जरूरी नाही.

"ठिक आहे. माझ्या लोकांपैकी काही विश्वासपात्र व शूर धाडसी अशी पांचसहा माणसे निवडून तुझ्या बरोबर देतो. त्याच बरोबर पन्नास सैनिक सुद्धा देतो. माझ्या राज्याची सीमा पार केल्यानंतर पूर्व प्रदेशाकडचा मण्डलाधीश वीरमल्ल तुझ्या करीता नक्कीच मदत करेल" राजा म्हणाला.

वीरमल्लचे नाव ऐकताच चंद्रवर्माला आपला सेनापती धीरमल्लची आठवण झाली. त्याने मनांतल्या मनांत विचार केला की, धीरमल्ल म्हणजे वर्माचा विश्वासपात्र नोकर सुबाहू ह्याची काय अवस्था झाली असावी.

थोडा वेळाने चंद्रवर्मा म्हणाला— "महाराज, आपण आपल्या इच्छेनुसार योजना करापण उद्या सकाळी सूर्योदयापूर्वी मी माझ्या कामगिरीवर निघेन. कांशाच्या किल्ल्यापाशी पोहोचेपर्यंत मला अनेक जंगले अरण्ये वाळवंटे डोंगर पार करावे लागतील. तेव्हां त्या त्या ठिकाणा प्रमाणे खाद्यपदार्थ लादुन नेण्याकरीता तशी जनावरे मला न्यावी लागतील. वाळवंटातून जातांना मला उंटानासुद्धा घेऊन जावे लागेल. आपण आपल्या सीमेपार असलेल्या वीर-मल्लला तसा संदेश पाठवून द्यावा. कारण आम्ही तिचे पोहोचे पर्यंत ते सर्व तयारी करून ठेवतील.

"ती सर्व तयारी मी करेन तुम्हांला घाबरायचे कारण नाही." राजा शिवसिंह त्याला म्हणाला.

दुसऱ्या दिवशी उजाडताच चंद्रवर्मा आपल्या सर्व तयारी सह निघाला. शिवपुरच्या सीमेपर्यंत राजा मंत्री व प्रजेतील लोक त्याला सोडण्यास आले. त्यानंतर चंद्रवर्मा काही अनुचर व देवलला बरोबर घेऊन निघाला. देवलची आदल्या



दिवशीच तुरुंगातून सुटका करण्यात आली होती. चंद्रवर्माने खूप लांबपर्यंत जंगलातून वाटचाल केली. परंतु त्याला म्हाताऱ्याने जो नकाशा दिला होता त्याचा तोपर्यंत काहीही उपयोग झाला नाही. चंद्र-वर्माला जंगले व दऱ्याखोऱ्यातून काहीही पहावयास मिळाले नाही तो पश्चिमेकडेच चालला आहे कां रस्ता चुकला आहे? कळत नव्हते त्याला सुर्योदय व सुर्यास्ता-वरूनच दिशा समजत होत्या.

अशा प्रकारे बरेच दिवस प्रवास केल्या-नंतर एके दिवशी सूर्योदयाच्या सुमारास देवल एका उंच शिखरावर चढला व जोर-जोरात टाळ्या वाजवित ओरडला—"अरे पहा! आपण कोणत्यातरी जुन्या नगरात पोहोचलो आहोत वाटते. मला शंका येते की हाच कांशाचा किल्ला आहे.

देवलचे ओरडणे ऐकून चंद्रवर्मा व त्याच्या बरोबर चालणारे धावत त्याच्या बाजूला गोळा झाले. त्याने ज्या दिशेला इशारा केला त्या बाजूला सर्वांनी आपली नजर वळविली. समोर पहाडाच्या माथ्यावर त्यांना एक मोडकळीस आलेले एक महा-नगर दृष्टीस पडले. घरांच्या छतामधून झाडेउगवलेली होती. त्याची दारे खिडक्या लोंबत होत्या. सर्व प्रकार भयानक वाटत होता.



"हा कांशाचा किल्ला तर नक्कीच नाही. तरी एकवार आपल्याला ह्या मोडकळीस आलेल्या किल्ल्याची पहाणी करावी लागेल. तुम्ही काही लोक माझ्याबरोबर चला." असे म्हणत त्या शिखरावरून चंद्रवर्मा खाली उतरला व त्या मोडक्या किल्लाकडे चालू लागला.

ह्यानंतर हळूहळू सर्व लोक त्या मोडकळीस आलेल्या किल्ल्याच्या जवळपास आले. त्या किल्ल्याच्या आंवारात वाघाची तीन पिल्ले खेळत असलेली त्याना दिसली. त्या सर्वांची चाहुल लागताच ती तिन्ही पिल्ले गुरगुरत एका उडीत दगडापार जाऊन अदृश्य झाली दुसऱ्याक्षणी

      

एक भयंकर वाघाची डरकाळी ऐकू आली. तो आवाज ऐकताच चंद्रवर्मा स्तब्ध उभा राहला व सर्वांना संकेत करून म्हणाला–"आपल्याला ह्या वरात जाणे धोक्याचे वाटते. दुसऱ्या वाटेने आत जाऊ." असे म्हणत तो दुसऱ्या बाजूला वळून चालू लागला.

तो मोडकळीस आलेला किल्ला जेमतेम पंचवीस तीस फर्लांग पसरलेला होता. परंतु तेथे अद्याप कोणीही मनुष्य त्यांच्या दृष्टीस आला नाही. तेथील प्रत्येक घर मोडक्या तोडक्या अवस्थेत आढळले. काही घरे जळलेल्या अवस्थेत नजरेस पडली. काही घरे तर अशी दिसत होती की कोणी त्याला काळा रंगतर लावला नाही. कोणत्यातरी काळात इथे मानव वस्ती करीत असावा. परंतु आता त्या ठिकाणी जंगली श्वापदांनी आपले वास्तव्य केले होते.

चंद्रवर्मा नगराच्या मध्यवर्ती भागात पोहोचला. तेथे त्याला एका उंचावर एक शिला लेख दिसला. त्याने जवळ जाऊन पाहिले त्यावरील अक्षरे अस्पष्ट झाली होती. त्याने जवळ जाऊन जोडून जोडून ती वाचण्याचा प्रयत्न केला. त्यात प्रामुख्याने असा उल्लेख केलेला आढळला की हे करवीरपुर आहे. एक हजार वर्षापूर्वी हे नगर भरपुर संपत्तीच्या खजिन्यांनी पूर्ण भरलेले होते. परंतु त्या नगरातील उत्तरी दिशेने आलेल्या बार्बर नावाच्या जातीतील लोकांनी सर्व संपत्ती आपली राजधानी कांशाच्या किल्ल्यामधे नेऊन टाकली.

चंद्रवर्माने वाचणे थांबवत आपल्या अनुचरांकडे पहात म्हटले–"आता आपल्याला आपला वेळ इथे फुकट घालवणे योग्य नाही. इथे मोडक्या तोडक्या दगड-विटांशिवाय दुसरे काही नाही. हा कांशाचा किल्ला नाही. त्यामुळे तुम्ही इथून पुढे जावयास निघा.

ह्यानंतर सर्व लोक पश्चिम दिशेकडे वळून तेथून चालू लागले. (क्रमश:)



# पुरावा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा ! मला एक शंका येते की, ह्या अर्धरात्री एवढे परिश्रम करण्यास तुला प्रवृत्त करणारा कोणी गुरु, भक्त किंवा योगी असावा. परंतु असे लोक सुद्धा वाक्चातुर्याने चांगल्या लोकांना कुमार्गाने जाण्यास प्रवृत्त करतात. अशा तऱ्हेने कठिण समस्यांची शिकार बनलेल्या पूर्णचंद्र नावाच्या एक व्यक्तिची गोष्ट तुला सांगतो लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

रामचंद्रपुर गावात रहाणारा पुर्णचंद्र पूर्ण नास्तिक होता. त्याचा देवावर जरादेखिल विश्वास नव्हता. एकदा त्या गावात एक



योगी आला. तो सर्व लोकांना उपदेश करू लागला की, देवभक्ति केल्याने त्याची मनोकामना सफल होईल. पुर्णचंद्रने एकांतात योग्याचे दर्शन घेतले व विचारले– ''स्वामी, आपण सर्वांना देवावर भक्ति करण्याचा उपदेश करता ! पण मला तर हे समजत नाही. म्हणून जाणून घ्यावे म्हणतो. देवावर भक्ति आहे ह्यापाठीमागे काय पुरावा आहे. देव कुठे आहे ?''

''बाळा, तुझ्या चारीबाजूला साऱ्या विश्वात देव आहे. हेच तर भगवान अस्तित्वात असल्याच प्रमाण आहे.'' त्या योग्याने उत्तर देत म्हटले.

''बरं जर कां घटकाभर असे मानले की, देवाचे अस्तित्व नाही तर काय. हवा वहाण्याचे थांबत नाही नां ? मानव समाजाचे जिवन ह्यावर निर्भर असत नाही. ह्याकरीता देव अस्तित्वात आहे. ह्याला काहीतरी पुरावा हवा. फक्त विश्वास बसावा ह्याकरीता नाही. तर देवाकडून काहीतरी कार्य घडावयास हवे. होय नां !'' पुर्णचंद्रने योग्याला प्रश्न केला.

योग्याला समजले की पुर्णचंद्रला कोणत्या गोष्टीचा पुरावा हवा आहे. जसे औषधाने रोग्याचे दुखणे बरे होते. अन्नाने भुकेचे हे सर्व शास्त्रदृष्टीने प्रमाण आहेत. हे तर मनुष्याने आपल्या कार्यान्वये व परिश्रमे संपन्न केले आहे. माणसाच्या विश्वासाचा इथे काही संबंध येत नाही.

''तुला पुरावाच हवा नां ! तू निर्मळ हृदयाने कोणतीही गोष्ट देवाजवळ माग. ती पूर्ण होईल ?'' योग्याने सांगितले.

माझ्या मनात कोणत्याही गोष्टीची आशा नाही. आणि असली जरी तरी ती मी कष्ट मेहनत करून पूर्ण करेन.'' पुर्णचंद्रने उत्तर देत म्हटले.

''एका वर्षाने मी ह्या गांवी परत येईन. माझ्या म्हणण्याप्रमाणे वाग. तुला नक्की पुरावा सांपडेल.'' योग्याने समजावले.



तो निघून गेल्यानंतर पुर्णचंद्रने त्याच्या म्हणण्याकडे अजिबात दुर्लक्ष केले. त्याने फक्त आपल्या मनाला समजावले की, योग्याने आपल्या मनाचे पूर्ण समाधान केले नाही.

एकदा त्या गावातील एक श्रीमंत माणूस अचानक आजारी पडला. अनेक प्रकारे त्याच्यावर इलाज झाले. परंतु त्याचे दुखणे दिवसेंदिवस वाढतच राहिले. एका ज्योतिषाने त्याची जन्मकुंडली पाहून त्यात काही दोष आहे कां ? हे पाहिले व सांगितले–''हे दुखणे औषधांच्या सेवनाने बरे होणारे नाही. एका नास्तिकाने देवळात प्रवेश केला तरच तुम्हांला स्वास्थ लाभू शकेल व देव नक्कीच आपला आजार बरा करेल.

त्या गावात पुर्णचंद्र एकटाच काय तो नास्तिक होता. ही गोष्ट सर्वांना माहीत होती. त्यामुळे त्या श्रीमंत माणसाच्या घरातील काही नातेवाईक पुर्णचंद्रच्या घरी गेले. व त्यांनी सर्व परिस्थिती सांगितली.

हि गोष्ट ऐकून पुर्णचंद्रला अत्यंत आश्चर्य वाटू लागले. त्याच्या मनाला एक शंका ग्रासू लागली. की आपण कधीही आजपर्यंत देवळात पाऊल टाकले नाही. की देवावर विश्वास केला नाही. तरी देव आपल्याला देवळात बोलावत आहे. ह्यामुळे त्याने मनोमन निश्चय केला की, ह्या गोष्टीच्या सत्यतेचा पडताळा तरी पहावी.



त्या श्रीमंत माणसाचे प्राण वाचविण्याच्या हेतूने पुर्णचंद्र देवळात शिरला त्याने मोठ्या श्रद्धेने देवाच्या मुर्तीकडे पाहिले व विश्वासाने देवाला म्हटले–''हे देवा, ह्या श्रीमंत माणसाचे आरोग्य लवकर सुधारू दे.''

दुसऱ्या दिवशी त्या श्रीमंताचा रोग अशा प्रकारे बरा झाला की, कोणीतरी जादू करावी. ते पाहून पुर्णचंद्रला अत्यंत आश्चर्य वाटले. परंतु त्याच्या मनात एक शंका येऊ लागली–''जर का देवाची प्रार्थना करून देव सर्व सुखे माणसाला देत असेल तर ह्या जगात प्रत्येकाला कोणत्यांना कोणत्या समस्या कां ? हि शंका येताच पूर्णचंद्रने विचार केला.

त्या श्रीमंत माणसाच्या बऱ्या होण्याचा देवाच्या अस्तित्वाशी संबंध काय? परंतु हा एक योगायोग असावा.

पण गावात सर्वत्र हि बातमी पसरली की, पुर्णंचंद्रने देवाची, करुणा भाकल्यामुळे श्रीमंताचे दुखणे बरे झाले. त्यामुळे लांब लांबवरून लोक पुर्णंचंद्रकडे येऊ लागले. त्या सर्व लोकांच्या समस्या ऐकून तो व्याकुळ झाला. अरेरे! ह्या जगातील सर्व समस्या काय माझ्या एकटयाच्या प्रार्थनेनी दूर होणार कां? त्याचा स्वतःचा देखिल विश्वास बसत नव्हता. तरी सुद्धा त्याने लोकांकरीता देवळात जाऊन श्रद्धा भावनेने प्रार्थना केली. आणि आश्चर्याची गोष्ट कर्मधर्म संयोगाने त्याची प्रत्येक प्रार्थना यशस्वी झाली.

अशा प्रकारे त्याचे यश चोहोबाजूला पसरले. लोक दररोज तिर्थयात्रेकरूंप्रमाणे त्याच्या घरीं येऊ लागले. पुर्णचंद्र लोकांचे म्हणणे शांतता पूर्वक ऐकू लागला जेव्हां त्याला विश्वास वाटे की, हि गोष्ट मनुष्य पूर्ण करू शकणार नाही. तेव्हां तो देवळात जाई व भक्ति भावनेने देवाकडे प्रार्थना करी. बाकीच्या लोकांना रागावून पाठवून देई.

असे थोडे दिवस उलटले. एक दिवशी पूर्णचंद्रच्या पत्नीने नवऱ्याला म्हटले–"काय हो! तुम्ही देवाची प्रार्थना करून सर्व लोकांची समस्या दूर करता. तुमच्या मध्ये जर अशीच काही अपूर्व शक्ति असेल तर माझी इच्छा कां पूर्ण करू शकत नाहीत?"

"सांग, तुझी काय इच्छा आहे?" पुर्णचंद्रने बायकोला विचारले.

"तुम्ही ह्या देशाचे राजा व्हां. आणि मी राणी होईन." त्याची बायको म्हणाली.

पुर्णचंद्रने विचार केला की, अशी इच्छा देवाजवळ उघड केल्याने तरी देवाचे अस्तित्व आहे कां नाही ह्याचा शोध तरी लागले.

मग काय त्याचक्षणी पुर्णचंद्र धावतपळत देवळात गेला. व त्याने देवासमोर हात जोडून प्रार्थना करीत देवाला म्हटले–"आज पासून बरोबर एका आठवडयात मला ह्या देशाचा राजा कर. ह्याक्षणी जो राजा आहे त्याच्या पेक्षा मला चांगला राज्यकारभार करावयाचा आहे. जनतेच्या सर्व कठीण समस्या सोडवायच्या आहेत.

ह्यानंतर खरोखरी पुर्णचंद्रने स्वप्नांत स्वतः अनुभवले की, आपण राजा बनलो. परंतु एक आठवडा उलटला तरी त्याची प्रार्थना सफल झाली नाही.

तुम्ही फार मोठी इच्छा मनांत धरलीत त्यामुळे ती सफल झाली नसावी. ह्यावेळी मनांत अशी इच्छा करा की, त्याने आपली संपत्ती वाढेल." पुर्णचंद्रच्या बायकोने त्याला समजावत म्हटले.

पुर्णचंद्रने हि इच्छा मनांत धरून देवाकडे प्रार्थना केली. ती देखिल सफल झाली नाही.

त्यावर त्याची बायको त्याला समजावत म्हणाली–"तुम्ही दुसऱ्याचे कल्याण व्हावे ह्या हेतूने देवाकडे मागणे मागून प्रार्थना करता नां! ह्याकरीता तुम्ही आता त्या





लोकांचा काहीतरी सल्ला घ्या व त्यांना विचारा की, आपली संपत्ती कशाने वाढेल.

पुर्णचंद्रने बायकोच्या म्हणण्याप्रमाणे केले ह्याचा परिणाम उलटच झाला. त्या दिवसापासून त्याची कोणतीही प्रार्थना सफल झाली नाही. त्यामुळे माणसांचे त्याच्यांकडे येणें सुद्धा हळूहळू कमी झाले.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला– "राजा, ह्या गोष्टी मध्ये मला जरा देखील शंका नाही की, पुर्णचंद्रने देवळात जाऊन देवाजवळ जी प्रार्थना केलीं व ती सफल झाली हे संयोगानेच घडले. नाहीतर त्याने स्वतः राजा बनण्याचे जे मनात आणून देवाकडे मागितले होते ते सुद्धा सफल व्हावयास पाहिजे होते. तेच नाही तर त्यानंतर सुद्धा त्यानी ज्या ज्या प्रार्थना केल्या त्या सुद्धा निष्फल ठरल्या. पण योग्याने देव अस्तित्वात आहे ह्याचा पुरावा दाखविण्यासाठी पुर्णचंद्रला वाकडा मार्ग दाखविला नां! हि गोष्ट खरी आहे की नाहीं? या शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर परिणाम माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील.

राजा विक्रमादित्य म्हणाला–"सुरवातीला पुर्णचंद्रने देवळात जाऊन देवाजवळ जी प्रार्थना केली व जे फल प्राप्त केले ते काही संयोगाने नाही. परंतु जी इच्छा स्वार्थाने प्रेरित होऊन त्याने देवाकडे प्रार्थना करून मागितली त्यांची किमत राहीली नाही. देवाचे देणें केवळ त्याच्या शक्तिनुरूपच असते. स्वार्थसिद्धिकरीता देवाकडे जो प्रार्थना करतो. त्याला देव मदत करीत नाही. परंतु पुर्णचंद्रने निस्वार्थ भावनेने जी दुसऱ्यांकरीता देवांकडे प्रार्थना केली ती सर्व सफल झाली. ह्यावरूनच देव अस्तित्वात आहे यांचा पुरावा सिद्ध झाला. त्यामुळे असे म्हणता येत नाही की, योग्याने त्याला धोका दिला.

**अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)**






# शेरास सव्वा शेर

तलाठी भीमराजचे नाव ऐकताच उभे गाव कांपत असे. मोठेमोठे अधिकारी व कर्मचारी सुद्धा त्यांना घाबरून असत. एकदा त्या गावात एक प्रसिद्ध ज्योतिषि आला. त्यांनी गावातील सर्व बडया बडया लोकांचे हात पाहून व जन्मकुंडली करून बराच पैसा कमावला. सरते शेवटी तो त्या गावच्या तलाठयाच्या घरी गेला.

त्यावेळी तलाठी ओसरीवर बसून जमाखर्च लिहीत होता. तलाठयाला पहाताच ज्योतिषाने नमस्कार केला.

"यावे यावे बसावे! भीमराजने आपल्या हातातील टांक खाली ठेवत त्याला म्हटले. थोडे इकडचे तिकडचे बोलणें झाल्यावर ज्योतिषाने तलाठयाचा हात आपल्या हातात घेतला व तो न्याहाळू लागला व त्याला म्हणाला–"वाह्! काय सांगू? आपली जन्मकुंडली अत्यंत सुंदर आहे! शनिने सातव्या घरात प्रवेश केला आहे. त्यामुळेच तर आपण आत्ता ह्या पदाला आहांत. तसे पाहिले तर आपल्या कुंडलीत राजयोग आहे. त्यामुळेच तर मुकुटारहीत ह्यागावचे आपण राजा आहात."

जन्मकुंडली पहाण्याच्या नादात तलाठयाने ज्योतिषाला विचारले–"काय हो, फक्त हस्तरेखां पहाण्याकरीता आपण किती पैसे घेता?

तसे काही फार नाहीत. काही लोंक तर आपल्या इच्छेला येईल तेवढे देतात. परंतु गरिबात गरीब सुद्धा चार रुपया खाली देत नाही. आपण तर ह्या गावाचे प्रमुख धर्मात्मा आहात आपल्या बरोबर कसला सौदा करू?" ज्योतिषाने उत्तर देत म्हटले.

ह्या गावात पटेल, शूरसिंग, तेजसिंग शार्दुलसिंह वगैरे अनेक श्रीमंत लोक आहेत त्याच्याकडे का नाही जात?" तलाठी म्हणाला.

"क्षमा करा साहेब, मी त्या सर्वांकडे जाऊन आलो सर्वांची घरे आपल्या कडे येण्याच्या रस्त्यातच आहेत नां ? मग त्याच्याकडे न जाऊन कसे चालेल ?" ज्योतिषाने म्हटले.

"हं मग सांगा पाहू एकूण किती रुपये कमावलेत ?" तलाठ्याने विचारले.

"सरकार, मागचे महीनाभर मी ह्या-गावांतच खेपा टाकतो आहे. खरे म्हटले तर आपल्या गांवात लक्ष्मी वसते आहे. खूप संपन्न आहे आपले गांव. त्यातून आपल्या गावातले लोक अतिशय उदार आहेत. विद्येचे माहेर घर सर्वांचे उदरभरण करणारे गांव आहे." ज्योतिषी म्हणाला.

"आपल्याला जास्त पैसा मिळाला असला तर त्यांत आम्हांला काय आनंदच आहे. आपल्या सारखे महापंडीत आमच्या गावांत आले की त्यांना प्रोत्साहन द्यावयास हवे नां !" तलाठी म्हणाले.

त्यांच्या तोंडी स्वत:चे गुणवर्णन ऐकून ज्योतिषाचा आनंद गगनात मावेनासा झाला तो भोळ्यासारखा त्यांना म्हणाला—

"आपल्यापासून कशाला लपवू. मी जवळ-जवळ दोनशे रुपये वसूल केले आहेत.

त्यावर भीमराज स्मित करीत म्हणाला— "वाह् ! मग आत्ता पर्यंत आपण हे आधी कां नाही सांगितलेत. तुम्ही हिशोब सांगितलात त्या हिशोबाने पाहिले तर एक रुपयाला पांच पैसे म्हणजे एकूण दहा रुपये झाले झटपट दहा रुपये माझे जमा करा पाहू मी गावच्या वसूली करीता पांच प्रतिशत पैसे जमा करतो. हे गावांत लहान पोरा पासून सर्वांना माहित आहे. त्यामुळे आपण आपले चार रुपये त्यातून कापून घ्या व सहा रुपये माझ्या हातात टाका ! म्हणजे काम झाले !"

तलाठ्याचे बोलणें एकूनच ज्योतिषी उभा हादरला. त्याने विचार केला की जर कां जास्त वेळ आता इथे घालवत बसलो. तर आणखी कोण कोणती संकटे समोर येतील कोण जाणे. त्याने चुपचाप सहा रुपये त्याला दिले व झटक्यात तेथून पसार झाला.





आपली देवळे :

## कोणार्क

चंद्रभागा नदीचा जिथे समुद्राशी संगम होतो. तेथेच एक सुर्याचे देऊळ बांध-लेले आहे. हे देऊळ सर्व जगातील सुप्रसिद्ध देऊळ आहे. पुराणातील कथामधे सुद्धा असे आढळून आले की, श्रीकृष्णाचा मुलगा सांब ह्याने सुद्धा सुर्याची आराधना करीत आपला बराच काळ येथे घालवला.

१३ व्या शतकाच्या सुमारास कलिंग राज्यावर राजा नरसिंह देवने राज्य होते. त्यांनी ह्या सुंदर प्रदेशात ह्या स्थळी सुर्य भगवानाचे देऊळ बांधण्याचा संकल्प मनाशी केला व त्या कार्याकरीता बाराहजार शिल्पकारांना बोलावून घेतले.





अत्यंत प्रसिद्ध शिल्पकार व वास्तु-शास्त्रतज्ञ बिष्णु मोहराणा यांच्या नेतृत्वखाली देवळाच्या बांधकामास सुरवात झाली. दूरदूरच्या देशातून मोठमोठ्या सुंदर दगड इथे आणवण्यात आले. शिल्पकलेमध्ये उत्कृष्ट स्थान बनण्याच्या उद्देशाने ह्या मंदीराचे काम वेळेच्या आधीच पूर्ण करण्याकरीता शिल्पकार रात्रंदिवस मेहनत करु




सूर्य भगवानाच्या ह्या रथाच्या चित्रां-मध्ये मोठमोठ्या चाकांसह व जोडलेल्या घोड्यांसह हे मंदिर पूर्ण केले गेले. वर्षभर सूर्याची किरणें ह्या देवळात पडावीत असे हे ईशान्य दिशेकडे तोंड करून बांधण्यात आले आहे.

प्रमुख शिल्पकार विष्णु मोहराणा ह्याला धर्मपाद नावाचा चौदा वर्षाचा मुलगा होता. तो आपल्या आईजवळ गावात राहून आपल्या वडिलांच्या ताडपत्र ग्रंथाचे अध्ययन करीत असे. एक दिवस धर्मपाद आपल्या वडिलांना भेटण्याकरीता आपल्या आईची परवानगी घेऊन कोणार्कला जावयास निघाला.





धर्मपाद चालत कोणार्कला पोहोचला. आपल्या मुलाला आलेला पहाताच मोठ्या आनंदाने विष्णु मोहराणाने धर्मपादला आपल्या मिठीत घेतले. धर्मपादचे ते अद्‌भुत् शिल्प पाहून देहभान हरपले.

ह्या देवळाचे बांधकाम पूर्ण झाले होते तरी सुद्धा तितकेसे कोणी प्रसन्न दिसत नव्हते. सर्व शिल्पकार काळजीत पडले. ते पाहून धर्मपादने त्यांना त्याचे कारण विचारले. तेव्हां त्या लोकांनी सांगितले की, ह्या देवळाच्या कळसाचे टोक बरोबर जोडण्यात त्या सर्वांनी चुक केली आहे. हेच आमच्या चिंतेचे कारण आहे.





मंदीर बांधण्याकामी जास्त वेळ जाणार पाहून राजा आपली सहनशिलता घालवून बसला. त्यांनी सर्व शिल्प-कारांना बोलावून तंबी दिली की, उद्या पहाटेच्या आत जर देवळाचा कळस बांधून पूर्ण झाला नाही तर सर्व शिल्पकारांना ठार केले जाईल. धर्मपादने शिखरावर चढून शिल्प-कारांना समजावून सांगितले की देवळाचा कळस कुठे हवा.

धर्मपादच्या साहसाची सर्वांनी स्तुती केली. विष्णु मोहराणाला अतिशय कौतुक वाटले. तरी सुद्धा काही शिल्पकार दुष्ट होते त्यांच्या मनात द्वेष निर्माण झाला ते एकमेकांना सांगू लागले की, बारा हजार शिल्पकारांना जे समजले नाही ते काय ह्या तरुणाला समजणार ह्रा अपमान आहे. त्यांचे तसे बोलणें पाहून धर्मपादला आश्चर्य वाटले.












त्याने मनात विचार केला, की आपण नेहमी करताच जर येथून निघून गेलो तर, कोणी असा विचार करणार नाही की, कळसाचे काम आपण पूर्ण केले. तो अर्ध्यारात्री त्या गोपुरावर चढला तो पौर्णिमेचा दिवस होता. त्यामुळे समुद्राच्या भरतीच्या लाटा देवळाच्या अंगणात येऊन धडकत होत्या. धर्मपादने तेथुन सरळ समुद्रात उडी टाकून आपल्या प्राणांची आहुती दिली.

कित्येक वर्षे लोटली तरीही धर्मपादच्या धाडसाचे इतिहासात सुद्धा नांव अजरामर राहीले आहे. हे मुख्य देऊळ नाही तरी सुद्धा त्याच्या प्रवेशद्वाराच्या भितीवरचे सुयचि सुंदर खोदकामाने आज सुद्धा दर्शकांच्या डोळ्यांचे पारणे फेडते.





कोणार्कच्या मुख्य प्रवेश द्वाराजवळच्या भितीवर खोदकाम केलेल्या मूर्ती अप्रतिम आहेत. आता चंद्रभागा नदी व देऊळ ह्यामधे बरेच अंतर आहे. तरीही ह्या देवळामुळे आज सुद्धा अत्यंत शांत व गंभीर असे वातावरण निर्माण झालेले दिसते.



# कष्टाची संपत्ती

गोवर्धन नावाचा एक मध्यम वर्गातला शेतकरी होता. त्याने आपल्या मुलीच्या लग्न खर्चाकरीता स्वतःची दोन एकर जमिन विकली. त्याचे त्याला दहाहजार रुपये मिळाले. ते घेऊन त्याने ते सुरक्षित नेऊन घरात ठेवले. परंतु त्याच वेळी त्याच्या एका नातेवाईकाने त्याला पैसे ठेवतांना पाहिले. व जरावेळाने गोवर्धनदास बाहेर गेलेला व त्याची बायको परसदारी आहे हे पाहून त्याने ती संपत्ती चोरली व तो तेथून पळून गेला.

त्या नातेवाईकाचे नाव शंभुनाथ होते. त्याला सुद्धा. एक उपवर मुलगी होती परंतु हुंडा कसा द्यावा. ह्याची त्याला विवंचना होती. नवरदेव त्याच गावचा सोमनाथचा मुलगा होता. हातात पैसा येताच तो आपल्या मुलीचे लग्न निश्चित करण्या करीता सोमनाथच्या घरी निघाला.

घरातून बाहेर पडण्यापूर्वी त्याने चोरलेले पैसे एका जुन्या सामानाच्या आत ठेऊन माळ्यावर टाकून दिले.

शंभुनाथच्या मुलाने मंगलनाथने आपल्या वडीलांना माळ्यावर काहीतरी टाकत असतांना पाहिले होते. त्यामुळे त्याने वडिल बाहेर जाताच माळ्यावरून ती वस्तू खाली काढली व अंगरख्यात लपवून त्याचे चारपांच टारगट मित्र होते त्याना भेटावयास तो निघाला. रस्त्याने जात असताना मंगलनाथ मोठ्या आनंदाने गुणगुणत उड्या मारीत गेला. त्यामुळे त्याच्या खिश्यातून ती पैशांची थैली खाली पडली परंतु त्याला कळलेसुद्धा नाही. थोड्या वेळाने त्या गावच्या सावकाराची गाडी त्या रस्त्याने जात असताना सावकारला रस्त्यात पडलेली ती थैली दिसली त्याला शंका आली की थैली



पैशांने भरलेली असावी परंतु त्याने ती उचलून घेतली पण उघडून पाहिली नाही. कारण ज्याची हरवली तो शोधत येथे आला आणि आपल्याला पाहिले तर. त्या भितीने तो न थांबता निघाला.

सावकार जेव्हां दुकानात पोहोचला, तेव्हां तो त्या थैलीची गोष्ट अजिबात विसरून गेला. काही वेळाने त्याने शोधले परंतु सामानात त्याला ती थैली काही सापडली नाही.

परंतु असे घडले तेव्हां सावकाराचा नोकर सामान उतरवून घेत होता. तेव्हां त्याला सामानामध्ये ती थैली दिसली त्याने भरकन् ती आपल्या धोतराच्या सोग्यात कोंबली व काम संपताच तेथून पोबारा केला. घरी येताच त्याने ती उघडून पाहिली व त्यात बरीच संपत्ती पाहून त्याची व बायकोची तर बोबडी बसली ती त्याला म्हणाली–"अहो ऐकलेत कां जर लोकांना समजले की आपल्याकडे इतके सारे धन आहे तर नक्कीच ते आपले प्राण घेतल्याशिवाय रहाणार नाहीत व नक्कीच पुन्हां हे चोरून नेण्याचे कोणी धाडस करेल त्यामुळे आपण आत्ताच गुपचुप आपल्या मागील दारी पुरून ठेवू.

दोघे नवराबायको थैली लपविण्याकरीता जेव्हां खड्डा खणत होते. तेव्हां त्याचा शेजारी जानकीराम ह्याने लपून पाहिले त्याला वाटले त्या थैलीत किंमती वस्तू असली पाहिजे. जेव्हां सावकार व त्याची बायको ते धन लपवून घरात परत आली व त्यांनी दार लावले. तेव्हां जानकीरामने लपून छपून भितीवरून त्यांच्या परसात उडी मारली व जेथे ती थैली पुरून ठेवली होती ती उखणून काढून तो परत भितविरून उडी मारून स्वतःच्या घरात आला.

त्यावेळी मध्यरात्र उलटली होती व एक चोर नेमका जानकीरामच्या घरात चोरी करण्याच्या उद्देशाने आला होता त्याने जानकीरामने काहीतरी वस्तू शेजाऱ्यांच्या कडून चोरून आणतांना पाहिली होती त्याला वाटले की, जानकीराम सुद्धा आपल्या सारखाच एक चोर असावा. त्यामुळे त्याने मनात विचार केला की त्याच्या चोरलेल्या माला तील हिस्सा मागावा ह्या हेतूने तो समोर आला. जानकीरामने चोराला पाहिले व तो जोरात किंचाळणार तेवढ्यात त्याच्या लक्षात आले की, आपल्या हातात चोरून आणलेले सामान आहे. तेव्हां त्याने ती थैली दाराबाहेरच टाकली व तो धावत घरात आला व त्याने दार लावून टाकले.

चोर आपल्या नशिबावर अत्यंत खुष झाला त्याने ती थैली घेतली दुर्दैवाने एक-दोन कुंत्री भुंकत त्याच्या पाठीमागे लागली. त्यामुळे आजूबाजूचे लोक उठून बाहेर आले त्यांनीं ती माणसे बाहेर आलेली व पाहीली व घाबरून थैली रस्त्या कडेला टाकून तो पळून गेला.

त्या गावात एक ज्योतिषि रहात होता. अगदी पहाटे नदीवरून स्नान करून परत येत होता त्याला रस्त्याकडेला पडलेली थैली दिसली. ज्योतिषाने ती थैली उचलून घेतली व त्यात पैसे आहेत हे पाहून तो अत्यंत आनंदीत झाला. घरात पोहचला नाही तोच त्याला आपल्या घरात काही गावकरी बसलेले दिसले ते लोकं लग्नाचा मुहूर्त विचारण्यास आलेले होते.

ज्योतिषाने त्यांना पहाताच ती पैशाची थैली उपरण्यात गुंडाळली व तेथेच टाकून दिली व त्या लोकांची विचारपुस करण्याकरीता ते त्याच्याजवळ गेले.



ज्योतिषाची बायको थोड्यावेळाने घाटावर धुणे धुण्यास निघाली. तिने झोपाळ्यावर मळलेले उपरणे पाहिले व तीने ते उचलून बादलीत टाकले.

ज्योतिषाची बायको जेव्हां नदीच्या घाटावर पोहोचली त्यावेळी नेमकी तिची मैत्रिण म्हणजे गोवर्धन दासची बायको तेथे धुणे धुण्यास आलेली तिला दिसली. थोडा-वेळे दोघींनी गप्पा मारल्या नंतर त्यानी कपडे धुतले व चुकून दोघींनी धुतलेले कपडे एकमेकींच्या बादल्यात घातले. कारण दोन दिवसापूर्वीच दोघींनी बाजारातून एकसारख्या रंगाच्या बादल्या विकत घेतल्या होत्या त्या-मुळे त्यांना बादल्या बदललेले समजले नाही.

गोवर्धनदासची बायको घरी आली व मागीलदारी जाऊन ती कपडे वाळत घालू लागली. तेव्हां तिला बादलीच्या तळाशी एक थैली आढळली तिने अत्यंत आश्चर्याने ती उघडून पाहिली व त्यात इतके रुपये पाहून हर्षनादाने गुणगुणू लागली. तितक्यात गोवर्धनदास मागीलदारी येत बायकोला विचारू लागला–"अग, ऐकलेस कां? मी काल संध्याकाळी माझ्या पेटीत तळाला पैसे ठेवले होते. ते कुठे दिसत नाहीत. तू कुठे पाहिलेस कां? असे म्हणत त्यांनी आपल्या बायकोच्या हातातच ती पैशाची थैली पाहिली व तिला म्हटले–"अग, तू ह्याला कशाला हात लावलास? मी तर तासभर हे शोधत आहे. असे म्हणण त्याने ते स्वतःच्या हातात घेतले.

गोवर्धनदासच्या बायकोला हे समजेना की, हि थैली आपल्या बादलीत कशी काय आली काय घडले? परंतु तिने विचार केला की, बहुदा चुकून कपड्यांबरोबर आपण घेऊन गेलो असू परंतु नशिबाने हरवली नाही.

शेवट काही कां होईना गोवर्धनदासचे हरवलेले रुपये कशाना कशा तऱ्हेने त्याला पुन्हां मिळाले व त्यामुळे त्याच्या मुलीचे लग्न निर्विघ्न पार पडले.






देव पुन्हां विष्णूकडे गेले आणि म्हणाले–
हे देवाधिदेवा! मंदर पर्वताची रवी कशी काय होणार? तो पर्वत तर जागचा हालत देखील नाही."

तेव्हां विष्णूने शेषनागाला आज्ञा केली की त्याने पर्वताला उपटून क्षीरसागरात टाकावे. ते देवाचे कार्य आहे. तेव्हां त्याने दिरंगाई करू नये. शेषनागाने, विष्णूने आज्ञा केली होती त्याप्रमाणे मंदर पर्वत क्षीरसागरात नेऊन टाकला.

देवांनी पुन्हां विनंती केली की, ह्या पर्वत धारण करण्याची शक्ति असेल असा कोणी तरी हवा. तेव्हां विष्णूने कूर्मरूप घेऊन आपल्या पाठीवर मंदरपर्वत धारण केला.

अशा तऱ्हेने सर्व प्रयत्न झाले. परंतु रवीची दोरी ऐवढी मोठी व बळकट कोठून मिळणार? तेव्हां वासुकीने दोरी होण्याचे मान्य केले आणि देव व दानव क्षीरसागराचे मंथन करू लागले. देवांनीं वासुकीच्या तोंडाकडची बाजू धरण्याचा आग्रह केला. पण राक्षस त्या गोष्टीस कबूल झाले नाहीत ते म्हणाले–"आम्ही वासुकीची शेपटी धरणार का? छे! छे! आम्ही ते नाही ऐकणार आम्हीच तोंडाकडची बाजू धरणार." अशा तऱ्हेने प्रतिस्पर्धेच्या भावनेनें राक्षसांनी हट्ट धरून शेपटीकडची बाजू धरायला देवांना सांगितले. व तोंडाकडची बाजू स्वतः धरली व ते खेचू लागले.

१३- समुद्रमंथन

      





समुद्रमंथन सुरू झाले. वासुकीच्या तोंडातून वाफा व ज्वाळा येऊ लागल्या आणि राक्षस फार घाबरून गेले. देव देखील घाबरून गेले. परंतु त्यांना तितका त्रास झाला नाही. तरी देव दानवांनी अशा तऱ्हेने बराच काळ समुद्रमंथन केले. परंतु क्षीरसागरातून अमृत निघाले नाही. उलट हलाहल विष निघाले आणि ते वेगाने चारीबाजूला पसरू लागले. ते पाहून सर्वांची बोबडी वळाली.

ते पाहून देवदानव दोघेही भयभीत झाले कोणाला काय करावे सुचेना सर्व कैलास लोकांकडे धावले आणि सदाशीवाला साष्टांग नमस्कार करून प्रार्थना करू लागले–"हे देवाधिदेवा महादेवा! हे हलाहल त्रिलोकाला भस्म करील की काय अशी भीती वाटू लागली आहे. तेव्हां या त्रिलोकाचे रक्षण कर. तूच या त्रिलोकाचा स्वामी धनी आहेस. तुझे तेज पाहून देव इंद्र ब्रह्मदेव स्वत: विष्णूदेखील आश्चर्यचकित होत आहे."

त्रिलोकात हाहा:कार उडून गेलेला पाहून सदाशिवाचे हृदय द्रवित झाले आणि तो पार्वतीला म्हणाला–" पाहिलेस, यांनी सर्वांनी मिळून समुद्रमंथन केले आणि हलाहल विष त्यातून निघाले. आता हे सगळेच घाबरून गेले आहेत. त्याना अभय दान देणे आपले कर्तव्य आहे. म्हणून मी हे हलाहल विष पिऊन टाकणार आहे. जगाचे रक्षण आपण केले पाहिजे." ह्याला दुसरा उपाय नाही.

शंकर म्हणाला त्याला पार्वतीने होकार दिला. शंकराने त्रिलोकात पसरलेले हलाहल विष एकत्र करून ते आपल्या कंठात ठेवले परंतु शंकरावर देखील विषाचा परिणाम अल्प का होईना पण झाल्याशिवाय राहला नाही. त्याचा कंठ काळानिळा झाला. तेव्हां पासून त्याचे नांवच निळकंठ पडले आणि तेच त्याचे एक आभुषण ही ओळखले जाऊ लागले.












त्यानंतर देवादानवांनी पुन्हां क्षीरसागराचे मंथन सुरू केले. तेव्हां सर्वात आधी कामधेनू उत्पन्न झाली. तिला ऋषी मुनी घेऊनगेले. त्यानंतर उच्चैश्रवा नावाचा एक पांढरा घोडा निघाला. बलीने व नंतर इंद्राला त्याचा मोह सोडण्यास सांगितले.

नंतर क्षीरसागरातून ऐरावत नावाचा चार दात असलेला एक पांढरा हत्ती निघाला. त्याच्या पाठोपाठ क्षीरसागरातून अनुक्रमे पारिजातक व अप्सरा निघाल्या आणि त्यानंतर लक्ष्मी निघाली. तिने स्वतः विष्णूला वरले. लक्ष्मी बरोबर क्षीरसागरातून चंद्र निघाला. यां सर्वांनंतर स्वतः धन्वन्तरी अमृत कलश घेऊन बाहेर आला परंतु तो कलश राक्षसांनी हिसकावून घेतला आणि दूर पळून जाऊन अमृतासाठी आपसात मारामारी करू लागले. तेव्हां देव विष्णूकडे जाऊन म्हणाले–"देवाधिदेवा, तुझ्या सल्ल्याप्रमाणे आम्ही समुद्रमंथन केले. आणि अमृत काढले. पण राक्षसांनी ते पळवून नेले आहे. तेव्हां विष्णू त्यांचे सांत्वन करून म्हणाला–"मी काहीतरी युक्ती करून तुम्हांला ते देववितो."

दुसऱ्या क्षणाला विष्णूने मोहिनीचे रूप घेतले आणि राक्षस होते तिकडे गेला. तिला पाहून सर्व राक्षस अमृताची गोष्ट पार विसरून गेले आणि तिच्या चारी बाजूला घोळका करून उभे राहले. त्यांच्याकडून त्यांच्या भांडणाचे कारण विचारून घेऊन मोहिनी म्हणाली–"मी करीन ते तुम्हांला मान्य असेल तर मी सर्वांना ते वांटून देईन." राक्षसांनी होकार दिला.

मोहिनीने देवासुरांना निरनिराळ्या पंक्तीत बसायला सांगितले आणि पहिल्याने देवांच्या पंक्तीत अमृत वांटायला सुरवात केली. राक्षसांनी मोहिनीला ती करील ते करण्यास होकार दिला होता. म्हणून त्यांना अन्याय वाटला तरी ते काही बोलले नाहीत. सर्व देवांचे अमृतपान झाल्यावर विष्णूने आपले मोहिनी रूप सोडले. शंकराला विष्णूने मोहिनी रूप घेऊन राक्षसांना फसविले व देवांना अमृत वाटले ही गोष्ट कळल्यावर तो पार्वतीसह वृषभ वाहनावर बसून विष्णूच्या दर्शनाला आला. व विष्णूला म्हणाला–"मी तुझी अनेक रूपे व अवतार पाहिले आहेत. परंतु तू मोहिनीचे रूपात धारण केले होतेस. ते पहाण्याची इच्छा माझ्या मनात आहे. ते पहाण्यासाठी मी इतक्या दुरून आलो आहे."

राक्षसांना मोहित करण्यासाठी मी जे रूप धारण केले होते तुला देखील दाखवितो." असे म्हणत विष्णू अदृष्य झाला आणि थोड्यावेळाने चेंडू खेळत असलेल्या मोहिनी रूप प्रकट झाला.

मोहिनीचे ते सुंदर रूप पाहून शंकर शेजारी पार्वती व त्याचे गण आहेत हे विसरून गेला आणि मोहिनीच्या पाठोपाठ धावू लागला परंतु लगेच ती विष्णूची माया असल्याचे शंकराच्या लक्षात आले तेव्हां विष्णूने शंकराच्या आत्मनिष्ठेची प्रशंसा केली.

त्यानंतर शंकर विष्णूचा निरोप घेऊन पार्वतीसह कैलास लोकी परतला.

प्राचीन काळी अयोध्येला बाहु नावाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या राज्यावर हैहयवंशी राजाने स्वारी करून त्याला हाकलवून लावले. बाहु आपल्या दोघां बायकांना घेऊन जंगलात राहू लागला.



जंगलात बाहूची एक बायको गरोदर असतांच बाहू मरण पावला. तेव्हां त्याची गरोदर बायको सती जाण्यास तयार होऊन त्याच्या चितेजवळ आली. तेव्हां और्वी नामक एका मुनीने पुढे येऊन तिला सांगितले–"मुली! तुला एक मुलगा होणार आहे. तू सहगमन करून कसे चालेल ?

म्हणून तिने सहगमन केले नाही. तेव्हां तिच्या सवतींनी नकळत तिला विष दिले परंतु तिला मुलगा झाला व त्याच्या बरोबर विष पण बाहेर आले म्हणून त्याचे नाव सगर (विषासह) पडले. सगर एक मोठा चक्रवर्ती राजा झाला आणि और्वी

ऋषींच्या कृपेने त्याने अश्वमेध यज्ञ पण केला.

सगर राजाला सुमती व केशिनी नावाच्या दोन राण्या होत्या परंतु त्याला मुलबाळ नव्हते म्हणून तो राजधानी बाहेर जंगलात जाऊन और्वी मुनींना भेटला.

और्वी मुनीं त्याला म्हणाले–" राजा तुला अपत्ययोग आहे. परंतु तुलां आपल्या दोघां राण्यांना बरोबर घेऊन जाऊन कैलास पर्वतावर तपश्चर्या करावी लागेल. सगराने त्याप्रमाणें तपश्चर्या केली. शंकराने प्रसन्न होऊन त्याला पुत्रप्राप्तीचा वर दिला. व तुला दोन मुलगे होतील असे सांगितले.

सगर राजधानीत परतल्यावर त्याच्या दोघा राण्यांना यथासमयी एकेक मुलगा झाला. त्याचे नांव असमंजस होते. और्वी मुनी म्हणाले–" सुमतीला जो मुलगा झाला. आहे त्याच्यात खरोखरी साठ हजार मुले आहेत.

म्हणून त्या मुलाचे साठ हजार तुकडे करून ते निरनिराळ्या मडक्यात ठेवण्यात आले आणि साठ हजार मुलगे जन्मले. केशिनीचा मुलगा असमंजस याची सर्व कामे राजाला असमंजस वाटतील अशीच होती. तो लहान थोर माणसांना उचलून नदीत फेंकून देई. प्रजा राजाकडे आपले गाऱ्हाणे घेऊन गेली. म्हणून सगर राजाने असमंजसला राजधानी बाहेर हाकलून लावले.

त्यानंतर राजाने पुन्हां अश्वमेध यज्ञ करण्याचे ठरविले. त्याने यज्ञाचा अश्व सोडला व त्याच्या रक्षणासाठी आपल्या साठ हजार मुलांना पाठविले. तो अश्व एका जागी एकाएकी अदृश्य झाला. तो कोठे गेला ह्याचा मुलांनी त्याचा शोध केला. पण तो कोठे दिसला नाही. तेव्हां मुलांनी परत येऊन सगर राजाला ते वर्तमान सांगितले. तेव्हां राजाने रागाने मुलांना पृथ्वी खणून अश्व कोठे लपला आहे हुडकून काढायला सांगितले. त्या कामगीरीवर सर्व मुले निघाली. त्यांना साष्टांग नमस्कार केला.





# देवीचे अलंकार

नागवर एक खेडेगांव होते. त्यां गावात एक देवीचे देऊळ होते. नागवरगावाला लागुनच एक केशवपुर नावाचे गाव होते. तेथील जमिनदाराने देवीच्या उत्सवात मूर्तीला घालण्याकरीता नथ, माळ सरी बांगड्या असे अनेक प्रकारचे दागिने घडविले. त्यावेळेपासून देवीची प्रतिमा सुंदर व आकर्षक दिसू लागली. ते दागिने कोणी चोरून नेऊ नयते म्हणून त्या दागिन्यांची जबाबदारी देवळाचा पुजारी शिवराम ह्याच्यावर सोपविण्यात आली.

शिवरामची बायको एक नंबरची हट्टी व भांडखोर होती. तीने कोणतीही गोष्ट मागितली व त्याने आणली नाही तर ती आकाशपाताळ एक करीत असे.

देवीच्या मुर्तीला दागिने घडविले असल्याची बातमी जेव्हां तिला समजली तेव्हां तिची आशा त्याच्यावर पडली. रोजच्या रोज नवीन दागिने घालावे असे तिला वाटू लागले. त्या कारणास्तव ती पतीला रोज त्रास देऊ लागली की देवीचे दागिने काढून त्याने आपल्याला आणून द्यावे.

आपल्या पत्नीचे बोलणे ऐकुन शिवराम उभा हादरून गेला. तिला झिडकारीत म्हणाला–" अग, तुला काय वेडबीड लागले नाही नां ! एखाद्या साध्या बाईने देवीचे अलंकार घालणें म्हणजे महापाप आहे. त्यातुनही तुला दागिने घालावेसेच वाटले तर थोडा दम धर मी तसेच दागिने तुला घडवीन."

परंतु त्याच्या बायकोला ते म्हणणे पटले नाही. ती उलट त्यालाच धमकावणीच्या सुरात म्हणाली–" हे बघा, आज रात्री जर कां देवीचे दागिने काढून तुम्ही मला आणून दिले नाहीत तर उद्या पहाटेच्या आत आपल्या परसदारी कडूलिंबाच्या झाडाला

मेघना दाते



माझे लटकते प्रेत तुम्हांला पहायला लागेल. शिवरामच्या मनांत आले की आपली बायको म्हणते ते नक्कीच करून दाखवते म्हणून तो घाबरून गेला. तो त्याच रात्री देवीच्या देवळात गेला. व देवीच्या मुर्ती समोर हात जोडून प्रार्थना करीत देवीला म्हणाला—"हे, कालीमाते ! तुला तर माझ्या बायकोचा हट्टी भांडकुदळ स्वभाव माहित आहे. तिची समजूत घालून मी हे तुझे दागिने सर्वच्या सर्व परत तुला आणून देईन. मी घोर अपराध करीत आहे तरी सुद्धा तुझी प्रार्थना करतो की, मी करीत असलेल्या चुकीच्या कार्याकरीता मला एकवार क्षमा कर." असे म्हणत त्याने देवीच्या मुर्तीवरचे सर्व दागिने काढले व एका फडक्यात बांधून घेतले.

शिवराम देवळातून बाहेर पडत होता तेव्हा कालीदेवीची दुसरी एक गांव देवी तिला भेटायला आली तिने शिवरामची सर्व करणी पाहिली तिनें काली देवीला विचारले—"हा दुष्ट तर तुझे सर्व दागिने काढून घेऊन जात आहे. हे पाहून सुद्धा तू अशी गप्प कां बसली आहेस? अलंकार-रहित तुझ्या मुर्तीला शोभा येणार नाही. त्या करीता तू त्या पुजाऱ्याला चांगला धडा दे.

त्यावर कालीमाता स्मित करीत म्हणाली—"हा शिवराम माझा भक्त आहे. त्याने मला वचन दिले आहे की, तो माझे दागीने मला परत देईल. मी त्याच्या बायकोला चार दिवसाचा अवधी दिला आहे. जर कां चार दिवसात तिने मला माझे दागिने परत केले नाहीत तर ती डोके फुटून मरून जाईल.

सोन्याचे दागिने फडक्यात बांधून घेऊन जात असतांना शिवरामने त्यांचे शेवटचे बोलणें ऐकले. व तो भीतीने थरथरू लागला. व देवीच्या मुर्तीकडे एकटक पहात उभा राहिला. परंतु त्यापुढे त्याला काही ऐकू आले नाही. त्यामुळे शिवरामच्या मनांत एक शंका आली.

शिवरामने सावधगिरीने देवळाच्या दाराला कुलूप लावले व दागिने घेऊन घरीं आला. आणि सारे दागिने आपल्या बायकोच्या हातात देऊन मोकळा झाला. दागिने पाहून तिचा आनंद गगनात मावे-नासा झाला. त्याचक्षणी तिने सारे देवीचे अलंकार अंगावर घातले.

शिवरामने आपल्या बायकोकडे रागाने पाहिले आणि देवीचा झालेला वार्तालाप तिला ऐकवला. तेव्हां रमाबाईने चिडीने नवऱ्याकडे पाहिले व त्याना म्हणाली—"तुम्ही तर भित्रे आहांत म्हणुन तुम्ही ह्या शंकेने भयाकुल झाला आहात व दागिने परत मागता आहांत पण काही झाले तरी मी हे दागिने काढून देणार नाही."

"देवी माते, माझ्या बायकोला वाचविणें आता तुझ्याच हातात आहे." असे म्हणत त्याने मनोमन देवीची प्रार्थना केली.

तीन दिवस उलटले तरी सुद्धा रमाबाईने अंगावरचे दागिने काढले नाहीत. शिवरामला देवीच्या बोलण्यावर विश्वास होता तो घाबरून गेला.

बरोबर त्याच दिवशी रमाबाई अंगावरचे दागिने न काढता झोपी गेली. बरोबर अर्ध्यारात्रीनंतर शिवरामच्या घरात एक चोर घुसला रमाबाई गाढ झोपेत असताना चोराने रमाबाईच्या अंगावरचे दागिने अलगद काढले. नंतर तो ते गाठोड्यात बांधून देवीच्या देवळाकडे निघून गेला.



चोराची योजना होती की ह्या दागिन्यां सोबत देवीचे दागिने काढून घ्यावे व पळून जावे. परंतु तो जेव्हां देवळापाशी पोहोचला तेव्हां पाहातो तो काय देवळाचे दार उघडेच होते. ते पाहून त्याला आश्चर्य वाटले त्याला वाटले की आपल्या आधीच कोणीतरी देवळात शिरून दागिने चोरून घेऊन गेले असावे. तो देवळात घुसला पहातो तो काय देवीच्या अंगावर एकही दागिना आढ-ळला नाही त्याने विचार केला की, एक तर आपल्या आधी कोणीतरी चोर येऊन दागिने घेऊन गेला असेल किंवा पुजाऱ्याने चोरीच्या भीतीने आपल्या घरी नेऊन ठेवले असावेत. असे वाटून तो निराश होऊन परत जात होता.

त्याच वेळी दुसरा चोर दागिन्यांच्या आशेने देवळात येत होता. तो रागारागाने त्याला म्हणाला–"अरे दुष्टां तू माझ्या आधी येऊन देवीचे दागिने चोरून नेत होतास काय? असे म्हणत त्याने त्याच्या डोक्यावर हातातील काठीचा प्रहार केला.

दुसऱ्या चोरांने तेव्हांच ताडले होते त्यामुळे त्याने दुसऱ्याच्या डोक्यावर प्रहार केला व दोघे बेशुद्ध होऊन देवीच्या दारापाशी कोसळले.

पहाटे रमाबाईला अचानक जाग आली. व आपल्या अंगावर एकहीं दागिना नसलेला पाहून किंचाळून ओरडली वतिने नवऱ्याला गदागद हलवून उठवले. नवरा खूप घाबरला व उठून सरळ देवीच्या देवळाकडे धावत सुटला तेथे दोन चोरांना गाठोड्या-सह बेशुद्धावस्थेत पाहून त्याने काय प्रकार घडला असावा हे जाणले.

शिवरामने गाठोड्यातील अलंकार बाहेर काढले व तो एक एक करून देवीला घालू लागला तितक्यात त्याची पत्नी रमाबाई तेथे येऊन पोहोचली. पत्नीला पाहून शिवराम म्हणाला–"अग ऐ पहातेस नां! देवीनेच सांगितले होते की, चौथ्या दिवशी जर दागिने परत आणले नाहीस तर तुझी बायको डोके फुटून मरून जाईल. ही गोष्ट मी स्वतः माझ्या कानांने ऐकली होती परंतु तो माझा एक भ्रम आहे म्हणून तू माझा तिरस्कार करू लागलीस.

तेव्हां रमाबाईने देवीला साष्टांग नमस्कार घातला व म्हणाली–" आई, मी एक मूर्ख बाई आहे. तुझा भक्त असलेल्या माझ्या पतीची प्रार्थना ऐकून मांझे प्राण वाचविलेस आता ह्या क्षणांपासून मी सुद्धा तुझी मनोभावे सेवा करेन. तुझी भक्ती करेन.

ह्यानंतर गावचा पहारेकरी तेथे येऊन पोहोचला व तेव्हांच शुद्धीवर येत असलेल्या त्या दोन्ही चोरांना त्यांनी पकडले व न्यायाधिशाकडे खेचित नेले.

ह्या गोष्टीनंतर रमाबाईने आपला हट्टी स्वभाव व भांडकुदळ पणा सोडून दिला व तीने आपल्या नवऱ्याचे म्हणणे ऐकून देवींच्या भक्तित लीन होऊन राहिली.





# चाणक्याची गोष्ट

प्राचिन काळात चणक नावाच्या गावात चणि नावाचा एक ब्राह्मण रहात होता. तो जैन धर्माचा भोक्ता होता. त्याच्या पत्नीचे नाव चणेश्वरी होते. त्यांना एक मुलगा होता. हाच चाणक्य नावाने इतिहासात प्रसिद्ध पावला.

चाणक्यने इतर मुलांसारखा साधारण जन्म घेतला नाही. त्याला जन्मतःच सर्व दात होते. ऋषिमुनीनें ब्राह्मणाला सांगितले की, जन्मतःच दात घेऊन येणारी व्यक्ति राजा बनते. परंतु चाणक्यचे वडिल भौतिक इच्छेपेक्षा परलोकचीच जास्त काळजी करीत असत. त्यामुळे त्यांनी आपल्या मुलाचे सारे दात काढून टाकले की, आपल्या मुलाला भौतिक सुख उचित नाही. ह्या घटनेनंतर मुनींनी आपली भविष्य वाणी सांगितली की, चाणक्य परोक्ष रूपानें राज्यकारभार करेल.

चाणक्यने सर्वशास्त्रविद्यांचा अभ्यास केला. उपवर झाल्या नंतर त्याने एका गरिब ब्राह्मणाच्या मुली बरोबर लग्न केले. एकदा चाणक्यची बायको आपल्या लहान भावाच्या लग्नानिमित्ताने आपल्या माहेरी गेली असतांना तिच्या इतर लहानमोठ्या बहिणीही तेथे आल्या होत्या. त्या सर्वांचे पती मोठमोठ्या हुद्द्यावर कामाला होते. सर्व सुखीसंपन्न होते. त्यामुळे त्या सर्व बायकांनी चाणक्यच्या बायकोची गरीब म्हणून खूप अवहेलना केली. त्या अपमानाने ती घरीं निघून आली. आपल्या बायकोची दयनिय अवस्था पाहून चाणक्य धन कमावण्याच्या हेतूने घराबाहेर पडला.

चाणक्यला माहित होते की, पाटलीपुत्रचा राजा नंद ब्राह्मणांचा खूप आदर करतो. म्हणून तो पाटलीपुत्रला आला व राजदरबारात जाऊन एका रिकाम्या आसनावर



बसला. ते आसन राजा नंदचे होते. थोड्यावेळाने नंद व त्याचा मुलगा तेथे येऊन पोहोचले. तेव्हां दरबारातील एका सेविकेने चाणक्यकरीता दुसरे एक आसन आणले त्याला तेथे बसण्यास सांगितले परंतु तरी सुद्धा चाणक्य तेथून हालला नाही. उलट त्याने आपले कमंडलू दुसऱ्या एका आसनावर ठेवले एकावर काठी ठेवली व तिसरीवर शाल काढून ठेवली चौथ्यावर यज्ञोपवीत काढून ठेवले. त्याचे करणे त्या सेविकेला सहन झाले नाही तिने चाणक्यला लाथ मारुन उठविले राजदरबारातून हाकलवून लावले. त्याने तेव्हां प्रतिज्ञा केली की, नंदवंशाचे निर्मूलन करेन तेव्हांच नावाचा चाणक्य. चाणक्यला प्रथमपासूनच माहीत होते की आपण कोणत्या तरी योग्य माणसाच्या सहाय्याने राज्यकारभार करू. तेव्हां तो प्रतिनिधीच्या रूपाने राजा बनण्यास योग्य कोण आहे अशा माणसाच्या शोधात निघाला. तो भटकत मोर पाळणाऱ्या लोकांच्या गावांत आला की, जे लोक राजाचे मोर पाळतात. चाणक्यला समजले की गावच्या पाटलाची मुलगी गर्भवती आहे. व तीला सूर्याला पिण्याचे डोहाळे लागले आहेत.

चाणक्याने गावच्या पाटलाला जाऊन सांगितले की, तुमच्या मुलीच्या गर्भातून जन्मणारे मुल मला सांभाळण्यास देत असाल तर मी तिचे डोहाळे पुरवू शकतो. ही अट पाटील व त्याच्या बायकोने मान्य केली.

चाणक्यने एक झोपडी बांधवली व त्याच्या छताला एक झरोका ठेवला. जेव्हां रात्र होई तेव्हां चंद्राची किरणें आत येत त्या ठिकाणी एक दुधाचे भांडें ठेवलें. व त्या गर्भवती मुलीला बोलावून आणून म्हटले–"हे बघ तो चंद्र आहे त्याला पिऊन टाक. तिला जेव्हां हे खरेच वाटले तेव्हां तिला समजेना काय करावे. परंतु छतावर बसलेला माणूस जेव्हां तो झरोका हळूहळू बंद करू लागे. तेव्हां त्या गर्भवती मुलीला आनंद होई की आपण खरेच चंद्राला पिऊन टाकले. ह्याकारणानेच तिने जन्म दिलेल्या मुलाचे नामकरण चंद्रगुप्त असे केले गेले.

ह्यानंतर चाणक्यने संपत्ती कमावण्याच्या इच्छेने देशाटन करण्यास आरंभ केला. त्याला परत गांवी यायला अनेक वर्षे लोटली. त्याने जेव्हां गावांत पाऊल टाकले तेव्हां त्याला अनेक मुले तेथे खेळतांना दिसली. त्याच्यात चंद्रगुप्त सुद्धा होता. तो राजा सारखा वागत होता. इतर मुले त्याला राजा मानून त्याचे सांगणे ऐकत होती. चाणक्यानी चंद्रगुप्तला ओळखले नाही. त्याचे वर्चस्व पाहून त्याला आश्चर्य वाटले. त्यांनी त्याच्या शक्तिची परिक्षा घेण्याकरीता त्याला विचारले. की मला कोणती तरी वस्तू दान कर.

चंद्रगुप्तने झटक्यात आज्ञा केली–"घ्या, दूरवर दिसणाऱ्या गाईंना हांकत घेऊन जा. मी दान केल्या सांगितल्यावर आपल्याला कोणी अडविण्याची हिम्मत करणार नाही!"

चाणक्य अत्यंत प्रसन्न झाला. त्यांनी इतर मुलांकडे त्याच्या विषयी चौकशी केली तेव्हां त्याला समजले की तो मुलगा चद्रगुप्त आहे.

"बाळ, तू जेव्हां राजा होशिल तेव्हां तुला राज्य पाहिजे नां! त्याकरीता तू माझ्याबरोबर चल. मी तुला राज्य मिळवून देतो. असे सांगून चाणक्य चंद्रगुप्तला आपल्या बरोबर घेऊन गेला.



चाणक्यने जेवढी संपत्ती कमावली होती. त्याने एक सैनिक दल एकत्र केले. त्यांच्या मदतीने त्याने पाटलीपुत्रला घेरले. परंतु पाटलीपुत्रच्या शक्तिशाली सैन्याने चाणक्यच्या सैन्याला सहजतेने नामोहरण केले. चाणक्य व चंद्रगुप्त आपापले प्राण वाचवून पळून गेले. नंदच्या सैनिकांनी त्यांना पकडण्याकरीता त्यांचा पाठलाग केला. चाणक्य व चंद्रगुप्त जेव्हां एका तळ्याकांठी येऊन पोहोचले तेव्हां त्यांचा पाठलाग करीत सैनिक अगदीं त्यांच्याजवळ येऊन पोहोचले. तेव्हां चाणक्यानी एक युक्ती केली. ते स्वत: एका मुनीचे सोंग घेऊन तपस्व्यासारखे बसले व त्यांनी चंद्रगुप्तला सरोवरात जाण्याची

       



आज्ञा केली. घोडेस्वार जेव्हां चाणक्यच्या जवळ आले तेव्हां त्यांनी चाणक्यला विचारले–"बाबा, इकडे कोणी पळत आले होते कां?" तेव्हां चाणक्यांनी तळ्याकडे बोट करीत चंद्रगुप्तला दाखविले. तेव्हां सैनिक तावडतोब घोड्यावरून खाली उतरला व तळ्यात उतरण्याकरीता कपडे काढू लागला. तेव्हां झटक्यात चाणक्य उठू उभा राहिला व सैनिकीची तलवार उपसून त्याने त्याची मान उडवून टाकली.

ह्यानंतर चाणक्य व चंद्रगुप्त त्या सैनिकांच्या घोड्यावर स्वार होऊन तेथून पळून गेले. त्यावेळेस चाणक्याने चंद्रगुप्तला विचारले–"त्या शिपायांनी पाण्यात उभ्या असलेल्या तुला पाहिले तेव्हां तुला कसे वाटले."

"मी तावडतोब असा विचार केला की, पुढचे कर्तव्य काय हे स्वत: गुरूजीना ठाऊक आहे." चंद्रगुप्ताने झटक्यात सांगितले.

हे उत्तर ऐकताच चाण्क्याने असा विचार केला की चंद्रगुप्त राजा होईल आणि मी त्याचा गुरू बनेन. तरी सुद्धा चंद्रगुप्त आपला विश्वासपात्र राहिल व आपल्या आज्ञेचे पालन करेल. तितक्यात आणखी एक सैनिक त्यांचा पाठलाग करीत त्यांच्या पाठीमागे येऊ लागला. चाणक्याने युक्तीने त्यालाही ठार मारले. ह्यावेळी त्याने एका कपडे धुणाऱ्या माणसाला असे सांगून पाठवून दिले व त्याच्या जागी स्वत: उभा राहला. तो त्याला म्हणाला–"अरे ऐक, राजा धोबी लोकांवर असंतुष्ट झाला आहे व त्यांनी त्या सैनिकाला तुम्हांला पकडून आणण्यासाठी पाठविलें आहे. आणि तो पळून गेल्यावर त्याच्याजागी उभा राहला. चंद्रगुप्तला पुन्हां पाण्यामध्ये पाठवून दिले. व त्याही सैनिकाला पूर्वीसारखे ठार करून ते दोघे त्याच्या घोड्यावर बसून निघाले.

भुकेने तडफडत कसे बसे ते संध्याकाळपर्यंत एका गावच्या वेशीपर्यंत पोहोचले. नंतर ते दोघे गावभर पायी भटकले व विचार करू लागले की कोण आपल्याला खायला देईल. तितक्यात त्यांना एक विचित्र दृष्य दिसले. एका वयस्क बाई स्वयंपाक करून तो थाळीतून वाढून आपल्या मुलांना देत होती. त्यातील एका मुलाने घाईने जेवणात हात घातला तेव्हां त्याचा हात पोळला. ते पाहून त्याची आई त्याला म्हणाली–"अरे बाळ हे रे काय! तू सुद्धा चाणक्यासारखा मंदमति झाला आहेत वाटते?"

एका अनोळखी बाईच्या तोंडून असे उद्गार बाहेर पडलेले ऐकून चाणक्य आश्चर्यचकित झाला. त्याने त्या घरात प्रवेश करीत त्या बाईला विचारले–"बाई, तुझ्या ह्या म्हणण्याचा अर्थ काय?"

"बाळ, हळूहळू खात गेले पाहिजे. परंतु ह्याने सरळ थाळीमध्येच हात घातला व पोळून घेतला. त्यामुळे ह्याने सुद्धा चाणक्य सारखाच मुर्खपणा केला. आजूबाजूच्या नगरांवर विजय प्राप्त करून मग त्याने राजधानीला घेरले पाहिजे होते." बाईने सांगितले.

ह्यानंतर चाणक्य चंद्रगुप्तला बरोबर घेऊन हिमवत्कूट नावाच्या राज्यात जाऊन पोहोचला व त्या नगरात राज्यकारभार करणाऱ्या पर्वतक राजा बरोबर त्याने एकजुटी केली. त्या एकजुटीच्या अटी अशा होत्या. नंदराज्य जिकण्या साठी पर्वतकला चाणक्य मदत करेल. त्याच्या बदल्यात नंद-



राज्य हारल्या नंतर त्या राज्यातील अर्धा भाग त्याला प्राप्त होईल.

त्या त्यांच्या समजुतीनुसार चाणक्य व पर्वतक दोघांनी मिळून पाटलीपुत्रच्या परीसरातील अनेक गावांवर विजय मिळविण्यात सुरवात केली. परंतु एका नगरांवर त्यांना विजय मिळविता येईनां तो कसा काबीज करावा ह्यावर काही उपाय न सापडल्या मुळे चाणक्याने त्रिदंडी संन्यासाचा वेष घेतला व त्याने नगरात प्रवेश केला. त्या नगरात सप्तमातृकाचे मंदीर होते. तेथील लोकांचा विश्वास होता की, त्या देवळात सात देवी रहातात. त्या नगराचे रक्षण करतात, दुष्मनांच्या वारंवार हल्ल्यामुळे

त्रस्त झालेल्या प्रजेतील लोकांनी त्या वेषधारी चाणक्याला विचारले–"स्वामी, ह्या हल्ल्याचा शेवट केव्हां होईल ?"

"लोकहो, हा हल्ला असाच चालू राहिल जोपर्यंत सप्तमातृक हे देऊळ सोडून जात नाहीत. संन्याशाच्या बोलण्यावर विश्वास ठेवून लोकांनी देवळातील देवीच्या मुर्ती काढून बाहेर आणल्या. ह्यानंतर चंद्रगुप्त व पर्वतकला चाणक्याचा हेतू समजला त्यावर त्यानी आपला हल्ला करण्याचे सोडून देण्याचे नाटक केले व ते परत जाऊ लागले ते सैनिक निघून जात असल्याचे पाहून नगरवासियांना अत्यंत आनंद झाला. व ते आनंदाने नाचू लागले. ते पाहून शत्रूसैन्यांने अचानक हल्ला करून ते नगर हस्तगत केले.

चाणक्याने पाटलीपुत्र नगरावर आक्रमण केले. ह्या युद्धात नंदराजा पराभूत झाला व तो चाणक्याच्या अधीन झाला. तेव्हां चाणक्याने नंदला प्राणमुक्त करीत म्हटले–"हे राज्य सोडून निघून जा. बरोवर तुला तुझ्या रथात जेवढी मावेल तेवढी संपत्ती घेऊन जा.

चाणक्याच्या आज्ञेनुसार राजा नंद रथात आपल्या दोन बायका व मुलगी दुर्धरा ह्यांना बसवून काही दागदागिने घेऊन निघाला. रस्त्यात घोड्याच्या रथात स्वार होऊन येत असलेला चंद्रगुप्त त्यांना दिसला. चंद्रगुप्तला पाहून नंद राजाची मुलगी त्याच्या रूपावर मुग्ध झाली. आपल्या मुलीचा मानस जाणून नंद राजा तिला म्हणाला–"बाळे, जर कां तुला लग्न करावयाचे असेल तर काही संकट कोसळणार नाही."

आपल्या वडिलांचे बोलणे ऐकल्यावर ती वडिलांच्या रथातून उतरली व चंद्रगुप्तच्या रथात जाऊन बसली तेवढ्यात चंद्रगुप्तच्या रथाच्या चाकाच्या नऊ आऱ्या फटाफट तुटल्या. हा अपशकून आहे असे चंद्रगुप्तला वाटले व त्याने दुर्धराचा स्विकार करण्याची शंका घेतली. परंतु चाणक्यने त्याला सांगितले–"वत्सा, हा एक शुभ शकुन आहे. ह्याचा अर्थ असा आहे की, तुझ्या वंशातील लोक नऊ पिढ्यांपर्यंत राज्य करतील."

(पुढील अंकी समाप्त)





# पावसाळ्या रात्रीचा चोर

एके दिवशी बस्रा नगरचा सुल्तान अमीर ह्याच्याकडे त्या नगराचा कोतवाल एका तरुण मुलाला पकडून घेऊन आला व त्याला म्हणाला–"हुजूर, हा एक अट्टलबाज चोर आहे. रात्री जेव्हां मुसळधार पाऊस पडत होता. तेव्हां हा चोरी करता ना आमच्या हाती सापडला.

अमीरने त्या तरूण मुलाकडे थोडे रागाने पाहिले व दुसऱ्या क्षणी त्याला मोठे आश्चर्य वाटू लागले. कारण त्याला पहाताच तो तरूण चोर असावा असे कोणतेच लक्षण त्याच्याकडे पाहून वाटत नव्हते. तो तर खूप सज्जन वाटत होता.

"काय रे तू काय त्या घरात चोरी करण्याकरीता घुसला होतास कां?" अमीरने त्या तरुणाला विचारले.

"हो, सरकार!" त्याने विनयतापूर्वक उत्तर देत म्हटले.

"तर मग तुला माहीत आहे, तुझ्या अपराधाची कोणती शिक्षा होते. हे दोन्ही हात कापले जातात." अमीर म्हणाला.

तो तरुण मान डोलावून गप्प राहला. अमीरला वाटले की, त्या तरुणाला आपण निर्दोष आहोत. असे सांगणे बरोबर वाटत नसावे. तेव्हां तो कोत्वालाला म्हणाला–"ठिक आहे. ह्याला तुरुंगात बंद करून टाका. उद्या ह्याला शिक्षा देण्यात येईल."

त्या दिवशी रात्री जेव्हां अमीर त्या तुरुंगाच्या वाटेने चालत जात होता. तेव्हां त्याला मधूर आवाजात कोणीतरी गाणे म्हणत असल्याचे ऐकू आले. त्या आवाजाच्या रोखाने तो गेला. तेव्हां ज्या तरुणाला उद्या शिक्षा देण्यात येणार होती तोच तरुण मधूर आवाजात गात होता.

अमीर त्याच्या जवळ जात त्याला म्हणाला–"अरे, माझ्या मनातून वाटत आहे



की, तू चोर नाहीस. उद्या तुझे हात कापून टाकण्याकरीता तुला वधस्तंभाकडे नेण्यात येईल. तेव्हां सर्वजनते समोर मी परत एकदा तुला प्रश्न करेन तेव्हां तू असे सांग की मी त्या श्रीमंत माणसाच्या घरात चोरी करण्याकरीता नाही तर दुसऱ्या काही कामा करीता गेलो होतो. तेव्हां त्या चुकीची शिक्षा म्हणून एक महिनाभर तुरूंगवास भोगून तुला सुटका मिळेल.

"सरकार आपल्या उपकाराचा मी अत्यंत ऋणी आहे." त्या तरुणाने उत्तर देत म्हटले.

सुलतानाला वाटले की तो तरुण आपल्या शब्दाचा मान राखेल. नगरवासियाना जेव्हां समजले की चोराला उद्या दण्ड देण्यात येणार आहे तेव्हां प्रचंड संख्येने सर्वजण वधस्तंभापाशी उपस्थित झाले. अमीर व इतर अधिकारी उंचावर बसलेले होते. शिपायांनी त्याला पकडून आणले.

अमीरने मोठ्या आवाजात त्या तरुणाला विचारले–"तू त्या घरात चोरी करण्या करीता गेला नव्हतास कोणाला तरी ओळखीच्या माणसाला भेटायला गेला होतास मी म्हणतो ते खरे आहे नां?"

"सरकार, माफ करा माझे कोणतेही जरूरीचे काम नव्हते." त्याने उत्तर दिले.

ते उत्तर ऐकून अमीर संतापला त्याला शिक्षेपासून मुक्त करण्याचा त्याचा सारा खटाटोप व्यर्थ गेला. त्यामुळे त्याने मनांत असा विचार केला की, हा कोणी एक मूर्ख माणूस असावा.

"ठिक आहे! ह्याचे दोन्ही हात कापून टाका" अमीरने शिपायांना आज्ञा दिली.

एक शिपायी तलवार घेऊन त्याच्या जवळ आले तितक्यात त्या गावकऱ्यांच्या गर्दीतून एक तरुणी धावत पळत वधस्तंभापाशी आली व त्या शिपायी व त्या तरुणाच्या मध्यभागी येत गंभीर आवाजात बोलू लागली. तुम्ही पाहिजे तर माझे हात कापावे हा तरुण निरपराधी आहे.

अमीरने त्या शिपायाला दूर जाण्याची आज्ञा केली व त्याच्या डोळ्यात पाणी



आलेल्या तरुणीला विचारले–"तुला खरे काय घडले ते माहीत आहे तू सांगू शकतेस कां?"

त्यावर त्या तरुणीने डोळे पुसत सांगितले–"सरकार, काही वर्षापूर्वी आमचे कुटुंब बसरा शहरात नाही तर दुसऱ्या शहरात रहात होते. त्यावेळी आमच्या घरासमोर एका श्रीमंत माणसाचे घर होते. हा तरुण त्याच श्रीमंत माणसाचा मुलगा आहे. त्या कुटुंबाशी आमचे चांगले सलोख्याचे संबंध होते. त्यामुळे आमच्या कडील मोठ्या माणसांच्या मनात माझे लग्न त्याच्याशी करून द्यावे असे होते.

परंतु काही कारणांमुळे आम्ही ते शहर सोडून बसरा शहरात आलो व आमचे कुटुंब येथेच स्थाईक झाले व पुढे त्या तरुणाचे वडील निर्धन झाले व आमचे येणे जाणे सुद्धा बंद झाले.

हा तरुण दोन दिवसापूर्वी काही कामास्तव बसरा नगरात आला होता. रात्री जेव्हां हा रहात असलेल्या धर्मशाळेत परत जात होता. तेव्हां अचानक आलेल्या पावसामुळे त्याने जवळच असलेल्या एका घराचा आसरा घेतला त्याला माहीत नव्हते की हे घर पूर्वी घरोबा असलेल्या तरुणीचे आहे. त्यामुळे तो पायऱ्या चढून वर गच्चीत येऊन पोहोचला. परंतु विजेच्या प्रकाशात तो गच्चीत उभा असलेला मी



ओळखला व दार उघडून त्याला आत घेतले व खोलीत नेले. त्याला अंग कोरडे करण्याकरीता एक वस्त्र दिले. त्यावेळी आमच्या घरातील सर्व लोक झोपलेले होते.

आम्ही नंतर तासभर इकडच्या तिकडच्या गप्पागोष्टी केल्या. मी त्याला सांगितले की, माझे लग्न एका श्रीमंत घराण्यातील मुलाबरोबर निश्चित झाले आहे व त्या मुलाचा बाप आता आमच्या घरातच झोपलेला आहे.

त्यावर तो तरुण स्मित करीत मला म्हणाला–"ह्या अशा अर्ध रात्री मी तुझ्या खोलीत आहे हे जर कां सर्वांना समजले तर माहीत आहे ह्याचा परिणाम काय








होईल. ते लोक काय काय आपल्या दोघां-बद्दल गैर समज करून घेतील?"

त्याला उत्तर देण्याकरीता मी झटक्यात म्हटले–"आणि खरेच संयोगाने जर आमच्या घरातील कोणी तुला पाहिले नां तर मी चटकन" चोर! चोर! "म्हणून ओरडीन आणि माझी अब्रु वाचविण्यासाठी तुम्हांलाही ती गोष्ट मान्य करावी लागेल की तू चोर आहेस. कबूल आहे तुला."

थोड्यावेळाने पाऊस पडणे बंद झाले व तो तरुण परत जावयास निघाला. त्याला पाहून एक नोकर जोरात ओरडला– "चोर! चोर! पकडा त्याला."

त्या आवाजाने झोपलेले सर्वजण जागे झाले व त्या पळून जात असलेल्या तरुणाला त्यानी पकडले. माझ्या आईवडीलांनी त्याला पहाताच ओळखले की तो कोण आहे? तरी सुद्धा त्यांनी असा विचार केला व गप्प राहीले की, आपले होणारे संबंधी माझ्या चारित्रावर शंका करतील. हा सविस्तर समाचार ऐकून अमीरने रुमालाने डोळे पुसले व गर्दीतल्या सर्वा लोकांना उद्देशून म्हटले–"हा तरुण अत्यंत साहसी ईमानदार आहे. एका भोळ्या तरुणीच्या चारित्र्यावर कोणत्याही प्रकारचा कलंक लागू नये म्हणून हा आपले दोन्ही हात कापून घ्यावयास तयार झाला. खरा त्याग हाच आहे. माझी जर कोणी मुलगी असती तर नक्की तिचे लग्न मी ह्याच्याशी करून त्याला माझा जावई करून घेतले असते."

त्याचवेळी त्या गर्दीतून त्या तरुणीचे वडील सुलतानाच्या जवळ येत म्हणाले– "हुजुर, कृपाकरून माझ्या मुलीचे लग्न ह्या तरुणा बरोबर लावून द्या. मी हा तरूण कोण हे महित असून लपविले. त्यामु मी शर्मिंदा झालो आहे.

ते ऐकताच सुलतान अमीर खदखदून हसू लागला. सर्व लोंकानी टाळ्या वाजवून आपला आनंद प्रकट केला. त्याच दिवशी अमीरने त्या दोघां तरुण तरुणीचे लग्न मोठ्या थाटामाटात लावून दिले.





# स्कॉटलॅण्डचा जंगली रानमांजर

स्कॉटलॅण्डच्या उंच उंच डोंगरामुळे व निर्जन दऱ्याखोऱ्यांमुळे तेथील जंगली श्वापदांना स्वतःचा आहार शोधण्याकरीता त्यांचा चांगलाच उपयोग होतो. त्या कारणांमुळे इंग्लिश बेटामधे कधी न दिसणारी जंगली रानमांजरे स्कॉटलॅण्डच्या त्या दऱ्याखोऱ्यांतून आपले वास्तव्य करून आहेत. मानवांकडून संहार न होणाऱ्या अशा खडकाळ प्रदेश दऱ्याखोऱ्या नदि-नाले असलेल्या ठिकाणी येथे सध्या हि रानमांजरे आपले रहाते ठिकाण करून आहेत.

कोण्या एका काळी ब्रिटन मध्ये अधिक संख्येने दिसणारी हि रानमांजरे सध्याच्या परिस्थितीत मानव संहारामुळे उत्तरेकडे निघून गेली आहेत.

हि जंगली रानमांजरे साधारण मांजरी पेक्षा आकारांनी थोडी मोठी दिसतात. वाघाची पिल्ले असतात त्या आकाराची. त्यांचा रंग भूरकट जांभळ असतो. उंच पाय, केसाळ शरिर, चतुरस्त्र आकाराच्या डोक्याच्या दिसणाऱ्या ह्या मांजरांना तीन चतुर्थांश मीटर लांब शेपटी असते व त्या शेपटीला चारी बाजूने गोल गोल चारपाच झालरी असतात.

हि मांजरे झाडांच्या ढोलींत किंवा दाडांच्या कपारीत रहातात. स्वतःच्या आहारासाठी मोठ्या कुशलतेने हि मांजरे आपले सावज शोधतात. दिवस असो अगर रात्र रानमांजर एक-एकटेच आपली शिकार करतात. ससे उंदीर कबुतरे ह्यांची मोठ्या सावधतेने वाट पहात रहातात. व नजरेत आल्याबरोबर एका ढांगेत उडी मारून पकडतात. जेव्हां खाद्य मिळत नाही त्यावेळेस हि मांजरे नदीतील मासे डुबकी मारून पकडून खातात. ह्यांचीवर्षभरात फक्त एकदाच वसंतऋतुमध्ये गर्भधारणा होते.

धिप्पाड व टोकदार नखांमुळ नेहमी भयंकर दिसणारी हि जंगली रानमांजरे जर पकडून नेऊन पाळली तरी त्यांना पाळणे शक्य होत नाही. कारण लहान पिल्लांपासून पिंजऱ्यात बंद करून ठेवलेल्या ह्या रानमांजराना जर खायला घालू लागले तरी ते खायला घालणाऱ्यांचा हात चावतात.

कोण्या काळी माणसे ह्या जंगली रानमांजराची शिकार करून त्यांना खात असत हळूहळू त्यांची सध्याची संख्या घटत आहे. त्यामुळे आता त्यांच्या संरक्षणा करीता काही सोई करणे चालू आहे. त्याच बरोबर हि मांजरे झाडांना नष्ट करणाऱ्या खारींना मारून त्यांची संख्या न वाढवण्याकरीता नियंत्रण करीत असतात.





# चांदोबा

## मनोरंजनाबरोबर ज्ञानवृद्धी करणारे खास असे एकमेव मासिक

* चांदोबा आपल्याला पुराणातील व साहित्यातील उत्कृष्ट असे पैलू दाखवून देतो.
* योग्य तो दृष्टीकोन ठेऊन उभ्या जगतातील अद्भुत् व काव्य कथा सरळ शुद्ध शैलीत प्रस्तुत करतो.
* हलकेफुलके हास्य निर्माण करणाऱ्या व ज्ञानात भर पाडणाऱ्या व मनोरंजन करणाऱ्या अशा सुंदर गोष्टींचा संग्रह आपल्याला सादर करतो.
* आपल्याला पुराणातील गोष्टींचे वेचक ज्ञान प्राप्त करून देतो.
* हास्यपूर्ण प्रसंग व ज्ञानबोध करणारी शिर्षके याने आपल्या वाचकांचा उत्साह द्विगुणीत करतो.
* चांदोबा ह्या मासिकाने केवळ आपल्याच जीवनात नाही. तर आपल्या अनेक बंधु-भगिनी व मित्र-मैत्रिणी ह्यांच्याही जीवनात आपले स्थान पक्के केले आहे. त्यामुळे आपण आपल्या अत्यंत जवळच्या मित्रांना चांदोबा भेट द्या.

लहानांचे हे मासिक मोठ्यांच्या आनंदात सुद्धा भर घालते.

इंग्रजी, हिंदी, मराठी, तेलुगु, कानडी, तामिळ, गुजराथी, मल्याळम्, बंगाली, उडिया पंजाबी, असामी व संस्कृत

ह्या तेरा भाषांमध्ये चांदोबा छापला जातो. जो चांदोबा आपणास पाहिजे असेल त्याचे आजच वर्गणीदार व्हा.

**वार्षिक वर्गणी : ३०-०० रु.**

आपल्याला कोणत्या भाषेतील चांदोबा पाहिजे आहे ह्याचा उल्लेख करून खालील पत्त्यावर आपली वर्गणी पाठवा.

## फोटो जोडनावे चढाओढ :: पारितोषिक रु. ५०

या फोटोंची जोडनावे मे १९८६ अंकात जाहीर केली जातील.



M. Natarajan



M. Natarajan

★ या फोटोंची युक्त जोडनावे एकेकाच शब्दात किंवा छोटया वाक्यांत असली पाहिजेत. ★ जोडनावे मार्च महिन्याच्या २० तारखेच्या आंत आमच्या पत्त्यावर पोंचती झाली पाहिजेत ★ आमच्याकडे आलेल्या जोडनावांत सर्वोत्तम ठरतील (दोन्ही जोडनावे धरून) त्यांना रु. ५० चे पारितोषिक दिले जाईल. ★ जोडनावे पोस्टकार्डावर लिहून चांदोबा फोटो चढाओढ, वडपळणी, मद्रास - २६ या पत्त्यावर पाठवावीत.

### जानेवारी महिन्याच्या चढाओढीचा निकाल

पहिला फोटो : प्रसन्नतेने बघते माता, बालमुखीचे हास्य निरागस !

दुसरा फोटो : जवळी घ्यावे वाटे बघता, बाळ असे हे लोभस गोंडस ! !

नांव : कमलाकर कुलकर्णी, वकीलपुरा, मु. पो. चांदूर, जि. अमरावती, पिन ४४४ ७०४

### तुम्हाला माहित आहे का ? उत्तरे :

१. मलगासे (मडगास्कर). २. खिसली. ३. त्रिस्टान डाकुन्हा. ४. ३०० पेक्षा जास्ती ५. ६२०६ बेटे.



# चांदोबा

एप्रिल 1986



## अनुक्रमणिका





एक प्रत : २-५०
वार्षिक वर्गणी : ३०-००

# चांदोबा

संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी

या महिन्याची वेताळाची गोष्ट 'नागकन्या' ही वसुंधरा यांनी लिहीलेली आहे. काहीजण सहवासात असलेल्या लोकांपेक्षा प्रतिभाशाली असतात. अशी माणसे साधारणतः दानशील व विनयशील असतात. ह्याच्या अभावाने त्यांना अपमान सोसावा लागतो. ह्याचे स्पष्टीकरण आपल्याला "निजरूप" नावाच्या गोष्टीत वाचावयास मिळेल.

### अमर वाणी

स्थान भ्रष्टा न शोभंते, दंता केशा स्तथा नखाः,
गजं चमर शार्दुली हित्वा यत्र गौरवम् ॥

[आपल्या ठिकाणापासून नाहिसे झाल्याने दांत केस व नखे ह्यांची शोभा नष्ट होते परंतु अशा प्रकारे आपल्या जागेतून नाहीसे झाले तरी हत्तीचे दांत हरणाचे केस व वाघांची नखे ह्यांचा नेहमी आदर केला जातो.]

वर्ष : ३५ एप्रिल १९८६ अंक : १०
एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००














चांदोबातील



### दूरचे नक्षत्र मंडळ

अमेरिकेतील खगोलशास्त्रज्ञांनी पृथ्वीपासून १४.५ लाखकोटी प्रकाशवर्षा पलीकडल्या प्रकाश मंडळाचा शोध लावला आहे. बार्क्ली विश्व विद्यालयाचे प्रोफेसर वैरन स्पिनराडने ह्या गोष्टीचा उल्लेख करीत आपला विचार व्यक्त केला तो असा पृथ्वीपासून सर्वात लांबचे नक्षत्र मंडळ हेच आहे.

### दयाळू हत्ती



आंध्र प्रदेशातील चित्तूर जिल्ह्यातील एक शेतकरी आपल्या ऊसाच्या शेतात पहारा देत होता. तेव्हां त्याने चुकीने ऊसाच्या शेतात चरत असलेल्या एका हत्तीला म्हैस समजून काठी मारली. तेव्हां सुडाने पेटलेल्या त्या हत्तीने शेतकऱ्याला सोंडेत धरून वर उचलले. परंतु त्या वृद्ध शेतकऱ्याने कळवळून हात जोडून हत्तीला नमस्कार केला व त्याला विनविले की, मला वाचव. त्यावर हत्तीने त्याच्यावर कृपा केली व त्याला हळूवार खाली उतरवले व तो निघून गेला.

### संगीत प्रदर्शनातील नवी शोभा



श्रीरंगम्च्या देवळातील प्रांगणात संगीत प्रदर्शनांच्या कार्यक्रमात एक ऐतिहासीक नविन प्रतिमा स्थापन झाली आहे. सद्य स्थितीत नागै मुरलीधरन नावाच्या संगीत विद्वानाने २५ तास सतत व्हायोलिन संगीत ऐकवले. त्याच्या समोर राजारामने मृदंग वाजवला.

## तुम्हांला माहीत आहे कां ?

१. उत्तर ध्रुवावर सर्वात प्रथम कोण पोहोचले ?
२. दक्षिण ध्रुवावर सर्वांत प्रथम कोण पोहोचले ?
३. न्युझीलंडचा शोध कोणी लावला ?
४. सर्वात प्रथम एकाच वेळी जगप्रवास पूर्ण करणारा इंग्रज नावाडी कोण होता ?
५. आफ्रिकेतील प्रवासात डेव्हीड लिविंगस्टनने कोणत्या धबधब्याचा शोध लावला ?

[ उत्तरे पान ६५ वर पहावीत ]

# अनसूया

महर्षी अत्रीच्या पत्नीचे नाव अनसूया होते. ती अत्यंत पतिव्रता व सुंदर होती. तसेच सर्वांवर समान रूपाने प्रेम व वात्सल्य व लोभ करणारी एक माता म्हणून सुद्धा प्रसिद्ध होती.

अनसूयेच्या पातिव्रत्याचे व मातृत्ववृत्याचे दर्शन तिन्ही लोकांना घडावे ह्या हेतूने ब्रह्मा विष्णू व महेष ह्यांनी संकल्प केला. व ते तिघेही ब्राह्मणांचा वेष धारण करून अत्रीऋषींच्या आश्रमात पोहोचले. अनसूयाने मोठ्या श्रद्धा भावनेने त्यांचा आदर सत्कार करून त्यांना विचारले–"महानुभाव, मी आपल्या लोकांची कशा तऱ्हेने सेवा करावी.

"आम्ही तुझ्या आश्रमात थोडावेळ आराम करावा म्हणतो. आम्हांला तिघांना तू मांडी वर झोपवून दूध पाजवून अंगाई गीत म्हणावेस हिच आमची इच्छा आहे." तीघांनी म्हटले.

त्यांचे बोलणे ऐकून अनसूया मंद हास्य करीत म्हणाली–"बाळांनो, मी तुम्हांला हवे तसे करते." असे म्हणून तिने हात पुढे करून तिघांच्या अंगावर अक्षता टाकल्या दुसऱ्या क्षणीं त्या तिघां ब्राह्मणांचे तिन तान्ह्यांबाळांच्यात रुपांतर झाले. ते पाहून अनसूयेने अत्यंत प्रेमाने त्यांना उचलून आपल्या मांडीवर घेतले मातृभावनेने त्यांना दूध पाजवले व अंगाई गीत म्हटले.

अनसूयेच्या महिमेंवर तिमूर्ती अत्यंत मुग्ध झाले. त्यानंतर त्या तिघांनी आपले स्वस्वरूप धारण केले व अनसूयेला वर मागण्यास सांगितले. तेव्हां अनसूयेने त्या तिघांनी आपल्या पोटी जन्म घ्यावा अशी मनोकामना केली. काही काळानंतर ब्रह्माच्या अंशाने सोम, विष्णूच्या अंशाने दत्तात्रेय आणि शिवाच्या अंशाने दुर्वास यांचा जन्म झाला.

वनवासाच्या वेळी राम सीता व लक्ष्मण यांना अत्रिऋषिनीं आत्रिम संदर्शन केले. त्यावेळी अनसूयेने सीतेला सती धर्मांचा उपदेश केला. व कधी न फाटणारे व कधीही न घाण होणारे असे वस्त्रआभुषणें भेट म्हणून दिली.





# निजरूप

चतुरंगपुरचा राजा चंद्रहास ह्याची राजगुरू रुद्राक्षवर अति-श्रद्धा व भक्ति होती. ह्याचे एकच कारण होते की चंद्रहास जेव्हां आपल्या जातीय लोकांच्या सुड-भावनेच्या संकटात सापडला तेव्हां उचित सल्ला देऊन राजगुरूनेच त्यांना मदत केली होती.

रुद्राक्ष स्वत:ला विरागी मानत असे. परंतु त्याच्या मनात अहंकार ठासून भरलेला होता. तो भगवी रेशमी वस्त्रे परिधान करी गळ्यात रत्नहार व हातात सोन्याची कंगणे घालीत असे. म्हणूनच राजाकडे त्याचा प्रभाव चालत असे. त्यामुळे मंत्री व अन्य दरबारी अधिकारी ह्यांची टिंगल करून त्याचा अपमान करीत असत.

रुद्राक्षने एक दिवस राजा चंद्रहासला म्हटले–"महाराज, सर्व लोकांना माहीत आहे की, आपण माझ्या प्रती श्रद्धा भक्ति ठेवता. परंतु पुढच्या पिढीला हे माहीत असायला हवेनां ! त्या करीता तुम्ही माझा पुतळा करून मुख्य रस्त्याच्या चौकात उभा करून त्याची स्थापना करा.

चंद्रहासनें रुद्राक्षचे म्हणणें मान्य केले व आपला मंत्री मार्तंड ह्याला आपल्या राजगुरुचे बोलणे सांगून म्हटले–"ह्या कार्याकरीता आपण प्रथम सर्वात चांगल्या शिल्पकारांना बोलावून त्यांचा सल्ला घ्या. सर्वात कुशल आहे त्याच्याकडे ह्याचे काम सोपवा परंतु एक लक्षात ठेवा सर्वात मुख्य गोष्ट म्हणजे पुतळ्याची वाखाणणी सर्वांनी करावयाची आहे. हे काम त्याच्या येत्या वाढदिवसाच्या दिवशी पूर्ण व्हावयास हवे.

मंत्री मार्तंडनें दरबारी चित्रकाराकडून रुद्राक्षचे एक चित्र तयार करून घेतले.

कांता आगाशे



ह्यानंतर ते चित्र अवन्तीनगरचा सुविख्यात शिल्पकार मल्हण ह्याच्याकडे पाठवून दिले व त्याबरोबर एक मजकुर पाठविला.

त्या चिठ्ठीत मंत्र्याने असे लिहीले होते "हे चित्र चतुरंगपुरचा राजा चंद्रहास ह्यांचा राजगुरु रुद्राक्ष ह्याचे आहे. जेवढे लवकर करता येईल तेवढा ह्याचा पुतळा तयार करुन पाठवून द्या पुतळा तयार करीत असतांना एक गोष्ट ध्यानात ठेवा राजगुरु एक संन्यासी आहे.

रुद्राक्ष गुरुच्या जन्मदिवसा आधीच दोन दिवस मल्हण त्यांची प्रतिमा घेऊन चतुरंगपुरला येऊन पोहोचला. त्याने तो पुतळा आणून एका चौरस्त्यात मध्यभागी ठेवला.

तो समाचार मंत्र्याने राजाला दिला तेव्हां राजा अत्यंत प्रसन्न झाला व त्याने सांगितले की, त्यांनी स्वतः गुरुच्या जन्मदिवशी त्या प्रतिमेची प्रतिष्ठापना करावी.

म्हणून पुन्हां पुतळा मंगलवाद्याच्या सुरात वाजत गाजत मुख्य चौकात नेण्यात आला राजाने प्रतिमेच्या वरचे आच्छादिलेले वस्त्र बाजूला केले. तेव्हां रुद्राक्षाने त्याकडे निरखित पाहिले व संतापाने विचारले–"महाराजा ही काय माझी प्रतिकृती आहे कां? उजेडात पाहिले तरी सुद्धा ह्यात माझ्या कोणत्याही रुपरेखा दिसून येत नाहीत."

राजा ते ऐकून शरमिंदा झाला व त्याने मंत्री मार्तंडच्याकडे पाहिले तेव्हां मंत्री मार्तंड विनयपूर्वक राजाला म्हणाला– "महाराज, हि प्रतिमा सुविख्यात शिल्पी मल्हणने तयार केली आहे. त्यांनी अद्भुत अशा असंख्य दगडी मूर्ती तयार केल्या आहेत. आणि त्याची तुलना करणे अद्याप कोणाला ही शक्य झाले नाही? त्याकारणाने त्याच्यामध्ये अहंकार निर्माण झाला असावा. त्यामुळे ह्या पुतळ्यामध्ये काही कमतरता झाली असेल तेव्हां शिल्पकाराला त्याच्या पुतळ्याकडे जातीने लक्ष घालण्याची आवश्यकता आहे." असे म्हणून मंत्र्याने मूर्तीकार मल्हण ह्याला बोलावणे पाठवले.

मूर्तीकार मल्हण राजासमोर उपस्थित झाला. तेव्हां राजाने त्याला विचारले– "मल्हण, तू विख्यात मूर्तीकार असलास तरी माझ्या गुरूंची प्रतिमा करण्यात अयशस्वी झालास ते स्वतः सांगतात की माझ्या व ह्या प्रतिमेत काही साम्य नाही."

मल्हणने विस्मयाने मंत्र्याकडे पाहिले व राजाला निवेदन केले–"महाराज मंत्र्याने दिलेल्या चित्रानुसार ते पाहूनच मी पुतळा तयार करावयास सुरवात केली. परंतु त्या चित्राबरोबर जी चिठ्ठी पाठवून मला आदेश दिला गेला त्यानुसार मला समजले की गुरुदेव पूर्णपणे संन्यासी आहेत.

"हो तर, ती गोष्ट खरी आहे!" मंत्री मार्तंडने म्हटले.

त्यावर मल्हणने राजगुरूला निरखून पाहात म्हटले–"सर्वस्वाचा त्याग करणारे महापुरुष कसे असतात हे मला ठाऊक आहे. संन्यासी कसे असतात मला चांगले माहीत आहे. त्यामुळे मी पुतळ्याच्या चेहऱ्यावरचे भाव शांत, शुभ्र वस्त्र प्रावरणात साधेपणा, गळ्यात रुद्राक्षमाळा, हातात दण्ड व कमंडलू असे असणेच आवश्यक मानले व त्यांची प्रतिमा तयार केली ह्या कामाकरीता मी आपली क्षमा मागतो. तसेच लवकरात लवकर मंत्र्याच्या






द्वारे एक पाठवलेल्या चित्राच्या आधाराने मी आणखी एक प्रतिमा तयार करवून देऊ शकतो.

"तसे करा, परंतु ह्या गोष्टीला विलंब होता कामा नये. काम लवकर झाले पाहिजे" राजाने आज्ञा केली.

ह्यानंतर मल्हण राजाला प्रणाम करून तेथून जाऊ लागला. तेवढयात राजगुरूने त्याला अडवत म्हटले–"ऐका, त्या मुर्ती मध्ये कोणत्याही तऱ्हेचे परिवर्तन करणे आवश्यक नाही, त्याच बरोबर राज्याच्या मध्यवर्ती ठिकाणी त्याची स्थापना करण्याचीही काही जरुरी नाही."

ते ऐकताच सर्वांना आश्चर्य वाटू लागले तेव्हढयात राजगुरु म्हणाले– "चंद्रहास, मी अलौकीक गोष्टींच्या विषयी थोडे ज्ञान संपादन केले आहे. तरी सुद्धा लौकिक गोष्टी मध्ये तोंड घालून लोकांना खरोखरी त्रास दिला आहे. त्यामुळे माझे खरेरूप समोर उघड झाले आहे. ह्या गोष्टीवरून तुम्हां लोकोपैकी कित्येक लोकांनी जाणले असेल की मी म्हणतो त्या गोष्टीत काही खरे पणा आहे हो ना!

ह्या प्रश्नाचे उत्तर कोणी देऊ शकले नाही. परंतु रुद्राक्ष मंदहास्य करीत म्हणाले–"मंत्री मार्तंडने शिल्पकार मल्हणने माझे खरे असणारे रूप प्रत्यक्ष करून माझ्यावर अत्यंत उपकार केले आहेत. असा चांगला कर्ता मंत्री व राजकर्मचारी असल्यावर माझी राज्याला अजिबात आवश्यकता नाही. माझे खरे रूप जर समोर येण्यापूर्वी जर ते नाहीसे करावयाचे झाले तर मला देवाचे ध्यान करण्यातच आपले मन गुंतवले पाहीजे. ह्या सारखे महत्वपूर्ण काम दुसरे कोणतेच नाही. त्यामुळे माझ्या तिर्थयात्रेचा प्रबंध करावा.

मी माझे मन इशचिंतनात घालवावे म्हणतो. दुसऱ्या दिवशी रुद्राक्ष राज्य सोडून तिर्थाटनाला निघून गेला.





# लोभी व्यापारी

कोण्या एका गावांत फळाफुलांची एक खूप सुंदर बाग होती. त्या बागेत एक साधू पर्णकुटी बांधून रहात होता. साधू पाठशाळा चालवित असे. त्यात अनेक शिष्य शिक्षण घेत होते. परंतु. त्यातील अधिक शिष्य आध्यात्मिक गोष्टीवर न लक्ष देता लौकिक गोष्टींवर अभिरुची ठेवत असत. तरीही साधू त्यांचा सर्वांचा आदर करून त्यांना सुख पूर्वक व शांतीने जिवन जगण्याकरीता योग्य तो सल्ला देई.

साधूंच्या शिष्यांपैकी एकजण व्यापारी होता. तो एक नंबरचा लोभी व कंजूस होता. त्याने लाखो रुपये कमावले परंतु स्वत:चा एक पैसा जर जास्त खर्च झाला तर तो आपले एकवेळचे खाणें बंद करीत असे. त्याने त्याच्या आयुष्यात अद्याप पर्यंत कोणा-मित्राला कधी जेवायला बोलावलं नाही. की कधी धार्मिक कार्याकरीता पैसा वर्गणी म्हणून दिला नाही.

तो व्यापारी शिष्य नेहमी चिंतामग्न व मनस्क रहात असे. ते पाहून साधु त्याला सारखा विचारी–"तू कधी प्रसन्न दिसत नाहीस. तुला मी कधी हसतांना सुद्धा पाहिलं नाही ह्याचे शेवट काय कारण आहे?"

हा प्रश्न ऐकून तर व्यापारी जास्तच चिंतामग्न चेहरा करीत म्हणे–"गुरुदेव, खरे प्रसन्न व्हायला काय नविन गोष्ट घडावयास पाहीजे आहे? हे सारे जग दुष्टांनी भरलेले आहे. मी जितके श्रम करतो. तितके योग्य फळ मला मिळत नाही."

साधूने त्याला अनेकदा समजावण्याचा प्रयत्न केला–"तू तर अनावश्यक कोणत्या-तरी भीतो व आशंकानी ग्रासून शिकार होऊन कुढत जात आहेस. ह्या संसारात



कित्येक लोक गरीब आहेत तरी ते आपापल्या परिस्थितीनुसार संतुष्ट राहून आपले आयुष्य घालवित आहेत. तू सुद्धा तुझा व्यवहार बदलू शकतोस व आयुष्य आनंदाने घालवू शकतोस.'' तरी व्यापाऱ्याच्या मनात काहीही बदल झाला नाही.

थोडे दिवस उलटले. त्यात साधू आजारी पडला. त्याने आपल्या साऱ्या शिष्यांना एकत्र बोलावून घेतले व म्हटले– ''मी लवकरच देहत्याग करणार आहे माझे आशिर्वाद तुम्हांला सर्वांना आहेत की, तुम्ही सुखाने व शांतीनें रहा. तुम्ही देवावर पूर्ण विश्वास ठेवा. त्यामुळे तुम्हांला सुखशांती लाभेल. परंतु शेवटच्या क्षणी तुम्हीं मी सांगिन त्या सल्ल्यानुसार वागा. तर तेव्हां तुम्ही एकेकांने माझ्या खोलीत या !'' गुरुदेव आजारी पडल्यामुळे सारे शिष्य दु:खी झाले.

थोड्या वेळाने एक एकजण साधूला जाऊन भेटून व त्याच्याकडून आशिवाद घेऊन प्रार्थना करुन बाहेर आले.

सरते शेवटी तो लोभी व्यापारी साधूला भेटायला गेला व म्हणाला–''गुरुदेव, आपण प्रथम मला वचन द्या. की मी जी गोष्ट तुमच्याकडे मागेन ती तुम्ही मला द्याल.''

साधू त्याचवेळी शांतचित्ताने नेहमी करता आपले डोळे मिटण्याच्या घाईत होता. त्यामुळे व्यापाऱ्याला घाईने पाठविण्याच्या उद्देशाने त्याने त्याच्या प्रश्नाचे समाधान कारक उत्तर न देता स्विकृति सुचक मान हलविली.

त्यावर तो लोभी व्यापारी म्हणाला– ''साधू महाराज, आपल्या जुन्या शिष्यांपैकी एकाने मला सांगितले आहे की, आपण काही अद्भूत् शक्ति जाणता ! असे पण ऐकले की आपण लोखंडाचे सोन करता. कृपा करून ती शक्ति आपण मला द्या.''

व्यापाऱ्याची हि कामना ऐकताच मरणाची घटका मोजणारे साधू आश्चर्यचकित होत म्हणाले–'' अरेरे, तुला वाटते की, मी अशा काही शक्ति बाळगीत आहे. पण एक गोष्ट लक्षात ठेव तू जर का अशा शक्ति मिळविल्यास तर अधिक चिंता व दयनिय अवस्थेचा शिकार होशील. त्यामुळे तू तुझ्या दुसऱ्या कोणत्याही इच्छा सांग. त्याने खरोखरी तुझे कल्याण होईल.''

''तसे काही नाही गुरुदेव ! ह्याचे जर का रहस्य मला समजले तर माझ्या सारखा सुखी माणूस जगात दुसरा कोणी असणार नाही. जास्त सोने असणे म्हणजे सर्वात जास्त सुखी असतो माणूस !'' हावरट व्यापारी साहसाने म्हणाला.

साधूने मनाशी विचार केला की त्या लोभी व्यापाऱ्याला नीतिचे उपदेश देऊन काही उपयोग होणार नाही. तेव्हां ताबडतोब त्याला घालवून देण्याच्या हेतूने त्याने एक मंत्र त्याला सांगितला व म्हटले–'' ऐक तू कोणतेही लोखंडका असेंना त्यावर मंत्र फुंकून टाकलास की ती वस्तू सोन्यांची होईल.

ह्यानंतर क्षणभरातच साधूचे देहावसान झाले. त्यांच्या सर्व शिष्यांमधे फक्त लोभी व्यापारीच थोडा प्रसन्न दिसला. ते पाहून इतर शिष्यांना वाटले की, साधू महाराजानीं त्याला एकट्यालाच देवाच्या सानिध्यात जाण्याचा मार्ग सांगितला असावा. आपल्याला असे सौभाग्य कधी प्राप्त होणारच नाही. त्याच्याबरच साधूंची मर्जी बसण्यापाठीमागे काहीतरी खास उद्देश असावा.



एका आठवड्यानंतर त्या लोभी व्यापाऱ्याने बाजारात जाऊन जुन्या लोखंडाची किमत विचारली. त्या व्यापाऱ्याने जी किमत सांगितली ती लोभी व्यापाऱ्याला थोडी जास्तच वाटली. त्याने विचार केला की, कींमत थोडी कमी होईपर्यंत वाट पाहीलेली चांगली.

ह्यानंतर तो दर आठवड्याच्या बाजाराला जाऊन किमत विचारू लागला. परंतु त्या लोखंडाच्या भावात काही फेरबदल होत नव्हता. त्यामुळे त्याने विचार केला की, नाहीतरी ह्या कचरा लोखंडाचे सोनेंच व्हायचे आहे. मग थोडे पैसे जास्त दिले तरीं काय नुकसान होणार नाही तरी सुद्धा ह्या व्यापाऱ्याला फुकटचा नफा कशाला करून द्यायचा थोडे आणखीं थांबून पाहू या.

अशा प्रकारे दोन वर्षे उलटली व काही कारणास्तव लोखंडाचा भाव भराभर उतरला. तेव्हां लोभी व्यापाराने गाड्या-भरभरून जुने लोखंड खरेदी केले व ते घरी आणले. कारण आता ते सोनें बनणार होते नां! त्यामुळे त्याने घराचीं डागडुजी करण्याकरीता सुरवात केली. कारण सोनें सुरक्षीत राहीले पाहिजे मग त्याकरीता त्याने अनेक गवंडी मेस्त्री कामाला लावले वाळू, वीटा चुन्याकरीता खूप खर्च केला. मजुरांच्या रोजच्या खाण्यापिण्यात खूप खर्च झाला. शेवटी सर्व लोखंड घरांत बंद झाले.

एक दिवस व्यापाऱ्याने रात्री त्या जुन्या लोखंडामध्ये बसून तो मंत्र म्हणण्यास सुरवात केली. परंतु त्याला काहीं केल्या तो मंत्र आठवेनां. तो निराश होऊन स्वतःचे डोके बडवू लागला व मंत्र आठवण्याचा प्रयत्न करू लागला. परंतु काही उपयोग झाला नाही. त्यां लोभी व्यापाऱ्याने एक मोठी चुक केली होती की, मागची दोन वर्षे लोखंडाचे भाव कमीजास्त होण्याच्या विचारांत तो मंत्र लक्षात ठेवण्यास साफ विसरून गेला होता.

त्यामुळे थोड्या दिवसांतच त्याला वेड लागले व सारे आयुष्य त्याने त्या लोखंडावर लक्ष ठेवण्यात घालवले.






## [१६]

[कांशाच्या किल्ल्यापर्यंत पोहोचण्यासाठी रुद्रपुरच्या राजा शिवसिंहने चंद्रवर्माला अनेक मदती देऊ केल्या. चंद्रवर्मा राज्यातील चार अधिकारी व काही सैनिक बरोबर घेऊन निघाला. वाटेत त्यांना एक मोडकळीस आलेले नगर दिसले. तेथे त्यांना एक शिलालेख पहावयास मिळाला. त्याच्या आधारावरून चंद्रवर्माला समजले की, ते नगर करवीरपुर आहे. ...पुढे वाचा]

करवीरपुर नगरातून त्या खाचखळग्याच्या रस्त्याने ते पश्चिमेकडे बरेच दूर चालून गेले व अचानक त्यांना समोर उंचउंच डोंगर दिसू लागले. आता ते डोंगर पार करून जाणें म्हणजे एक अत्यंत बिकट काम त्यांच्यावर येऊन पडले. सर्व डोंगर पर्वत उजाड तुटके ओसा वाटत होते. खाद्यपदार्थ लादलेल्या खेचरांना पर्वत पार करून नेणें म्हणजे अशक्यच होते. आता काय करावे बरे? तो विचार करू लागला.

"आता आपल्या पुढे एकच एक उपाय आहे कीं आपल्याला पाठीवरून व खांद्यावरून जेवढ्या खाण्याच्या चिज वस्तू वाहून नेता येतील तेवढ्याच आपण पर्वतावर चढून घेऊन जाऊ. हि खेचरे व बाकी इतर सामान ह्या जंगलात सोडून देऊ." चंद्रवर्माने सुचविले.




तेव्हां राजा शिवसिंहाचे अधिकारी म्हणाले–"पर्वताच्या पलीकडे काय आहे हे आपणास माहीत सुद्धा नाही. एखादे वेळेस तिथे आपल्याला खाणे सुद्धा मिळाले नाही तर प्राणाला मुकण्या शिवाय गत्यंतर नाही. आणि खेचरे व सामान इथेच जंगलात सोडून द्यावयाचे."

"ह्या पर्वतावर चढायला कोठे वाटही दिसत नाही म्हणजे आपल्याला दोरीच्या सहाय्यानी वर जाणे भाग आहे मग तेथे खेचरे कशी काय वर ओढून घ्यायची? त्यामुळे थोडे फार सामान व खेचरे इथेच सोडणे भाग आहे." चंद्रवर्माने त्यांना समजावत सांगितले.

चंद्रवर्माच्या म्हणण्याला चार अधिकारी सोडले तर बाकी सर्वांनी दुजोरा दिला. ह्यानंतर खेचरांवर लादलेले सामान खाली उतरवण्यात आले व प्रत्येकानें आपल्या शक्तिनुसार खाण्याचे सामान एकेका थैल्यात घालून घेतले. कोणी खांद्यावर तर कोणी डोक्यावर घेऊन तो पर्वत चढण्यास सुरवात केली. सूर्योदयापूर्वी त्यांनी पर्वतावर चढण्यास सुरवात केली. दुपारपर्यंत ते सर्व डोंगरावरच्या माथ्यावर एका समतल भागात येऊन पोहोचले. तेथे त्यांनी स्वयंपाक तयार करून खाऊन घेतला व थोडा आराम करून पुन्हां डोंगर चढण्यास सुरवात केली. सूर्यास्ताच्या सुमारास ते एका डोंगराच्या शिखरावर येऊन पोहोचले.

सर्वात प्रथम चंद्रवर्मा व देवल डोंगराच्या माथ्यावर चढून गेले. तेथून त्यांनी जे दृश्य पाहिले ते पाहून त्यांचा आनंद गगनात मावेनासा झाला. डोंगराच्या पायथ्याशी त्यांना एक महानगर दिसत होते. त्या नगरांच्या किल्ल्यातील उंच उंच मनोऱ्यांवर सूर्याची किरणें पडून ती चमकत होती. नगरातील इतर डोंगरामधून फुलाफळांची झाडे लगडलेली होती. लांब लांब वर हिरवीगार शेते पसरलेली होती.

"हे नगर कोणत्या राजाचे आहे? ह्या नगराचे नांव काय असावे बरे?" असा मनोमन विचार करीत चंद्रवर्मा आश्चर्यचकीत झाला. तितक्यात एक अधिकारी त्याच्यापाशी येऊन पोहोचला व डोंगराच्या तळाशी दिसत असलेले महानगर पाहून आनंदाने जोरजोरात ओरडून नाचू लागला. "हे तर शिवपुर आहे, शिवपुर आहे!"






"हे बघ, तू खात्रीपूर्वक सांगू शकतोस हेच शिवपुर आहे. तू कधी पूर्वी ह्या नगरात गेला होतास कां?" चंद्रवर्माने त्याला विचारले.

"सरकार, मी काहीं दिवसांपूर्वी एक महिनाभर ह्या नगरात राहिलो होतो. हे नगर रुद्रपुर राज्याच्या पश्चिम सीमेकडे वसलेले आहे. ह्याच्यापुढे खूप दूरपर्यंत वाळवंट पसरलेले आहे. ह्या नगरचा प्रतिनिधी विरमल्लाला सुद्धा मी ओळखतो." त्या अधिकाऱ्यांने चंद्रवर्माला म्हटले.

"म्हणजे ह्याचा अर्थ तुला रुद्रपुरापासून ह्या नगरात येण्याचा मार्ग पूर्वीच चांगला माहीत होता. मग ही गोष्ट तू मला पूर्वीच कां सांगितली नाहीस?" चंद्रवर्माने आपली शंका व्यक्त करीत विचारले.

ते ऐकताच तो अधिकारी घाबरला व स्वतःला सावरीत म्हणाला–"सरकार, मी मागच्या वेळी ह्या मार्गाने आलो नाही. राजधानी रुद्रपुरपासून शिवपुरला जाण्याकरीता दुसरा सुद्धा एक मार्ग आहे परंतु तो आत्ता माझ्या लक्षात नाही!"

चंद्रवर्मा त्याच्या जवळ त्या संबंधात काही बोलत होता. तितक्यात डोंगराच्या पायथ्यामधून एक रणभेरीचा कर्कश आवाज ऐकू आला. त्यानंतर दुसऱ्याक्षणी नगरातील किल्ल्याच्या एका तटावरील नगाऱ्यांचा भयंकर आवाज सर्वत्र दुमदुमू लागला. त्याच क्षणी किल्ल्याच्या तटावर अनेक सशस्त्र सैनिक धनुष्य भाले घेऊन घेऊन ओळीने उभे राहिले.

चंद्रवर्माला तो प्रकार पाहून आश्चर्या बरोबर कुतुहल वाटू लागले ते बहुदा आपल्याला पाहून शत्रू सैनिक समजले









असावेत. त्याने असा विचार केला की, त्यांनी बाणाचा नेम आपल्यावर करण्या आधी आपण त्यांचे मित्र आहोत हे दर्शविणें योग्य होईल. त्यामुळे त्यानी एक पांढरे स्वच्छ फडके आपल्या तलवारीच्या टोकाला बांधले व ते त्यांना दिसेल असे हवेत फडकवले.

किल्ल्याच्या तटावरील सैनिक क्षणभर डोंगरामाथ्याकडे टक लावून पाहत राहिले. तितक्यात एक अजस्त्र माणूस एका माणसाला ढकलीत पुढे घेऊन आला व धनुष्याला बाण लावून त्याने चंद्रवर्मा उभा होता तिकडे सोडला. सूंसू करीत तो बाण चंद्रवर्मा-पासून थोड्या दूर येऊन पडला त्या बाणाला कागदाचा एक तुकडा बांधलेला होता.

चंद्रवर्माने मोठ्या उत्सुकतेने तो बाण आपल्या हातात उचलून घेतला व त्या बाणाला बांधलेला कागद उलगडून वाचला. ते पत्र शिवपुरच्या किल्ल्याच्या तटावरील सैनिकांच्या मुख्य नायकांचे होते. त्याने त्या पत्रात विचारणा केली होती की–"तुम्ही कोण आहात? कुठचे रहाणारे? आणि कोणत्या कामाकरीता इथे आलां आहात?" आणि ह्याचे उत्तर ताबडतोब मिळाले नाही तर सर्वांना आम्ही शत्रू समजून ठार करू.

त्यावर चंद्रवर्माने रुद्रपुरच्या राजा शिव-सिंहा कडून आणलेले आज्ञापत्र त्या बाणाला बांधून तो बाण असा सोडला कीं, तो बरोबर त्या किल्ल्याच्या तटावर जाऊन पडला. थोड्यावेळात आनंद व जल्लोषांत सर्व सैनिक नाचू लागले व त्यांनी असा आनंदव्यक्त केला की, ते सर्व आमच्या स्वागतास तत्पर आहेत!"

डोंगरांवरून नगरात प्रवेश करण्याकरीता तयार केलेल्या दगडांच्या पायऱ्या उतरून चंद्रवर्मा व त्यांचे साथीदार थोड्यावेळात किल्ल्याच्या जवळच्या खंदकापाशी येऊन पोहोचले. चंद्रवर्मा त्यांच्या नायकाला पहाताच आनंदाने आश्चर्यचकीत होऊन नाचू लागला. ह्याचे मुख्य कारण म्हणजे सैनिकांच्या सर्वांत पुढे सेनापतीच्या पोशा-खात सुबाहु उभा होता.

सुबाहुने आपले युवराज चंद्रवर्माला ताबडतोब ओळखले. दुसऱ्याक्षणी त्याने सांकेतीक नजरेने त्याला हात हलवून संकेत केला. ह्यांचा अर्थ होता की, आपल्यादोघांची ओळख इतरांना समजू नये. चंद्रवर्माला ती सांकेतिक भाषा समजली. तो सुबाहुच्या जवळ जात सादर प्रणाम करीत म्हणाला–"आपण शिवपुरचे सेनापती आहात कां? मीं राजप्रतिनिधी वीरमल्लची भेट घेऊ इच्छितो. त्यांच्या बरोबर काही खास गोष्टीवर बोलणी करावयाची आहेत.

"मग ह्यात काय मोठेस! कोणते आहे असे काम? प्रथम आपण सर्वजण थोडा आराम व खाऊन पिऊन घ्या. मग मी आपली भेट घडवून आणतो!" असे म्हणत सुबाहुने आपल्या साथीदारांच्या हाती चंद्रवर्माच्या साथीदारांना सोपविले.







सैनिक व चंद्रवर्मांचे साथीदार जेव्हां किल्ल्याच्या आत निघून गेले. तेव्हां सुबाहूने मोठ्या भक्तिभावनेने हात जोडून चंद्रवर्माला नमस्कार केला व म्हणाला– "महाराज, मी अत्यंत भाग्यवान आहे. मला स्वप्नातही वाटत नव्हते की, ह्या जन्मीत आपले पुन्हां दर्शन घडेल. चला घरी गेल्यावर सर्व हकीगत सविस्तर सांगतो." असे म्हणत सुबाहु किल्ल्याच्या आत पुढे होऊन निघाला.

चंद्रवर्माने सुबाहुच्या घरी जाताच सर्व गोष्टींची माहीती करून घेतली. कित्येक वर्षापूर्वी सर्पकेतूच्या सैनिकांच्या हातून प्राण वाचवून चंद्रवर्मा बरोबर सुबाहुने नदीत उडी टाकली होती. परंतु संयोगाने तो एका डोंगराच्या पहाडी प्रदेशात वहात जाऊन लागला.

त्यानंतर त्याची त्या पहाडात धीरमल्ल नावाच्या एका व्यक्तिची भेट झाली. धीरमल्ल सुद्धा सर्पकेतूच्या बरोबर लढून शेवटी पराभुत झाला होता आणि आपल्या बोटावर मोजण्या एवढ्या सैनिकांनिशी तो पळून ह्या पहाडात जाऊन लपला होता. ह्या गोष्टी नंतर काही दिवसांनी ते सर्व रुद्रपुरचा राजा शिवसिंह ह्याच्या दरबारात नोकरीला लागले व नंतर त्यांच्या आज्ञेने ते शिवपुरला आले.

शिवसिंहच्या दरबारात आश्रय मिळाल्या बरोबर धीरमल्लने आपले नाव बदलून वीरमल्ल केले. त्याचा हेतू चुकून सुद्धा आपला नाव पत्ता सर्पकेतूला लागू नये. अशा कारणाने त्याने आपले नांव बदलून आपली ओळख करून दिली होती.

चंद्रवर्माने सुद्धा सुबाहू बरोबर नदीत उडी मारली होती. त्याने सुद्धा सर्व घडलेल्या घटना सविस्तर सुबाहुला सांगितल्या. व तेथे येण्याचे कारण सुबाहुला सांगितले. चंद्रवर्माच्या तोंडी कांशाच्या किल्ल्याचे नांव ऐकताच क्षणभर तो आश्चर्यचकित झाला.

"महाराज, आता खरेच असे वाटते आहे की, आता आपले सारे कष्ट जादूसारखे दूर होणार व आपले भविष्य उज्वल होणार खरी गोष्ट तर अशी आहे की, ह्या क्षणी धीरमल्ल नगरात नाही हि गोष्ट आम्ही गुप्त ठेवली आहे. आम्हांला आत्ताच सुगावा लागला आहे की सर्पकेतू आपल्या सैन्यासह कांशाच्या किल्ल्याकडे जात आहे. त्याचे सैन्य किती आहे हे अजमावण्याच्या उद्द्शाने व त्यांचा वाटेतच कांटा काढण्याच्या हेतूनें धीरमल्ल गुप्तरूपाने थोडया सैन्यानिशीं दोन दिवसापूर्वीच नगरातून बाहेर पडला आहे." सुबाहुने खरी गोष्ट सांगितली.



सर्पकेतुचे नाव काढताच चंद्रवर्माला अत्यंत संताप आला तो रागारागातच त्याच्याकडे पाहू लागला हे पाहून सुबाहुने त्याला समजावत म्हटले–"महाराज, ह्या क्षणी सर्पकेतू फक्त वीरपुरचेच नाही तर साऱ्या महिष्मती नगराचे चक्रवर्ती आहेत.

यशोवर्धन चक्रवर्ती राजाचे देहावसान झाले आहे. त्यांचा ज्येष्ट पुत्र तपोवर्धन विरागी बनून जंगलात तपश्चर्या करण्या-करीता निघून गेले आहेत. ह्यानंतर गुण-वर्धनला सर्पकेतुने मदतीचे आमिष दाखवून आपल्या स्वार्थ सिद्धि करीता त्यांचा वध केला व महिष्मती राज्यात स्वत:चा राज्याभिषेक करवून घेतला.

"अरेरे! एवढे मोठे राज्य हस्तगत करून सुद्धा संपत्तीची त्याची हाव मुटली नाही वाटते आणि पुन्हां सैन्य घेऊन कांशाच्या किल्ल्यातील खजिनां लुटायला धावला." चंद्रवर्मा कठोर आवाजात म्हणाला.

"सर्पकेतुच्या ह्या हल्लया पाठीमाग फक्त त्याला संपत्ती लुटण्याची हांव नाही तर राज्य काबीज करून ते. मिळविण्याचा सुद्धा एकतर्फी प्रयत्न आहे. काही कां असेना! त्याने शिवपुरवर अचानक हल्ला केला नाही ही आपल्या नशिबाचीच गोष्ट म्हणावयाची गुप्तहेरांकडून आम्हाला

आधींच समजले आहे की तो कोणत्या मार्गाने कांशाच्या किल्ल्याकडे जाणार आहे." सुबाहु त्याला म्हणाला.

चंद्रवर्मा आणि सुबाहु ह्यांचा असा वार्तालाप चाललेला असतानांच दुताने प्रवेश केला व एक लखोटा त्यांच्या हाती दिला. ते पत्र वाचताच सुबाहुचा चेहरा पांढरा फटक पडला. ते वाचुन झाल्यावर सुबाहुने तो कागद चंद्रवर्माच्या हातात दिला.

चंद्रवर्माने ते पत्र उत्सुकतेने वाचले. ते सेनापती धीरमल्लने सुबाहुच्या नावे लिहीलेले होते. त्याचा अर्थ असा होता– धीरमल्लने आपल्या मोजक्या सैन्यांनिशी शिवपुरच्या उत्तरेकडच्या असलेल्या बाळ-बंटी प्रदेशात सर्पकेतुच्या मोठ्या सैन्यांशीं सामना दिला.

त्यामुळे समोरा समोर लढणे म्हणजे संकट ओढून घेतल्या सारखेंच झाले म्हणून मागे फिरून पळण्याचा प्रयत्न केला पण ते लक्षात घेऊन सर्पकेतुने थोड्या सैन्यानिशी पुन्हां पाठलाग केला व तो थोड्या सैन्यासह शिवपुरला परत येत आहे. त्यामुळे त्याने सुबाहुला तावडतोब थोडे सैन्य नगरात ठेऊन बाकी सैन्यासह स्वत:च्या मदतीस येण्याकरीता कळविले होते.

"महाराज, हे तर खरोखरी आपले दुर्दैव आहे म्हणावयाचे! सेनापती धीरमल्ल ह्या नगराची सुरक्षा हद्द ओलांडण्यापूर्वी जर सर्पकेतूने धीरमल्लवर हल्ला केला तर धीरमल्लचा पराभव नक्कीच होईल व ह्या नगराचा सर्वनाश होण्यास काही वेळ लागणार नाही. ह्याकारणाने आपल्याला तावडतोब ससैन्य त्यांचे रक्षण करण्याकरीता जायलाच पाहिजे!" आता मागचापुढचा विचार करीत बसण्यात सुद्धा अर्थ नाही आपण दोघेही थोडे सैन्य बरोबर घेऊन निघावे. सुबाहुने आपला विचार मांडला.

(क्रमश:)



# नागकन्या

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणें मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! अशा अर्ध्यारात्री तू एवढे कष्ट व श्रम करीत आहेस. ह्याचे काय कारण आहे. मला समजत नाही. परंतु एक गोष्ट लक्षात ठेव. ह्या जगात अनेक भोळे भाबडे लोक हातात आलेली चांगली संधी गमावून बसतात. तू तर तसा काहीसा नाहीस नां ? त्याकरीता हातात आलेले चांगले कार्य गमावून बसलेल्या धीरचंद्र नावांच्या माणसाची गोष्ट तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कौमुदी नावाची एक नागकन्या एके दिवशी प्रथमच पाताळलोकातून बाहेर



आली व एका नदीकांठी मानव रूपात विहार करू लागली. पृथ्वीवरचे वातावरण तीला अत्यंत प्रसन्न वाटले.

ती मनांत विचार करू लागली–"अरे वा! माणूस किती भाग्यवान आहे!" तेवढ्यात तिला एक तरुण दिसला.

त्या तरुणाचे नाव धीरचंद्र होते. कोण्या एका काळात त्याचे कुटुंब संपन्न होते. परंतु आता त्याची परिस्थिती चांगली नव्हती. त्याचीं आई आजारी होती. तिच्या उपचाराकरीता त्याच्याकडे फुटकी कवडी सुद्धा नव्हती. दोन वर्षी पूर्वी जो दुष्काळ पडला होता तेव्हां त्याने काढलेल्या कर्जाचे व्याज दामदुप्पट वाढले होते. ह्यावर्षी सुद्धा त्याने थोडे कर्जावू पैसे घेतले होते व ते सुद्धा न फेडल्या कारणाने सावकाराच्या भीतीने त्याचा बाप घर सोडून सहामहिन्यापूर्वीच पळून गेला होता.

त्या परिस्थितीत धीरचंद्राने स्वतःचे पूर्वपाजित घर विकून कर्ज फेडण्याकरीता पैसा जमा केला. परंतु त्याच्या दुर्देवानें त्यांच्या घरात चोरी होऊन तो सर्व पैसा गेला त्याने ज्या माणसाला घर विकले होते त्याला ते घर खालीं करून देण्याचा शेवटचा दिवस होता.

आजारी आई व कर्जाचे डबोले व त्यातून निराश्रित. उद्या आपले काय होणार? ह्याच काळजीत तो त्या नदीच्या किनारी जाऊन संचित मुद्रेने बसला होता. नागकन्या कौमुदी त्याचे सौंदर्य पाहून मुग्ध झाली. तिने मनात विचार केला–"हा तरुण किती सुंदर आहे!"

धीरचंद्र विस्मयाने तिच्याकडे पाहू लागला व त्याने विचारले–"तू कोण आहेस?"

"माझे नाव कौमुदी आहे. मी एक नागकन्या आहे." त्याचा चिंतामग्न चेहरा पाहून तिने विचारले." तुम्ही उदास कां आहात?"

धीरचंद्रने तीला घडलेले सविस्तर सांगितले तिने त्याला म्हटले–"मी तुझ्यावर प्रेम करते. तू माझ्याबरोबर नागलोकात येतोस कां?"



नागकन्येचे बोलणें ऐकून त्याला अत्यंत आश्चर्य वाटले क्षणभर विचार करीत तो म्हणाला–"मी तर तुला माझ्या अडचणी सांगितल्या. त्या सोडून मला तुझ्या बरोबर येता येणार नाही."

तुझ्या सार्‍या अडचणी पैशाला बांधलेल्या आहेत. मी तुला हवे असेल तेवढे सोने देते. आता घेऊन येते तू इथेंच थांब." असे म्हणत ती अदृष्य झाली.

धीरचंद्र विचार करू लागला–"हे जे काय घडले ते सत्य आहे कां स्वप्न?" परंतु काही वेळानंतर नागकन्या पुन्हां सदृष्य झाली व त्याच्या हातात तिने एक थैली दिली. त्यात सोन्यांच्या नाण्यासोबत किंमती हिरे माणके सुद्धा होतीं.

"हे बघ, ह्या पैशांनी तू आपले सर्व कर्ज फेडून टाक. येत्या दशमीच्या दिवशी पुन्हां ह्या नदीच्या कांठी ये. आणि जर कां तू आला नाहीस तर तुझ्या कुटुंबाचा मी सर्वनाश करेन." नागकन्या धमकावणीच्या सुरात म्हणालीं.

त्यां धनाच्या प्राप्तीमुळे त्याचे एकाएकी रूपच पालटले. त्याने त्यातील एक रत्न विकले तेव्हां त्याला एक लाख सोन्यांचीं नाणी मिळाली. त्याने त्या पैशाने एक सुंदर घर विकत घेतले. सर्व कर्ज फेड केली. घरांत अनेक नोकर चाकर ठेवले आपल्या आईवर औषधोपचार करण्या करीता अनेक निष्णात वैद्य बोलावले.

वैद्यांनी उपचार सुरू केले. त्याच्या आईची तब्येत दोन दिवसांत चांगली सुधारू लागली. तेव्हां धीरचंद्रच्या आईने नविन घरा संबंधी व तिची सेवासुश्रुषा करणाऱ्या नोकरासंबंधी आश्चर्य वाटून मुलाला विचारले–"बाळ, आपल्या परिस्थितीत एकदम एवढा बदल कसा काय घडला?" धीरचंद्रने आईला सर्व खरे सांगितले. ते ऐकताच ती घाबरली व त्याला म्हणाली–"बाळ, नागकन्याबरोबर













संबंध म्हणजे नक्कीच काहीतरी दगाफटका आहे. तू कसेही करून त्या कौमुदीनीच्या जाळ्यातून बाहेर पड. माझा धाकटा भाऊ शूरगुप्त नक्कीच तुला ह्याकरीता मदत करेल तू जाऊन त्याची मदत घे."

धीरचंद्रच्या आईने अशा स्थितीत शूरगुप्ताचे नाव घेतले ह्यापाठीमागे एक कारण होते, जोपर्यंत ते संकटात होते तोपर्यंत तिच्या भावाने त्यांच्याघरात डोकावून सुद्धा पाहिले नव्हते. कारण तो एक नंबरचा स्वार्थी होता आणि त्याला एक मुलगी होती. त्यामुळे तो आपल्या मुलीकरीता धीरचंद्रला मागणी घालेल असे तिला वाटले. धीरचंद्रच्या आईने केलेली कल्पना खरी ठरली. आपला भाचा श्रीमंत झालेल्या ऐकताच शूरगुप्ताने धीरचंद्रचे मोठ्या आदराने स्वागत केले. सर्व गोष्टी ऐकून त्याला समजावणीच्या सुरात म्हटले–"मुला, नागकन्यांच्या पाठीमागची कटकट सोडण्यासाठी एक उपाय आहे. तू तिला सांग की, माझ्या आईचे स्वास्थ सुधारले नाही. ते फक्त काष्टऔषधांमुळेच सुधारण्याची शक्यता आहे. ती ओषधी मुळचा आणू शकणार नाही.

दशमीच्या दिवशी धीरचंद्र नदीच्या काठी आला व शूरगुप्ताने सांगितल्या प्रमाणे त्याने नागकन्येला सांगितले.

तेव्हां त्याला उत्तर करीत ती म्हणाली–"माझे आयुष्य एक हजार वर्षे आहे. मी तुला ती मुळी आणून देईन त्याने तुझ्या आईला आराम वाटले परंतु माझे अर्धे आयुष्य त्यामुळे कमी होईल. परंतु तुझ्या शिवाय मला जगणे व्यर्थ आहे. म्हणून माझे आयुष्य कमी झाले तरी हरकत नाही. मी तुला ती मुळी आणून देते. त्या मुळींने मानव संबंधीत सारे रोग नष्ट होतात.

नागकन्येने ती औषधी मुळी आणून दिली. धीरचंद्रची आई त्या मुळीचे सेवन केल्याने एकदम ठणठणीत बरी झाली. धीरचंद्रने पुढच्या पोर्णिमेच्या दिवशी नागकन्येला स्वत: येण्याविषयी सांगितले होते. त्यामुळे त्याची आई अस्वस्थ झाली व तिने आपल्या भावाकडे निरोप पाठवून मुलाचे मानस बदलण्या विषयी कळवले.

शूरगुप्तने सर्व ऐकून धीरचंद्रला म्हटले–"मुला तू आपल्या आईला एकटीला इथे सोडून नागलोकात कसा काय जातोस? तू नागकन्येला असे सांग कि, तुझे वडील इथे नाहीत. ते घरातून निघून गेले आहेत ते येई पर्यंत तरी मला तुझ्या बरोबर येता येणार नाही."

धीरचंद्रने मामाने सांगितल्या प्रमाणे केले. त्यावर नागकन्या म्हणाली–"तुझ्या वडीलांना शोधून काढून तुझ्या घरी परत आणून देते त्या करीता मला माझ्या शंभर वर्षांचा त्याग करावा लागेल. तरी सुद्धा तुझ्याकरीता मी शंभर वर्षे त्याग करायला तयार आहे.

नागकन्येने त्याला पुढच्या पंचमीच्या दिवशी नदीकांठी येण्याविषयी सांगितले.

त्याच दिवशी रात्री धीरचंद्रचे वडील घरी परत आले परंतु नवरा घरी परत आला ह्याच्या आनंदापेक्षा तिला मुलगा जाणार ह्याचेच जास्त दु:ख झाले. त्यावर तिच्या भावाने तिला आणखी एक सल्ला दिला. त्या उपायाने त्याला नागलोकात जाणे अशक्य आहे. मानव जातीत पुरुष एकपत्नी व्रत असतात आणि असा रिवाज असतो की पत्नीने पतीच्या घरीच येऊन



संसार करावा. जर कां खरोखरी नागकन्या त्याच्यावर प्रेम करत असेल तर तिला धीरचंद्र बरोबर लग्न करून मानवलोकात येऊन रहाणे भाग आहे.

शूरगुप्तने धीरचंद्रसमोर अशा काही गोष्टी सांगून त्याला अट घालीत म्हटले–"बाळ, खरे तर असे आहे. नागकन्या मनुष्यलोकांत येऊन रहाणे कदापी शक्य नाही. त्यामुळे तुझे म्हणणे ती स्विकारणार नाही. आणि जर कां ती हे म्हणणे मान्य करावयास तयार झाली. तर तू तो शेवटचा उपाय तिला सांग!

पंचमीच्या दिवशी धीरचंद्रने नागकन्येला नदीकांठी भेटून मानव लोकांच्या चालीरिती विषयी सांगितले.



ह्यावर नागकन्या दुःखी होत म्हणाली– "मी तुमच्या बरोबर विवाह करून तुमच्या घरी आले तर माझा नागलोकाशी संबंध रहाणार नाही. मग माझ्या साऱ्या शक्ति नाहीशा होऊन जातील म्हणून मी थोडा वेळ तुम्हांला माझ्या बरोबर घेऊन जाऊ इच्छिते.

"आमच्या मनुष्य जातीच्या अगदी उलट तुझे आचार विचार आहेत म्हणून मला क्षमा कर." धीरचंद्र म्हणाला.

"मी मनांत आणल तर तुम्हांला जबरदस्ती घेऊन जाऊ शकते. तरी सुद्धा तुमच्या करीता मी माझ्या शक्तिचा त्याग करण्यास तयार आहे." नागकन्या म्हणाली.

नागकन्येचा होकार ऐकून तो अवाक् झाला. त्याने फिरून विचारले–"काय ग, तुला ह्या गोष्टीची भीती नाही कां की तुझ्या सर्व शक्ती जर नष्ट झाल्या तर मी तुला सारखा त्रास देत राहीन ?"

"मी तुझ्यावर जीवापाड प्रेम केले आहे अशा स्थितीत तू मला काय त्रास देणार ?" नागकन्या म्हणाली.

"ह्याचे एकच कारण आहे. माझे वडील गरुड वंशातले आहेत. माझ्या आईकरीता त्यांनी आपल्या लोकांचा त्याग केला व ते पृथ्वी लोकात आले व त्यांनी येथेच आपले वास्तव्य केले. माझ्यामधे त्यांचाच अंश आहे." धीरचंद्र त्याला म्हणाला.

"मी जाणते की, गरुड व नागलोकांचे जातीवैर आहे. परंतु मी माझ्या प्राणांपेक्षा तुझ्यावर जास्त प्रेम करते त्यामुळे मी तुझी पत्नी बनून माझ्या प्राणांचाही त्याग करेन." नागकन्या म्हणाली.

हे उत्तर ऐकताच धीरचंद्र विचलीत झाला व तिला म्हणाला–"मी तुझ्या बरोबर नागलोकांत यावयास तयार आहे. चल आपण आपले आयुष्य तिथेच सुखाने घालवू.

वेताळाने येथवर गोष्ट सांगितली व विचारले–"राजा, आपल्या स्वार्थाकरीता धीरचंद्रने नागकन्येला अनेक अटी घातल्या त्याच्या साऱ्या अटी नागकन्येने कबूल केल्या. तेव्हां त्याला तिला आपल्या घरी नेऊन तिच्या बरोबर विवाह करता आला नसता कां? परंतु त्याने तसे केले नाही. पण उलट तोच तिच्या बरोबर नागलोकांत जावयास निघाला. कार्याची पूर्ती झाल्यामुळे धीरचंद्रने जो व्यवहार तिच्याबरोबर केला. तो काहीं त्याचा भोळेपणा आहे असे वाटत नाही ? या शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

विक्रमादित्य म्हणाला–"तू जे काय नियम वगैरे म्हणतो आहेस ते सर्व स्वार्थ सिद्धीं करीता धीरचंद्रच्या मामांने आपल्या कल्पने प्रमाणे केलेले आहेत. तरी ते नियम पालन करण्याची स्विकृती नागकन्याने दिली. तेव्हां धीरचंद्रला जगातील स्वार्थी लोकांची खावू वृत्ती स्पष्ट झाली. त्यांच्या आई, वडिल, मामा, ह्यांच्या दृष्टीला सर्व धन-संपत्ती ह्यालाच महत्व होते. धनाच्या अभावामुळेच त्याचा बाप त्याच्या आईला सोडून पळून गेला. जेव्हां धीरचंद्र श्रीमंत बनला तेव्हां कधीही लक्ष न देणारा त्याचा मामा त्याच्या समोर लाळ घोटू लागला. नागकन्याने त्याला धनच दिले नाही तर स्वतःच्या आयुष्याचा पण त्याग करण्यास तयार झाली. ह्या लोकांनी तिच्या बद्दल कृतज्ञता न दाखविता तिला धोका देण्याचाच उपाय सांगितला. धीरचंद्राने तिला असे भय दाखवून सुद्धा सांगितले की, मानवाशी विवाह झाल्याने काय काय कष्ट त्रास सहन करावा लागतो तरी तिने ते सर्व मान्य करून त्याच्याबरोबर लग्न करण्याची संमत्ती दर्शविली. तिचा दृढ निर्णय ऐकूनच त्याला चांगले समजून आले की, ती किती तन मन धन लावून आपल्यावर प्रेम करते आहे. त्या कारणांमुळे तो नागकन्येसोबत नागलोकात जावयास तयार झाला. हा काही त्याचा भोळा स्वभाव नाही.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)










# रोगाचे निदान

कृपानंद वैद्याने स्वतःच्या अचुक रोग निदान करीता गावात चांगले नाव कमावले होते. ते रोग्याची नाडी तपासून त्यांना विचारीत–"प्रथम हे सांगा की, मागच्या चार दिवसात तुम्ही कोणत्या भाज्या खाल्यात? तेच तुमच्या अस्वस्थ होण्याचे कारण आहे."

ह्यानंतर ते रोग्याच्या तोंडून भाज्यांची नावे ऐकीत असत. नंतर म्हणत–"अरे रे, आता मला समजले. हे बघा हे औषध घ्या. असे म्हणत ते रोग्यांच्या हातात काही पुड्या देत व त्यांच्याकडून पैसे घेत."

एकदा रत्नाचारी नावाचा एक तरुण मुलगा त्यांच्याकडे रोग निदान शिकण्यासाठी आला व बरेच दिवस आपले गुरु कशा तऱ्हेने रोगावर उपचार करतात ते पहात राहला. परंतु एके दिवशी त्याने गुरुना विचारले–"गुरुदेव, आपण सर्व रोग्याना एकच प्रश्न विचारता कि मागच्या चार दिवसात कोणत्या भाज्या खाल्लया ह्याची काही जरुरी आहे का?"

ते ऐकताच ते मंद स्मित करीत म्हणाले–"ते ज्या काही भाज्या फळे खातात. त्यावरून त्यांची आर्थिक स्थिति समजते. मग मी निर्णय घेतो की, कोणत्या रोग्याकडून किती पैसे घ्यावे.






आपली देवळे :

## कालीघाट

पुष्कळ वर्षापूर्वीची गोष्ट आहे. आत्माराम नावाचा एक ब्राह्मण रोज जंगला नजिक गंगाकाठी जाऊन आपला वेळ ध्यान धारणेत घालवित असे तो जंगलाजवळच्या गावातच रहात होता.

एके दिवशी संध्याकाळी आत्माराम ध्यान संपवून उठून उभा राहीला. त्यावेळी त्याला गंगेच्या प्रवाहामध्ये एक विचित्र असा प्रकाश उजळून निघाल्याचे दृष्टीस पडले. त्याला ते पाहून अत्यंत आश्चर्य वाटले. सर्वत्र अंधार होवू लागला होता. त्यामुळे तो त्या प्रकाशाच्या दिशेकडे जाऊ शकला नाही.





त्या रात्री तो जागाच राहीला व प्रकाशाच्या विषयी विचार करु लागला. दुसऱ्या दिवशी लवकर उठून तो गंगा किनारी आला. तेव्हा तो प्रकाश त्याला जसाच्या तसा दिसत होता. त्याने जवळ जाऊन पाहिले. तेव्हां गंगेच्या प्रवाहात चमकत असलेला एक शिलाहस्त त्याला दिसला.









आत्मारामने तो घेतला व आपल्या घरी नेला. त्या रात्री त्याने एक अद्‌भुत स्वप्न पाहिले. यज्ञाला आलेल्या सती देवीला पाहून दक्ष अत्यंत संतापला त्याने तीची निंदा नालस्ती व अपमान केला. ती अपमान सहन करु शकली नाही व दुःखातिरेकाने बेशुद्ध होऊन मरून जमिनीवर पडली.

मृत सतीदेवीला खांद्यावर टाकून व्यथित होऊन शंकर देहभान विसरला व पिसाळलेल्या माणसाप्रमाणें पृथ्वी लोकांत निरुद्देश सर्वत्र संचार करु लागला. त्यांना कोणी अडवू शकले नाही.





सरते शेवटी विष्णूने आपल्या सुदर्शन चक्राचा प्रयोग केला. विष्णू चक्राने सती देवीच्या देहाचे तुकडे तुकडे झाले व तिचे भाग वेगवेगळ्या प्रदेशात जाऊन पडले. तिचा हात ह्या वन्य भागातील गंगेच्या प्रवाहात येऊन पडला.

आत्मारामला वाटले की, आपल्याला प्राप्त झालेला शिलाहस्त नक्कीच सतीदेवीचा हात आहे. त्याने तो हात काली मातेच्या मुर्तीमध्ये स्थापन करून तिच्या करीता जंगलात एक देऊळ बांधले व तिची रोज पुजा करु लागला.





देवीचे देऊळ जंगलाच्या मध्य भागात बांधले गेले म्हणून कित्येक वर्षे ह्या गोष्टींचा शोध लागला नाही. एकदा एक जमिनीदार गंगानदीमध्ये नावेत बसून प्रवास करीत होते. तेव्हां त्यांना जंगलातून एक शंखनाद ऐकू आला.

जमिनदार नदीच्या काठांला उतरून जंगलात चालत गेला. त्यांनी पाहिले तेव्हां एका ठिकाणी कालीच्या प्रतिमे समोर काही मुनी बसलेले होते. ते पाहून ते आश्चर्य चकित झाले. त्यांनी काली देवीच्या समोर साष्टांग नमस्कार घातला.











नंतर त्या मुर्तीची परवानगी घेऊन त्या जमिनदाराने देवीच्या मूर्ती करीता मोठे देऊळ बांधले. त्या देवळात अनेक भक्त रोज दर्शनाला येऊ लागले. काही काळानंतर देवळा सभोवतालचे जंगल पार नष्ट झाले. पुजाऱ्यांनी व व्यापाऱ्यांनी देवळाच्या सभोवताली आपापली घरे बांधली.

मंदिर निर्माण झाल्याचे जेव्हा थोडे दूर समजले. तसे अधिकाधिक संख्येने भक्त गण तेथे येऊ लागले. नेहमी तेथे उत्सव कार्यक्रम होऊ लागले. अठराव्या शतकाच्या सुमारास हे स्थान कालीघाट नावाने प्रख्यात झाले.





कालीघाट ह्या नावालाच कालान्तराने कलकत्ता नावाने संबोधले जाऊ लागले ईस्ट इंडीया कंपनीचे आगमन कलकत्यामध्ये झाल्याने त्याचा विकास लवकर झाला. आज कलकत्ता हे शहर भारतात एक प्रमुख शहर मानले जाते.



# विचित्र बायको

बगदाद शहरात सिदीनुमान नावाचा एक तरुण रहात होता. तो एक व्यापारी होता. एकदा त्याने एक अतिशय सुंदर तरुणी पाहीली व तिच्या सौंदर्यावर अत्यंत मोहित झाला आणि तिच्या कुटूंबाविषयी काहीही चौकशी न करताच तिच्याशी विवाहबद्ध झाला. ह्या लग्ना करीता नुमानने आपल्या नातेवाईकांची सुद्धा अनुमती घेतली नाही.

नुमानने एक मोठे घर भाड्याने घेतले व त्यात तो आपल्या पत्नीसह राहू लागला. दोन दिवस मोठे मजेत आनंदात गेले. परंतु ते दोघे खाण्याची थाळी समोर घेऊन बसले की तिला खाणे नकोसे वाटे. ते पाहून त्याला आश्चर्य वाटू लागले. नुमानने तिला खाण्याविषयी खूप सांगून पाहिले. परंतु तिने काही ऐकले नाही.

दहा दिवस उलटले परंतु काही न खाता सुद्धा नुमानची बायको ठणठणीत दिसत होती. तिचा उत्साह पूर्वी सारखाच ताजा-तवाना होता. नुमानच्या मनात एक दाट शंका येऊ लागली की आपली बायको बहुदा आपला डोळा चुकवून काही तरी खात असणार परंतु तिला असे करावयाचे काय कारण बरे!

एका रात्री नुमानने निश्चय केला की आपली बायको रात्रभर काय करते ते पहावे. ह्यांचा शोध लावलाच पाहिजे. त्यामुळे तो रात्री बायको शेजारी डोळे मिटून झोपण्याचे सोंग करून पडून राहला. बरोबर अर्ध्या रात्री ती आपल्या अंथरुणा-वरून उठली व आवाज न करता बाहेर गेली. नुमानने थोडा वेळ जाऊ दिला पाठोपाठ तिच्या प्रमाणेच उठून बाहेर आला.



ती अंधारातूनच शहराच्या बाजूला दूर-वर असलेल्या स्मशानाच्या दिशेकडे जाऊ लागली. स्मशानाला लागूनच एक मोडकी तोडकी भिंत होती त्यावर एक भूतीण बसलेली होती. ह्या तरुणीला पहाताच तिने आपल्या हाताचा तिला आधार दिला. त्या तरुणीने अत्यानंदाने भूतीणीचा हात आपल्या हातात पकडला व भिंतीवर चढून वर आली. नंतर दोघी एकदम् अदृश्य झाल्या.

ते दृश्य पाहून नुमान आश्चर्यचकित झाला. त्याला मनातून कल्पनाही करवत नव्हती की, त्या भिंतीच्या पलीकडे कोणत्या तऱ्हेचं खाणे बायको खात असेल.

ह्यानंतर नुमान सरळ घरी परत आला व पूर्वीप्रमाणे झोपण्याचा प्रयत्न करू लागला. बरोबर एका तासाने त्याची बायको घरी परत आली. त्याच्या मनांत एकच विचार घोळू लागला की, आता आपल्या बायकोला सरळ मार्गाने कसे आणावयाचे.

दुसऱ्या दिवशी जेव्हां दोघे एकत्र खाण्यास बसले तेव्हां त्याने आपल्या बायकोला विचारले–"तुला जसे खावेसे वाटते तसे विकत आणावयास माझ्याकडे भरपुर पैसा आहे. तरी अशा परि-स्थितीत तुला अर्ध्यारात्री उठून शहरा-बाहेरच्या अंधाऱ्या स्मशानात जाण्याची काय गरज आहे?"

तो प्रश्न ऐकताच त्याची बायको संतापली. तिचे डोळे रागाने लालबुंद झाले. तिला समजले की गुपीत फुटले आहे. मग काय, तिने एका तांब्यात पाणी घेतले व त्याच्यावर मंत्र टाकून ते पाणी नुमानच्या अंगावर शिंपडले.

नुमान त्याच क्षणी कुत्र्याच्या रूपात बदलून गेला. तिच्यापासून प्राण वाचविण्या करीता तो धांवत पळत घरातून बाहेर पडला. त्याची मान दारात अडकली तेव्हां तिने त्याला मारण्याचा खूप प्रयत्न केला परंतु तेवढ्यात अवघीत त्याची मान बाहेर आली होती. परंतु त्याची शेपटी फक्त दारात सांपडली त्यामुळे त्याची अर्धी शेपूट कापली गेली.

घरातून बाहेर येऊन पळत असलेल्या त्या कुत्र्याला पाहून गल्लीतील इतर कुत्री त्याचा पाठलाग करू लागली. त्यांच्या पासून वाचण्याच्या उद्देशाने नुमान एका दुकानात घुसला त्या दुकानाचा मालक अत्यंत दयाळु होता. त्याने दाराशी आलेल्या इतर कुत्र्यांना हाकलवून लावले. व ह्या कुत्र्याचे रक्षण केले. नुमान कुत्र्याने आपली तुटकी शेपूट हालवीत त्या मालका विषयी आपली कृतज्ञ भावना प्रकट केली. हळूहळू तो त्या दुकान मालकाचा आवडता बनला व तेथेच आपला वेळ घालवू लागला.

एके दिवशी एक बाई त्या दुकानात सामान खरेदी करण्यास आली तिने सामान खरेदी केले. सामान घेऊन पैसे दिले. परंतु दुकानदाराने तक्रार केली की तिने दिलेल्या नाण्यामधे एक नाणे खोटे आहे. ते ऐकून त्याबाईला दुकानदाराचा अत्यंत राग आला. त्या बाईला नाराज झालेले पहाताच तो दुकानदार त्या बाईला म्हणाला–"आपण ह्या गोष्टीवर फुकटच कां नाराज होता. हे तर खोटे नाणे आहे. ही गोष्ट माझे कुत्रे सुद्धा सांगू शकेल.

"अरे वा! ठिक आहे. मला पण पाहू दे ह्या कुत्र्यांकडून सांगवा नां?" असे म्हणत



त्या बाईने आपल्या हातातील नाणी जमिनीवर फेकली.

कुत्र्याने आपल्या पायाने खरी नाणी एकत्र केली व ती वेगळी काढली. खोट्या नाण्यांना त्याने स्पर्शही केला नाही.

कुत्र्यांच्या हुषारीवर ती बाई चकित होऊन गेली.

ह्यानंतर तो व्यापारी आपल्या कुत्र्याच्या हुषारीवर अत्यंत खुष झाला व त्याची स्तुती करू लागला. त्याचा कुत्रा खोटी नाणी शोधून देण्यास चुकत नसे. त्यामुळे अनेक व्यापारी आपल्या पैशांमधे खोटी नाणी घालून ती कुत्र्यापुढे टाकीत व कुत्रे बरोबर खरी बाजूला काढून देई.








एके दिवशी दुपारी व्यापारी दुकानात मागवला गेलेला माल पहाण्यात गुंग झालेला होता. त्यावेळी एक म्हातारी त्याच्या दुकानात आली व तिने कुत्र्याला स्वतः बरोबर येण्याचा इशारा केला. कुत्रा तिच्या पाठोपाठ चालू लागला व निघून गेला.

म्हातारी घरी आली व आपल्या मुलीला म्हणाली–"मुली तू तो माणूस कुत्र्याच्या कडून खरी व खोटी नाणी यांचा शोध लावतो म्हणाली होतीस नां. मला तर एका गोष्टीची शंका येते की कोणीतरी मंत्रतंत्राचा उपयोग करून एखाद्या मानवाला कुत्र्याचे रूप दिले असावे तू ह्याचे निदान कर.

वीस वर्षाची तिची मुलगी घराबाहेर आली. तिने कुत्र्याला निरखून पाहीले व एका सुरईतल्या पाण्यात मंत्र टाकून ते पाणी त्या कुत्र्याच्या अंगावर शिंपडले.

त्याच क्षणी कुत्र्याचे रूप बदलले व नुमानला मनुष्य रूप प्राप्त झाले.

नुमानने आनंदाने अश्रु ढाळीत त्या तरुणीचे आभार मानले. नंतर तिला सविस्तर सांगितले की आपल्याला कुत्र्याचे रूप कसे काय प्राप्त झाले.

ती तरुण मंत्रतंत्र करण्यात चांगली तरबेज होती. परंतु ती आपल्या मंत्र शक्तिचा उपयोग फक्त चांगल्या कामा करीताच करीत असे. ह्यानंतर तिने नुमानच्या हातात थोडे मंत्रवलेले पाणी देत सांगितले की, ह्या पाण्याचा कशातऱ्हेने उपयोग करावा.

नुमान त्याच क्षणी आपल्या घरी परत आला. त्याला स्वतःच्या घरात आपल्याला कुत्र्याचे रूप देणारी ती तरुणी दिसली नाही. तो तिची वाट पहात घरात बसला. थोडा वेळाने ती तरुणी घरात प्रवेश करती झाली व नुमानला तेथे पाहून आश्चर्यचकित झाली. परत त्याच्यावर मंत्राचा प्रयोग करण्याकरीता ती इकडे तिकडे पाणी शोधू लागली. तेवढ्यात नुमाननेच मंत्रवलेले पाणी तिच्यावर शिंपडले त्याच क्षणी ती अनुपम सुंदरी एका खेचराच्या रूपात बदलली व तेथून पळत बाहेर निघून गेली.






तो अश्व एकाएकी अदृश्य झाला. मुलांनी त्याचा शोध केला, पण तो कोठे दिसला नाही. तेव्हां मुलांनी परत येऊन सगर राजाला ते वर्तमान सांगितले. तेव्हां राजाने रागाने मुलांना पृथ्वी खणून अश्व कोठे लपला हे आहे हुडकून काढायला सांगितले.

सगरपुत्रांनी सर्व पृथ्वी खणून काढली. पाताळ लोकात एका जागी कपिल मुनी तपश्चर्या करीत असलेले दिसले. त्यांच्या पाठीमागे बांधलेला यज्ञाचा अश्व पाहून सगरपुत्र चकित झाले. त्यांना वाटले की या ऋषीनेच घोडा चोरून आणून ठेवला असावा. ते घोड्याला आणायला पुढे गेले. तेव्हां कपिल मुनींची समाधि भंग झाली आणि रागाने त्यांनी सगरपुत्राकडे पाहिले मात्र एकाएकी ते सर्व भस्म होऊन गेले. ती गोष्ट सगर राजाला नारद मुनींकडून कळली. तेव्हां सगर राजाने असमंजसचा मुलगा अंशुमान याला यज्ञाचा अश्व आणायला पाठविले.

अंशुमान कपिल मुनी तपश्चर्या करीत होते तेथे गेला आणि तेथे कपिल मुनी समोर हात जोडून उभा राहला. कपिल मुनींनी तपश्चर्या संपल्यावर अंशुमानला हात जोडून उभा असलेला पाहून विचारले– "तुला काय पाहिजे?" अंशुमानने नम्रपणे अश्व मागितल्यावर कपिल मुनी म्हणाले– "वत्स! तू यज्ञाश्व घेऊन जा आणि आपल्या आजोबांना सांग, तुझ्या चुलत्यांनी











उर्मटपणा केला म्हणून माझ्या कोपाग्नीत ते भस्म झाले."

अंशुमान नम्रपणे म्हणाला–"मुनिवर्य! माझ्या मृत पितरांच्या उद्धाराचा काही उपाय सुचवावा!"

"यांना जन्म जन्मांतराने देखील पाप मुक्ती नाही. परंतु तुझ्या नातवाच्या हाती यांना नक्कीच मुक्ती मिळेल." कपिल मुनी म्हणाले. त्यानंतर अंशुमान यज्ञाचा अश्व सोडवून घेऊन आपल्या आजोबांकडे आला. सगर राजाने अश्वमेध यज्ञ करून अंशुमानला आपला वारस केले.

राज्याभिषेक झाल्यावर अंशुमानला आपल्या पितरांच्या उद्धाराची काळजी वाटू लागली. एकदा गरुडाने येऊन त्याला सुचविले की गंगा नदी जर पितरांच्या चितेवरून वहात गेली तर त्यांना नक्कीच मुक्ती मिळेल."

गंगेला पृथ्वीवर आणण्यासाठी अंशुमानने त्यांचा मुलगा दिलीप याला युवराजपद दिले आणि स्वत: जंगलात जाऊन तपश्चर्या करू लागला. परंतु त्याची तपश्चर्या पूर्ण होण्यापूर्वीच त्याला मरण आले.

त्यानंतर दिलीपचा मुलगा भगीरथ ब्रह्मदेवाचे स्मरण करून तपश्चर्या करू लागला. तेव्हां ब्रह्मदेव त्याला दर्शन देऊन म्हणाला–"तुझ्याकडून धर्मपालन सर्वदा होत राहील व तुझे सर्व आयुष्य सुखी होईल."

नंतर भगीरथाने गंगेचे स्मरण करून तपश्चर्या सुरू केली. गंगेने भगीरथाला दर्शन देऊन व त्याचा मनोरथ ओळखून विचारले–"मी स्वर्गातून पृथ्वीवर उतरून येईन तेव्हां मला धारण करणे कोणाला शक्य आहे? पृथ्वीला माझ्या वेगाने फार फार मोठे भोक पडेल व ते पाताळ लोकांपर्यंत जाईल."

तेव्हां भगीरथ म्हणाला–"माते! विश्वंभर असा महादेव तुला धारण करू शकेल. मी त्याला प्रसन्न करून माझ्यावर कृपा करण्यास विनंती करीन."





गंगेने भगीरथाला विचारले–"मी पृथ्वी-वर उतरले तर सर्व पापी जीवांचा उद्धार होईल. परंतु त्या सर्वांची पापे धारण केल्यावर माझा उद्धार कसा होईल?"

"माते! पापी जीवाबरोबर पुण्यवान लोकदेखील तुझ्या प्रवाहात स्नान करतील व तुझे सर्व पाप धुवून निघेल व तू पाप-मुक्त होशील." भगीरथ म्हणाला.

"ठिक आहे! तरमग मला आपल्या शिरावर धारण करण्यास शंकराचे मन वळव." असे सांगून गंगा अंतर्धान पावली.

त्यानंतर गंगा अवतरली आणि शंकराने तिला आपल्या शिखेत धारण केले. भगीरथ वायुवेगाने रथात बसून पुढे निघाला आणि त्याच्या पाठोपाठ गंगा सगरपुत्रांच्या चिते-वर वाहू लागताच त्यांचा उद्धार झाला. जेथे सगरपुत्रांचे भस्म होते तेथे जे पाणी एकत्र जमले त्याला सागर.नाव पडले व भगीरथ गंगेला पृथ्वीवर घेऊन आला म्हणून तिचे नाव भागीरथी पडले.

स्वयंभू मनूच्या काळातील ही गोष्ट आहे. लागोपाठ साठ वर्षे पाऊसच पडला नाही आणि दुष्काळामुळे हा:हाकार उडून गेला. माणसे पटापट मरू लागली आणि जिकडे तिकडे मेलेली जनावरे पडलेली दिसू लागली. तेव्हां सृष्टीकर्त्या ब्रह्मदेवाने पुन्हां सृष्टी स्थिर करण्याचा मनाशी निश्चय केला.

मनुवंशात जन्मलेला रिपुंजय नावांचा एक अद्‌भूतगुण संपन्न असा क्षत्रिय वीर होता. ब्रह्मदेव त्याला म्हणाला–"बाळा! मी तुला या सर्व जगाचा अधिपति नेमतो. तू दिवोदास ही उपाधि धारण करून या सर्व पृथ्वीवर राज्य कर. वासुकीची मुलगी अनंगमोहिनीशी तुझा विवाह होईल."

ते ऐकून रिपुंजय ब्रह्मदेवाला म्हणाला–"आजोबा! मला एक वर आपण देऊ शकलात तर ही सर्व जबाबदारी मी आनं-दाने शिरावर घेईन. भूलोकात पाताळ किंवा स्वर्गलोकातला कोणी येऊन राहता कामा नये!"

ब्रह्मदेवाने तो वर मान्य करून काशी विश्वेश्वराला ती गोष्ट कळविली. विश्वे-श्वराने रिपुंजयचा राज्याभिषेक करून दिला आणि कैलास लोकी निघून गेला. रिपुंजय 'दिवोदास' ही उपाधी धारण करून राज्य करू लागला. त्याने देव किंवा दानव कोणी पृथ्वीवर रहायला परवानगी नसल्याची दवंडी पिटविली.

दवंडी ऐकून देव काशी विश्वनाथाकडे आले. त्यांना शंकर म्हणाला–"ब्रह्मदेवाने मला विचारूनच दिवोदासला वर दिला होता. आपण मंदर पर्वतावर जाऊन राहू या."

जगात देवाचे नाव उठले नाही. दिवो-दासने काशी येथे आपली राजधानी स्थापन करून आठ हजार वर्षे निर्विघ्न राज्य केले. दीर्घकालपर्यंत या पृथ्वीवर रहात होते ते दिवोदासच्या आज्ञेप्रमाणे राहू लागले.

अगदी असह्य झाले तेव्हां देवांनी आपले गुरू बृहस्पती याला विचारले–"गुरुवर्य! दिवोदासला राज्यभ्रष्ट कसे करावयाचे हे सांगण्याची कृपा करावी!"

बृहस्पती म्हणाला–"अग्नी, वायु व वरूण आपल्यापैकीच तर आहेत त्यांनी आपापली शक्ति मागे घ्यावी. म्हणजे पृथ्वीवरचे जिवन अस्तव्यस्त होऊन जाईल प्रथम अग्नीने असहकार करावा."



काशीत कोठेच चूल पेटली नाही. दिवोदासला सूर्यप्रकाशाच्या मदतीने अन्न मिळाले. दिवोदासच्या भोजनाची व्यवस्था झाली. परंतु प्रजा उपाशी होती. ती गोष्ट ऐकून दिवोदास म्हणाला–"हा सर्व गोंधळ देवांनी केलेला आहे. तुम्ही भिण्याचे मुळीच कारण नाही. मी तपोबलाने तुम्हांला अग्नी वायु व वरूण यांची प्राप्ती करून देतो." असे सांगून त्याने त्याप्रमाणे करून ही दाखविले. देवांच्या माना खाली झाल्या.

परंतु शंकराला काशी सोडून जावे लागले याचे त्याला फार वाईट वाटत होते. दिवोदासाचे राज्य नष्ट व्हावे असे त्याला वाटू लागले. त्याने चौसष्ट योगिनींना







बोलाविलें व म्हणाला–“तुम्ही वेष पालटून काशीला जा आणि तेथील स्त्रियांचे पातिव्रत्य भंग होईल व पुरुषाची धर्मबुद्धी नष्ट होईल असे काहीतरी करा. त्या शिवाय दिवोदास भ्रष्ट होणार नाही.”

चौसष्ट योगिनींनी शंकराच्या आज्ञेप्रमाणे केले. परंतु शंकराने सांगितलेले काम मात्र पूर्ण झाले नाही. तेव्हां शंकराने सूर्याला काशीला जाऊन दिवोदासला धर्मच्युत करण्यास सांगितले.

सूर्य निरनिराळे वेष धारण करून दिवोदासच्या हातून कोठे काही धर्मलोप होतो आहे कां? हे फार बारकाईने पाहू लागला. दिवोदाच्या हातूनच काय, त्याच्या प्रजेच्या हातून ही पापकार्य घडलेले सूर्याला दिसले नाही. काम पुरे झाल्याशिवाय जाणें बरे वाटले नाही म्हणून सूर्यसुद्धा काशीलाच राहिला.

त्यानंतर शंकराने ब्रह्मदेवाला पाठविले. म्हणाला–“मी दिवोदासाचे पतन व्हावे ह्या हेतूने चौसष्ट योगिनींना आणि त्यानंतर सूर्याला पाठविले पणकाम पुरे न झाल्यामुळे सर्वच काशीला अडकून राहिले आहेत. तेव्हां आता तू जा.”

ब्रह्मदेव वृद्ध ब्राह्मणाचे रूप घेऊन काशीला दिवोदासच्या दरबारात गेला. त्याने राजाला आशीर्वाद दिला व म्हणाला–“आपली अनुज्ञा असेल तर यज्ञकार्य सुरू करावे म्हणतो. परंतु काशीला विश्वेश्वरच नाही म्हणून काशी नगराचा ह्रास होत आहे. शंकराचे आवाहन करणें बरोबर होईल.”

दिवोदास काहीच बोलला नाही. ब्रह्मदेवाने दहा अश्वमेध यज्ञ केले आणि शेवटी हार मानून काशी येथेच राहू लागला.

ब्रह्मदेव परत न आलेला पाहून शंकराने भूतगणांना पाठविले. परंतु ते ज्या कामासाठी आले होते नेमके तेच काम विसरून गेले त्यांच्यापैकी कपर्दी नांवाच्या एका प्रमुखाने कपर्दीश्वर लिंगाची प्रतिष्ठा केली व तेथेच राहू लागला.





# किंमत

उदयगिरीचा राजा उदयसेन फार मोठा धर्मात्मा होता. त्याने आपल्या राज्यातील सर्व लोकांकरीता अनेक सुखसोई उपलब्ध केल्या होत्या. कामधंदा दिला होता. त्यामुळे कोणावरही आर्थिक संकट येत नसे. ह्याकारणाने राज्यातील याचक वृत्ती आपोआप कमी झाली. परंतु जे लोक कामधंदा करण्याच्या स्थितीत नव्हते ते मात्र भीक मागून आपले पोट भरीत असत.

त्या राज्यातील भिकाऱ्यामध्ये एक तरुण होता. तो जेव्हां मोठा झाला तेव्हां पासून तो भीक मागूनच पोट भरू लागला. पण गावात हळूहळू भिकाऱ्यांना सुद्धा कोणी भीक देईनासे झाले. त्यामुळे भीक मागणे सुद्धा एक कठीण काम झाले.

एकदा त्याला सकाळपासून दुपारपर्यंत कोणीच काही भीक घातली नाही त्याला कडकडून भूक लागली. तशा अवस्थेतच तो एका झाडाच्या सावलीत बसून राहिला व रस्त्याने जाणाऱ्या येणाऱ्याकडे हात पसरून भीक मागू लागला. त्याच्याकडे कोणी ढुंकूनही पाहिले नाही. तेव्हां त्याने विचार केला की, जर देवाचे नाव घेतले तर बहुदा लोकांना आपली दया येईल. असे समजून तो जोरजोरान ओरडू लागला–“हे देवा, ह्या गरीबाला थोडी भीक दे! हे दयाळू परमात्मा, भुकेलेल्याला एक चतकोर भाकरी दे!”

त्याच्याकडे कोणी लक्ष दिले नाही. ओरडून ओरडून त्याच्या घशाला कोरड पडली, तेव्हां त्याला देवाचा अतिशय राग आला व तो देवाला शिव्या हासडू लागला–“अरे ऐ देवा, तू काय मेलास काय? जो जन्माला घालतो तो खायलाप्यायला पण घालतो असे म्हणतात. मग तू मला जन्माला








घातलेस मग खायला कां घालीत नाहीस मर तुझ्या आईची कुस जळो!"

त्याचवेळी राजा घोड्यावर बसून राजमार्गाने फेरफटका मारण्यास निघाला होता. जाताना त्यानें भिकाऱ्याचे बोलणें ऐकले व घोड्याला थांबवून तो घोड्यावरून खाली उतरला व त्याने भिकाऱ्याला विचारले–"अरे बाबा सांग, तू कोणाला शिव्यागाळ करीत आहेस!"

"कोणाला काय विचारता? त्या भिकारड्या देवाला!" भिकाऱ्याने ठसक्यात उत्तर देत म्हटले.

"अरे बाबा, देवाची पुजा करावयाची निंदा नाही. देवानी तुझ्यावर काय अन्याय केला आहे?" राजाने विचारले.

"अजून काय करण्याचे बाकी आहे? सकाळपासून मी भुकेला तडफडतो आहे. पण कोणी भीक सुद्धा घालीत नाही!" भिकाऱ्याने चिडून उत्तर देत म्हटले.

"अरे, तुला जर खायला पाहिजे असेल तर मी तुला देईन. मी ह्या देशाचा राजा आहे. तू जर तुझा एक हात मला कापून देशील तर मी तुला एक हजार रुपये देईन. नाहीतर एक पाय कापून देशील तर दोन हजार रुपये देईन आणि जर कां तू तुझे डोळे काढून देशील तर मी तुला अर्धे राज्य सुद्धा देईन" राजा म्हणाला.

"तुमचे पैसे मला नको. मी तुम्हांला काही देणार नाही" भिकारी म्हणाला.

"म्हणजे ह्याचा अर्थ तू खूप भाग्यवान आहेस कारण तुझ्याकडे एक हजार किमतीचे हात, दोन हजारा किमतीचे पाय व अर्ध्या राज्यापेक्षा अत्यंत मौल्यवान असे डोळे आहेत. मग एवढ्या किमती वस्तू तुला देवांनी दिल्या असताना तू देवाची भक्ति करण्याऐवजी त्यांची निंदा करतोस–"अरे गाढवा, मूर्खा जा. देवांनी दिलेल्या ह्या किमती वस्तूचा उपयोग करून पोट भर आणि यापुढे कधी भीक मागू नकोस" अशा प्रकारे रागावून राजा गेला.

त्या दिवसापासून भिकाऱ्याने भीक मागणे सोडून दिले व स्वकष्टाने पोट भरू लागला.





# भिड्डा मांत्रिक

**भी**मराज नावाचा एक चोवीस वर्षाचा तरुण होता. त्याच्यापाशी संपत्ती म्हणून एक पैसा देखिल नव्हता. परंतु कचेरीत तो चांगल्या पदावर नोकरीला होता. एकदा तो कचेरीच्या काही कामाकरीता शेजारच्या गावात गेला व काम संपल्यावर संध्याकाळच्या सुमारास घरी परत आला. तेव्हां नोकराने त्याला निरोप दिला की, डोंगरावर असलेल्या देवळात वीणावतीने भेटावयास बोलावले आहे.

वीणावती तिच्या वडिलांची एकुलती एक मुलगी होती भीमराजच्या शेजारीच त्यांचे घर होते. वीणावतीच्या वडिलांनी त्या दोघांच्या लग्नाला पूर्वीच संमती देऊन ठेवली होती. त्यामुळे भीमराजला अत्यंत आश्चर्य वाटले की, जर का वीणावतीला गोष्ट सांगावयाची असती तर तीने घरीच सांगावयास हवी. असे असतांना देवळात का बरे बोलावले?

भीमराजला लांबून येत असतांना पाहूनच वीणावती डोंगरा जवळच्या एका खडकावर बसलेली उठली व भीमराजच्या जवळ आली. भीमराजने मंदहास्य करीत तिला विचारले–"काय काही खास गोष्ट आहे कां? तुझ्या वडिलांनी आपल्या लग्नाचा मुहूर्त तर पक्का केला नाही?"

वीणावती आपले दुःख आवरीत त्याला म्हणाली–"हो, हो परवाच लग्नाचा मुहूर्त नक्की झाला आहे. परंतु नवरदेव तुम्ही नाहीत दुसराच कोणीतरी आहे.

भीमराजने आश्चर्यचकित होत विचारले–"सांग खरे काय आहे?"

वीणावती सर्व खुलासा करीत त्याला म्हणाली–"काल अचानक माझ्या वडिलाचे बालपणचे स्नेही आमच्या घरी येऊन टपकले. असे समजले की, त्यानी नौकाव्यापार करून लाखो रुपये कमावले आहेत

मेधना दाते



त्याच्या सोबत त्याचा मुलगा सुद्धा आला होता. त्याने मला पाहून पसंत केले. शुभ मुहूर्त तावडतोब निघाला. त्यामुळे माझ्या वडिलानी त्या तरुणा बरोबरं माझे लग्न लावून द्यायचे त्याना वचन दिले.

ते सर्व निघून गेल्यानंतर मी त्या तरुणा बरोबर लग्न करण्यास स्पष्ट नकार दर्शविला. तेव्हां मला वडिल खूप रागावले व म्हणू लागले–"मूर्ख मुली, गप्प बस, त्या भीमराजच्या जवळ फुटकी कवडी नाही. मी असे कित्येक लोक पाहिले आहेत की जे कचेरीत नोकरी करीत आपले आयुष्य फुकट घालवतात. माझ्या मित्राकडे लाखांने पैसा आहे. तरी तू माझे म्हणणे ऐकले नाहीस तर मी घर सोडून दूरदेशी निघून जाईन."

ते ऐकताच भीमराजला स्वतःच राग आवरता आला नाही. तो संतापाच्या भरात म्हणाला–"असे आहे का! थांब तुझ्या वडिलांशीच ह्याविषयी मी बोलतो.

वीणावती निराशेने मान हलवित म्हणाली–"तुम्ही असे काही करू नका. माझे वडील शीघ्रकोपी व हट्टी आहेत. आणि खरोखर काही वादविवाद झाला. तर ते खरेच घर सोडून निघून जातील." असे म्हणून ती घराच्या दिशेकडे वळून रडत चालू लागली.

ह्या गोष्टीने भीमराज अत्यंत व्याकुळ झाला. त्याने त्या दिवशी अंधार झाला तरी घरी परत न जाण्याचा मनाशी निश्चय केला व तेथील एका उंचवटयावर बसून राहूला पण अचानक दचकून तो उठून उभा राहीला व डोंगराच्या पलीकडे उतरून चालू लागला.

डोंगराच्या पलीकडे घनदाट जंगल पसरलेले होते. बऱ्याच लोकांचा विश्वास होता की, त्या जंगलात रानटी माणसांचे वास्तव्य आहे व ते स्वभावाने अत्यंत कुर आहेत. भीमराज डोंगर उतरून थोडया लांबपर्यंत चालत गेला. तेव्हां त्याला एक अनोळखी आवाज स्पष्ट ऐकू आला–"कोण आहे तो? ते ऐकताच थबकून तो तेथेंच उभा राहीला.

दोन रानटी माणसे हातातील तळपते भाले उगारीत त्याच्या जवळ आले. त्यांनी त्याला अडवित विचारले–"मी भयंकर संकटात सांपडलो आहे. त्यामुळे एखाद्या रानटी श्वापदाच्या तोंडी बळी जाण्याच्या इच्छेने ह्या जंगलात आलो आहे.

ते उत्तर ऐकताच ती रानटी माणसे आश्चर्यचकीत झाली. नंतर थोडया दूर-वर जात त्यांनी एकमेकांशी सल्लामसलत केली व भीमराजजवळ येत त्याला म्हणाले–"संकटात जर कोणी सांपडला असेल तर त्याच्यावर आम्हांला दया येते. इथे भूतांचा एक पहाड आहे. तेथे अनेक भुते वास्तव्य करतात. ती आम्हा रानटी लोकांना नेहमी त्रास देतात. त्यावेळी एक गिड्डा मांत्रिक आला व त्याने आमचे सर्वांचे रक्षण केले. तू त्याला तुझे संकट सांग. तो बहुदा ते दूर करण्याच्या कामी तुला मदत करेल. असे म्हणून भीमराजला ती जंगली माणसे गिड्डया मांत्रिकापाशी घेऊन गेली.

गिड्डा मांत्रिक झोपडीच्या बाहेर एक शेकोटी पेटवून त्याच्या समोर बसला होता. त्याने भीमराजला पहाताच विचारले–"बऱ्याच वर्षांनी माझा शोध काढत आलेला तू कोण आहेस रे!"

"दादा, मी मोठ्या संकटात सांपडलो आहे." असे म्हणत तो त्याच्या समोर मांडी ठोकून बसला.





मांत्रिकाने शेकोटी मधून धकधक् जळणारी एक काटकी उचलून घेतली व त्याच्या उजेडात भीमराजचा चेहरा नीट निरखून पहात त्याला विचारले–"सांग, तुझे संकट तरी असे काय आहे ?"

भीमराजनें आपली अडचण सांगितली व व म्हटले–"जर कां वीणावती बरोबर माझे लग्न झाले नाही. तर हा भूतांचा डोंगरच काय तो माझा पण सोबती होईल. परवा एका दुसऱ्या तरुणाचे वीणावती बरोबर लग्न होणार आहे. ते लग्न थांबवायला पाहीजे. तिच्या बरोबर माझे लग्न व्हावयास हवे. ह्याकरीता तू आपल्या मंत्रतंत्राचा प्रयोग करून मला मदत कर.

तत्क्षण गिड्ड्या मांत्रिकाने त्या जळत्या काटकीवर हात धरला ती काटकी आपोआप विझली. नंतर त्याने त्यावर कमंडलूतील पाणी शिपडले. तेव्हां त्यातून काळा कोळसा तयार झाला.

मांत्रिकाने त्यातील एक कोळशाचा तुकडा हातात घेऊन आपल्या कपाळावर टेकवला व काही मंत्र तोंडाने पुटपुटले व तो कोळसा भीमराजच्या हातात देत त्याला म्हणाला–"तू ज्या तरुणी बरोबर लग्न करू इच्छितोस त्या तरुणीच्या हातात हा कोळसा देऊन तीला तो चावून चावून गिळायला सांग जसा गुळ चावून खातात.

भीमराज मांत्रिकाला काही विचारणार तितक्यात मांत्रिक उठून झोपडीच्या आत जाता जाता त्याला म्हणाला–"अरे माझ्या जावया. मला उगाच काही प्रश्न विचारून डोके फिरवू नकोस जा चालू पड.

भीमराज कोळशाचा तुकडा घेऊन घरी आला. व वीणावतीच्या घरी गेला. तिच्या झोपण्याच्या खोलीच्या खिडकिवर त्यानें टकटक केली.

भीमराजने दबत्या आवाजात तिला सांगितले–"तू मला आत्ता काही एक विचारू नकोस. फक्त हा कोळसा चावून गिळून टाक." असे म्हणून त्याने कोळशाचा तुकडा तिच्या हातात दिला.

वीणावतीने होकारार्थी मान हलविली. तेव्हां भीमराज संतोषाने आपल्या घरी परत आला. सकाळी वीणावतीला उठवण्यास एक बाई आली व तिचा चेहरा पाहून तिने भीतीने किंकाळी फोडली. कारण वीणावतीचा गोरापान चेहरा काळाकुट्ट कोळशा सारखा झाला होता.

ही बातमी झंझावातासारखी सर्वगावभर पसरली. नवऱ्यामुलाकडची माणसे ती गोष्ट ऐकून वीणावतीला पहावयास तिच्या घरी आली. आणि ते पाहून असे म्हणू लागली–"हे काय बुवा विचित्र ? ही मुलगी आम्हांला नको बुवा. ही तर रंग बदलणारी भुतांच्या जातीतील वाटते.

वीणावतीचा बाप डोके बडवून घेऊ लागला. बराच वेळ डोके बडवून सुद्धा त्याला समजले नाही हे कसे काय झाले ? आता कितीका हुंड्याचा लोभ दाखवला तरी सुद्धा माझ्या मुलीला कोणी पसंत करणार नाही. तिच्या बरोबर लग्नाला तयार होणार नाही.

त्यानंतर त्याने कचेरीत जाणाऱ्या भीमराजला अडवत म्हटले–"बाळ, मला माहीत आहे की, तुझे वीणावतीवर जिवापाड प्रेम आहे. तिच्यावर कोणी मंत्रतंत्र टाकला आहे. उद्या तिच्या लग्नाचा मुहूर्त आहे. तेंव्हा माझ्या मुली बरोबर विवाह करून तू माझी लाज राख.



"जसे आपण सांगता तसे, मला तर काही वाटत नाही" भीमराजने उत्तर देत म्हटले.

ते बोलणे ऐकताच वीणावती ओक्स बोक्सी रडू लागली व म्हणाली–"भीमराज माझ्या सारख्या कुरूप मुली बरोबर लग्न करणें तुम्हांला योग्य होणार नाही.

भीमराज तोंडातल्या तोंडात हसत गप्प राहिला नंतर पुन्हां त्या रात्री त्या गिड्ड्या मांत्रिका पाशी गेला. भीमराजला पहाताच मांत्रिक अत्यानंदाने पुढे येत त्याला विचारू लागला–"काय जावईबापू, आमची योजना काय सफल झाली नां ?

"कां नाही ? वरपक्षाकडील लोक तिला पाहून गेले. उद्या वीणाच्या बरोबर माझे

लग्न होणार आहे. काल तुम्ही जो मंत्र फुंकला त्याचे रहस्य मला परत सांगा."

"काय मंत्र सांगू ? माझ्या पाशी कोणता मंत्र नाही" मांत्रिक म्हणाला.

भीमराज चकित होऊन म्हणाला– "मग काय वीणावती आयुष्यभर काळचा रंगाची राहील काय ?

"मग काय ? पण तू तर तिच्यावर खुप प्रेम करतोस ना ? मग तर ती बदलली नाही. तिचा फक्त रंगच काय तो बदलला. तू एखादी सुंदर तरुणी पाहून तिच्याशी लग्न करून टाक" मांत्रिक म्हणाला.

भीमराज मांत्रिकाचे बोलणे ऐकून दुःखी झाला व म्हणाला–"वीणावती कुरुप झाली म्हणून मी तिच्या बरोबर लग्न करणार नाही. असे नाही. वीणावती स्वतःच कुरुप बनल्यामुळे माझ्याशी लग्न करण्यास तयार नाही. तू मंत्र घालून दिलेला तो कोळसा मला दे. मी तो चावून खाईन मग आम्ही दोघें एकरंगाचे होऊ.

"अरे जावईबापू, तुझे प्रेम अगाध आहे. ह्याची परिक्षा घेण्याकरीताच मी ही गोष्ट तुला सांगितली होती." असे म्हणत गिट्टुचा मांत्रिकाने जवळच असलेल्या टोपलीतून एक पेरू काढला व त्यावर मंत्र टाकून तो भीमराजच्या हातात दिला व म्हणाला–"हे फळ वीणावतीने खाल्ले की, तिचा पूर्व रंग तिला प्राप्त होईल."

भीमराज फळ हातात घेऊन म्हणाला– "आम्ही दोघे लग्नानंतर केव्हांही तुमच्याकडे येऊ तुमचे उपकार मी जन्मात विसरणार नाही. दादा !

तेव्हां तो गिट्टा मांत्रिक भयंकर संतापला व त्याला म्हणाला–"तू मला व मी केलेल्या उपकाराला विसरून जा. ऐक माझ्या बद्दल कोणाला काहीही सांगू नकोस.

भीमराज घरी परत आला व मांत्रिकाने दिलेला पेरू त्याने वीणावतीला दिला. पेरू खाताच तिला पूर्व रंग प्राप्त झाला.

दुसऱ्या दिवशी भीमराजच्या जवळ विवाह स्थळी गोऱ्यापान वीणावतीला पाहून तिचा पिता व इतर सर्व मंडळी आश्चर्यचकित होऊन पाहू लागली.



# उतावळेपणा

सुरेंद्र नावाच्या एका राजाने आपल्या मुलाला श्रीकर्ण नावाच्या गुरूंपाशी विद्याभ्यास करण्यास पाठवले. एका वर्षाने राजा गुरुकुलात आपल्या मुलाला व पाठशाळेला भेट देण्याच्या इच्छेने गेला. त्याने आपल्या मुलांच्या शिक्षणा संबधी काही माहीती विचारली व त्याच्या बोलण्यावर राजा असंतुष्ट झाला.

ते बोलणे ऐकून त्याने गुरुदेवांना विचारले–"गुरुवर्य, काय आपण राजकुमाराचे लवकरात लवकर शिक्षण पूर्ण करण्याची काही सोय करता का ? ह्यांचे शिक्षण दोन-चार वर्षांच्या आत पूर्ण झाले तर उत्तम होईल.

त्यावर श्रीकर्णांनी त्यांच्या पाठशाळेच्या कामाकरीता मागवलेल्या विटा व लाकडे वगैरे साहित्य दाखवित राजाला म्हटले–"महाराज, ह्या कच्च्या मालाचा उपयोग करू सुंदर महाल बनविण्यास कमीत कमी एक वर्ष तरी लागते. परंतु एखादी झोपडी उभी करण्यास चार पाच दिवस पुरतात. परंतु यापूर्वी आपण असा निर्णय घ्यावयास हवा. की आपली घडण, रहाणी ह्या करीता महाल योग्य की, झोपडी.

हे उत्तर ऐकताच राजाला आपली घाई समजून आली. त्यांनी त्याच क्षणी श्रीकर्णांना सांगितले की, इतर विद्यार्थ्यांना जसे शिक्षण दिले जाते तसेच राजकुमाराला पण देण्यात यावे असे सांगून राजा राजधानीत परत गेला.





# चाणक्याची गोष्ट

(मागील अंकावरून पुढे चालू)

चाणक्य व चंद्रगुप्ताने नंदाच्या राज्यावर अधिकार गाजवला व त्याची सारी धन संपत्ती समान रूपाने वाटून घेतली. त्याच्या महालात एक दासी होती. तिला विष खाण्याची सवय होती पर्वतकाने स्वत:करीता त्या दासीची मागणी केली. चाणक्याने त्या गोष्टीला मंजूरी दिली. पर्वतकने अग्नीला साक्षी करून त्या दासीचे पाणीग्रहण केले. तिच्या हातातील घामामुळे तिचे विष पर्वतकच्या शरीरात भिनून गेले. तो किंचाळून धाडकन खाली पडला. खाली पडता पडता त्याने वैद्याला बोलावून आणावे म्हणून सांगितले. तेव्हां चंद्रगुप्ताने वैद्यांना बोलावण्याकरीता माणसाला धाडले तेवढ्यात चाणक्याने त्याला अडवीले.

बरोबर त्याच वेळी अर्धे राज्य प्राप्त करणाऱ्या पर्वतकला वैद्य न मिळाल्यामुळे औषधोपचारा अभावी प्राणास मुकावे लागले. त्यामुळे त्याचे अर्धेराज्य सुद्धा चंद्रगुप्तला मिळाले.

अशा प्रकारे नंदाचा राज्यकारभार संपुष्टात आला. परंतु त्याचे अनेक अनुचर अनेक प्रकारे राज्यात अराजकता माजवू लागले. त्यांच्यावर नियंत्रण करून मानसिक क्षमता टिकवून ठेवणारा एक कोष्टी चाणक्याच्या दृष्टीस पडला. तो जिथे जाळे विणेल तेथे आग पडत असे. त्यामुळे त्याने लवकरच अराजकता पसरवणाऱ्यां लोकांचा नायनाट केला. त्याच्या बद्दल चाणक्याच्या मनात गाढ विश्वास निर्माण झाला.

चंद्रगुप्तला राज्य प्राप्त झाले. परंतु त्याचा खजिना मात्र रिकामा होता. त्या कमतरते साठी चाणक्याने नकली फांसे खेळून सर्व सोने लावण्याचा बहाणा केला व द्युत जिंकून अनेक संपत्ती मिळवली पण राज्याचा खजिना अशा तऱ्हेने भरणे अशक्य होते. चाणक्याने युक्तिने राज्यातील अनेक श्रीमंत धनवान लोकांना आमंत्रित केले व त्याना जबरदस्त मद्यपान करवून ते लोक जेव्हां नशेत मग्न होते तेव्हां त्यांना अशा आशयाचा एक श्लोक सांगितला की, राजाला आपल्या हातातील खेळी कशा तऱ्हेने बन-वावे मग काय ! दुसऱ्या क्षणाला प्रत्येक जण आपापल्या संपत्तीच्या बढाया मारू लागला. ते ऐकून चाणक्याने प्रत्येकाचा खजिना लूटला व राज्याच्या खजिन्यात भरला.



चंद्रगुप्तच्या राज्यात एकदा भयंकर दुष्काळ पडला. राज्यातील जैन भिक्षुकांना भिक्षा मागणे दुर्लभ झाले. त्यांच्या सुस्थित गुरूनीं आपल्या शिष्यांना सल्ला दिला की, त्यांनी हे नगर सोडून दुसरीकडे कोठेतरी निघून जावे व तेथे भिक्षा मागून आपले आयुष्य घालवावे. त्यावर बहुतेक करून सर्व जैन संन्यासी नगर सोडून निघून गेले. परतु त्यातील दोन शिष्य आपल्या गुरूनां सोडून जाण्यास तयार होईनात. त्यांनी आपल्या खाण्यापिण्याकरीता एक युक्ती केली त्यांना अशा प्रकारचे एक अंजन ठाऊक होते. ते जर डोळ्यात घातले तर माणूस अदृश्य होतो त्या-प्रमाणें ते दोघे अंजन घालून नेहमी चंद्रगुप्तच्या महालात भोजन समयी जात त्याच्या बरोबर जेवून परत निघून येत.

थोडे दिवस असेच लोटले. चाणक्याने एके दिवशी विचार केला की, दिवसेदिवस चंद्रगुप्त असा अशक्त का होत आहे ? त्याचे काय कारण असावे ?

"चंद्रगुप्तला सुद्धा काय कारण असावे समजत नव्हते स्वयंपाकी त्याला व्यवस्थित भरपुर जेवण वाढत पण सर्व त्याला पोटात गेल्यासारखे वाटत नसे." चंद्रगुप्तने सांगितले.

चाणक्याला वाटू लागले की, कोणी अदृश्य स्वरूपात येऊन चंद्रगुप्तचे जेवण



चोरून घेऊन जात असावा त्या गोष्टीचा शोध काढण्याकरीता दुसऱ्या दिवशी चाणक्याने सर्व स्वयंपाक घरात एक मऊ पावडर पसरून ठेवली. चंद्रगुप्त जेऊन उठल्यानंतर इतर दोघांच्या पायाच्या खुणा त्या पावडर मधे स्पष्ट दिसून आल्या.

दुसऱ्या दिवशी चंद्रगुप्त जेव्हां जेवावयास बसला तेंव्हा चाणक्याने तिखटाची धुरी सर्व खोलीभर पसरवली. त्यामुळे त्या दोघांच्या डोळ्यात पाणी येऊन ते अंजन निघून गेले व ते दोघे सदृश्य झाले व इतर लोकांना दिसले. त्यांना पाहून सर्व लोक चकित झाले. चाणक्याने त्या जैन संन्याशाना नमस्कार करीत तावडतोब परत धाडले. दुसऱ्यांनी खाल्लेले उष्टे आपण खाल्ल्यामुळे चंद्रगुप्तला अत्यंत दुःख झाले. तेव्हां चाणक्याने त्याला समजावत सांगितले जैन संन्याशाना भिक्षा देण्याने तुला पुण्य प्राप्त होईल. तरी सुद्धा चाणक्याने आचार्याकडे त्याच्या शिष्यांनी केलेल्या कार्याची तक्रार केली.

"चूक तर आपल्या नागरीकांची आहे. आपल्या भिक्षुकांना जर त्यानी भिक्षा घातली असती तर तशी पाळी आली नसती." असे आचार्यानीं उत्तर लिहून पाठविले. त्या दिवसापासून पाटलीपुत्र नगरात भिक्षुकांना रोजच्या रोज भिक्षा देण्याचा प्रबंध करण्यात आला.

चंद्रगुप्तावर काही जणांनी सूडभावनेने विष प्रयोग करण्यास सुरवात केली. त्या शंकेने चाणक्यानी रोज थोडे विष त्यांच्या अन्नात कालवून ठेवले. आणि त्या विषाने एक वेळ अशी आली की, त्या विषाचा प्रभाव त्याच्यावर बिलकुल होईनासा झाला. परंतु ही गोष्ट चंद्रगुप्तला माहीत सुद्धा नव्हती.

दुर्धरा गर्भवती होती. एक दिवस ती चंद्रगुप्तच्या जवळ बसली व चंद्रगुप्त खात असलेला फराळ ती खाऊ लागली. ते खाणे विष कालवून ठेवलेले होते, म्हणून ते खाताच ती तावडतोब मरण पावली त्याच क्षणी चाणक्य तेथे पोहोचला व ते संकट ओळखून त्याने मेलेल्या दुर्धराचे पोट चिरले व मुलाला बाहेर काढले पण त्याच वेळी एक विषाचा बिंदु त्या मुलाच्या शरिरात भिनून गेला म्हणून त्या मुलाचे बिंदुसार असे नामकरण करण्यात आले.

चंद्रगुप्तच्या मृत्यू नंतर चाणक्याने स्वतः बिंदुसारचा राज्याभिषेक करविला. परंतु तो जास्त काळ बिंदुसारचा मंत्री बनून राहला नाही. चाणक्याने सुबंधु नावाच्या एकास आश्रयास ठेऊन त्याला राज्यतंत्र शिकविले व आपला शिष्य बनवले. सुबंधुच्या मनात मंत्रीपद प्राप्तीची खूप इच्छा होती. त्यामुळे सुबंधुनी त्या बिंदुसारला सांगितले की, चाणक्यावर तू काडीचाही विश्वास ठेवू नकोस कारण की, त्यानेच तुझ्या आईचा गर्भ कापून काढला होता. बिंदुसारने त्या गोष्टीची चौकशी केली तेव्हां ती गोष्ट सत्य असल्याचे त्याला समजले त्यामुळे चाणक्याविषयी त्याच्या मनात द्वेष भावना निर्माण झाली.

आपल्या बद्दल दुसऱ्याच्या मनात द्वेष निर्माण करून दिला आहे हे समजल्यावर आपले भविष्य जाणून चाणक्याने वैराग्य घेण्याचे ठरविले. त्याने सुबंधुला क्षमा केली नाही. त्याचे पतन करण्याचा मनाशी



चंग बांधला त्यांनी भुर्जपत्रावर काही तरी लिहिले व ते एका सुगंधी पत्र्याच्या पेटीत ठेऊन ती पेटी एका पेटाऱ्यात ठेवून त्याला मोठ्या सावधगिरीने कुलूप लावले. त्यानंतर त्याने आपली सारी संपत्ती गरिबांना वाटून टाकली व नगराच्या बाहेर जाऊन तो एका पाचोळ्यावर बसून राहीला.

तेवढ्यात बिंदुसारला चाणक्या बद्दलची खरी वास्तविकता समजली व तो अत्यंत दुःखी झाला. त्याने धावत जाऊन चाणक्याकडे क्षमा याचना केली की, त्यांनी परत मंत्री पदाचा अधिकार घेऊन मदत करावी परंतु चाणक्यने आपला विचार बदलला नाही. बिंदुसारने परत राज्यात







येऊन आपला सारा राग सुबंन्धु वर काढला सुबन्धुने राजाकडे निवेदन करीत म्हटले की, मी निर्दोष आहे आणि चाणक्याचे मन बदलण्याचा मी प्रयत्न करेन ह्या आश्वासनाच्या आधारावर तो चाणक्याकडे गेला व केविलवाणे व विनयाने बोलत त्याने भस्नाच्या आत असलेल्या एका ठिणगीला पाचोळ्यात टाकून दिले. त्या ठिणगीने पाचोळ्यामधे धुमसत पेट घेतला आणि त्या ज्वाळामधे चाणक्य भस्म होऊन गेला.

बिन्दुसाराची परवानगी घेऊन सुबंधुने चाणक्याच्या घरात प्रवेश करून धनसंपत्ती शोधली. तेव्हां चाणक्याच्या एका पेटाऱ्याच्या आत एक छोटी डबी त्याला दिसली त्याने ती उघडून पाहिली तेव्हा एकदम् सुगंधी भपकारा आला. त्यात एक ताडपत्र त्याला दिसले सुबन्धुने विचार केला की, त्या पत्रात चाणक्याने संपत्तीचे रहस्य लिहून ठेवले असावे. परंतु ते वाचल्यावर तो आश्चर्य चकित झाला. त्या पत्रात असे लिहिले होते ज्याने संन्यासी जिवन कंठले नसले त्याने जर का हे द्रव्य हुंगले तर तो मरण पावेल. हे खरे किंवा खोटे ह्याची परिक्षा पहाण्याकरीता सुबंधुने एका माणसास पकडले व त्याला ते द्रव्य हुंगवले ते हुंगवताच तो माणूस तात्काळ मरण पावला.

ह्यानंतर बिन्दुसारने विषाचा प्रभाव कमी करण्याचा आतोनात प्रयत्न केला. परंतु त्याचा काही एक फायदा झाला नाही. सुबंधुने विचार केला की, आपली सुद्धा अशीच अवस्था होईल. म्हणून त्याने मंत्रीपदाचा त्याग केला व जैन गुरुकडे जाऊन संन्यास ग्रहण केला. इतर संन्यासी लोकांना ठाऊक होते की सुबंधुने मनापासून संन्यास घेतलेला नाही. त्यामुळे सर्वजण त्याचा अनादर करू लागले.

चाणक्या प्रमाणे षडयंत्र करण्याचा प्रभाव सुबंधुला प्राप्त झाला नाही परंतु चाणक्याने मरून सुद्धा आपल्या परस्पर्धीचा अशा तऱ्हेने बदला घेतला.





# टास्मानियातिल क्रुर प्राणि

ऑस्ट्रेलियाच्या आग्नेयदिशेकडे पसरलेले टास्मानिया बंदर शांत वातावरणामुळे शोभिवंत झालेले आहे. ह्याच बेटावर विचित्र क्रुर श्वापदे पहावयास मिळतात. टास्मानियाचे लांडगे डेविल, वाघरानमांजरे इत्यादींनी इथे आपले निवास स्थान केले आहे.

ह्या प्राण्यांमधे टास्मानियातील लांडगे आकाराने खूप मोठे आहेत. ते पहावयास साधेच वाटतात हे खूप दुर्मिळ आहेत. ते लांडग्यांच्या आकारापेक्षां थोडे लहान असतात. त्यांच्या अंगावर खूप केस असतात मादी आपल्या पिल्लांना आपल्या स्तनाच्या चारीबाजुला एक कातडी पिशवी सारखे लोंबत असते तेथे डकलून ठेवते व जेव्हां त्याना भूक लागेल तेव्हां दूध पाजत रहाते. पिल्ले थोडी मोठी होई पर्यंत तेथेच आईच्या स्तनापाशी रहातात. मादी पहाडातील गुहांमध्ये राहून फक्त रात्री भक्ष शोधण्याकरीता बाहेर पडते. ही जात एके काळी ऑस्ट्रेलियाच्या भुखंडात पसरलेली होती. परंतु हे प्राणी फक्त टास्मानियाच्या बेटावरच सापडतात.

स्तनाच्या चारीबाजूला व्याप्त असलेली पिशवी असणारा आणखी एक मुख्य प्राणि टास्मानिया बंदरात पहावयास मिळतो. तो म्हणजे डेविल. हा पहावयास पाणकुत्र्यासारखा दिसतो. मोठे डोके, रूंद स्तन त्याच बरोबर हे खूप शक्तिवान असतात. मोठे लांब कान सर्व अंग भर केस व काळे लालनिळे रंगाचे हे प्राणि डोक्यावर व अंगावर पांढरे ठिपके असलेले असे असतात. आपले भक्ष शोधण्याकरीता फक्त रात्र पडली की बाहेर निघतात. सुर्यप्रकाशात ह्यांना डोळ्यांना दिसत नाही. त्यामुळे हे दिवसभर अंधाऱ्या गुहेमधून बसून झोपून रहातात. ते अत्यंत क्रुर असतात. तरी उड्या मारीत इकडून तिकडे पळतात. त्यामुळे काही लोक ह्यांची पिल्ले पाळतात.

टास्मानिया येथे सर्वसाधारण सापडणारा प्राणी म्हणजे रानमांजर हे साध्या मांजराच्या आकाराचे असतात. ह्यांचे दांत मांजरी सारखेच असतात. परंतु तितके मजबूत असत नाहीत. ह्यांच्या लालनिळ्या रंगावर पांढरे पांढरे ठिपके असतात. छोटे कान लांब शेपटी आणि अंगभर केस असतात.



# चांदोबा

## मनोरंजनाबरोबर ज्ञानवृद्धी करणारे खास असे एकमेव मासिक

* चांदोबा आपल्याला पुराणातील व साहित्यातील उत्कृष्ट असे पैलू दाखवून देतो.
* योग्य तो दृष्टीकोन ठेऊन उभ्या जगतातील अद्भुत् व काव्य कथा सरळ शुद्ध शैलीत प्रस्तुत करतो.
* हलकेफुलके हास्य निर्माण करणाऱ्या व ज्ञानात भर पाडणाऱ्या व मनोरंजन करणाऱ्या अशा सुंदर गोष्टीचा संग्रह आपल्याला सादर करतो.
* आपल्याला पुराणातील गोष्टीचे वेचक ज्ञान प्राप्त करून देतो.
* हास्यपूर्ण प्रसंग व ज्ञानबोध करणारी शिर्षके याने आपल्या वाचकांचा उत्साह द्विगुणीत करतो.
* चांदोबा ह्या मासिकाने केवळ आपल्याच जीवनात नाही. तर आपल्या अनेक बंधु-भगिनी व मित्र-मैत्रिणी ह्यांच्याही जीवनात आपले स्थान पक्के केले आहे. त्यामुळे आपण आपल्या अत्यंत जवळच्या मित्रांना चांदोबा भेट द्या.

लहानाचे हे मासिक मोठयांच्या आनंदात सुद्धा भर घालते.

इंग्रजी, हिंदी, मराठी, तेलुगु, कानडी, तामिळ, गुजराथी, मल्याळम्, बंगाली, उडिया पंजाबी, असामी व संस्कृत

ह्या तेरा भाषांमध्ये चांदोबा छापला जातो. जो चांदोबा आपणास पाहिजे असेल त्याचे आजच वर्गणीदार व्हा.

**वार्षिक वर्गणी : ३०-०० रु.**

आपल्याला कोणत्या भाषेतील चांदोबा पाहिजे आहे ह्याचा उल्लेख करून खालील पत्त्यावर आपली वर्गणी पाठवा.

## डाल्टन एजन्सीज

## चांदोबातील नव...



### मंगळग्रहावर प्रवास

वीस वर्षापूर्वी वेर्नहर वानब्रान नावाच्या एका वैज्ञानिकाने आपले असे अनुमान सांगितले होते की, १९८४ पर्यंत मानव मंगळग्रहावरून परत येऊ शकेल. परंतु त्याचे म्हणणे खरे ठरले नाही. परंतु अमेरिकेतील नॅशनल एरोनाटिक.अॅण्ड स्पेस एडमिनिस्ट्रेशन (नासा) एका संस्थेने १९९० पर्यंत माणूस नसलेले एक अवकाशयान मंगळ ग्रहावर पाठविण्याचा प्रबंध केला आहे.

### प्राचिन भारतातील अक्युपंक्चर

इलाहाबादच्या इंडियन अक्युपंक्चर केंद्राचे निर्देशक डॉ. पी. के. सिह यांचे म्हणणे आहे की सुयां टोचून रोगांचे निवारण करणारी अक्युपंक्चर चिकित्सा प्राचिन भारतातच सुरू झाली होती. नुकत्याच बेजिंगमध्ये झालेल्या सेमिनार मध्ये डॉ. सिहने भाषण देऊन एका गोष्टीचा उल्लेख केला की भीष्माने ५८ दिवस झोपून राहून शरशय्येवर इच्छामरण प्राप्त केले.





### टूथपेस्टचे जेवण

अमेरिकेत वास्तव्य करणाऱ्या जूं ज्वार्टस नावाच्या एका २६ वर्षांची तरुणी नौका विहार करीत असताना दिशाभूल होऊन वाट चुकली तिला इंडोनेशियाच्या एका समुद्र किनाऱ्यावर २१ दिवस रहावे लागले. त्यावेळी तिच्याजवळ फक्त एक टूथपेस्टच काय ती शिल्लक होती. ती थोडी थोडी खाऊन तिने आपला जीव कसाबसा वाचविला.

## तुम्हांला माहीत आहे कां ?

१. सर्वसाधारण माणसाच्या शरिरात नाडीचे ठोके मिनीटांला किती पडतात ?
२. सर्वात प्रथम शस्त्र चिकित्सेच्या द्वारे मनुष्याच्या हृदयाचे स्थानान्तरण केव्हां झाले ?
३. मनुष्याचा मेंदूचे सरासरी परिमाण किती ?
४. रक्तरोहिण्या किती दिवस जिवंत रहातात ?
५. अलेक्जांडर फ्लेमिंग कोणत्या वस्तू करिता प्रसिद्ध होता ?

[ उत्तरे पान ६५ वर पहावीत ]










# अलम्बुस

इंद्राच्या दरबारात अलम्बुस नावाची अप्सरा होती. एकदा ती आपला प्रियकर विधुम गंधर्वा बरोबर गप्पा गोष्टी करीत होती. त्याचवेळी इंद्र तेथून गेला. अलम्बुसचे त्याच्याकडे लक्ष नव्हते. ते पाहून इंद्राला संताप आला. त्याने तिला शाप दिला—"तुम्ही दोघे मानव रूप घेऊन पृथ्वीवर जा व पतीपत्नीच्या रूपात रहा."

त्याच्या शापामुळे विधुम कौशाम्बींचा युवराज सहस्त्रानीकच्या रूपात व अलम्बुस मृगवतीच्या रूपात जन्माला आले. त्याचा विवाह पण निश्चित झाला. त्याच वेळी देव व असुर ह्याच्यांत कडावयाचे भांडण सुरू होते. त्यावर इंद्राने सहस्त्रानीकाची मदत मागितली. सहस्त्रानीकाने देवांच्या बाजूने मदत करून त्यांना पराभूत केले, नंतर तो परत पृथ्वीलोकांत निघाला तेव्हां इंद्राने तिलोत्तमेला त्याच्या बरोबर पाठविले, सहस्त्रानीक रथात बसून निघाला तेव्हां त्याला मृगवतीची फार आठवण येऊ लागली. तिलोत्तमाने त्याला प्रश्न विचारले तेव्हां त्याचे लक्ष नव्हते ते पाहून तिने रागाने शाप दिला—"तू जिच्या आठवणीने व्याकुळ झाला आहेस व ती चौदा वर्षे तुझ्यापासून दूर राहिल." सहस्त्रनीक कौशाम्बीला पोहोचला व त्याने मृगवती बरोबर लग्न केले. मृगवती जेव्हां गरोदर राहीली तेव्हां तिने आपल्या पतीकडे लाल सुगंधित पुष्करणी मध्ये स्नान करावे अशी इच्छा प्रकट केली.

मृगवती लाल सुगंधीत पुष्करणीमध्ये स्नान करीत असतांना लालभडक रक्तात एक मांसाचा गोळाच पडलेला आहे असे समजून एक प्रचंड गिधाड तिला उचलून घेऊन गेले ते पाहून सहस्त्रनीकला अत्यंत दुःख झाले. त्या गिधाडाने मृगवतीला एका उंच डोंगरावर आणून टाकले. काही वेळाने एका मुनीकुमाराने तिला जमदग्निच्या आश्रमात आणले. तेथे तिने एका मुलाला जन्म दिला. उदयन असे त्याचे नामकरण करण्यात आले.

चौदावर्षानंतर एक दिवस एक गारुडी एका सापाला पकडीत असतांना उदयनने पाहिले गारुड्यांच्या हातातून सुटण्याची सापाची धडपड पाहून उदयनला त्याची दया आली त्याने गारुड्याला एक सोन्याचे कंकण देऊन त्या सापाला सोडण्याची विनंती केली. गारुड्याने ते सोन्याचे कंकण घेतले व ते कौशाम्बी नगरात जाऊन विकले. तेव्हां सहस्त्रानीकला समजले की हे कंकण राणीचे आहे. तेव्हां तो जमदग्नीच्या आश्रमात आला बायको व मुलाला पाहिले व त्यांना घेऊन राजवाड्यात आला.






# हुषार जांवई

वीरभद्र नावाचा एक जमीनदार होता. बऱ्याच वर्षानंतर त्याला एक मुलगी झाली. त्याने तिचे नाव करणसुप्रिया ठेवले व मोठ्या कोडकौतुकानें तिचा सांभाळ केला. ती शिक्षणात व इतर कलांमध्ये मोठी हुषार होती पण कोणत्याही लहान लहान गोष्टीसाठी हट्ट करीत असे.

जमीनदाराला आपल्या मुलीचे गुण माहीत होते. तो तिच्या बुद्धीमत्तेवर अत्यंत प्रसन्न होता परंतु तीच्या हट्टी स्वभावाची त्याला चीड येत असे.

सुप्रिया जेव्हां उपवर झाली तेव्हां जमिनदार तिच्यासाठी योग्य वराच्या शोधात निघाला. त्याच्या बरोबरीच्या बऱ्याच मित्रांची मुले लग्नायोग्य होती परंतु अधिकांश व्यसनी व इतर वाईट चाली-रीतीची होती. त्यामुळे जमिनदाराने आपल्या पेक्षां काही कमी दर्जाच्या गरीब व्यक्तिच्या मुलांना बोलावणे पाठविले परंतु सुप्रियाने त्यांना असे म्हणून त्यांचा संबंध तोडला की ते संपत्तीच्या लोभाने आपल्या बरोबर संबंध जोडून घेत असावेत.

शेवटी जमीनदार चिडून तिला म्हणाला—"मुली, मला हे समजत नाही तुला कोणत्या तऱ्हेचा मुलगा नवरा म्हणून हवा आहे.

"बाबा, मी ईमानदार असून योग्य बुद्धिमत्ता असलेल्या तरुणाबरोबर, लग्न करू इच्छिते." सुप्रिया म्हणाली.

"एक वडील म्हणून मला सुद्धा तसेच वाटते आहे. परंतु ह्याचा निर्णय आपण दोघांनी कशा तऱ्हेने घ्यावयाचा की, तुझ्या बरोबर लग्न करणाऱ्या तरुणांमध्ये तसेच उत्तम गुण आहेत!" जमीनदाराने विचारले.

"बाबा, ह्याचा निर्णय घेण्याकरीता एक परिक्षा आहे, मी एक गोष्ट श्लोकात

गणेश जाधव



म्हणीन त्याचा अर्थ त्या तरुणाला समजावयास हवा." सुप्रिया म्हणाली.

त्यावेळी सुबुद्धी नावाचा गरीब सावकाराचा एक मुलगा होता. त्याने वीरभद्रराय याच्या घरी जाऊन त्याच्या कचेरीत नोकरीची मागणी केली. त्याचा स्वभाव वागणें बोलणें त्या जमीनदाराला खूप आवडले व त्याने त्यावर खुष होऊन त्याला आपल्या कचेरीत नोकरी दिली.

सुबुद्धी जसा कामाला येऊ लागला तसे त्याच्या हालचालीवर सुप्रिया जातीने लक्ष ठेवू लागली. पैशाच्या देण्याघेण्यासाठी एक दिवाण ठेवला होता. त्याचे नाव सुकेतु होते. जमीनदार व त्याच्या मुलीला बऱ्याच दिवसांपासून एक शंका येत होती की, सुकेतु पैशांच्या व्यवहारात काहीतरी गडबड करीत असावा. परंतु ते उघड करण्याकरीता त्यांच्या पाशी काही पुरावा नव्हता. त्यामुळे त्यांना गप्प बसावे लागे.

एक दिवस जमीनदार व सुबुद्धीला काही कामाकरीता बाहेरगांवी जाणे भाग पडले. परंतु तेथे जाण्याकरीता फक्त पायवाट होती व पायीजाणेंच भाग होते ते जेव्हां निघाले तेव्हां सुप्रियाने एका भाड्यांत पक्वान्ने व फराळाचे पदार्थ घालून सुबुद्धीच्या हातात दिले व त्याला म्हटले–"इतर प्रवाशांसारखे रस्त्यात थकलात तर अर्धेअर्धे करून वाटून खा."

सुप्रियाने सांगितलेली गोष्ट जमीनदाराच्या लक्षात आली नाही. त्याने विचार केला की, सुप्रियाचे म्हणणे असे असेल की, तिने दिलेले जे पदार्थ आहेत ते भुक लागल्यावर अर्धे अर्धे करून खावे.

परंतु सुबुद्धीनें जमीनदाराला त्याच्या मुलीने सांगितलेल्या गोष्टीचा अर्थ सांगितला. इतर यात्री म्हणजे सूर्य व चंद्र. रस्ता जेव्हां जड होणार नाही ह्याचा अर्थ चालून थकवा आला की, गप्पा गोष्टी करीत जा ह्यांचा अर्थ फराळ करा.

सुबुद्धीने सांगितलेली व्याख्या ऐकून बाप लेक दोघे आनंदीत झाली.



एक दिवस सुबुद्धीला जमीनदाराच्या मुलीकरीता जंगलातून मध व सुगंधी द्रव्ये आणावी लागली. तेव्हां तो जंगलात निघाला तेव्हां सुप्रियाने एक तलवार त्याच्या हातात देत म्हटले–"एकटाच जातो आहेस ह्या तलवारीच्या मदतीने एका घोड्याला बरोबर घेऊन जा.

सुप्रियाचे बोलणे जमीनदाराला समजले नाही त्याने आपल्या मुलीला म्हटले–"ह्या जंगलाच्या रस्त्यात माणसाला जाणे सुद्धा कठीण मग असे असतांना घोडा कसा बरोबर जाणार?"

सुप्रियाने सुबुद्धीकडे एक दृष्टीक्षेप टाकला तेव्हां सुबुद्धीने जमीनदाराला समजावत म्हटले–"सुप्रियाचे म्हणणे असे आहे की त्या तलवारीनें जंगलाच्या वाटेतील झाडाची एक फांदी कापून हातात घ्या व त्याच्या आधाराने जंगलात जा."

थोड्या दिवसाने जमीदाराच्या घरच्या दिवाणाने सुकेतुने मोठ्या थाटामाटात स्वत:च्या वहीणीचे लग्न लावले. त्यावेळी साऱ्या गावाला निमंत्रित केले होते व जमीनदार सुप्रिया व सुबुद्धीला सुद्धा बोलावले होते.

सुप्रियाने सुकेतुला विचारले–"तुम्ही आपल्या वहीणीचे लग्न अगदी थाटामाटात लावून दिलेत तुमच्या घराचा पाया अगदी भक्कम दिसतो आहे.

"ताई, आमचे घर म्हणजे काही महाल नाही झोपडी आहे. मग त्याचा पाया तो कसा असणार?" सुकेतु म्हणाला.

त्यावेळी सुबुद्धी तेथे नव्हता सुप्रियाने आपल्या वडीलांना म्हटले–"मी सुकेतुला त्याच्या आर्थिक स्थितिबद्दल विचारले. आता तर माझी शंका नक्कीच खरी होवू लागली आहे. हा नक्कीच चोर असावा. आता ह्याचा शोध मी सुबुद्धी तर्फेच लावीन ह्याकरीता एक उपाय आहे!"

ह्या गोष्टीनंतर आठवड्याने सुबुद्धी व जमीनदार शेत कापणीसाठी शेतावर गेले



दुपारच्या खाण्याच्या वेळी सुकेतुला बोलावुन त्याच्या हातात अशी सहा भांडी दिली की, जी एकावर एक बसतील. व त्याला दोरीनें बांधले आणी तिनें सुकेतुच्या हातात देत म्हटले–"डोक्यावर पौर्णिमेचा चंद्र आहे. घराच्या खालच्या भागात सहा पोती धान्य आहे. ह्या गावात चोरांची रेलचेल आहे. चारी बाजुला सावधगिरीने पाहीले तर चोरांना आपण खात्रीनें पकडू शकतो ही माझी गोष्ट तू सुबुद्धीला जाऊन सांग."

खाण्याची भांडी घेऊन सुकेतु शेताकडे निघाला रस्त्यातून जाताना त्याला एक शंका येऊ लागली की बरेच दिवस झाले सुप्रियेचे सुबुद्धीवर मन जडते आहे. आणि असे झाले तर त्या दोघांचे लग्न सुद्धा लवकर होईल. त्यामुळे त्याच्या मनात इच्छा निर्माण झाली की, मनापासून त्याच्यावर प्रेम करणारीने त्याला डब्यात काय प्रकारेच जिन्नस पाठविले असावेत.

असा विचार घेऊन त्याने मध्य रस्त्यातच ती भांडी उघडली व त्यातील अन्न पदार्थ पाहिले. ते पाहून त्याच्या तोंडाला पाणी सुटले. परंतु कोणाला काही कळू नये अशा उद्देशाने त्याने प्रत्येक भांडयातील पदार्थ थोडा थोडा चाखून पाहिला. व पुर्वीसारखीच भांडी परत बांधली व ती नेऊन सुबुद्धीच्या हातात दिली.

सुबुद्धीने एक एक करीत भांडी काढली तेव्हां सुकेतुने सुबुद्धीला त्या गोष्टी सांगितल्या ज्या सुप्रियाने त्याला सांगावयास सांगितल्या होत्या. त्या सुकेतुला समजल्या नाहीत परंतु सुबुद्धीने भांडी निरखून पाहीली व त्याला म्हटले–"तुझे चौर्यकर्म दाखवून देण्याच्या हेतूने सुप्रियाने ह्या गोष्टी श्लेषार्थाने तुला सांगण्यास सांगितल्या. तुझी बुद्धी वाईट आहे. तू प्रत्येक भांडयातील थोडा थोडा पदार्थ चाखून पाहिलास. अशा छोटयाश्या गोष्टीची सुद्धा तू चोरी करतोस मग कचेरीतील कामाच्या हिशोबात सुद्धा अशीच चोरी करीत असशील. नक्की काय गडबड गोंधळ करतोस ते खरे सांग!"

सुकेतुला काय झाले कळले नाही तो खूप घाबरून गेला. तेव्हां सुबुद्धी म्हणाला–"डोक्यावरपूर्णचंद्र आहे ह्याचा अर्थ असा आहे की, सर्वात वरच्या डब्यात स्वच्छ पांढरी साय आहे. सर्वात खालच्या भागात सहा बुंदीचे लाडू आहे. ह्याचा अर्थ बाकी चार भांडी पाहिल्यास चोराचा शोध ताबडतोब लागेल.

सुकेतुच्या चेहऱ्यावरचे भाव बदलताच जमीनदाराच्या मनात विश्वास निर्माण झाला की, सुकेतु नक्कीच चोर आहे.

त्यावर जमीनदाराने सुकेतुकडे रागाने पाहात म्हटले–"ठिक आहे. तू ह्याक्षणी कोतवालाकडे चल. तोच तुझ्या तोंडून सत्य वदवेल.

कोतवालचे नाव ऐकताच त्याला कापरे भरले व फटक्यांची आठवण आली. मग काय तत्क्षण तो जमीनदाराच्या पाया पडला व कळवळत म्हणाला–"मालक, लोभाने मी जमाखर्चामध्ये गडबड केली व थोडे फार पैसे मिळविले जे काय खर्च झाले ते सोडून जे काही वाचले आहेत ते मी तुम्हांला उद्या ह्यावेळी आणून देतो." मला क्षमा करा मी पुन्हां अशी चुक कधी करणार नाही.

जमीनदाराने त्याला क्षमा केली. ह्यानंतर तो एकटाच पुढे घरी आला व त्याने ही सारे घडलेली गोष्ट मुलीला सांगितली. व विचारले–"मुली, सुबुद्धी बद्दल तुझे काय मत आहे. तो केवळ हुषारच नाही तर ईमानदार आहे." तसेच प्रसंगावधानी सुद्धा आहे त्याला प्रत्येक गोष्टीतील मर्म माहीत आहे.

"बाबा, माझे सुद्धा तसेच मत आहे. आपला जांवई बनण्याची त्याची योग्यता आहे." सुप्रियाने प्रसन्नतापूर्वक उत्तर दिले. आपल्या मुलीचे बोलणें ऐकून जमीनदार हंसू लागला व त्याने एक महिना पूर्ण होण्यापूर्वीच त्या दोघाचा विवाह थाटामाटात लावून दिला.












# उत्तम गाणारा

सिरपुरच्या राजाच्या मनांत एक दिवस अचानक एक विचार आला. की, आपल्या दरबारात कवी व पंडितांबरोबर एक गायक सुद्धा असणें चांगले त्याने आपला विचार मंत्र्यापुढे मांडला व गाणाऱ्याची निवड करण्याकरीता एक चढाओढ ठेवण्याची आज्ञा केली.

"महाराज, आपला विचार तर फार चांगला आहे. परंतु हे सांगा कीं त्या परिक्षेचा निकाल सांगणारे परिक्षक कोण असणार?" मंत्र्याने विचारले.

"दुसरे कोण कां? मी राणी व तुम्ही आपण तिघे परिक्षक होवू. आपण तिघें तर संगीताचे प्रेमी आहोत नां! त्याकरीता बाहेरच्या संगीत विद्वानांना बोलावून घेणे निरर्थक आहे." राजा म्हणाला.

तसे पाहीले तर राजाला संगीताची अत्यंत आवड होती परंतु संगीतशास्त्र संबंधी ज्ञान बिलकुल नव्हते. परंतु राणीला संगीत शास्त्राबद्दलची चांगली माहीती होती.

राजाच्या आज्ञेने मंत्र्याने देशभरच्या संगीतातील विद्वानांना व साधारण प्रजे-तील लोकांना आमंत्रित केले. संगीत विद्वानांच्या मध्ये संगीताची प्रतिस्पर्धा चालू झाली ती तीन दिवस चालली सर्व गायकांनी अशा तऱ्हेने आपले गाणे गाऊन दाखविले की. आपल्याला दरबारात संगीत पदावर निवडले जावे.

संगीत विद्वानांमधील तीन व्यक्तिना प्रत्येकांने आपापल्या परीने निवडले. मुरलीनाथला राजाने, वेणुनाथला राणीने व सुसंगीतला मंत्र्याने निवडले. तिघांनी तीन जणांची निवड केली.

राजाने आपल्या निवडीचे स्पष्टीकरण करीत म्हटले. मुरलीनाथचे संगीत अद्‌भुत् होते ते ऐकताच मी स्वतःला विसरून गेलो. तुम्ही ज्या दोघांची निवड केली आहे ती तेवढी काही खास नाही त्याने तितके उत्तम गाणे गाईले नाही.

त्यावर राणी म्हणाली–"मुरलीनाथच कां! वेणुनाथाने फार छान गाणें गायले. दुसऱ्या दोघांना संगीत ज्ञानाची विशेष माहीती दिसत नाही. संगीत ज्ञान जर प्राप्त नसेल तर खऱ्या अर्थाने तो संगीत विद्वान म्हणवला जात नाही. त्यामुळे मी वेणुनाथची निवड केली.

त्यावर राजाने मंत्र्याला विचारले–"मंत्री महोदय, तुम्ही सुसंगीतची निवड केलीत त्याप ठी मागे काय कारण?"

"महाराज, सुसंगीतला संगीत शास्त्र संबंधी ज्ञान व तसेच तो उत्तम गाणे सुद्धा गातो खरा गाणारा तर असाच असावा लागतो. की जो पंडीत व अज्ञानी दोन्हीं लोकांचे मनोरंजन करु शकतो. ह्याचे खरे सामर्थ्य फक्त सुसंगीत मधेच आहे. हे फक्त माझेच मत नाहीं तर सर्व पंडीत व अज्ञानी लोकसुद्धा तसेच माझ्या मताशी सहमत आहेत." मंत्र्याने उत्तर दिले.

हे उत्तर ऐकताच राजा व राणी आश्चर्य करु लागले व त्यांनी एकसुरात विचारले–"काय हो, आपल्या विचारांशी संगीतातील विद्वान व साधारण संगीत प्रेमी सुद्धा सहमत आहेत कां? तुम्ही त्यांचा विचार केव्हां घेतलात?"

"ते तिघे संगीत विद्वान जेव्हां दरबारात गात होते. तेव्हां मी दरबारात गाणें



ऐकणांऱ्या श्रोत्यांची प्रतिक्रिया कशी झाली त्याकडे निट लक्ष ठेवले." मंत्री म्हणाला.

"मुरलीनाथचे गाणे ऐकतांना माझे देहभान हरपले त्यामुळे माझे इतर श्रोत्यांकडे लक्ष नव्हते." राजा म्हणाला.

मी वेणुनाथ गात असतांना त्याला असलेल्या संगीत शास्त्र संबंधी ज्ञाना विषयी मंत्र मुग्ध झाले होते त्याकारणांमुळे मी राजाकडे व इतर दरबारी श्रोत्यांकडे बिलकुल लक्ष दिले नाही." राणी म्हणाली.

"आपण ज्या गायकांची दरबारी गायक म्हणून निवड करणार आहोत. तो फक्त आपल्या तिघांनाच नाही तर राज्यातील सर्व प्रजेला संगीत विद्वानांना अज्ञानांना संतुष्ट करेल असाच हवा. मला वाटते की, राजाला पण असेच वाटत असावे." मंत्री म्हणाला.

"हो हो, माझा सुद्धा तसाच विचार आहे." राजा म्हणाला.

"तर मग, मी ह्या गोष्टींचा उल्लेख करून सांगतो की, हे तिघे गायक गात असतांना इतर दरबारी श्रोत्यांची कशी कशी प्रतिक्रिया झाली. तुम्ही सर्वांनी लक्ष देऊन ऐका. मुरलीनाथ गात असतांना दरबारातील सर्व पंडीत सभासद एकएक करीत बाहेर उठून गेले व इतर जनता माना हलवित शेवटपर्यंत तेथेच बसून राहीली. आता राहीली वेणुनाथची गोष्ट तो गात असताना इतर प्रजेतील लोक तावडतोब उठून गेले. परंतु गानपंडीत शेवत पर्यंत मोठ्या अभिरुचीने गाणे ऐकत तेथच बसले. परंतु सुसंगीतचे गाणे चालू झाले तेव्हां इतर विद्वान पंडीत व त्याचबरोबर जनता सुद्धा मंत्रमुग्ध होऊन शेवटपर्यंत तेथेच बसून राहीली होती.

ह्याच कारणाकरीता मी तिघां मध्ये सुसंगीतची दरबारीं गायक म्हणून निवड केली." मंत्री म्हणाला.

मंत्र्याचा विचार योग्य वाटल्यामुळे राजा व राणीने सल्लामसलत करून त्याला सहमत देऊन त्याची दरबारी गायक म्हणून निवड केली."



# कांशाचा किल्ला



[१७]

[चंद्रवर्माला शिवपुर नगरात सुबाहू दिसला. त्याने चंद्रवर्माला सेनापती धीरमल्लचा समाचार ऐकवला- त्यावेळी एका गुप्तहेराने प्रवेश करीत एक गुप्त बातमी सांगितली की; सर्पकेतु धीरमल्लचा मोठ्या सैन्यानिशी पाठलाग करीत येत आहे. सुबाहुने चंद्रवर्माला एक उपाय सुचविला की ह्यावेळी धीरमल्ला मदत करण्यास जाणे योग्य होईल. पुढे...]

चंद्रवर्माला सुद्धा ह्यावेळी सुबाहूने दिलेला सल्ला योग्य वाटला. थोडया वेळातच नगरातील सारे सैनिक एका ठिकाणी उपस्थित झाले.

ह्यानंतर सारे सैन्य नगराच्या सरहद्दीपलीकडे पार होऊन उत्तर दिशेने पुढे निघाले. चंद्रवर्मा व सुबाहू साऱ्या सैन्यांच्या मध्यभागातून घोडयावरून चालू लागले. रात्रभर कोठेही न थांबता सैन्य पुढे पुढे जात होते. आता सुर्योदयाला दोन तासच बाकी उरले. तितक्यात पहाडापाठीमागच्या बाजूने घोडयाच्या टापांचा आवाज अस्पष्ट ऐकू आला ह्या गोष्टीचा सुगावा घेण्याच्या इच्छेने की व तो कोणी उपटसुंभा मित्र आहे कां शत्रू आहे हे पहाण्याच्या उद्देशाने सुबाहू व चंद्रवर्मा दहा सैनिकांना स्वतः बरोबर घेऊन वेगाने पुढे निघाले. बरोबर डोंगराच्या वळणावर



त्यांना चार घोडेस्वार सामोरे आले. अस्पष्टशा धुक्यामध्ये सुद्धा त्यांनी सुबाहूला पहाताच ओळखले व आपल्या घोड्यांला थांबवून म्हटले–" सेनापती महाशय, राजप्रतिनिधी धीरमल्लने आम्हांला पाठविले आहे. सर्पकेतु नावाच्या राजाच्या सैनिकांनी आपल्या सैनिकांना डोंगराच्या आडवाटेते येऊन अडविले तेव्हां दोन्ही सैनिकांच्यात चकमकी झाल्या त्यात आपले अनेक सैनिक प्राणास मुकले. आपले राजप्रतिनिधी शत्रूला मधेच रोखून लवकर लवकर नगराच्या बाजूने येऊन देण्याकरीता त्याना अडवित मागे हटवत जात आहेत. सैनिक हा समाचार सुबाहूला ऐकवत नाहीत तोच इतर काही सैनिक त्यांच्या बाजूने येत असतांना त्याना दिसले. धीरमल्ल मोठ्या गतीने त्यांच्या जवळ आला व म्हणाला–" सुबाहू आता आपल्याला नगराचे रक्षण करावयास जायलाच पाहिजे सर्पकेतू बरोबर......"

असे शब्द म्हणत अडखळला व शेजारी चंद्रवर्माला पाहून एकदम आश्चर्यचकित झाला नंतर अत्यंत प्रसन्नतेने घोड्यावरून खाली उतरीत व एका ढांगेत त्याच्यापाशी येत म्हणाला–" महाराज, असे गहिवरून म्हणत त्यांने त्यांचे हात हातात घेतले.

"धीरमल्ला ! मी स्वप्नात सुद्धा कल्पना केली नव्हती की, तुझी पुन्हां फिरून गांठ भेट होईल परंतु आता आपण अगदी विचित्र परिस्थितीत एकत्र भेटलो. आता सवडीने तुझ्याबरोबर गप्पा गोष्टी करेन, आताची वेळ गप्पांची नाही. चल आता ताबडतोब आपल्याला नगराची रक्षा करण्यासाठी गेले पाहिजे." चंद्रवर्मा त्याला म्हणाला.

सेनापती धीरमल्लने क्षणभर आपल्या समोर असलेल्या सैन्याकडे दृष्टीक्षेप टाकला. नंतर पाठीमागून येणाऱ्या घोडेस्वारांकडे पहात म्हटले–" महाराज, आपल्या येण्यामुळ खुपच बदल घडला आहे. सर्पकेतुच्या बरोबर शेवटच्या घटकेला युद्ध करण्याची वेळ येऊन ठेपली आहे. आता युद्ध नगराच्या बाहेर करावे लागू दे किंवा आत दोन्हीं आम्हांला सारखेच आहे. ह्याक्षणी तर शत्रूसैन्यांचे घोडेस्वार वेगाने सामना करावयास येत आहेत. शत्रूसैन्यांचे पायदळ डोंगरापाठीमागच्या मैदानांत आहे. आता आपल्याला व्युहरचना करायला थोडा फार वेळ पाहिजे." असे म्हणत तो सुबाहुकडे वळला व त्याला म्हणाला–"सुबाहु ! तू काही सैन्याला वेगळे काढून समोरच्या डोंगर घाटीत घेऊन जा. त्या डोंगराच्या घाटातील मार्गाचे रक्षण करण्याकरीता थोडेच सैन्य आवश्यक आहे. तेथे काही घोडेस्वार सुद्धा बरोबर ठेव" असे म्हणत तो चंद्रवर्माच्या बरोबर डोंगरकपारीच्या बाजूने चालू लागला.



थोड्याचवेळातच सर्व सैन्य घाटात पोहोचले. चंद्रवर्माने धीरमल्लला थोडक्यात आपल्यावर कोसळलेल्या कठिण आपत्तीचे विवरण करून सांगितले. धीरमल्लाने मोठ्या तल्लीनतेने त्याचे म्हणणे ऐकले व त्यांना विनयपूर्वक म्हटले–" महाराज, सुबाहुने आपल्याला सांगितलेच असेल की, मी व त्यांनी कोणकोणत्या कठीण संकटाना तोंड दिले. शेवटी मी राजा शिवसिह ह्यांच्या दरबारात आश्रय मिळवून त्याचा साथीदार बनून ह्या शिवपुरात आलो. आज अचानक आपल्याला सर्पकेतु बरोबर युद्ध करावे लागत आहे. परंतु त्या दुष्टां बरोबर केव्हां तरी युद्ध करावेच लागले असते नां ? ते काम आजच करावयाचे. त्यात मोठेसे काय बिघडले ह्या युद्धात एकतर आपला विजय होईल नाहीतर सर्वनाश ! बस् ह्या व्यतिरिक्त दुसरा मार्ग नाही."

"हो, हो, धीरमल्ला ! आपल्या सारख्या लोकांनी आपला देश सोडून परकियांच्या राज्यांत हिंडणे ह्याला काही अर्थ नाही. तू सैन्यांची तयारी कर. सर्पकेतू बरोबर लढा देऊन आपण ह्या गोष्टीचा उलगडा करून घेऊ की आपला विजय होईल का

आपल्याला वीरगती प्राप्त होईल." चंद्रवर्मा म्हणाला.

चंद्रवर्मा असे बोलत होता तोच डोंगर-घाटातून बराच कोलाहल गडबड गोंगाट ऐकू येऊ लागला. परंतु तेथे पाहारा देणारे तीरंदाज आपल्या धनुष्यबाणांचा नेम बरोबर करीत होते. काही घोडेस्वार सामोरे येणाऱ्या सैन्याला थोपवून त्याच्या बरोबर लढून त्यांना सळोकी, पळो करून सोडत होते.

"महाराज, सर्पकेतू आता डोंगरघाटात चढून येऊ लागला आहे असे दिसते. त्या अवघड रस्त्यामध्ये दोन्हीं बाजुने वेढा घालून त्याला डोंगराच्यामध्यावरच ठार करण्याची माझी योजना आहे." म्हणत सेनापती धीरमल्ल मोठ्या खुषीनें घोड्यावर उडी मारून बसला.

चंद्रवर्मा सुद्धा त्याच्या पाठोपाठ टांग मारून घोड्यावर चढून बसला.

ह्यानंतर चंद्रवर्मा व धीरमल्लने सैन्याचे दोन भाग केले व एकएक सैन्याच्या तुकडीला बरोबर घेऊन दोन्ही बांजुना जाऊन उभे राहीले. सुबाहू काही पायदळ सैनिकांना बरोबर घेऊन घाटांच्या तोंडाकडच्या बाजूला जाऊन स्वारांच्या मदती करता व काही हवेनको ते पहाण्या साठी पुढे जाऊन उभा राहीला.

हळूहळू सर्पकेतुचे सैन्य त्या घाटातील दुर्गम्य अशा आड वाटेने आत घुसून येऊ लागले. हजारों सैन्य त्या घाटातील कठीण वाटेने आत येऊ लागले त्याच्या गर्जना घोड्यांचे खिकांळने सर्व दऱ्याखोऱ्यात निनादू लागले त्यातील बरेच सैन्य सुबाहुच्या सैन्याशी मुकाबला करून मोठ्या शर्थीनें लढून प्राण देत होते. त्यांच्या तिरंदाजासमोर अनेक सैनिक बाण लागून जखमी अवस्थेत खाली कोसळत होते. त्याचा हल्ला चुकवुन जे सैनिक आत घुसून येत होते त्याच्याशी चंद्रवर्मा व धीरमल्ल मोठ्या शौर्याने लढा देत होते.

अशा प्रकारे थोडा वेळ दोन्ही सैन्याच्या चकमकी होत राहील्या. त्यात चंद्रवर्माचे थोडे सैन्य सुद्धा मरण पावले. शत्रूचे सैन्य असंख्य होते तर चंद्रवर्माचे सैन्य अगदी कमी होते. अशावेळी सर्पकेतुने आपले आणखीं काही सैन्य घाटात जर आणले असते तर चंद्रवर्मा व धीरमल्ल नक्कीच कठीण संकटात सापडले असते आता ते कोणता उपाय शोधून काढावा ह्यावर चर्चा करू लागले.

त्याच वेळी सर्पकेतुचा कर्णकठोर असा कर्कश आवाज घाटातील मार्गात ऐकू येऊ लागला. तो आपल्या सैनिकांना मोठ्या आवाजात ओरडून सांगत होता–"जे कोणी, चंद्रवर्मा व धीरमल्ल ह्याचे डोके कापून आणून देईल त्याला एक लाख सुवर्ण मुद्रा देण्यात येतील तसेच त्याला ह्या नगराचा मांडलीक राजा बनविण्यात येईल. तुम्ही सर्वांनी शर्थीनें पुढे लढावयास जा."








क्षणभरातच घाटातील तोंडाजवळ दोन्ही सैन्यांमध्ये घनघोर युद्ध सुरू झाले. सर्पकेतुने लावलेल्या बक्षिसाच्या लोभाला बळी पडून अनेक शत्रू सैनिक प्राणपणाला लावून अवघड घाटातील मार्ग पार करीत पुढे येऊ लागले व चंद्रवर्माच्या सैन्याशी लढा देऊ लागले. सुबाहूच्या मदतीकरीता धीरमल्लने आणखी काही सैनिक घाटातील मागिकडे पाठविले. परंतु सर्पकेतुच्या घोडस्वारानी आपल्या बाजूकडचे काही मेलेले घोडेस्वार त्याच्या दिशेने पाठवून दिले.

चंद्रवर्माने एकदम वळून आपला घोडा धीरमल्लच्या दिशेने आणला व त्याला म्हटले—"धीरमल्ल, मला एक कल्पना आली आहे. आपण समोर दिसणाऱ्या डोंगरांच्या कड्यांवर जाऊन पाठीमागून सर्पकेतूच्या सैन्यांशी लढा दिला तर जास्त चांगले होईल. आणि जरी कां त्या कड्यावरून पाठीमागे जाणें अशक्य झाले तरी आपले तिरंदाज तेथून शत्रूसैन्यावर बाणाचा वर्षाव करतील. तेवढे झाले तरी सर्पकेतू आपले थोडेफार सैन्य घाटाच्या तोंडाकडच्या बाजूने मागे हटवत नेईल.

"होय हो महाराज, हि कल्पना चांगली वाटते ह्या स्थितित आपल्याला काहीतरी तोडगा शोधून अमंलात आणलाच पाहिजे. सर्व शत्रू सैन्य एकापाठोपाठ घाटात शिरले तर आपल्याला पळून जाण्याची तरी एक चांगली संधी मिळेल" धीरमल्ल म्हणाला.

त्यानंतर चंद्रवर्मा काही तिरंदाजाना बरोबर घेऊन तो उंच डोंगर चढून वर आला. नंतर त्याने तेथील उथळ भागात पाहिले तेव्हां मात्र त्याचा विश्वासच होईना मोठ मोठे शुरवीर व साहसी असे हजारो सख्येने असलेले सैनिक पाहून व सर्पकेतू सर्व सैन्यांच्या अग्रभागी त्या घाटातील मार्गाने पुढे येत असलेला पाहून त्याने मनातल्या मनात विचार केला की अशा भारी सैन्या बरोबर लढा देऊन आपण त्यांना कसे काय पराजित करू शकू!" आणि त्यातून संधी सांपडली तरच आपण सुबाहू धीरमल्ल व देवलचा मुलगा शत्रूच्या हातून पळून जाऊ शकतो. पण पुन्हां जंगलात भटकून आपल्याला आयुष्य कंठणें प्राप्त होईल. मग काय एकूण सारखेच.

अशा प्रकारे मनात विचार करीत चंद्रवर्मा निराश होत शत्रूच्या सैन्याकडे निरखून पाहू लागला. तितक्यात त्याच्या डोक्यात एक मस्त कल्पना आली तो मोठ्या हिंम्मतीने अशा एका उंच कड्यावर उभा राहिला की, शत्रू सैन्य त्याला स्पष्ट पाहू शकेल. नंतर तो तेथून जोरजोरात ओरडून म्हणाला—" हे पहा सैनिकांनो, मी वीरपुरचा राजा सूर्यवर्मा ह्याचा मुलगा चंद्रवर्मा आहे. हा दुष्ट सर्पकेतु महिष्मती राज्यावर कब्जा करून तेथील खोटा चक्रवर्ती राजा बनला आहे. ही, गोष्ट तर तुमच्या पासून गुप्त नाही. मी पुन्हां महिष्मती राज्याच्या सिंहासनावर यशोवर्द्धन सम्राटाच्या वंशातील मागे राहिलेल्या तपोवर्ध्दनला राजा करूइच्छितो. आणि जर कां तो ह्याला तयार नसेल तर मग तुमच्या लोकामधील कोणीही तुमच्या मनपसतीस असेल तो राज्याचा राजा होईल. त्याकरीता ह्या दुष्ट कपटी निर्दय, सर्पकेतूला बंदी करावयाचे आहे. तुम्हां लोकांमध्ये जर कां



कोणी वीरपुर राज्यातील सैनिक असतील तर ती जबाबदारी मी तुम्हां लोकांवर सोपवावी म्हणतो."

चंद्रवर्माचा खणखणीत आवाज ऐकताच तेथील सर्व सैनिक क्षणभर विचलित झाले. त्याचे बोलणे संपताच त्यातील काही सैनिक जल्लोष करू लागले—" वीरपुर महाराजाचा जय असो! दुसऱ्या क्षणी सैनिकाच्यात गडबड सुरू झाली. ते आपापसात लढू लागले. पहाता पहाता त्याच्यांतील बरेच सैन्य वेगळे झ.ले व चंद्रवर्माच्या बाजूने येऊ लागले त्याच बरोबर दुसरा जयघोष ऐकू येऊ लागला— सर्पकेतु महाराजाचा जय असो!"

चंद्रवर्माच्या बाजूने येणारे पायदळ व घोडेस्वार क्षणार्धात मागे वळून मोठमोठ्याने गर्जना करीत येणाऱ्या सैन्यावर तुटून पडले.

चंद्रवर्मा पाठीमागे वळून मागेत उभ्या असलेल्या धीरमल्लला म्हणाला–"धीरमल्ला, ही आपल्याला एक आयती संधी मिळाली आहे. सर्पकेतूच्या सैन्यातील बराच मोठा भाग आता आपल्याला सैन्याला येऊन मिळणार आहे. ते लोक दुष्ट शत्रू सैन्यांशी लढा देत आहेत तू आपल्या सैनिकांना तयार करून घाटातील तोंडाशी नेऊन सर्पकेतूशी मोठ्या प्रमाणात लढा दे. जर का तेथून तू त्या सपाट जागी येऊ शकलास तर आपल्याला सर्पकेतूचा नायनाट निश्चितपणे करता येईल.

सेनापती धीरमल्ल आपल्या सैनिकांना चेतावणीच्या सुरात सांगत होता. तोच सर्पकेतूने आपल्यावर येणारे संकट ओळखले. त्याने जेव्हां पाहिले तेव्हां त्याच्या सैनिकातील काहीजण त्याच्याच सैनिकांना मारून चंद्रवर्मा व त्याच्या सैन्याला जाऊन मिळत होते. तेव्हां त्याने आपल्या काही विश्वास पात्र साथीदारांना घाटातील मार्गातून आपल्या बरोबर मागे नेले व त्याना बरोबर घेऊन तो तेथून पळून जाऊ लागला.

चंद्रवर्मा आणि धीरमल्ल आपल्या सैन्याला एकत्र करून पळून जाणाऱ्या सर्पकेतुच्या सैन्याचा पाठलाग करू लागला. त्या खडकाळ दुर्गम अशा घाटातून जात दुपारपर्यंत चंद्रवर्मा त्याच्या सैन्याचा पाठलाग करीत होता. शत्रू सैन्याचे काही सैनिक व घोडे सुद्धा त्याच्या हाती आले सर्पकेतू आपल्या काही खास अनुचरांसह तेथून लांब पळून गेला व शत्रूसैन्यांला न दिसेल अशा जागी जाऊन उभा राहीला.

सेनापती धीरमल्ल व चंद्रवर्माने आपापसात सल्लामसलत करून आपले दहा घोडेस्वार सर्पकेतूचा ठावठिकाणा काढण्यासाठी पाठविले. (पुढच्या अंकी समाप्त)



# स्वर्णगुप्ताची गोष्ट

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–" राजा ! तू कोणती सिद्धी मिळावी म्हणून प्रयत्न करतो आहेस, कोणास ठाऊक, परंतु स्वर्णगुप्तने जी सिद्धी प्राप्त केली. ती त्याने मानसिक दुर्बलतेने सर्व घालविली. त्याची गोष्ट तुला सांगतो लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कांचीपुर येथे रहाणाऱ्या स्वर्णगुप्तने अनेक प्रकारचे व्यापार करून लाखो करोडो रुपये कमावले. त्याने नौका व्यापारी, वाणी, लोकांना खूप पैसा व्याजाने दिला.

कर्जदारांकडून चक्रव्याढासकट त्याने सर्व पैसा निर्दयतेने मिळवला व त्या सर्व



पैशांनी त्यांनी आपल्या तिन्ही मुलींची लग्ने करून दिली. आपल्या मुलांच्या नावी इस्टेट लिहून त्यांच्या नावे सुद्धा व्यापार व दुकाने काढून नविन पैशांची आवक सुरू केली.

कालक्रमाने स्वर्णगुप्त म्हातारा झाला. त्यावेळी त्याच्या मनात एक अनाकलनिय भीती निर्माण झाली, की आपण आपले उभे आयुष्य सर्व पापेच केली. त्याचे परिणाम स्वरूप मृत्युनंतर आपल्याला नरकवास नक्कीच भोगावा लागणार.

त्याच सुमारास एक बातमी त्यांच्या कानांवर आली की, एक स्वामी कांचीपुरच्या परिसरातील शांतीवनात येऊन राहिले आहेत. त्याना अनेक सिद्धी प्राप्त आहेत.

लोकांच्या तोंडी समाचार ऐकल्यानंतर स्वर्णगुप्त साधूच्या दर्शनाकरीता शांतीवनात आले व त्यांचे दर्शन घेऊन त्यांची पायधुळ मस्तकी लावून त्यांना नमस्कार केला व आपल्या मनातली गोष्ट बोलून दाखविण्याकरीता ते तोंड उघडणार तितक्यात स्वामी त्यांना म्हणाले–"मी तुमच्या मनांतील सर्व काही जाणतो! तुम्ही जी काय पापे केली आहेत त्याच्यापासून मुक्ती मिळविण्याकरीता एकच उपाय आहे. रोज शंभर लोकांना अन्नदान अशा हिशोबाने दहा हजार लोकांना अन्नदान करा. तेव्हां तुम्हाला पापांपासून आपोआप मुक्तता मिळेल.

स्वामींचे बोलणे ऐकताच स्वर्णगुप्तचा चेहरा पांढरा फटक पडला. रोज शंभर लोकांना आपल्या कमाईतून जेवण घालणें त्याच्या मनास येईना.

"स्वामी, मला क्षमा करा! इतक्या लोकांना जेवण देणें माझ्या सारख्याला शक्य नाही. दुसरा काही उपाय असल्यास सुचवावा." स्वर्णगुप्तानी निवेदन केले.

साधू मंदहास्य करीत म्हणाले–"तसे म्हणजे सावकारी वर अमाप पैसा कमावून पापे सुद्धा जोडली आहेत. दररोज शंभर लोकांना अन्नदान केले तरी दहावर्षे हा क्रम चालू राहीला तरी तुमच्या संपत्तीत घट होणार नाही. ही गोष्ट मला चांगली



ठाऊक आहे. असत्य बोलून मला त्रस्त करू नका."

ह्यावर स्वर्णगुप्तानें उलट वाद घातला नाही. फक्त मान खाली घालून गप्प राहीला. साधू थोडावेळ शांत बसले नतंर त्यांनी काही एक मंत्र जपून एक चांदीचे भांडे बाहेर काढले व ते त्यांच्या हातात देत म्हटले–"तू फक्त पापीच नाहीस. तर एक नंबरचा कंजूस सुद्धा आहेस म्हणून तुला हे चांदीचे भांडे देत आहे. हे भांडे तुला फक्त तीन दिवसच काम देईल. ह्या तीन दिवसात तुला दहा हजार लोकांना अन्नदान करावे लागेल. आणि जर कां ते केले नाहीस तर तुझे डोके फुटून तुला मरण येईल."

स्वर्णगुप्तानें घरी येऊन त्या भांड्याकरवी अन्नदान करण्यास सुरवात केली. रोज रात्री दहावाजे पर्यंत असंख्य लोक येऊन जेवून जात होती. अशा प्रकारे दोन दिवस उलटले. तिसऱ्या दिवशी रात्री दहावाजे पर्यंत स्वामींनी सांगितल्या प्रमाणे लोक येऊन जेवण करून गेली परंतु त्यांनी सांगितलेल्या संख्येत दहा लोक कमी पडले.

स्वर्णगुप्ताने मोठ्या कष्टाने दारोदारी हिंडून आठ लोकांना कसेबसे पकडून आणून अन्नदान केले. आता दहा हजारा मध्ये फक्त दोन माणसेच कमी पडली.



तोपर्यंत बराच वेळ निघून गेला होता. त्याने बराच विचार केला शेवटी विवश होऊन त्याने त्या चांदीच्या भांड्यापासून दोन पाने वाढली ती स्वयंपाक घरात ठेऊन दिली व असा विचार केला की, आता कसेही मरण येण्याचे टळत नाही. असे म्हणत तो आपल्या खोलीत जाऊन झोपी गेला.

थोड्या वेळाने पहाट झाली. पाखरांचा किलकिलाट ऐकू येऊ लागला माणसांची व वहानांची वर्दळ सुरू झाली ते ऐकून स्वर्ण गुप्तनें डोळे उघडले व त्याला एका गोष्टीचे मोठे आश्चर्य वाटू लागले एक प्रकारे आनंद सुद्धा झाला. की आपण अजून जिवत आहोत. तो तत्क्षण स्वयंपाक घरात



घुसला. तेथे रात्री दोन पानात जे जेवण वाढून ठेवले होते ते रात्रीत येऊन कोणीतरी खाल्ले होते व तेथे ते चांदीचे भांडे सुद्धा नव्हते.

स्वर्णगुप्तच्या मनात एक विचार चमकून गेला की, हे काम कोणा चोरांचे असावे. त्या क्षणी त्याने जेथे आपली तिजोरी ठेवली होती तेथे धावत आला त्यांची शंका खरी ठरली. रात्री दोन पानांवर वाढून ठेवलेले जेवण जेवलेले चोर त्याची तिजोरी फोडून सारे दाग-दागिने चोरून घेऊन गेले होते.

क्षणभर त्याला काही सुचेनासे झाले. नंतर स्वत:ला सावरत तो खोलीबाहेर आला. तेवढयात त्याला ओसरीवर कुणाच्या तरी ओरडण्याचा आवाज ऐकू आला. त्याने झटक्यात दार उघडले.

दारासमोर लोकांचीही गर्दी जमली होती. वहाजण दोन माणसांचे हातपाय दोरींनी बांधून त्यांना ओढत घेऊन आले होते. त्या दोघाना त्या लोकांनी स्वर्णगुप्ताच्या समोर आणून उभे केले व त्याना म्हणाले–"शेटजी हे दोघे थोड्यावेळा पूर्वी आपल्या परसदाराच्या भिंतीवरून उडी मारून पळून जायच्या प्रयत्नात होते. आम्ही त्यांच्यावर शंका येऊन त्या दोघांना पकडून आणले. हे दोघे चोर व दरोडेखोर आहेत ह्यांच्या पाशी दोन गांठोडी आहेत तुम्ही ती उघडून पहा."

स्वर्णगुप्ताने त्यांच्यापाशी होती ती दोन्ही गांठोडी उघडून पाहिली. तेव्हां त्याच्या घरात चोरलेला माल जसाच्या तसा त्यात होता. नंतर त्यांने पुन्हां ती दोन्ही गाठोडी बांधली व मोठ्या प्रेमाने त्या दोन्हीं चोरांच्या पाठीवर थोपटत म्हटले–"तुम्ही दोघे भिऊ नका! हे सारे धन तुमचेच आहे."

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, स्वर्णगुप्तबद्दल तुझे काय मत आहे. अनेक प्रकारे अन्याय व पापे करून त्याने जी संपत्ती कमावून ठेवली होती. ती त्याने फुकटांफाकट चोरांच्या हवाली केली! काय हे वृद्धावस्थेमधील मानसिक दुर्बळतेचे द्योतक तर नाही नां? किंवा अशा गोष्टींची कृतज्ञता तर नसेल की त्या दोन्ही चोरांनीं त्याच्या प्राणांचे रक्षण केले. ह्या शंकाचे समाधानकारक उत्तर दिले नाहीस, तर तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्या पायावर लोळू लागतील.

विक्रमादित्य म्हणाला–"स्वर्णगुप्त खुळा नव्हता. त्याने साधूचे दर्शन प्राणाच्या भीतीने वशीभूत होऊन नव्हे तर नरकवासाच्या होणाऱ्या त्रासाने घेतले. त्यामुळे एक गोष्ट लक्षात ठेवणे जरूरी आहे की, त्याला नेहमी त्याच त्रासाची काळजी लागून राहीली होती की, आपण केलेल्या पापाचे प्रायश्चित भोगण्यासाठी आपण मरणांबरोबर नरकलोकात जाणार. साधूने त्याचे निवारण करण्याचा मार्ग सांगितला की त्याने तीन दिवसाच्या आत दहा हजार लोकांना अन्नदान केले पाहीजे परंतु तिसऱ्या दिवशी त्याच्या दहा हजार संख्येत दोघे जण कमी पडले त्यामुळे योग्याने सांगितल्या प्रमाणें त्याचे मरण निश्चित होते. त्याने विचार केला की दहाहजार लोकांना अन्नदान करण्यात आपण अपयशी झालो. त्यामुळे आपल्याला नरकवास भोगणे भाग्य आहे. परंतु त्याच्या नशिबाने दोन चोरांकरवी त्याच्यावरचे सकट टळले. ह्याचा अर्थ असा की, आता त्याला नरकवास भोगावा लागणार नाही. त्यामुळे त्याने ह्याच एका कारणाकरीता स्वत:च्या घरातील धन चोरानी लुटले असले तरी पुन्हा: त्यांनाच ते दान करून टाकले. ह्यावरून असे स्पष्ट होते की, स्वर्णगुप्तला सतत त्रास देणारी भीती ही प्राणांची नव्हती तर नरकयातनाची होती. त्यामुळे असे मानणें अगदी चुक आहे की, तो मानसिक दुबळेपणाचा शिकारी होता."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)






# चोरांची मेजवानी

भीमशंकर नावाचा माणूस शेजारगांवी नात्यातल्या घरी लग्नाला गेला. व लग्न आटोपून संध्याकाळच्या सुमारास परत निघाला. त्याला एक जंगल पार करून जावे लागले. जाते वेळी अचानक मुसळधार पावसाला सुरवात झाली. पावसात न भिजण्याच्या इच्छेने त्याने आजुबाजुला काही आडोसा आहे कां पाहिले. त्याला जवळच एक पडकी झोपडी दिसली.

तो धावतच त्या झोपडीत शिरला व अगदी एका कोपऱ्यातील आडोश्याला जाऊन बसला. तितक्यात पंचवीस चोरांची टोळी आपल्या सरदारासह तेथे आली. सर्व घोडयांवरून खाली उतरून झोपडीत शिरले. त्यांनी आपल्या सोबत आणलेले, साहित्य काढून ठेवले व ते आतल्या खोलीत जाऊ लागले. तेव्हां त्यांचा सरदार इतर चोरांना आज्ञा करीत म्हणाला–"आज हि वादळी हवा व पाऊस थांबण्याचे लक्षण दिसत नाही. तेव्हां तुम्ही सर्वांनी फक्कड पैकी जेवण तयार करा."

चोरांच्या सरदारांनी आज्ञा करायचाच अवकाश तावडतोब चोरांनी चूल मांडली व बरोबर तीन तासाच्या आत मस्त स्वयंपाक बनवला. भीमशंकरला तो घमघमाट वास येऊन तोंडाला पाणी सुटले. भीमशंकर तसा धाडसी व शुर होता तल्लख बुद्धीचा होता. तो हळूच खोली बाहेर आला व चोरांचा डोळा चुकवत त्यांच्याच गोठोडयांतील काही कपडे घालून त्यांच्या सारखाच एक चोर बनला.

थोडया वेळाने चोरांना जेवणाकरीता पत्रावळी मांडण्यात आल्या. तेथे एक मिणमिणता दिवा लावण्यात आला. त्या अंधुक उजेडात स्पष्टसे दिसत नव्हते. चोरांचा सरदार पत्रावळी निरखीत म्हणू लागला–"अरे, आपण तर सर्वजण मिळून सव्वीसजण आहोत त्यांतील स्वयंपाक करायला चार जण गेली. बाकी उरली बावीस मग इथे तेवीस पत्रावळी कशा आल्या ? हे कसे काय झाले बुवा ? म्हणजे ह्याचा अर्थ आपल्या टोळीत कोणी परका माणूस शिरलेला दिसतो."

ते बोलणे ऐकून सर्व चोर आश्चर्यचकित झाले व एकमेकांचे चेहरे निरखू लागले. त्याचा सरदार म्हणाला–"परक्या व्यक्तिला पकडणे अगदी सोपे आहे. ह्याकरीता एक उपाय आहे. असे म्हणत त्याने आपल्या प्रमुखाला जवळ बोलावले व इतर चोरांना उद्देशून म्हटले–"ऐका आम्ही दोघे ह्या बाजूच्या खोलीत जातो. तुम्ही एकेक जण त्या खोलीत यां. मी ह्या जळत्या चिरूटांनी एकेकाला डागत जाईन. जो ते डागणे सहन करू शकणार नाही तोच माणूस नविन आहे. मग मी त्याला समोरच्या झाडाला टांगून ठेवीन.



त्यानंतर सरदार व प्रमुख बाजूच्या खोलीत गेले. नंतर एकएक चोर त्यांच्या खोलीत गेले. प्रत्येक वेळी "आई ! ओय् असा एकच आवाज ऐकू आला."

ते ऐकून भीमशंकरने मनोमन जाणले की सरदार कोणालाही चिरूटाने डागीत नसावा परंतु त्याची आपल्याला शोधण्याची कल्पना असावी त्यामुळे तोही इतरांसारखाच खोलात गेला. तेव्हां चोरांच्या सरदारांचा प्रमुख आई ! ओय् करीत जरासा किंचाळला व भीमशंकरला बाजूला बसवले शेवटी एकएक करीत सर्व चोर संपले.

तेव्हां चोरांचा सरदार सर्वांना उद्देशून म्हणाला–"आपल्यात घुसलेली व्यक्ति मोठी चतूर दिसते आहे. त्याच्यावर माझ्या युक्तिचा उपयोग झाला नाही. परंतु मी नक्कीच त्याला पकडेन. मी परत त्या खोलीत जातो. तुम्ही परत एकेकांनी आत या. आज रात्रीचा जो आपला सांकेतिक शब्द आहे तो तुम्ही मला सांगत चला. चोर सरदाराच्या खोलीत जाऊ लागले. परंतु

उल्हास देशपांडे

भीमशंकरला तर त्यांचा सांकेतिक शब्द माहीत नव्हता. त्यामुळे तो अत्यंत घाबरून गेला. तेवढयात त्याला स्वयंपाक घरात जे दोघेजण होते त्यांचे कुजबुजणे ऐकू आले. त्यातील एकजण दुसऱ्याला खिजवीत म्हणत होता–"अरे मूर्खा, एक नंबरचा विसरभोळू आहेस!"

भीमशंकर गुपचुप त्या दोघांच्या जवळ जाऊन म्हणाला–"तू तर पहिल्या पासूनच विसराळू आहेस. मग तूच तर तो शब्द विसरला नाहीस नां?"

ते ऐकताच त्याला अतिशय राग आला व म्हणाला–"लम्बालुम्बा" असे दहादा सांगू कां? काय रे मी साधे शब्द सुद्धा लक्षात ठेवणार नाही होय?

भीमशंकरचा आनंद गगनात मावेना. जेव्हां त्याची सरदाराच्या खोलीत जाण्याची पाळी आली. तेव्हां तो आत जात एकदम जोरात किंचाळला. "लम्बा लुम्बा."

जेव्हां सर्व जणांनीच तो संकेत सरदाराला ऐकवला. तेव्हां सरदार आश्चर्यचकित झाला सर्व चोरांना उद्देशून म्हणाला–"अरे वा, जो आगांतुक आहे. तो मोठा चतुर आहे मी तर अशा माणसाचा सन्मान करावा म्हणतो. जर कां तो माझ्या समोर आपण-हून येईल तर त्याला मी बक्षिस देईन त्याला शिक्षा न करता मुक्त करीन. ह्या गोष्टीची मी शप्पथ घेतो.

दुसऱ्याक्षणी भीमशंकर सरदाराच्या समोर येऊन उभा राहीला व सत्य हकिकत सांगत म्हणाला–"मी तर खरा भुकेला होतो. वर आपल्या येथील मस्त स्वयं-पाकाच्या घमघमाटाने मला असे धाडस करण्याचे उत्तेजन मिळाले.

सरदार जोरजोरात हसू लागला व म्हणाला–"आता स्वयंपाकाचा वासच घेऊ नकोस तर त्याचा स्वाद सुद्धा घेऊन पहा! ये, आमच्या सर्वांच्या बरोबर जेव."

चोरांच्या सरदाराने भीमशंकरला पोट-भर जेवण दिले. तो जेव्हां परत जाऊ लागला. तेव्हां सरदाराने त्याला दहा सोन्याची नाणी बक्षीस पण दिली.





आपली देवळे

# सोमनाथचे देऊळ

पुराणातील ग्रंथाच्या आधारा वरून कोण्या एका काळात चंद्राचा प्रकाश कमी होणे व वाढत जाणे हा प्रकार नव्हता, तर प्रत्येक रात्री चंद्राचा पूर्ण प्रकाश पृथ्वीवर पडत होता.

चंद्र दक्ष प्रजापतीचा जावई होता. एकदा त्याने धर्माचे उल्लंघन केले त्यामुळे त्याने आपल्या सासऱ्याचा राग आपणहून ओढवून घेतला. दक्षाने क्रोधावेशाने चंद्राला शाप दिला. "तू कालक्रमाने क्षीण होत जाशिल.





चंद्राचा पूर्ण क्षय होण्यापूर्वीच देवांनी दक्षाला तसे न करण्याकरीता अनुरोध केला व त्याला सांगितले की त्याने शाप परत घ्यावा. तरी दक्षाने त्याचा शाप परत घेतला नाही. परंतु त्याचा प्रभाव थोडा कमी केला. ह्याच कारणाने महिन्यातील पहिले पंधरा दिवस चंद्रकला वाढणे व पुढचे पंधरा दिवस लहान होणे अशी पौर्णिमा, आमावास्या झाली.











ह्यानंतर सर्व देवतांनी चंद्राला सुचविले की, "तू समुद्रस्नान करून शंकराची आराधना कर. चंद्राने त्यांच्या सल्ल्यानुसार करण्याचे ठरविले व आपला गमावलेला प्रकाश पुन्हां प्राप्त केला. ह्या कारणामुळे त्या ठिकाणाला 'प्रभास क्षेत्र' हे नाव पडले.

चंद्राने काही काळ प्रभास क्षेत्री राहून शंकराची पुजा केली. हा समाचार ऐकताच तेथील जनतेने सुद्धा तेथे असलेल्या शंकराची पुजा सोमनाथ ह्या नावाने करण्यास सुरवात केली.





परंतु अद्याप हे ठाऊक नाही की, प्रभास क्षेत्री सर्वात प्रथम शंकराच्या देऊळाचे निर्माण केव्हा झाले? इ. स. ७ व्या शतकाच्या सुमारास शासन करणाऱ्या वारसेन च्या काळात हे मंदिर मोडकळीस आलेल्या अवस्थेत होते. तेव्हां ह्या राजाने त्याच ठिकाणी एक नविन देऊळ बांधले.

नवव्या शतकात देवळाचे पुर्ननिर्माण झाले त्याच वेळी हे स्थान एक प्रसिद्ध तिर्थक्षेत्राच्या रुपाने प्रसिद्धिस पावले. चोहोकडून भक्त लोक ह्या देवाचे दर्शन घेण्यासाठी येतात. येथे राजे, महाराजे व जनता आपापल्या यथाशक्ति देवाला सोन्यांचे दागिने अर्पण करतात. ह्या देवळाच्या आजुबाजुला दुकाने व रहाण्याच्या सोयी उपलब्ध होऊ लागल्या आहेत.





अकराव्या शतकाच्या सुमारास मोहम्मद गजनीने भारतावर आक्रमण केले. मोहंम्मद गजनीला सोमनाथाच्या देवळातील दागदागिन्यां विषयी आधीपासूनच कल्पना होती. त्यामुळे त्याने आपल्या सर्व सैन्यांच्यासह देवळाच्या चारीबाजूला वेढा घातला. तेव्हा हि गोष्ट प्रजेतील लोकांना समजली.

देवळाच्या संरक्षणासाठी राजाने आपल्या सैनिकांना तेथे पाठविले परंतु महंम्मद गजनीच्या अफाट सैन्यापुढे त्याचा टिकाव लागू शकला नाही. सर्वसाधारण जनतेनी सुद्धा सैन्याशी मुकाबला केला व आपले प्राण खर्ची घातले.












देवळातील पुजाऱ्यांनी व अन्य भक्तांनी आक्रमण करणाऱ्या सैनिकांना विनवणी केली की त्यांनी देवाचे दागदागिने व इतर वस्तु घेऊन जाव्या पण मुख्य मूर्तीला हात लावू नये. तरीसुद्धा गजनीच्या मोहंम्मदने त्यांचे एकले नाही. उलट सांगणाऱ्यांची निघृण हत्या केली.

पन्नास हजार सैन्यांची कत्तल केल्यानंतरच गजनीच्या सैनिकांना देवळात प्रवेश करता आला. सैनिकांनी देऊळ व देवळातील मूर्तींची खूप तोडफोड केली व स्वतःच्या कल्पनेपेक्षा अधीक संपत्ती लुटून नेली.



ह्या हल्ल्यानंतर पुन्हां जे देऊळ बांधले. ते तेराव्या शतकाच्या सुमारास अल्लाउद्दीन खिलजीने मोडून टाकले पुन: देवळाचे पुर्ननिर्माण करण्यात आले ते अठराव्या शतकात औरंगजेबाच्या आज्ञेने पुन: जमिनदोस्त करण्यात आले. ह्यानंतर इंदुरची महाराणी अहिल्याबाई हिने देवळाची पुर्नस्थापना केली. आता जे देऊळ आहे त्यांची स्थापना १९५१ साली करण्यात आली.



# नागमुगुट

कोण्या एका काळी स्विझर्लण्डमध्ये एक राजा रहात होता. त्याला एकुलती एक मुलगी होती. मुलगा झाला नाही. त्यामुळे त्यानें मुलीलाच मुलगा मानून तिचे खूप कोडकौतुक केले.

एक दिवस राजा व राजकुमारी हिंडण्यास बाहेर पडले. तेव्हां रस्त्यात एक म्हातारी सांपाचा मुका घेत असतांना तिला दिसली. तेव्हां राजकुमारी तिरस्काराने तिच्याकडे पहात म्हणाली–"छी: छी: काय घाणेंरडे प्रकार करते आहे!"

ते ऐकून म्हातारीला अतिशय वाईट वाटले. ती निराश झाली व रागाने राजकुमारीला आपादमस्तक न्याहाळीत म्हणाली–"तू ह्या जनावराला पाहून त्याची घृणा करतेस. म्हणून तू सुद्धा ह्या प्राण्यांसारखेच आपले आयुष्य घालवशिल." असे म्हणत म्हातारीनें आपल्या हातातील जादुच्या कांडीने राजकुमारीच्या शरिराला स्पर्श केला. राजा त्या म्हातारीला अडवणार तितक्यात तो दारुण प्रकार घडला राजकुमारी सांप झाली. तिने केविलवाणें आपला फणा वर करीत वडिलांकडे पाहिले.

म्हातारी तेवढ्यानेच गप्प बसली नाहीं. तिने तिला दरडावत म्हटले–"आता तुझे राजाकडे काय काम राहीले? जा, तू सर्पाचे जिवन जग" असे म्हणून तिने सांपावर परत जादुच्या कांडीचा स्पर्श केला. तो सांप सर् सर् झाडीत निघून गेला.

राजा तो सर्व प्रकार पाहून आश्चर्य चकित झाला व नंतर दुःखाने संतापानें त्याने म्हातारीला मारण्याकरीता तलवार उगारली–" तेवढ्यात निर्भयतेने म्हातारीने आपल्या हातातील कांडी राजावर उगारली व धमकावणीच्या सुरात म्हणाली–"खबरदार! तुझे सुद्धा तुझ्या मुलीसारखेच हाल होतील.



राजा घाबरला मबाळकीने तिला म्हणाला की, माझ्या मुलीवर दया कर–"मला फक्त मंत्र टाकणे माहीत आहे. एक मदत मी करू शकते. राजकुमारीला नागांची राणी करेन. राणी झाली तर तिची स्थितीं थोडीं चांगली राहील. तू तुझ्या मुलीकरीता एक छोटासा मुकुट तयार करून मला दे. तीन दिवसाच्या आत तो येथे आणून दे तुझीं मुलगी तो मुकुट. नष्ट होईपर्यंत साप बनून राहील त्यानंतर तिला पुन्हा मानवरूप प्राप्त होईल. तू खऱ्या सोन्याचा मुकुट तयार करून आण कारण सोन्यात जर भेसळ झाली तर तो पाण्यात विरघळणार नाही." ती जादूगारीण म्हातारी म्हणाली.

राजानें दिर्घश्वास घेतला व आपल्या महालात परत येऊन त्याने मुकुट बनवला व त्या म्हातारीला दिला. म्हातारीनें तो ताबडतोब राजकुमारींच्या डोक्यावर घातला तो धारण करताच खरे तिचे महत्व वाढू लागले. ती तो धारण करून जेथे जाई तेथे कोणत्याही गोष्टीची उणीव भासत नसे. जर तो मुकुट धान्याच्या दुकानात ठेवला तर ते धान्याचे कोठार भरलेले राही. धन संपत्तीत ठेवले तर ते कधी कमी होत नसे. त्यामुळे तो मुगुट प्राप्त करण्याचा जो तो प्रयत्न करू लागला.

एक दिवस एक प्रवासी जगलात प्रवास करून अतिशय थकला. त्याला खूप तहान लागली. तो जवळच्या तळ्याकांठी आपली तहान भागविण्याकरीता आला. तेव्हां पाण्यात एक नागसांप त्याला पोहोताना दिसला व काठावर एक चमकणारा मुकुट पण दिसला. त्याने विचार केला की हा त्या नागाचा मुकुटच असणार मग काय, त्यानें घाईघाईनें तो मुकुट उचलला व रस्त्यानें भराभर चालू लागला. थोडा मार्ग चालून गेल्यावर त्याने पाठीमागे वळून पाहिले तो अनेक साप व राणी त्याचा पाठलाग करीत येत असलेले त्यानी पाहिले. तो घाबरला व झरकन शेजारच्या झाडावर चढून बसला. सर्व साप झाडाला वेळोखे घालून फुत्कारू लागले. तितक्यात एक बाई त्या बाजूने तेथे आली. तिनें त्या प्रवाशाला झाडावर बसलेले पाहून विचारले–"काय रे बाबा, तू झाडावर चढून कशासाठी बसला आहेस?" त्या प्रवाशाने सर्व गोष्ट खरी सांगून तिला विचारले 'हे सांप' तुला काही त्रास देत नाहीत हे कसे काय?

"मला सर्पाचा मंत्र येतो त्यामुळे हे सांप मला काही करू शकत नाहीत. आणि जर कां तो नागमुकुट तू मला देशिल तर मी ह्या सर्व सर्पांना इथून जायला सांगेन व तू आपले प्राण वाचवशिल." त्या बाईने उत्तर देत म्हटले.

"ते सर्व आपण नंतर पाहू. प्रथम तू त्या सर्पांना इथून घालवून दे" तो प्रवासी म्हणाला.

त्या बाईने काहीतरी मंत्र तोंडाने पुटपुटले त्याबरोबर सर्व साप आल्यावाटेने निघून गेले. त्यानंतर तो माणूस झाडावरून खाली उतरून आला व त्या बाईला म्हणाला–"माझ्यावर कुटुंबाचा फार मोठा बोजा आहे. हा मुगुट माझ्या चांगला उपयोगास येईल पाहिजे तर तू सर्व परिवारासह माझ्या घरी येऊन रहा. मी चांगले लक्ष ठेविन कीं, तुला कोणत्याही गोष्टीची कमी पडणार नाही.

कसेबसे त्या बाईने त्या माणसाचे म्हणणे मान्य केले. तो प्रवासी घरी आला व त्या मुकुटापासून प्राप्त झालेल्या धनधान्यानी आपले जिवन सुखाने जगू लागला. परंतु त्या बाईला त्याने तो













नागमुकुट कुठे ठेवला हे माहीत नव्हते. शेवटी त्याचा शोध तिने कसाबसा लावला व तो कुठे शेजारगांवी गेला असल्याची संधी साधून तिने तो हडप केला व घरी निघून गेली. त्या प्रवाशाला तिचा घरचा पत्ता ठाऊक नव्हता.

त्या बाईचे भाग्य फळाळले. तिने तो नागमुकुट आपल्या धान्याच्या कोठडीत ठेवला त्याचा परिणाम तिचे धान्याचे कोठार सदा भरलेले राहू लागले. तसेच तिने खूप पैसा कमावला. एकदा तिने धान्य काढून गिरणीत दळावयास पाठवले तेव्हां चुकून तो नागमुकुट सुद्धा दळणात निघून गेला.

त्या गिरणीच्या मालकाने धान्य घालून दळावयास सुरवात केली बराच वेळ झाला जात्यातले पीठ येणे थांबेचना त्याला गंमत वाटली व काहीतरी जादू असावी असे वाटले त्याने हात घातला तेव्हां एक छोटा नागमुकुट त्याच्या हाती लागला. त्याने तो नागमुकुट घेतला व कपाटात लपवून ठेवला दुसऱ्या दिवशी ती बाई आली. तिने तक्रार केली की आपला एक दागिना धान्यात गेला आहे. गिरणीच्या मालकाने काही माहीत नसल्याचे सांगितले. तेव्हां निराशेने दुःखी होऊन ती तेथून निघून गेली.

गिरणीच्या मालकाने विचार केला की तो नागमुकुट गिरणीच्या जात्यात घालून ठेवला तर थोड्या धान्याचे खूप पिठ करून ते विकता येईल व अफाट पैसा कमावता येईल. अशा प्रकारे काही दिवस त्याने पिठ करून खूप पैसा कमावला. परंतु एक दिवस अचानक दुर्दैवाने त्याच्या हातून चुक झाली तो मुगुट धान्यांबरोबर चुकीने जात्यात निघून गेला व त्याचा चुराचुरा होऊन गेला.

जात्यातून धान्य येणे बंद झाले तसेच पिठ येणे सुद्धा बंद झाले.

तो नागमुकुट नष्ट होताच नागराणी बनलेल्या राजकुमारीला पूर्ववत रूप प्राप्त झाले. ती आपल्या वडिलांकडे गेली व योग्य राजकुमारा बरोबर विवाह करून आपले आयुष्य आनंदाने घालवू लागली.






शंकराला मंदर पर्वतावर काशीला काय होत आहे, याचे वर्तमानच कळेनासे झाले. योगिनी सूर्य, ब्रह्मदेव यांना आपले स्मरण देखील कसे काय कोणालाही राहिले नाही? भूतगण तेथेच कायमची वस्ती करून राहू लागले की काय? शंकराला फार काळजी वाटू लागली. तेव्हां त्याने गणपतीला बोलावून त्याला सांगायचे ते सर्व नीट सांगून काशीला पाठविले.

विघ्नेश्वर गणपती काशीला गेला. आणि त्याने तेथे निरनिराळ्या प्रकारे उपद्रव सुरू केला ढुंढीभट्ट नाव धारण करून तो काशी नगरवासियांना भविष्य सांगित हिंडू लागला. काशी नगरावर फार मोठे संकट येणार अशी अफवा नगरभर पसरली. नंतर गणपती दिवोदासच्या राजवाड्यात गेला. दिवोदासने त्यांला राजपुरोहितात एक प्रमुख स्थान दिले.

राजाने एक दिवशी ढुंढीभट्टाला बोलावून विचारले–"काशी नगरीत हे जे उपद्रव होत आहेत त्याचे कारण काय?"

"महाराज मला वाटते की आपण काही काळ काशी सोडून बाहेर कोठेतरी जाऊन राहणे श्रेयस्कर होईल नंतर अठरा दिवसांनी उत्तरेकडून एक ब्राह्मण येईल व तो आपल्याला आपल्या हिताहिताचा उपदेश करील." ढुंढीभट्ट म्हणाला.

त्यानंतर शंकराने विष्णूला काशीं नगरीत पाठविले. विष्णु वृद्ध रूप घेऊन काशीला आला आणि काशीच्या नागरिकांमध्ये



नास्तिक वादाचा बौद्धमताचा उपदेश करू लागला. अशा तऱ्हेने काशीवासियांची बुद्धि भ्रष्ट झाली. त्यानंतर तो ब्राह्मण रूप घेऊन दिवोदासलाच जाऊन भेटला आणि त्याला आशीर्वाद दिला. दिवोदासने त्याला विचारले–"हे ब्रह्मर्षी! देव मला व माझ्या प्रजेला नानाप्रकारे त्रास देत आहेत आता वृद्धापकाळ आला आहे. मला मोक्ष प्राप्तीचा मार्ग सांगा!"

"हे राजन् काशी नगरीत लिंग प्रतिष्ठा कर. तुला सदेह कैलासवास लाभेल." विष्णू म्हणाला.

त्याप्रमाणे दिवोदासने आपला मुलगा समरंजय याला आपला वारस नेमून त्याचा राज्याभिषेक केला. नंतर एक मोठे देऊळ बांधून त्यात लिंग प्रतिष्ठा केली. त्याच्यासाठी कैलास लोकांतून विमान आले त्यात बसून कैलास लोकी निघून गेला. सर्व देव पुन्हां काशीला येऊन राहू लागले. शंकर नंदीवर बसून पुन्हां काशीला आला आणि त्याच्या मनाला शांती प्राप्त झाली.

विश्वनाथ तथा विशालाक्षी दोघे काशीला जाऊन काशीवास करावा. हा विचार मनात येतांच ते एक दिवशी आपल्या तीनशें शिष्यांसह काशीला येऊन पोंचले त्याच्या शिष्यांत वैशंपायन, जैमिनी सुमंत आदि प्रमुख होते. सर्व ऋषींनी प्रथम गंगेवर स्नान संध्यादि करून गायत्री जप झाल्यावर शंकराची आराधना केली. व्यास मुनींनी शिष्यांसह मुक्ति मंडपात मध्याह्न होईपर्यंत शिवपुराणाचे वाचन केले. नंतर सर्व मंडळी भिक्षाटनास निघून गेली.

त्यावेळी शंकर पार्वतीला म्हणाला– "व्यास मुनींची परीक्षा घेतली पाहिजे. त्यांना किंवा त्यांच्या शिष्यांना कोणाला भिक्षा मिळता कामा नये."

विशालाक्षी पार्वतीने होकारार्थी मान हलवून नगरीच्या प्रत्येक गृहिणीच्या मनात भिक्षा न देण्याची प्रेरणा उत्पन्न केली. व्यास मुनी सशिष्य "भिक्षांदेहि!" म्हणत घरोघरी फिरत असतां त्यांना उत्तर मिळे–



“अद्याप सैंपाकच झाला नाही!” किंवा जेवणे आटोपून बराच वेळ होऊन गेला!” एकेका घरी दार देखील उघडले नाही.

तीन प्रहरी गुरू आपल्या मठात परत आले व सर्व शिष्य मंडळी रिकाम्या हातांनीच परतली. सर्वांना भुका लागल्या.

“मला भिक्षेत एक शीत देखील मिळाले नाही!” व्यास मुनी म्हणाले आणि त्यांनी आपल्या शिष्यांना विचारले—“तुम्हांला काय काय भिक्षा मिळाली?” परंतु शिष्यांनी पण त्यांना मुळीच भिक्षा न मिळाल्याचे सांगितले.

लागोपाठ सात दिवस कोणालाच भिक्षा मिळाली नाहीं. व्यास मुनींना आश्चर्य वाटू लागले, या शिवपुरीत एका काळी दिवो दासासारख्याचे राज्य होते आणि आता तर काशी विश्वनाथ स्वतः काशीवास करीत आहेत. या गावात प्रत्येक गृहिणी अन्नपूर्णा म्हणून ओळखली जाते एक आठवडाभर उपासमार व्हावी ह्याचे कारण काय? उपासामुळे वैशंपायन जैमिनी सुमंत इत्यादि शिष्य बेशुद्ध होऊन पडले होते.

आठवा दिवस उजाडला. स्नानसंध्यादि आटोपून व्यासमुनी शिष्यांबरोबर भिक्षाटनास दारोदारी निघाले.

परंतु एका घरी देखील कोणी भिक्षा घातली नाही. तेव्हां मात्र व्यासांना मनस्वी राग आला. त्यांच्या कपाळाला आठ्या पडल्या कपाळावर घामाचे थेंब दिसू लागले त्यांनी कमंडलातून पाणी घेऊन शाप देण्यासाठी संकल्प सोडण्याचा निश्चय केला. आपले भिक्षापात्र फोडून सर्व काशीवासियांस असा शाप देण्याचे ठरविले कीं, तीन पिढयां त्यांना विद्या, धन आणि भक्ति या तिन्हींचा लाभ होणार नाही. परंतु कमंडलातले पाणी सोडायला हात पुढे केला तेव्हां हात थरथर कापू लागला व कमंडलातले पाणी हातावर पडले नाही.

त्याच वेळी एका वृद्ध सौभाग्यवती स्त्रीने आपल्या घराचे दार उघडले. तिच्या सर्वांगावर शुभ वस्त्राभूषणे होती. ती म्हणाली—“हे ब्राह्मणा! शाप कां देतोस माझ्याजवळ ये.”

ती स्त्री म्हणाली—“भिक्षा मिळाली नाही म्हणून का तू सर्व काशी नगरीला शाप द्यायला निघालास? तुझ्या हृदयाची परिक्षा घेण्यासाठी स्वतः काशी विश्वनाथने हा डाव रचला होता. नाहीतर तुझ्या सारख्यांना भिक्षा घालणे या काशीवासियांस अशक्य होईल असे वाटले कां तुला? दररोज अन्नपूर्णा स्वतः सुवर्णाच्या पळीने अमृतासारखी खीर सर्वांना देते ही गोष्ट तुला माहीत नाही वाटते?” तू आपला धीर सोडलास आणि विश्वनाथाला पत्नीं स्वरूप असलेल्या या काशीनगरीस शाप देऊ लागलास यावरून भूक ही तुझ्या सारख्या थोर महर्षीला देखील कशी हालवून सोडते हे उघड झाले आहे. बरे तर ये, मी तुला आज सशिष्य पंचपक्वान्नांचे मानून वाढते.

ते ऐकून व्यासमुनीं म्हणाले—“माते! आज कित्येक दिवसानंतर तुझे हे अमृत तुल्य गोड शब्द ऐकायला मिळाले आहेत. माते, तू काय वाटेल ती भिक्षा वाल, आम्ही तीं आपसांत वांटून घेऊन त्यात मनाचे समाधान करून घेऊ.

ते ऐकून ती स्त्रीं स्मित करून म्हणाली:—“बाळा! मध्यान्ह उलटून चालली आहे. तुम्ही सर्व गंगास्नान करून या. तुम्हां सर्वांना मी स्वतः मनसोक्त जेवण वाढणार आहे.”



त्यानंतर व्यास ऋषी आपल्या सर्व शिष्यांसह गंगास्नानास निघून गेले. स्नान संध्यादि आटोपून पुन्हां त्या सुगृहिणीच्या घरी भोजनार्थ परत आले. त्या सुगृहिणी ने सर्वांना आदपूर्वक घरात बोलावून नेले तिने पहिल्यापासून मांडून ठेवलेल्या पाटांवर त्यांना बसायला सांगितले आणि केळीचीं स्वच्छ पाने मांडली.

नंतर धूप रांगोळी आदी झाल्यावर ती सर्वांस म्हणाली—“आता अपोषणी घेऊन भोजनास सुरवात करावी.” ते एकून व्यास मुनी व त्यांचे शिष्य चकित होऊन










परस्परांकडे पाहू लागलें. त्या वेळी त्यांना पाने कोरीच दिसत होती आणि पक्वान्नांचा वास पण येत नव्हता.

आज ही गृहिणी आपल्याला उपाशी मारून आपली सर्वांची खोड मोडणार असे सर्वांच्या मनात येत होते परंतु त्याचवेळी काही स्त्रिया आपोषणी साठी पाणी घेऊन आल्या. ती वृद्धा स्त्री सर्वांना म्हणाली– "बाळांनो जेवायला थोडा उशीर झाला ; सावकाश होऊं द्या !"

सर्वांनी आपोषणी घेतांच सर्वांच्या पानावर प्रत्येकाला आवडणारे पदार्थ वाढलेले दिसले. सर्व पदार्थ स्वादिष्ट व प्रत्येकाला हवे तितके वाढलेले होते.

प्रत्येकाला वाटत होते की ती प्रत्यक्ष अन्नपूर्णाच आहे. जेवणें झाल्यावर त्या वृद्ध स्त्रीने सर्वांच्या विश्रांतीची व्यवस्था केली.

थोड्या वेळाने पार्वती परमेश्वर तेथे आले. सर्व विश्रांती घेत पडले होते. पार्वतीच्या चेहऱ्यावर शांतभाव होता. परंतु शंकराचा चेहरा उग्र दिसत होता. शिव पार्वतीला समोर पाहून सर्व उठून नम्रपणे प्रणाम करून उभे राहले.

शिवपार्वती उच्च आसनावर बसले. शंकराने व्यास मुनीकडे क्रुद्ध दृष्टीने पाहून विचारले–"काय रे उद्दंड मूर्ख, महाभारत लिहिण्याचे मूर्खत्व करून आज मला पत्नीस्वरूप असलेल्या काशीनगरीस शाप द्यायला निघाला होतास नाही कां? एक तर या काशीत तू प्रवेश केलास हाच तुझा अपराध ! आता जास्त वेळ न घालविता आलास तसा निघून जा !"

व्यासांनी पार्वती परमेश्वरांना नम्रपणे नमस्कार करून क्षमा मागितली आणि काशीहूंन निघण्यास तयारी करू लागले. तेव्हां पार्वतीला राहवले नाही ती म्हणाली– "बाळ ! तू काळजी करू नकोस झालेल्या चुकीचे प्राय:चित्त दक्षारामला भोमेश्वरांची उपासना करून कर, तुझे सर्व प्रकारे कल्याण होईल." पार्वतीच्या आज्ञे प्रमाणे व्यास आपल्या शिष्य मंडळी समवेत दक्षारामला निघाले.





# नवीन अनुभव

नीलगावात एकदा निर्गुणानंद नावाचे साधू आपल्या शिष्यगणांसमवेत आले. त्यांच्या दर्शनाकरता गावातील अनेक लोक येत. निर्गुणानंदानी बराचवेळ भक्तितत्व व वैराग्याविषयी अनेक उपदेश केले ह्यानंतर बऱ्याच लोकांनी आपल्या समस्या स्वामीपुढे मांडल्या.

निर्गुणानंदानी त्या समस्या ऐकून अनिच्छेने मान हलवित त्यांना समजावणीच्या सुरात म्हटले–"ह्या तुमच्या समस्या अत्यंत क्षुल्लक आहेत. ह्या अशा छोट्या छोट्या समस्यांकरीता तुम्ही लोक विनाकारण कां त्रस्त होता. असे आहे तर तुमच्या पुढे कठीण समस्या उभ्या राहिल्या तर तुम्ही नक्कीच वेडेपिसे व्हाल !" असे सांगून त्यांनी लोकांना पाठवून दिले.

भक्तगणांना ह्या गोष्टीचे मोठे आश्चर्य वाटले. की ज्या काळज्यामुळे आपल्या आयुष्यात अशांती माजली आहे त्या समस्या क्षुल्लक वाटत आहेत. हे सर्व जाणणारा त्यांचा पाटील शिवचरन ह्यांनी भक्तांना उद्देशून म्हटले–"तुम्ही लोकांनी स्वामींसमोर ज्या आपल्या समस्या प्रकट केल्यात त्या गृहस्थ जीवनातील अत्यंत साधारण आहेत. जर कां तुम्ही काही अध्यात्मिक समस्या त्यांच्या पुढे ठेवाल तर ते निश्चित पणे काही उपाय सांगतिल."

त्यांच्या बोलण्यात काहीतरी तथ्य असावे असे गावकरी लोकांना वाटले परंतु गावकऱ्यांना सद्स्थितीत फक्त गृहस्थजिवनातीलच काही काळज्या होत्या.

ह्यानंतर निर्गुणानंदानी लोकांना दोन दिवस धर्मसंबधी काही उपदेश केले तिसऱ्या दिवशी गावच्या पाटलांनी साधूंना स्वत:च्या घरी पाचारण केले. भोजनानंतर त्यांच्या विश्रांतीची सोय करून निर्गुणानंदांकरीता











एक मच्छरदाणी लावून दिली. परंतु सकाळ होताच स्वामीचे डोळे झोप न मिळाल्यामुळे लाल झालेलें होते व ते थोडे चिडचिडे सुद्धा झालेले दिसत होते. त्यावर शिवचरणांनीं त्याना विचारले– "स्वामीजी, रात्रभर आपल्याला चांगली झोप लागली नाही काय ?"

"झोप कुठली आली रात्रभर डासांनी चावून काढले त्यामुळे रात्रभर जागाच होतो !" निर्गुणानंद म्हणाले.

शिवचरणांनी भोळा चेहरा करीत विचारले–"स्वामी, आपल्याला माहीत आहे. ह्या काळात डांस जास्त होतात त्यात ह्या गावात तर जास्तच, याकरीता मी मच्छरदाणीची सोय केली.

"मच्छरदाणी असली म्हणून काय झाले? झोपमोड करणारा एखादा डासच मच्छरदाणी मधे घुसला तर काय थोडे आहे ?" निर्गुणानंद म्हणाले.

त्यावर शिवचरणांनी भोळ्याचा आव आणित विचारले–"मला तर एका गोष्टीचे मोठे राहून राहून आश्चर्य वाटते आहे. की आपल्या सारख्या एखाद्या अगाध ज्ञानीला एक साधा डास कसा त्रास देतो? आपण मला क्षमा करीत असाल तर एक गोष्ट आपल्या समोर निवेदन करावी म्हणतो की, काल गावकरी लोकांनी आपल्या समोर त्यांच्या ज्या काळज्या सांगितल्या. त्या तर तुमच्या ह्या त्रासपेक्षां सुद्धा जास्त कठीण असतिल नां !"

शिवचरणांच्या बोलण्यामुळे निर्गुणानंदाना आपली चुक समजून आली. माणसाला छळणारी लौकीक व्यथा केवळ धर्मोपदेशां मुळे निवारण होऊ शकत नाही. त्या करीता ती सोडविण्याचा काही मार्ग अवलंबला पाहिजे. त्याकरीता योग्य सल्ला दिला पाहिजे.

त्याच दिवशी निर्गुणानंदानी सर्व भक्तगणांना एकत्र बोलावून घेतले व प्रत्येकांच्या समस्या ऐकून त्यांना त्या निवारण कशा कराव्या ह्या विषयी सल्ला व त्यांच्या मनाचे समाधान केले.





# करणीचे फळ

निर्वाक नावाचा वैद्य कैक वर्षापासून रोग्यांवर उपचार करीत होता. परंतु त्याची मिळकत तेवढी नसल्यामुळे तो रोग्यांकडून पैसा काढीत असे. त्याचे वडील भरण त्याला नेहमी समजावित–"अरे, वैद्याला धनाचा लोभ कधी असू नये. प्रत्येक रोग्याचे आजाराचे काय कारण हे तपासून त्याला योग्य ते औषध द्यायला पाहिजे. जसा तुला अनुभव येईल तसा तू वैद्यकीत निपुणता प्राप्त करशील व अशी एक वेळ येईल की सर्व रोगांना दूर पळवून लावशील. परंतु तू तर रोग्यांच्या बरोबर तसा व्यवहार करीत नाहीस तुझे लक्ष फक्त रोग्यांच्या खिशा-कडेच लागलेले असते. तू रोग्याकडे अशा दृष्टीने पहातोस की ते आपले पैसे प्रथम देतात कां नाही. परंतु वडिलांनी ऐकवलेले त्याला अजिबात आवडत नसे. तो त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून स्वतःच्या मना-प्रमाणेच रोग्यांबरोबर वागत असे.

एक दिवस निर्वाकच्या घरासमोर एक भिकारी डोळ्यापुढे अंधेरी येऊन खाली पडला. ते पहाताच निर्वाकचे वडील धावत बाहेर आले आणि त्यांनी त्याला उचलले व घरांच्या ओसरीवर आणून ठेवले.

भिकाऱ्याचा श्वासोश्वास चालू होता. तेव्हां भरणने विचार केला की, त्या भिकाऱ्याला भुकेमुळे चक्कर केली असावी त्याने त्याच्या तोंडावर थोडे गार पाणी शिपडले त्याबरोबर भिकारी शुद्धीवर आला उठून बसला त्याने हात जोडून भरणला नमस्कार केला व तेथून जाऊ लागला.

तेव्हां भरणने दया येऊन म्हटले–"अरे, आज जेवून मग जा."

भिकारी म्हणाला–"दादा, मला भूक नाही. आता इथे येण्यापूर्वीच एका दयाळू



बाईने मला पोटभर खायला घातले आहे. मी कोपऱ्यावरच्या धर्मशाळेत रहातो. डोळ्यांसमोर अंधेरी येऊन मी खाली पडलो."

"भरणने आश्चर्य करीत विचारले— तुझे अंधेरी यायचे कारण भूक नाही ?"

"नाही, दादा ! हा माझा जुना आजार आहे. दिवसातून कमीत कमी तीन चार वेळा मी चक्कर येऊन बेशुद्ध पडतो. त्यामुळे मला भीक मागायला सुद्धा त्रास पडतो. परंतु रस्त्यावर बेशुद्ध होऊन मीं पडलेला असतो तेव्हां रस्त्यातील लोकांना दया येऊन ते थोडे फार पैसे माझ्या आजूबाजूला टाकून जातात. ते सुद्धा मला थोडें उपयोगी पडतात.

पण पैशां अभावी आजार गुप्त ठेवता कामा नाही. जर तुला खरोखरी तुझ्या आजारावर उपचार करून घ्यावयाचे असतील तर माझा मुलगा वैद्य आहे त्याला मी सांगतो तो तुझ्या रोगावर चांगला उपचार करेल." भरण म्हणाला.

भिकारी केविलवाणा चेहरा करीत म्हणाला—"दादा, माझ्या दुखण्यावर उपचार करणे अद्याप कोणत्याच वैद्याला जमले नाही.

तू तुझ्या रोगावर इलाज करून घेणार असलास तर सांग. मी आता तुझ्यावर उपचार करण्यास त्याला सांगतो." भरणने समजावले.

भिकारी गालातल्या गालात हसत म्हणाला—"दादा, कोण असा दुर्दैवी आहे की, जो आपल्या रोगावर उपचार करण्यास मागेपुढें पाहिल. आणि मी जर कां गावातील लोकांच्या पुढे चक्कर येऊ खाली पडलो तर काही वाईट नाही. परंतु निर्जन वाटेत पडलो तर काय अवस्था होते काहीं दुष्ट लोक मी भिकारी आहे चक्कर पडलो आहे. हे पाहून सुद्धा मी भिक मागून कमावलेले पैसे चोरून घेऊन पळून जातात. आता तुम्ही बरोबर उपचार केला तर मी आयुष्यभर ऋणी राहीन.

ह्यानंतर भरण घराच्या आत निघून गेला. व त्याने आपल्या मुलाला भिकाऱ्याची सर्व गोष्ट सांगितली व म्हणाला—"मुला तू माझा हा विक्षिप्तपणा आहे असे समजू नकोस केव्हां केव्हां भिकाऱ्याच्या रूपात देवच येतो. पैसा देण्याच्या स्थितित नसलेल्या ह्या अनाथ गरिबावर निष्काळजीपणा न करता बरोबर रोग निदान करून चांगले औषध दे. तुझे उपकार होतील. तुझे भाग्यच बदलेल माझ्या बोलण्याचा तिरस्कार करू नकोस.

निर्वाक चिडीनेच त्या रोग्याजवळ गेला व त्याला तपासून तो घरात आला व काहीतरी औषध तयार करून भिकाऱ्याच्या हातात देत म्हणाला—"ऐक, तू चार दिवस ह्या गोळ्या खा. तुझे दुखणें नक्की बरे होईल." ह्यानंतर भिकाऱ्याने दोघांना नमस्कार केला व तेथून निघून गेला.

भरण म्हणाला—"निर्वाक, तू हे जे उपकार केलेस ते पाहून मला खूप आनंद वाटला देव तुझे नक्की कल्याण करेल.

त्यावर निर्वाक चिडून म्हणाला—"आणि खरेच देवांनी माझे कल्याण केले व माझे भाग्य उजळले तर मला त्यात आनंदच होईल. परंतु मला माझ्यावर इतका देखिल विश्वास नाही की. माझ्या औषधांने तो भिकारी सुधारेल.

"तू त्या भिकाऱ्याला कोणती औषधे दिलीस." भरणने घाबरत त्याला विचारलें.



"मी फक्त तुम्हांला संतुष्ट करण्याकरीता अशी औषधे मिसळून त्याला दिली की त्याने त्याचे काही नुकसान होणार नाही. परंतु पुढे त्याचे नशीब." निर्वाक म्हणाला.

दैवयोगाने भिकाऱ्याला त्याच्यारोगांवर जे औषध दिले गेले ते बरोबर उपयोगी पडले भिकारी चार दिवसात ठणठणीत बरा झाला.

एका आठवड्यानंतर तो भिकारी निर्वाकच्या घरी आला व त्याला म्हणाला— "वैद्यसाहेब आपल्या हातचा गुण अद्‌भुत आहे. कोण्याकाळी मी एक भिकारी नव्हतो. इमानदारीने कष्ट मेहनत करून



पैसा कमावून आपले पोट भरीत होतो. परंतु ह्या रोगांमुळे मला काम सोडून देणे भाग पडले. शेवटी भीक मागणें नशिबी आले. आता पुन्हां मी कष्ट करून पैसा कमाविन असे म्हणत तो भिकारी कृतज्ञता पूर्वक पाया पडला.

निर्वाक चिंतायुक्त स्वरात त्याला म्हणाला–" तुझ्यासारख्या गरिबावर माझ्या औषधाचा उपयोग झाला. त्यामुळे माझ्या मिळकतीत कधी फेरफार होत नाही.

त्यावर भिकारी म्हणाला–" साहेब, तुम्ही माझा उद्धार केला. मी माझ्या परीस्थितीमुळे तुम्हांला पैसा देऊ शकत नाही परंतु तुम्हांला पैसा मिळविण्याचा उपाय सांगतो त्याने माझे ऋणतरी फिटतील.

हे उत्तर ऐकून निर्वाक चिडला व म्हणाला–" माझ्यावर अद्याप पर्यंत इतके तरी दुर्दैव येऊन पडले नाही की, भिकाऱ्याने मला पैसा मिळविण्याचा उपाय सांगावा.

तेवढ्यात भरण तेथे आला म्हणाला– "काही सांगता येत नाही कोणामुळे कोणाचे भाग्य फळेल. त्याचे म्हणणे लक्षपूर्वक ऐक तरी."

भिकारी निर्वाकला म्हणाला–" सहरान-पुर इथून शंभर कोस सुद्धा दूर नसेल. त्या गावात एक श्वेतगुप्त नावाचा व्यापारी रहातो. तो पिढींजात कोटयाधिशा आहे. परंतु त्याचा उपयोग काय? तो सुद्धा मला झाला होता त्या रोगानेच ग्रस्त झालेला आहे. अनेक वैद्यांनी त्याच्यावर चांगले चांगले उपचार केले परंतु उपयोग झाला नाही. शेवटी व्यापाऱ्याने जाहीर केले की जो वैद्य त्याच्या रोगावर बरोबर उपचार करेल त्याला एक लाख सोन्याची नाणी बक्षीस देण्यात येतील. तेव्हां मला विश्वास आहे की, आपण मोठ्या सुलभतेने हे बक्षीस मिळवू शकता" असे सांगून तो भिकारी तेथून निघून गेला.

तो सल्ला ऐकून निर्वाकचा चेहरा काळा ठिक्कर पडला. परंतु भरणचे त्याकडे



लक्ष गेले नाही तो आपल्या मुलाला म्हणाला–" ऐकलेस नां, गरीब व श्रीमंत कोण हे न पाहात जो मनापासून त्याच्या रोगावर उपचार करतो त्याचे नेहमीच चांगले होते. तू भिकाऱ्याला मदत केलीस ते पाहूनच देव तुझ्यावर संतुष्ट झाला व तुझे भाग्य उजळले."

निर्वाक दिनवाणेंपणाने म्हणाला–"बाबा, तुम्ही सांगितलेला सल्ला मी खरोखरी पाळला असता तर आता खरेच माझे भाग्य उजाळले असते. परंतु मी मन:पुर्वक भिकाऱ्यावर इलाज केला नाही. आपल्या आज्ञेचा तिरस्कार करता येत नाही म्हणून मी चिडून जाऊन त्याला रागाच्या भरात कोणतीतरी चार औषधे मिसळून त्या भिकाऱ्याला दिली.

" मग त्यात वाईट काय झाले. तीच चार औषधे तू त्या श्वेतगुप्त व्यापाऱ्याला नेऊन दे" भरणने सुचविले.

निर्वाक क्षणभर मौन राहीला नंतर म्हणाला–" मला दु:ख त्याचे नाही. बाबा भिकाऱ्याने मला पूर्वीच तसे सांगावयास पाहिजे होते. आता माझ्या ध्यानात सुद्धा नाही की मी त्या भिकाऱ्याच्या रोगावर कोणकोणती औषधे मिसळून दिली. मी रागात व चिडून जी औषधे तयार केली होती आता ती औषध पुन्हां मी तयार करू शकणार नाही. कारण आपल्या घरात दोन हजाराहून जास्त औषधे आहेत. मी भिकाऱ्या करीता ज्या चार औषधांचा उपयोग तेव्हां केला होता तो माझ्या लक्षात सुद्धा नाही!

जाणुन बुजून जो स्वत: अपराध करतो त्याला सुटका कधी मिळत नाही आता भोग आपल्या कर्माची फळे" असे म्हणून रागारागाने त्याचे वडील तेथून निघून गेले.

ह्या गोष्टीमुळे निर्वाकचे डोळे उघडले. त्याने आपल्या वडीलांच्या सांगण्यानुसार वागण्यास आरंभ केला व एक प्रख्यात निष्णात वैद्य म्हणून नावाजला गेला. त्यामुळे त्याला पैसा सुद्धा भरपुर मिळु लागला.





# कृतज्ञता

शंभर वर्षापूर्वीची गोष्ट आहे. करबला नावाच्या नगरात एक सुलेमान नावाचा गरीब म्हातारा रहात होता. त्याची बायको व दोन मुली दररोज सूत कातीत व ते सुत घेऊन जाऊन बाजारात विकत. ती मिळकत फक्त त्याच्या कुटुंबालाच पुरेशी होती. त्यामुळे त्याला एक पैसा सुद्धा जमवणे शक्य झाले नाही. त्यांच्या दोन्ही मुली लग्नायोग्य झाल्या होत्या. परतु त्या म्हाताऱ्याला पैशांअभावी त्याचे लग्न करून देणे अशक्य होते. त्याच काळजीमुळे तो नेहमी चिंतामग्न असे.

एक दिवस सुलेमान आजारी पडला. व गावच्या बाजाराला जाऊ शकला नाही. त्यामुळे त्याची मोठी मुलगी सूत घेऊन बाजारात गेली व येईल त्या किंमतीला सूत विकून त्या पैशांने तिनें तीन रोटया घेतल्या व परत निघाली.

सुलेमानची मुलगी झाडीतील पायवाटेने येत असतांना जवळच असलेल्या एका झोपडीतून तीला एका बाईचा विव्हळण्याचा आवाज ऐकू आला तीने पुढे होवून झोपडीच्या आत डोकावून पाहीले. आत जमिनीवर एक म्हातारी पुढयात दोन मुलाना घेऊन झोपलेली दिसली. ती तापाने कण्हत होती. सुलेमानची मुलगी झोपडीत शिरली व तिने त्या म्हातारी जवळ जात तिला विचारले–"माई, तुम्हांला कसला त्रास होत आहे? कण्हत कां आहात?"

"भुकेने जिव कासावीस झाला आहे, मुली! तीन दिवसांपासून काही खायला नाही." त्या म्हातारीने सांगितले.

"माझ्यापाशी तीन रोटया आहेत मला वाटते आत्ताची भुक भागवायला ह्या तीन तुम्हाला नक्की पुरतील. परंतु उद्या तुम्हीं काय कराल?" त्या मुलीने विचारले.

"बाळे ह्या क्षणाला थोडाफार पोटाला आधार मिळाला तरी पुरे आहे ती खाऊनच आम्ही आमचे प्राण तरी वाचवू नंतर शेजार गांवी आमच्या श्रीमंत नातेवाईकांकडे जाऊ." ती म्हणाली.

सुलेमानच्या मुलीने आपल्या पिशवीतील तिन रोटया काढून त्या म्हातारीच्या हातात दिल्या. त्या त्यांनी खाल्लया.

म्हातारी म्हणाली–"बाळे, तुझे गुण वाखाण्याजोगे आहेत. परंतु तुझ्या उपकाराच्या बदली देण्याजोगे माझ्याजवळ काही नाही. फक्त हि सुरई आहे परंतु ही रिकामी सुरई नाही ती तू घे." असे म्हणत जुनी सुरई तिच्या हातात दिली.

सुलेमानच्या मुलीने ते सुरई वरखाली निरखून पाहिली–"ह्या सुरईची आम्हाला अजिबात गरज नाही तेव्हां तुम्हीच ही ठेऊन घ्या." ती मुलगी म्हणाली.

"अग मुली मी, सांगितले नां! ही रिकामी सुरई नाही. माझे म्हणणे ऐक. तू आपल्या बरोबर घेऊन जा." ती म्हातारी गद्‌गद्‌लेल्या स्वरात म्हणाली.

त्या मुलीला म्हातारीचे सांगणे डावलणे अशक्य झाले. तीने ती सुरई घेऊन घरी परत आली घरी आल्यावर तिने सारा वृतांत आईवडीलांना सांगितला.



त्या गरीब म्हातारीवर त्यांनी जो दयाभाव दाखविला त्या मुळे सर्व कुटुंबाला एक दिवस उपास घडला पण कोणी दु:खीकष्टी झाल नाही.

सुलेमान आपल्या धाकटया मुलीला म्हणाला–"बाळ, तुझ्या ताईने चांगले काम केले. आता ही सुरई बाजारात नेऊन विकलीस तर कमीत कमी एक रोटी तरी येईल." असे सांगून म्हाताऱ्या बापाने ती सुरई हातात दिली.

ती सुरई घेऊन बाजारात गेली व एका जागी सुरई पुढयात ठेऊन बसली. त्या रस्त्याने अनेक माणसे गेली परंतु कोणीही त्या सुरईची किंमत विचारली नाही.

संध्याकाळच्या सुमारास बाजार जेव्हां बंद झाला तेव्हां एक मासेविक्या तिच्याजवळ आला व त्याने विचारलं–"हे बघ, माझ्या टोपलीत एक मासा शिल्लक आहे जाता जाता मी विकणार आहे पाहिजे कां?

मासा विकत घ्यायला माझ्याकडे एक पैसा देखील नाही. पाहीजे असल्यास ही सुरई घेऊन त्या बदल्यात मला मासा दे." धाकटी मुलगी त्याला म्हणाली.

मासेविक्या थोडावेळ त्या सुरईकडे पहात राहीला. नंतर त्याने विचार केला की जे होते तें फायद्याचेच असते त्याने तो मासा त्या मुलीला दिला व सुरई घेऊन निघून गेला.

धाकट्या मुलीने तो मासा घरी नेऊन आपल्या आईच्या हातात दिला. तिने त्या मांशाचे दोन तुकडे केले. तेव्हां माशाच्या पोटातून एक मौल्यवान मोती बाहेर पडला. तो मोती पाहून सर्वांना अत्यंत आश्चर्य वाटले.

दुसऱ्या दिवशी सकाळी त्या म्हाताऱ्या बापाने तो मोती घेतला व आपल्या जुन्या सोनार मित्र कडे नेऊन त्याला दाखविला. त्या सोनाराने तो मोती निरखून पाहीला व त्याला म्हणाला–"मी आजपर्यंत इतका मौल्यवान मोती पाहीला सुद्धा नाही. त्यामुळे मला ह्याची खरी किमत काय हे समजत नाही. माझा दुसरा एक मित्र आहे तो रत्न-पारखी आहे चल आपण त्याच्याकडे जाऊन हा मोती दाखवू." असे म्हणुन तो दोघे त्या मित्राकडे गेले.

सोनार मित्राने त्या मोत्याची चांगली किमत सुलेमानला देऊ केली. त्या पैशांनी सुलेमानचे सारे कष्ट दूर झाले. सुलेमानने चांगली मुले पाहून आपल्या दोघीमुलींची लग्नें थाटामाटाने लावून दिली.

एक दिवस सुलेमान आपल्या मुली व जावयांसोबत मिष्टान्ने फराळ करीत असतांना त्याला जुन्या गोष्टीची आठवण झाली व तो कृतज्ञतेने म्हणू लागला. त्या गरीब म्हातारीच्या बोलण्यातील रहस्य आत्ता माझ्या ध्यानात आले. खरोखरी ती सुरई रिकामी नव्हती.





# महान वीर

प्राचीन काळी कलिंग व वंग ह्या दोन्ही देशांच्या मध्यावर एक किल्ला होता. त्याचे बुरुज दारे झरोके पाहून तो किल्ला असावा असे वाटत होते. परंतु त्यावर कोणीही चाल केली तर तो मोडून जाई.

त्या किल्यात जितवर्मा नावाचा एक मूर्ख बावळट रहात होता. त्याच्या पूर्वजांपैकी कोणा एकाचे ते राज्य होते. त्यामुळे तो स्वतःला फार मोठा पराक्रमी म्हणवत असे. तो नेहमी स्वतःची टिमकी वाजवित फिरत असे.

जितवर्माच्या ह्या घमंडी स्वभावाची इतर लोक वरवर तरी स्तुती करीत परंतु मनातून त्याची अवहेलना करीत.

जितवर्मा नेहमी आपले शौर्य दाखविण्याच्या उद्देशाने मोजक्या लोकांना बरोबर घेऊन जमिनदाराच्या घरी दरोडा घालण्याचा प्रयत्न करीत असे आणि तो एखादी कोंबडी किंवा मेंढी उचलून घेऊन गेला तर जमिनदाराला त्याचे फारसे काही वाटत नसे परंतु त्याहून जास्त किमतीची जर कां काही चिजवस्तु तो घेऊन जाण्याचा प्रयत्न करु लागला तर मात्र तो त्याच्या माणसां करवी त्यांना बदडून काढी असे जर त्याचे नोकर मार खाऊन परत आले तर जितवर्मा त्यानाच उलट दटावित म्हणत असे–"तुम्ही भित्रे आहात जर कां तुमच्यात हिम्मत असती तर माझ्या समोर येऊन उभे राहीला नसतात. असे त्यांनी आपल्या सैनिकांना हुसकून लावले नसते. अशा नीच व दुष्टां बरोबर मीच जाऊन युद्धा करतो.

आणि लुटायला जेव्हां जीतवर्मा स्वतः जाई व मार खाऊन परत येई तेव्हां त्याची बायको त्यांच्या जखमांना औषध लावीत असे. तीला माहीत होते की, आपला नवरा

संध्याकाळच्या सुमारास बाजार जेव्हां बंद झाला तेव्हां एक मासेविक्या तिच्याजवळ आला व त्याने विचारलं–"हे बघ, माझ्या टोपलीत एक मासा शिल्लक आहे जाता जाता मी विकणार आहे पाहिजे का?

मासा विकत घ्यायला माझ्याकडे एक पैसा देखील नाही. पाहीजे असल्यास ही सुरई घेऊन त्या बदल्यात मला मासा दे." धाकटी मुलगी त्याला म्हणाली.

मासेविक्या थोडावेळ त्या सुरईकडे पहात राहीला. नंतर त्याने विचार केला की जे होते तें फायद्याचेच असते त्याने तो मासा त्या मुलीला दिला व सुरई घेऊन निघून गेला.

धाकट्या मुलीनें तो मासा घरी नेऊन आपल्या आईच्या हातात दिला. तिने त्या मांशाचे दोन तुकडे केले. तेव्हां माशाच्या पोटातून एक मौल्यवान मोती बाहेर पडला. तो मोती पाहून सर्वांना अत्यंत आश्चर्य वाटले.

दुसऱ्या दिवशी सकाळी त्या म्हाताऱ्या बापाने तो मोती घेतला व आपल्या जुन्या सोनार मित्र कडे नेऊन त्याला दाखविला. त्या सोनाराने तो मोती निरखून पाहीला व त्याला म्हणाला–" मी आजपर्यंत इतका मौल्यवान मोती पाहीला सुद्धा नाही. त्यामुळे मला ह्याची खरी किमत काय हे समजत नाही. माझा दुसरा एक मित्र आहे तो रत्न-पारखी आहे चल आपण त्याच्याकडे जाऊन हा मोती दाखवू." असे म्हणुन ते दोघे त्या मित्राकडे गेले.

सोनार मित्राने त्या मोत्याची चांगली किमत सुलेमानला देऊ केली. त्या पैशांनी सुलेमानचे सारे कष्ट दूर झाले. सुलेमानने चांगली मुले पाहून आपल्या दोधीमुलींची लग्ने थाटामाटाने लावून दिली.

एक दिवस सुलेमान आपल्या मुली व जावयांसोबत मिष्टान्ने फराळ करीत असतांना त्याला जुन्या गोष्टीची आठवण झाली व तो कृतज्ञतेने म्हणू लागला. त्या गरीब म्हातारीच्या बोलण्यातील रहस्य आत्ता माझ्या ध्यानात आले. खरोखरी ती सुरई रिकामी नव्हती.





"हि काय विचारण्यासारखी गोष्ट आहे ? मीच आहे तो." जीतवर्माने मोठ्या साहसाने उत्तर दिले.

"तरमग, लवकरात लवकर किल्ला स्वाधिन कर. नाहीतर तुला व तुझ्या किल्ल्याचा समुळ नाश होईल. कलिंग देशाच्या राजाच्या आज्ञेने आम्ही वंग देशावर विजय प्राप्त करून येत आहोत." कलिंग सेनापतीने सांगितले.

"अरे दुष्ट नालायका, तुला एवढा अहं-कार कसला. मी तुला व तुझ्या सैन्याला आत्ताच्या आत्ता यम लोकात पाठवतो. जितवर्माच्या शौर्य साहसांच्या गोष्टी तू बहुदा ऐकल्या नसाव्यास ?" असे म्हणत जितवर्माने शत्रूच्या सेनापतीवर बाण सोडला तो त्याच्याजवळ जाऊन पडला.

तेव्हां सेनापतीने आपल्या सैन्याला इशारा केला. त्याबरोबर बाणाचा वर्षाव किल्ल्यावर होऊ लागला. जितवर्माने आपल्या लोकांना हल्ला करावयास सांगितले. परंतु गंमत एक झाली की जितवर्माचे बाण व शत्रू सैन्यांचे बाण इतके सोडून एकही सुद्धा माणूस जखमी झाला नाही. कोणाचे काहीही नुकसान झाले नाही.

अर्धातास अशा प्रकारे बाणांचा वर्षाव एक दुसऱ्यांवर होत राहला. तेव्हां कलिंग देशाचे सैन्य थोडे मागे गेले. जितवर्मा म्हणाला–"हात् तिच्या ! हे सर्व पळपुटे भित्रे म्हणून पाठीमागे जात आहेत. ह्या लोकांना माझ्या शौर्याच्या काही गोष्टींची माहीती दिसत नाही ?

परंतु कलिंग सैन्याने पूर्णपणे माघार घेतली नव्हती. त्यांनीं जवळच आपले तंबू ठोकले व सकाळी अर्धातास व संध्याकाळी अर्धातास ते किल्ल्याजवळ येऊन बाणांचा वर्षाव करू लागले. अशा तऱ्हेने दहा दिवस उलटले. अकराव्या दिवशी सेनापती घोड्यावर बसून किल्ल्याजवळ पोहोचला व ओरडून म्हणाला–"जितवर्मा ! आम्ही हारलो आपण एकजुटी करून घेऊ. आपण कृपया किल्ल्याचे दार उघडावे.

      


"हे डोके प्रथमच चालवले असते तर शिपायाचे श्रम तर वाचले असते नां? असे म्हणत जितवर्माने आपल्या किल्ल्याचे दार उघडले व शत्रू सेनापतीला किल्ल्याच्या आत येऊ दिले.

जितवर्माने कलिंगसेनापतीला विचारले— "आजपासून आपला राजा आमचा सामन्त बनेल व कर भरेल?"

तुम्ही असे एक पत्र लिहून द्या की, ह्या लढाईत आमचे अर्धे सैन्य कामी आले व बाकी अर्ध्या सैन्यातील बरेच शिपायी बंदी झाले." कलिंग सेनापती म्हणाला.

ह्यानंतर कलिंग सेनापतीने जितवर्मा-कडून तसे पत्र लिहून घेतले व आपले उरले सुरले सैन्य घेऊन वंग राजाकडे पोहोचला खरी गोष्ट अशी झाली की, कलिंग राज्य हडप करण्याकरीता एक षडयंत्र रचले होते. कलिंग सेनापतीने आपल्या राजाला असे आश्वासन दिले होते की, आम्ही वंग राज्यावर जय मिळवून परत येऊ आणि तो मोठ्या सैन्यानिशी तेथून निघाला व राज्याच्या सरहद्दीवर असलेल्या किल्ल्या च्या जवळ युद्ध करण्याचे ढोंग केले व जितवर्माकडून असे पत्र लिहून घेतले की युद्धात सर्व सैन्य नष्ट झाले व बाकी सैन्य वंग राजाच्या स्वाधिन करून थोड्याफार सैन्यासह तो आपल्या राज्यात परत आला. ह्यानंतर काही दिवसांनी वंग सैन्याने कलिंगवर आपला अधिकार प्राप्त केला.

परंतु ह्या सर्व गोष्टीचा पत्ता जीतवर्मा किंवा त्याच्या किल्ल्यात रहाणाऱ्या लोकांना बिलकुल नव्हता. त्यामुळे सर्व लोकांनी असा गवगवा केला की जीतवर्मा शूर साहसी योद्धा आहे आणि त्यावर हल्ला करून आलेल्या कलिंग सैन्याचा त्याने एकट्यानेच सर्वनाश केला. जीतवर्मा सुद्धा स्वत: असेच समजला की, आपल्या बाणांच्या वर्षावामुळे त्याचे अर्धे सैन्य प्राणास मुकले. परंतु खरी गोष्ट अशी झाली की युद्ध कोणीही स्वत:च्या डोळ्यांनी पाहिले नाहीत त्यामुळे काय घडले हे कोणालाही शेवटपर्यंत समजले नाही.





# वाळवंटातील प्राणी

नैसर्गिक आश्चर्यात काही गोष्टी अशा पण आढळतात की, वाळवंटी भागात झाडे झुडूपे उगवणे कठीण पण स्तन्य प्राणी व रंगीत प्राणी आपल्या उपजिवीके करीता तेथे वास्तव्य करून रहातात. वाळवंटी भागात रहाणाऱ्या प्राण्यांना भयंकर उष्णता व पाणी यांच्या अभावी खूप त्रास सहन करावा लागतो. तशा कठिण परिस्थितीला तोंड देऊन जिवंत रहाण्या-साठी काही प्राण्यांना निसर्गता तशी शक्ति प्राप्त होते.

खडबडीत व लांबलांब काटे असलेली शेपूट असलेल्या पालीं सारखे दिसणारे हे प्राणी उत्तरपूर्व आफ्रिकेत आढळतात. आपल्या अणकुचीदार नखांनी त्या दोन मिटर लांबी पर्यंत बिळे तयार करतात. व थंडीच्या दिवसात व पावसाळ्यात त्या त्यांत बसून आपल्याला सुरक्षित ठेवतात त्यांच्या खडबडीत व काटे असलेल्या शक्ति असलेल्या शेपटीचा शस्त्रासारखा उपयोग करतात साप किंवा इतर सरपटणारे प्राणी त्यांच्यावर हल्ला करावयास आले तर त्या बिळात लपतात व आपली धारदार शेपूट बिळाला आडोसा करून लावतात की इतर प्राण्यांना आत येणे कठीण होते.

वाळवंटात रहाणारे आणखी एक खास तऱ्हेचे प्राणी आहेत ते म्हणजे कंगारू उंदिर रात्री संचार करणारे हे प्राणी दिवसा बिळात रहातात. काही प्रकारची झाडे पाला सुकलेल्या बीया मुळ्या खाणारे हे उंदीर पाणी न पिता जिवंत रहातात. इतर वाळवंटी प्राण्या सारखीच ह्यांची श्रवण शक्ति अगदी तिक्ष्ण असते. ह्यांना पकडायला येणारी अस्वले व साप ह्यांचा आवाज लांब-वरूनच ऐकायला आल्यामुळे ती तावडतोब सुरक्षित जागी जाऊन लपतात.



सहारा वाळवंटात दिसणारे वर्सोवा जातीचे उंदीर हे जवळजवळ कंगारू उंदीरा-सारखेच दिसतात. पण ह्या उंदराची शेपूट जास्त लांब असते हे लांब लांब उड्या मारीत कंगारू उंदीरापेक्षा जास्त वेगाने पळतात.



# चांदोबा

संस्थापक : 'चक्रपाणी'

संचालक : नागिरेड्डी


गुन्हेगांराविषयी बेपर्वाई दाखविणे हे प्राचीन काळापासून एक कला व शास्त्र ह्यादृष्टीने मान्यता प्राप्त करीत आला आहे. गुन्हेगाराला बरोबर शोधून काढून त्यांचा गुन्हा उघड करून दाखविणारा तार्किक दृष्टीनें फार मोठा हुषार मानतात. ह्या गोष्टीचे खरेपण आपल्याला 'खरा चोर' ह्यागोष्टीत वाचावयास मिळेल.

## अमर वाणी

**विज्ञः स्वं मन्यते चाज्ञ, मज्ञो वर्तेत विज्ञवत् ।**
**मूकीभावं वहन प्राज्ञः, पुरुषेषूत्तमोत्तमः ॥**

[विद्वान माणूस आपल्याला अज्ञानी व अज्ञानी माणूस आपल्याला सर्वज्ञ म्हणवून घेतो. पण जो स्वतः संबधी काहीच न सांगता गप्प रहातो तोच खरा सर्वोत्तम माणूस म्हणवला जातो.]


वर्ष : ३५ जुन १९८६ अंक : १२

एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००














8 / 68



## चांदोबातील

### समुद्रातील अनोखे दृश्य



जपानच्या विमान कंपनीचे संबंधीत असलेले कॅप्टन चार्लेस मेकडेड ह्यांनी विमानातून प्रवास करीत असतांना टोकियोच्या ईशान्य दिशेला २५ मैल लांब समुद्रामधे ६० हजार फुट उंच व २०० मैलाच्या परिघात ढगांसारखा एक धूर उंच उडत असतांना व पाठोपाठ अदृश्य होतांना पाहिला. शास्त्रज्ञांचे असे मत आहे की समुद्र गर्भातिल अग्नि पर्वतामधे स्फोट झाल्याकारणामुळे तसे दृश्य दृष्टीस पडले असेल.

### गुंगीमुळे संकटात सांपडलेले पक्षी



जवळ जवळ ४०० रॉबिन पक्षी आकाशातून उडत उडत कॅलिफोर्नियाच्या हाय वे वर येऊन पडले व जाणाऱ्या येणाऱ्या गाड्यांखाली सांपडून मरण पावले. त्या पक्षांनी जी फळे खाल्ली होती ते जास्तच घट्टे कट्टे झाले होते व ती फळे खाल्यामुळे त्या रसांनी त्यांना इतकी गुंगी आली होती की, त्यांना आपले लक्षबरोबर न करता आल्यामुळे ते धडाधड येऊन मुख्य रस्त्यावर पडले.

### अंतराळातील यानांचा एक भाग



सन् १९०५ जून ३० तारखेला आकाशातून एक चमकणारी जड वस्तू पृथ्वीवर येऊन पडली. ती पडल्यामुळे त्याचा आघात होऊन मध्य सैबेरियातील १५०० मैल लांबीची जमिन हादरली. सध्या सोविएतच्या वैज्ञानिक एन्. वास्सिलीव ह्याने अनुमान काढले व आपला विचार प्रकट केला की करोडो वर्षांपूर्वीच्या अंतराळातील विमानाचा हा तुकडा आहे. आणी तो सुदूर नक्षत्रमंडळातून पाठविला असावा.

## तुम्हांला माहीत आहे कां?

१. जगातील सर्वांत मोठी जड घंटा कोठे आहे?
२. जगातील सर्वांत प्रथम बांधलेली उंच इमारत कोठे आहे?
३. जगात सर्वांत उत्कृष्ट चित्र कोणाचे?
४. अत्यंत प्राचीन राष्ट्रीय गीत गाणारा देश कोणता?
५. जगात सर्वांत प्रथम व जास्तीत जास्त इंग्रजी वर्तमान पत्र प्रकाशित करणारा देश कोणता?

## अरिष्टनेमि

फार पूर्वीच्या काळी एक राजा जंगलात शिकारीला गेला. सर्व जंगलात भटकून सुद्धा एक प्राणी देखिल दृष्टीस पडला नाही. सरते शेवटी एका डोंगरमाथ्यावर झाडाच्या आडोशाला उभे असलेले एक हरीण त्याला दिसले. राजाने त्याक्षणीं बाण सोडला व बाणाचा मार लागताच एका माणसाच्या विव्हळण्याचा आवाज ऐकू आला–"अरेरे !" राजाला आश्चर्य वाटले व त्या आवाजाच्या रोखाने धावला. तेथे हरीणाचे कातडे घालून बसलेला एक मुनी कुमार बाणाचा नेम लागून मेलेला आढळला. ते पाहून राजाला भयंकर दुःख वाटले.

राजाने विचार केला की, आपल्या हातून घडलेला अपराध कोणाला कळायच्या आत येथून निघून जावे. परंतु दुसऱ्याक्षणी त्याला वाटू लागले की, ह्या मुनी कुमाराच्या आईवडीलांकडे आपल्या चुकीची क्षमा मागणे उत्तम ह्या निश्चयाने त्याने चारी बाजूल निरखून पाहीले. एका झऱ्याच्या बाजूला त्याला एक पर्णकुटी दिसली. राजा तेथे जाऊन पोहोचला. त्या झोपडीतून बाहेर पडत असलेल्या अरिष्टनेमी नावाच्या ऋषिंना त्याने प्रणाम केला व विचारले–"गुरुदेव, हरीणाचे कातडे घातलेला एक मुनीकुमार त्या डोंगरमाथ्यावर गेला होता कां ?"

"हो ? तो माझा मुलगा काटक्या आणायला गेला होता." मुनीने त्याला सांगितले.

तितक्यात लाकडाची मोळी डोक्यावर घेतलेला मुनीकुमार दिसला. ते पहाताच आश्चर्याने याच्या तोंडून शब्द फुटेनासा झाला. थोडा वेळ गेल्यावर तो म्हणाला–"गुरुदेव, हरीण समजून मीं तुमच्या मुलावर बाण सोडला होता. बाणाच्या आघाताने मेलेला मुनीकुमार मी माझ्या डोळ्याने पाहीला तो जिवंत कसा ?

"ही गोष्ट खरी आहे तू माझ्या मुलावर बाण सोडलास परंतु आमचे प्राण देवाला अर्पण केलेले. अशा आघाताने आमच्या वर काही आघात होत नाही." ते म्हणाले.





## योग्यतेची परीक्षा

रमापतीला एकता नावाची एकुलती एक मुलगी होती. लहानपणीच तिची आई वारल्यामुळे ती मातृप्रेमाला पारखी झाली. त्यामुळे वडिलांनी तिला अत्यंत लाडानें लहानाचे मोठे केले. ती लग्नायोग्य झाली त्यामुळे रमापती तिच्यासाठी योग्य वराच्या शोधाला लागला.

एकदा त्यांच्या शेजारगावचा त्याचा मित्र ह्याने त्याला काही खास कारणास्तव भेटून जाण्याकरीता निरोप पाठविला. तेव्हां रमापतीने घरून निघताना मुलीला बजावून सांगितले–"एकता, मी आत्ता जाऊन उद्या पहाटे पर्यंत परत येईन. रात्री तू सर्व दारे खिडक्या बंद करून झोप विसरू नकोस."

"बाबा, तुम्ही अगदी काळजी करू नका! निश्चिंतपणे जा. मी काही आता कुक्कुल बाळ राहीले नाही ?" एकताने लाडीकपणें म्हणत वडिलांचा निरोप घेतला.

मध्यरात्र उलटल्यावर तिचा डोळ्याला डोळा लागला. तितक्यात दारावर कोणीतरी थांप मारल्याचा आवाज ऐकू आला. आता इतक्यारात्री कोण बरे आले असावे." असा विचार करीत तिनें खिडकीं उघडून बाहेर डोकावून पाहिले. पावसात भिजून चिंब झालेला एक म्हातारा दारापाशी उभा होता.

एकताला खिडकीतून डोकावून पहाताना तो म्हणाला–"मुली, आजची रात्र निभावून नेण्या पुरती जागा मिळेल कां ? म्हाताऱ्याला आश्रय देऊन पुण्य मिळव ग ! हे गाव मला परके आहे. त्यात पाऊस अंग सुद्धा आंबून गेले आहे.

एकताला त्याच्याकडे पाहून त्याची दया आली. तिने दरवाजा उघडला व त्यांना घरात घेतले. एकताने एक पंचा देऊन म्हाताऱ्याला अंग कोरडे करण्यास सांगितले. म्हाताऱ्याने अंग पुसत चोहीकडे पहात



तिला विचारले—"अग मुली, तू घरात एकटी कशी काय ?

एकताने वडिल शेजारगांवी गेले असल्याचे सांगितले नंतर विचारले—"आजोबा, संकोच करू नका कांही खाल्लें आहेत कां नाहीत ?

म्हाताऱ्याने मान खाली घालीत खाल्ले नसल्याचे दर्शविले. त्यावर एकताने घरात उरलेले अन्न त्याला गरम करून वाढले. म्हाताऱ्याने पोटावर हात फिरवित तृप्ती दर्शविली.

एकता पुढच्या खोलीत आली व तिने तेथे एक चटई घालून म्हाताऱ्याची झोपण्याची व्यवस्था केली. तितक्यात तिच्या मानेजवळ कसला स्पर्श झाला तिने झटकन मान वर करून पाहिले तेव्हां म्हाताऱ्याने धारदार सुरीचे टोक तिच्या गळ्याजवळ टेकवले होते ती काही बोलणार तितक्यात तो म्हणाला—"तू गुपचुप घरात जाऊन दाग-दागीने पैसा-अडका जो आहे तो मला आणून दे. जर त्यात काही गडबड केलीस तर तुझे मरण निश्चित समज !"

एकताला असे काहीं घडेल अशी अजिबात कल्पनाही नव्हती. त्यामुळे तिला अतिशय आश्चर्य वाटले. परंतु सावध पणें ती त्याला म्हणाली—"तुम्हांला आश्रय देणाऱ्याशीच तुम्ही द्रोह करता लोक म्हणतात कीं, चोर दरोडेखोरांपाशी सुद्धा दयाभाव असतो."

म्हातारा दांतओठ खात म्हणाला—"हा काय आश्रय आहे ? आणि जर तू दरवाजा उघडला नसतास तर तो फोडून मी आत आलो असतो. ह्या फालतू गोष्टीं करू नकोस मी झटपट सांगितलेल्या गोष्टी बांधून आण."

एकताने मनाशी धीर केला. ती म्हणाली मी तुम्हांला अडचणीच्यावेळी खायला घातले परंतु दागिने व पैसे कांहीं मी बांधून देणार नाही त्या खोलीतील तिजोरीत सर्व काही आहे. तुम्हीच आत जाऊन गाठोड्यात बांधून घेऊन या."



त्यावर म्हातारा तावडतोब एकताने सांगितलेल्या खोलीत गेला तेवढ्यात तिने चपळाईने पाठीमागून धावत जाऊन दार ओढले व कडी लावली. म्हाताराने दोन क्षण भांबावला व तो घाबरून धडक्या मारू लागला.

एकताने असा विचार केला व ती झोपण्याच्या खोलीत जाऊन झोपली की ह्या अर्ध्यारात्री शेजारपाजाऱ्यांच्या झोपेत कशाला विघ्न घालायचे.

पहाटे सूर्योदयापूर्वी पुन्हां दार ठोठ-वल्याच्या आवाजाने तिला जाग आली. तिला वाटले कीं, वडील परत घरी आले असावेत. ह्या विचाराने तिने दार उघडले. दाराच्या उंबरठ्यावर एक सुंदर व भरजरी कपडे परिधान केलेला एक तरुण उभा असलेला दिसला.

एकताने त्याला पहाताच प्रश्न केला—"तुम्हांला कोण पाहिजे ?"

तो तरुण गालातल्या गालात हसत म्हणाला—"मध्यरात्री पावसात भिजत एक म्हातारा आपल्याकडे आश्रयास आला होता नां ?"

"हो, आला होता, मी त्याला जागा देऊन खायला सुद्धा घातले. परंतु त्याने उलट मला सुरा दाखवून दाग-दागिने व पैसा अडका मागितला न दिल्यास मला



मारण्याची धमकी दिली. मी त्याला त्या समोरच्या खोलीत कोंडून ठेवले आहे ! बर पण त्या चोराशीं तुमचा काय संबंध ?" एकताने विचारले.

तो तरुण खदखदून हसू लागला व म्हणाला—"अहो तो चोर नाहीं. माझा विश्वासू नोकर आहे.

"तुमच्या घरचा नोकर आणि आमच्या घरी चोरी म्हणजे तो चोरच असणार आणि काय ?" एकता रागाच्या भरात म्हणाली.

तिचा राग व प्रश्न ऐकून त्याची हसून पुरेवाट झाली तो म्हणाला—"तो खरोखरी चोरी करण्याच्या उद्देशाने आला नव्हता.



ते एक नाटक होते.'' असे म्हणून त्याने तिला सर्व गोष्ट सांगितली.

मोहन सिंह नावाच्या एका तरुणाने एका आठवड्यापूर्वी मित्राच्या लग्नामधे एकताला पाहिले होते. तिच्या सौंदर्यावर व मोकळेपणावर तो आकृष्ट झाला. परंतु त्याच्या मनात एक शंका उत्पन्न झाली की, एका लक्षाधिशाच्या एकुलत्या एक मुलाबरोबर लग्न करण्याची तिची योग्यता आहे किंवा नाही ! त्या योग्यतेची परिक्षा घेण्याकरीता त्या मुलीला एकटीला घरात असलेली पाहून त्यानें आपल्या नोकरांतर्फे असे नाटक रचले.''

ते सर्व ऐकताच तिला अत्यंत आश्चर्य वाटले. त्या कडे लक्ष न देताच तो तरुण म्हणाला—"तू ह्या परिक्षेत ऐकशे एक टक्कयांनी पास झालीस."

"ते कसे ? आपला राग आवरत तिने विचारले.

तो तरुण नाटकी आवेशात म्हणाला—"म्हाताऱ्याला आसरा देऊन तू आपली उदारता दाखविलीस. सुरी दाखवून सुद्धा तू न घाबरता तुझे साहस दाखविलेस. व त्याला बंद करून तू तुझी चालाखी प्रकट केलीस तुझ्यापाशी माझी पत्नी होण्याची संपूर्ण योग्यता आहे आता तुझ्याबरोबर लग्न करून घ्यायला काही अडचण नाही.

"नोकरांकरवी ढोंगीपणाने स्वतः नाटक करून तुम्ही लाख कमावू शकता." असे तिरस्काराने म्हणत तिने दाराची कडी उघडली. तेव्हां म्हातारा डोळे चोळीत मालका समोर येऊन उभा राहिला.

त्यावर एकता त्या तरुणाला म्हणाली—"मोहन सिंह तुमच्या कडून माझ्या योग्यतेची परिक्षा करणे व त्याचा निर्णय घेणे हि दोन्ही मूर्खपणाची कामे आहेत. असल्या फालतू गोष्टी करीता तुम्हांला पोलीसांच्या स्वाधिन न करता मी तुमच्यावर दया दाखविते. तसेच तुमच्या सारख्या लक्षाधिशाला माझ्या इथून निघून जा असे सांगण्याचे साहस करते आणि तुमच्या बरोबर लग्न न करण्याची माझी बुद्धिमत्ता ह्यां सर्वांचा अंदाज लावा. हे समजण्याची आता तुमची योग्यता आहे कां नाही ते पहा आता इथून जावू शकता." असे म्हणत तिने दाराकडे अंगुलीनिर्देश केला.

एकताच्या तोंडचे सर्व बोलणें ऐकताच दोघांचे चेहरे पांढरे फटक पडले. थोड्या दूरवर उभे असलेल्या तिच्या वडीलांची नजर चुकवित त्यांनी पोबारा केला.

ते ऐकत उभे असलेले वडील त्या सर्व गोष्टी पाहून म्हणाले—"मुली, तू खूप घाई केलीस. लक्षाधिशाचा मुलगा आपण होऊन तुला मागणी घालण्याच्या इच्छेने आला होता. तू त्याला दटावून हांकलून कां लावलेस ?"

"बाबा, त्याला स्वतःच्या श्रीमंतीचा इतका गर्व आहे की, त्याला स्वतःच्या इच्छेप्रमाणे काहीही करता येते आणि मला माझ्या काही इच्छाच नाहीत. मी त्याला आवडले म्हणून त्याने माझी परिक्षा घेतली अशा तऱ्हेची माणसे स्वतःच्या पैशांनी काहीही विकत घेऊ शकतात." एकता म्हणाली.

एकताचे वडील थोडा विचार करीत म्हणाले—"माझा बालपणचा मित्र रामभद्र व त्याचा मुलगा प्रभाकर तुला माहीतच आहे नां ?"

"कां नाही, चांगले माहीत आहेत." एकता म्हणाली.

त्या लोकानी मला निरोप पाठवला होता त्यांच्याच घरी मी गेलो होतो. रामभद्र तुला आपली सुन करून घेण्याच्या विचारात आहेत. तुझे काय म्हणणे आहे ते कळवायचे आहे. प्रभाकर प्रामाणिक व कष्टाळू आहे. त्याच्यापाशी जी चार एकर जमिन आहे. त्यावर चांगली शेती करून त्याने सोनेच पिकविले आहे. त्याच्या बरोबर लग्न करण्यास तू तयार आहेस कां ?" वडिलांनी तिला विचारले.

एकताने मंदहास्य करीत आपली संमती दर्शविली. बालपणचा मित्रच आपला व्याही होत असल्याने पाहुन रमापतीचा आनंद गगनात मावेनासा झाला.






# भिकाऱ्याची पण गरीबी

सिंधूय देशावर सुगुण सेन नावाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या दरबारातील कवी पंडीत व प्रतिष्ठित व्यक्ति राजाची वरवर स्तुति करून त्याच्या आजोबापणजोंबाशी त्याची खोटी तुलना करीत असत.

एक दिवस मंत्री मार्तंडवर्मा राजाला म्हणाले–"महाराज, आपल्या राज्यकारभाराविषयीची स्तुती करून करून कोणीहीं कंटाळत नाहीत. त्यामुळे एक गोष्ट करणें चांगले की, आपण एकदा वेषपालटून राज्यात हिंडून लोक खरेच आपल्या विषयी काय विचार प्रकट करतात हे पहावे."

सुगुणसेनने मंत्र्याला त्याच्या सांगण्यावर दुजोरा दर्शविला आणि दुसऱ्याच दिवशी पहाटे ते दोघे वेष पालटून देश भ्रमण करण्यास निघाले. ते दोघे एका गल्लीतून जाऊ लागले तेव्हां एक भिकारी त्यांच्या दृष्टीस पडला. मंत्र्याने भिकाऱ्याकडे अंगुलीनिर्देश करीत राजाला म्हटले–"महाराज, हा भिकारी आपल्या राज्य कारभारा विषयी काय विचार प्रणाली ठेवतो हे आपण त्याला खिजवून विचारू या कां?"

राजाने थोडे आढेवेढे घेतच मान हलवित मंत्र्याला विचारले–"अशा भिकाऱ्यांना व याचकाना प्रश्न विचारून काय ह्या गोष्ट आपल्याला समजतिल.

त्यावर मार्तंडवर्मा नम्रपणे म्हणाला–"महाराज, आपण करीत असलेल्या राज्यकारभाराच्या कामकाजाविषयी प्रजेतील लोकांचे काय मत आहे हे विचारण्या जाणण्याकरीताच बाहेर पडलो आहोत तेव्हां अशा स्थितित जेवढे होईल तेवढे ह्या गरिब लोकांचे विचार सुद्धा आपल्याला जाणून घ्यावयास हवेत.

सुगुणसेनने स्विकृती सुचक मान हलविली व त्या भिकाऱ्यापाशी जात विचारले–

मेघना दाते

"हे बघ मला सांग तू भीक कां मागतो आहेस?"

तो प्रश्न ऐकताच भिकारी मोठ्या गुर्मीनें म्हणाला–"हे आपण काय विचारता आहात भीक कां मागतोस? हा काय प्रश्न झाला कां? मी मागचे पंचवीस वर्षे हा भीक मागण्याचा धंदा करतो आहे!"

भिकाऱ्याने राजाचे म्हणणे ऐकले व चीडून त्याला म्हणाला–"अहो साहेब, मला माहीत नाही आपले आजोबा कोण आहेत. परंतु मी मागची पंचवीस वर्षे भीक मागण्याचा धंदा करतो आहे. परंतु आता काही वर्षापासून खरी भीक कशी असते ह्याचा मला अनुभव येत आहे.

"अरे वा असे आहे कां! तो कसला बुवा अनुभव?" राजाने विचारले.

"आपण माझा विचार जाणू इच्छिता? तेव्हां मी माझा खराखरा अनुभव तुम्हांला सांगतो आपण लक्षपूर्वक ऐका. मागची पंचवीस वर्षे मी एक तास भीक मागीत असे तेव्हां माझी झोळी अन्नाने गच्च भरून जाई व वर चार पांच तांब्याची नाणी सुद्धा माझ्या हातात येत. परंतु काही वर्षानंतर ह्यात बदल होत गेला की, तेवढी भीक हाती येण्याकरीता आता चार पांच दिवस लागतात. परंतु सध्या तर गल्लीबोळातून भटकून झोळीत एक भाकरीचा तुकडा



देखिल येण्याची मारामार होते. वर एखादे नाणे देण्याचे पाप सुद्धा कोणी करीत नाही." असे सांगून भिकारी आपल्या रस्त्याने निघून गेला.

राजा त्यानें सांगितलेल्या गोष्टीवर थोडा विचार करीत राहला. नंतर मंत्र्याला म्हणाला–"मंत्री त्या भिकाऱ्याचे बोलणे ऐकून मला तर असे वाटू लागले आहे की खरोखर राज्यातील लोकांमधील धार्मिक बुद्धी व दानशीलता कमी होवू लागली आहे.

मंत्री म्हणाला–"महाराज, त्याच्या म्हणण्याचा अर्थ राज्यातील लोकांमधील धार्मिक बुद्धी कमी झाली नाही. तर तो

इतकेच सांगतो आहे की, मागच्या पंचवीस वर्षांपासून तो किती गरीब झाला आहे.

हे उत्तर ऐकताच त्याला आश्चर्य वाटले त्याने मंत्र्याला विचारले–"महामंत्री, हे तुम्ही काय सांगता? भिकाऱ्याची कसली गरीबी?"

"महाराज, भिकारी स्वतःच्या तोंडानेच स्पष्ट सांगतो आहे की, आपल्या पूर्वजांच्या वेळी तो किती सुखाने भीक मागून आयुष्य कंठीत होता आणि आता किती कष्टदायक आहे"

"म्हणूनच मी सांगतो प्रजेतील लोकांमधील धार्मिक व दानशील वृत्ती नष्ट होत चालली आहे." राजा म्हणाला.

"महाराज, क्षमा करा ह्या गोष्टीला काही पुरावा नाही. आपल्या विचार तत्वानुसार तर लोकांमधील ती मुल्ये नाहिशी झाली असती तर राज्यभर दंगेधोपे चोऱ्यामाऱ्या माजल्या असत्या परंतु तसे तर काही दिसून येत नाही." मंत्री म्हणाला.

"तर मग सांग! भिकाऱ्याची अशी परिस्थिती होण्यापाठी मागे काय हेतू?"

ह्याचे एकच कारण की, ह्या पंचवीस वर्षात जनतेच्या आर्थिक स्थितीमधे हळूहळू बदल होत आहे. पैसा कमी मिळत आहे तरी सुद्धा प्रजेतील लोक मोठ्या सहनशिलतेने ह्याची वाट पहात आहेत की, आता नाही तरी भविष्य काळात नक्कीं आर्थिक परिस्थिती सुधारेल माझे तर असे मत आहे की ह्या भिकाऱ्याची गरीबी म्हणजे जनतेतील दारिद्र्याचे द्योतक आहे." मंत्री म्हणाला.

मंत्र्याच्या सांगण्याने राजाचे थोडे समाधान झाले त्याला समजले की, दरबारी कवी पंडीत व श्रेष्ठ लोक ह्यांच्या वरवरच्या स्तुतीला भाळून आपण राज्यकारभाराकडे अत्यंत दुर्लक्ष केले.

ह्यानंतर राजाने मंत्र्याच्या सल्ल्यानुसार सर्वराज्यभर फेरफटका मारला व प्रजेतील लोकांची स्थिती पारखली. तेव्हां राजाला खरी परिस्थिती समजली. त्याने प्रजेच्या कल्याणाकरीता अनेक कार्ये केली व एक योग्य व समर्थ राजा म्हणून नाव कमावले.






[१८]

[शिवपुर नगराच्या सरहद्दीवर चंद्रवर्मा आणि सेनापती धीरमल्ल यांनी आपल्या सैन्यानिशी एका डोंगराळ भागातील घाटात सर्पकेतुशी सामना केला. सर्पकेतुच्या सैन्यांमधील निम्मे सैनिक चंद्रवर्माचे बोलणे ऐकतांच त्याच्या बाजूचे झाले. बाकी सैनिकांसह सर्पकेतू पळून जाऊ लागला. तेव्हां चंद्रवर्माने त्यांचा पाठलाग करण्याकरीता शिपायांना पाठविले. पुढे..]

**सूर्य** झरझर पश्चिमेकडे मावळू लागला. त्यावेळी चंद्रवर्माने पाठविलेल्या शिपायांपैकी दोघेजण परत आले व म्हणू लागले–"सरकार सर्पकेतूचे सैन्य कोठे गेले समजले नाही कुठे आहे दिसत नाही. परंतु त्यांच्या पावलांच्या खुणांवरून हे नक्की आहे की त्यांची सेना पश्चिमेकडे पळून गेली असावी." ते ऐकताच चंद्रवर्मा धीरमल्लकडे पहात म्हणाला–"धीरमल्ल, मला असे वाटते की, सर्पकेतू महिष्मती नगराच्या बाजूला पळून गेला नसणार. तो सरळ त्या कांशाच्या किल्ल्याच्या बाजूला गेला असावा. सेनापती धीरमल्ल व सुबाहुला चंद्रवर्मा म्हणतो ते खरे असावे असे वाटू लागले. परंतु त्याच्या पुढे एक गंभीर समस्या येऊन उभी राहीली त्याला सुचेनासे झाले की, आता महिष्मती नगरच्या बाजूने जावे की सरळ कांशाच्या



किल्ल्याच्या बाजूने थोडा वेळ सर्वांनी विचारविनिमय केला व ठरवले की, आता काशांच्या किल्ल्याच्या बाजूला जाऊन तेथेच सर्पकेतुला ठार करावे.

तत्क्षणी सर्व सैन्याला पश्चिम दिशेकडे जाण्याकरीता आज्ञा करण्यात आली थोड्याचवेळात सर्व तयारी निशि सैन्य आगेकूच करू लागले. सर्पकेतुच्या सैनिकांच्या पावलांच्या खुणावरून ते डोंगरदऱ्या खोऱ्या पार करून दूरवर असलेल्या एका जंगलातून गेले. तेथे त्यांना एक मोठी नदी लागली. ती पाहून चंद्रवर्माला अत्यंत आश्चर्य वाटले. आता आपल्या इतक्या सैनिकांना नदीपार कसे करून न्यायचे! सर्पकेतुने नदी कशी पार केली असेल बरे?

चंद्रवर्मा गाढ विचारात मग्न होता. त्याच क्षणी जवळच असलेल्या झाडाच्या फांद्यावरून एक तीन डोकी असलेला सर्प फुत्कार सोडीत धप्दिशी खाली जमिनीवर पडला. सर्वजण घाबरून जात भीतीनें व आश्चर्याने त्या सर्पाकडे निश्चल होऊ पाहू लागली. बरोबर त्याचक्षणी तो सर्प मानवरूप धारण करीत जोरात किंचाळीत म्हणाला—"चंद्रवर्मा! त्याच्याकडे धावत गेला. आपले नाव घेऊन धावत येणाऱ्या माणसांला पाहून त्यानें विस्मयाने आनंदाने पुढे उडी मारली व त्याचा हात हातात घेऊन प्रेमभरानें दाबीत म्हणाला—"कालकेतु! तू कां?"

"होय हो, वर्माजी! आपल्या कृपेने कालकेतुच्या रूपात वागडत असलेला कालसर्प तो मीच आहे. तुम्हांला माहीतच होते की, कोण्या एकावेळी त्या जादुगारीण कापालिनीचा मी सेवक होतो. आपला शत्रु सर्पकेतुने थोड्यावेळा पूर्वीच ही नदीपार ओलांडून जाण्याकरीता लाकडाचे तराफे व सांखळया ह्यांचा उपयोग केला होता. ते पहा झाडांच्या पाठीमागे तराफे लपवून ठेवले आहेत." कालकेतुने सांगितले.





ह्यानंतर तो चंद्रवर्माचा हात पकडून त्याला झाडीच्या आड घेऊन गेला आणि म्हणाला—"चंद्रवर्मा, तुला मदत करण्याच्या हेतूने मी सरळ शंसू पर्वतावरून येथे आलो आहे. काही दिवसापूर्वीच कापालिनी मरण पावली. मरणापूर्वीच तिने भूत व भविष्य काळात घडणाऱ्या गोष्टी दिसणारा तो कांचेचा जादुचा गोळा व ती माणसांची हाडे मला दिली. त्याच्या मदतीनेच मला समजले की, आपण कोणत्या स्थितित आहांत तेव्हांपासून आपला शत्रू ह्याकारणामुळे माझाही शत्रू बनला. आता आपल्याला तो आपल्या सैन्यासह कुठे आहे ते पहाता येईल चला पाहू या कां? असे म्हणून त्याने तेथल्या झाडाच्या ढोलीतून तो कांचेचा गोळा बाहेर काढला व मंत्र म्हणून माणसाचे हाडूक त्याला चिटकवले. दुसऱ्या क्षणी त्यांना एक अद्भुत दृष्य दिसले.

सूर्याच्या प्रकाशात कांशाच्या किल्ल्याची दारे खिडक्या चमचम चमकत होती. किल्ल्यांच्या दारांपैकी उत्तरेकडील मुख्य दाराचे कांचेचे दार उघडून टाकण्यात आले होते. त्याच्या समोरच काही सैनिक पहारा देत होते. किल्ल्याच्या आतील मोकळीस आलेल्या प्रत्येक दालनात मनसोक्त संचार करीत सर्पकेतुचे सैनिक इच्छेप्रमाणे अमूल्य सोने नाणे लुटीत होते.

"चंद्रवर्मा! आपल्या शत्रूचा हेतू हाच आहे! बऱ्याच जणांचे विचार असा होता की, कांशाच्या किल्यांच्या दारापर्यंत समुद्राचे पाणी येऊन धडकत होते. परंतु ही गोष्ट तर खरी नाही. जवळजवळ किल्ला बुडून गेला परंतु काही काळानंतर कांशांच्या किल्ल्याच्या दारापासून जवळ-जवळ एक कोस दूर समुद्र मागे हटला गेला." कालकेतु म्हणाला.

कालकेतुचे बोलणे ऐकून चंद्रवर्माला अत्यंत आनंद झाला. तो आपल्या सर्व-सैन्यासह नदीपार करण्याच्या तयारीला लागला. कालकेतुने पूर्वीच जे लाकडाचे जाड तराफे तयार करून ठेवले होते ते

टाकून चंद्रवर्माच्या सैनिकांनी नदीपार केली.

कालकेतु सर्व सैन्यांच्या पुढे एका घोड्यावर स्वार होऊन सर्व सैन्याला मार्ग दाखवित पुढे निघाला. त्याच्या पाठोपाठ सर्व सैन्य वेगाने किल्ल्याच्या दिशेने निघाले एक तासा नंतर त्यानां अत्यंत उंच अशी किल्ल्याची दारे दृष्टीस पडली. ते हळू सर्वजण किल्ल्याजवळ येऊन पोहोचले उत्तर दिशेला असलेल्या दाराजवळ आले परंतु ते दार बंद होते. चंद्रवर्मा सुबाहु व सेनापती धीरमल्ल ह्यांना बरोबर घेऊन तो अगदी दाराजवळ गेला व त्याने चांचपडून पाहीले ते दार कांशाचे मजबुत तयार केलेले होते. आता इतके मजबुत कठीण कांशाचे दार तोडून आत कसा काय बरे प्रवेश करावा?" हाच विचार करीत चंद्रवर्मा मग्न झाला. तितक्यात किल्ल्याच्या भिंतीवरून सर्पकेतुची गर्जना ऐकू आली. त्याच्या सोबत मोठ मोठ्या टोपल्या घेतलेले इतर सैनिक सुद्धा दिसले.

सर्पकेतुने आपल्या आजुबाजुला टोपल्या घेऊन उभ्या असलेल्या सैनिकांना शत्रु-सैनिकांना दाखवित म्हटले–"हे पहाता आहात नां! माझ्या प्रत्येक सैनिकांच्या हातात सोनेनाणे भरलेल्या टोपल्या आहेत. चंद्रवर्माला सोडून जो कोणी माझ्या बाजुने यावयास तयार असेल त्याला तशा सोन्याने भरलेल्या टोपल्या मिळतील त्या माणसासच तेवढे किल्ल्याचे दार उघडले जाईल तुम्ही स्वत:च्या डोळ्यानींच हे सोने रत्ने पहा. ह्यात आहे किंवा नाही."

सर्पकेतुच्या तोंडून बोलणे संपते नां संपते तोच शिपायांनी स्वत: बरोबरच्या टोपल्यातील नाणी अशा तऱ्हेने वरून खाली टाकली की बरोबर चंद्रवर्माच्या सैन्यांच्या डोक्यावर येऊन पडली. ती पडतानां चंद्रवर्माच्या सैन्यातील सैनिक ते मिळविण्यासाठी आपापसांत भांडणे करु लागली चंद्रवर्माला परिस्थितीतील गांभिय समजले. त्याने सुबाहुला म्हटले–"सुबाहु! तू आपल्या सैनिकांतील काही शिपायांना घेऊन जाऊन असा बहाणा कर की, तू त्यांना मिळत आहेस व तसे दार उघण्याकरीता जोरात किंचाळून सांग. तुझ्या म्हणण्यावर विश्वास ठेऊन जर सर्पकेतूने दार उघडले तर तू तात्काळ किल्ल्याच्या आत घुसून प्रवेश मिळव नंतर मग बाकी सैन्यांसह मी व धीरमल्ल प्रवेश करतो. मग आपण एकजुटीने शत्रु सैनिकांवर हल्ला करु त्यांचा सर्वनाश करून टाकू."

चंद्रवर्माचा सल्ला योग्य मानून सुबाहु सैनिकांच्या जवळ आला व त्यांच्यापाशी बोलाचाली केली पहाता पहाता सैनिकांच्यात दोन मोठे भाग वेगळे झाले. त्यातील एका तुकडीने सर्पकेतुच्या नावाचा खोटा जयजयकार केला सर्वजण एका तालासुरात ओरडू लागले–"महाराज सर्पकेतुचा जय असो!" त्यानंतर हळूहळू ते सैन्य किल्ल्याच्या दाराजवळ हळूहळू पुढे सरकू लागले.





     




त्यानां अडविण्याचे खोटे खोटे नाटक करीत इतर काही सैनिक त्याच्याशी लढू लागले.

सर्पकेतुला चांगलाच विश्वास वाटू लागला की चंद्रवर्माच्या सैन्यांत नक्कीच विद्रोह माजला आहे. तो किल्ल्याच्या तटावर विकट हास्य ध्वनी करीत जोरात ओरडला–" किल्ल्याचे दार उघडा. शत्रु-पक्षातील बरेच सैन्य आपल्या सैन्यात येऊन मिळाले आहे. मी आता काही क्षणातच चंद्रवर्माला व त्याच्या सैनिकांना यमसदनास पाठवतो" त्यांची आज्ञा मिळताच सर्प-केतुच्या शिपायांनी किल्ल्याची दारे उघडली.

त्यानंतर निमिषार्धातच सर्पकेतुच्या सैन्यातील लोकांची मुंडकी सपासप कापून खाली पडू लागली सुबाहुने समोर येईल त्याला यमसदनास पाठविले तितक्यात चंद्रवर्मा व धीरमल्ल सुद्धा किल्ल्यात प्रवेश करते झाले. त्यांच्या हल्ल्याला घाबरून सर्पकेतूच्या सैन्यांची हां! हां उडाली ते वाटेल तसे सैरावैरा पळून जाऊ लागले.

दगा फटका दिलेला पहाताच सर्पकेतुला अत्यंत राग आला. त्याने वरूनच खाली असलेल्या आपल्या सैनिकांना ओरडत सांगितले की, तुम्ही किल्ल्यातील दारे उघडून चंद्रवर्माच्या सैनिकांवर टाका व मोडक्या विटा फेकून मारा ते ऐकताच चंद्रवर्मा ओरडत म्हणाला–" सुबाहु, तू त्या दुष्टाला संधी मिळताच बंदी कर नाहीतर सरळ आपल्या तलवारीने त्याचा बळी चढव."

ह्यानंतर सुबाहु आपल्या काही साथी-दारांसह फुटक्या विटांचा मारा चुकवित भिंतीवर चढून जाऊ लागला परंतु त्याला सर्पकेतुला पकडणें तेवढे शक्य वाटले नाही. सर्पकेतुला वाटले की आता आपले मरण जवळ येऊन ठेपलेले आहे. त्यामुळे ते एखाद्या राक्षसासारखे किंचाळत ओरडत समोर येईल त्याची कत्तल केली सपासप वार करून त्यांना मारून टाकू लागले ते पाहून चंद्रवर्माचे सैन्य भयाने कापू लागले.

" चंद्रवर्मा, सर्पकेतुशी मुकाबला करणारा मी एकटाच योद्धा आहे. तो किल्ल्याच्या तटावरून मोठ्या धोंड्यासारखा खाली कोसळून पडणार आहे जरका तो प्राणासह तुम्हांला पकडून पाहिजे असेल तर तो वरून खाली जमिनीवर पडून त्याचे तुकडे तुकडे व्हायच्या आती तुम्ही मला पकडा." असे म्हणत कालकेतु तलवार उगारीत एका ढांगेत चढून तटावर गेला.

कालकेतुला पहाताच सर्पकेतुने जोरात तोंडाने हुंकार भरला व त्याच्यावर हल्ला करून जाऊ लागला. कालकेतु त्याच्या तलवारीचा वार चुकवित स्वतःला वाचवित त्याच्यापासून दूर दूर पळू लागला व त्याला म्हणाला–" सर्पकेतु तू ह्या क्षणी कालकेतु बरोबर लढत आहेस. "कालकेतु म्हणजे तीन डोकी असलेला महाकाल सर्प" असे म्हणत त्याने तत्काल सर्प रूप धारण केले व तो त्याच्यावर फुत्कार करू लागला.

सर्पकेतुला क्षणभर आश्चर्य वाटले. परंतु दुसऱ्या क्षणी तो प्राणांच्या भीतीने किंचाळून ओरडू लागला व किल्ल्याच्या तटावरून खाली कोसळला ते पाहून चंद्रवर्मा त्याच्या जवळ आला परंतु त्यापूर्वीच त्याचा देह निष्प्राण झाला. ते पाहून सर्पकेतुचे उरलेसुरले सैनिक चंद्रवर्माच्या आधिन झाले.

• • •



कालकेतुने कांशाच्या किल्ल्यात आपला निवास करण्यासाठी चंद्रवर्माकडे परवानगी मागितली चंद्रवर्माने त्याला होकार दिला. त्या दिवशी पूर्ण रात्र चंद्रवर्माने आपल्या सैन्यांसह त्या कांशाच्या किल्ल्यातील मोडक्या तोडक्या महालात काढली. नंतर पहाट होताच तेथील अनेक संपत्ती व सोने घेऊन त्याने रुद्रपुरकडे प्रस्थान केले. दोन तीन दिवस प्रवास केल्यानंतर ते रुद्रपुरला पोहोचले रुद्रपुरच्या काही नगरवासियांनी चंद्रवर्माला येऊन सांगितले की, राजा शिवासिंह डोंगर भागात पळून गेला आहे. त्यामुळे आत्ता इथे कोणी राजा नाही. त्यावर चंद्रवर्माने म्हाताऱ्याचा मुलगा











देवल ह्याला रुद्रपुरचा राजा नियुक्त केले.

त्यानंतर चंद्रवर्मा महिष्मती नगराच्या दिशेने पुढे निघाला. तो थोडाफार त्या नगराच्या जवळ येऊन पोहोचला नाही तोच तेथील नगरवासियाना समजले की, दुष्ट सर्पकेतु मरण पावला आहे. तेव्हां सर्व लोकांनी आनंदोत्सव केला. मंगल-वाद्याने सारे नगर दुमदुमले सर्व प्रजेतील लोकांनी एका तालासुरांत चंद्रवर्माला निवेदन करीत म्हटले. की त्याने आपल्या नगराचा राज्यकारभार पहावा. परंतु चंद्रवर्माने त्याचे म्हणजे मान्य केले नाही. त्याने सर्वांना समजावित सांगितले की, चक्रवर्ती यशोवर्द्धनचा मुलगा तपोवर्धन ह्याला महिष्यमति नगराचा राजा करणे उचित आहे.

तपोवर्द्धन नगराच्या जवळपासच्या जंगलात आपला आश्रम बांधून तेथे तपश्चर्या करण्यात आपला वेळ घालवत होता. तेथे चंद्रवर्मासह सर्व नगरवासी त्याला भेटण्यासाठी गेले व त्याला परत राज्यात येण्याविषयी व राज्यकारभार पहाण्याची विनंती केली परंतु तपोवर्धनने त्याच्या म्हणण्याचा तिरस्कार करून म्हटले–"मी कधीच सर्वस्वाचा त्याग केला आहे. राज्याबद्दल माझ्या मनात काही-चाही लोभ किंवा आशा नाही. माझा तर असा विचार आहे की, आपल्या सर्वांच्या आदरासह प्रेमपात्र बनलेला चंद्रवर्माच राजा बनण्यास सर्व प्रकारे उत्तम आहे."

त्यानंतर प्रजेतील लोकांचे म्हणणे मान्य करून तपोवर्द्धनने स्वतः चंद्रवर्माच्या डोक्यावर मुकुट घातला व त्याला महिष्मती नगराचा चक्रवर्ती बनवले. सर्व जनतेमध्ये आनंदाचे उधाण आले सर्व प्रजा चंद्रवर्माच्या नावे जयजयकार करू लागली.

चंद्रवर्माने राज्य ग्रहण करून आपल्या बरोबरीच्या विश्वास पात्र धीरमल्ल याला प्रधान सेनापतीच्या पदावर नियुक्त केले. आणि अनेक वर्षे राज्यकारभार मोठ्या आनंदाने केला. (समाप्त)



# दोन बहीणी

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो पुन्हां झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणें मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा ! तू कोणाच्या शब्दावर विश्वास ठेऊन या अपरात्रीच्या वेळी इतके कष्ट सहन करीत आहेस, कोण जाणे ? स्वार्थी कोण व कोण निस्वार्थी महान व्यक्तिच्या रूपात लोकप्रियता प्राप्त झालेले ज्ञानशिख नावाच्या महान योगीने ह्याबाबतीत चुक करून एका निर्दोष व्यक्तिला दुःख दिले म्हणून त्याची गोष्ट सांगतो लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

प्राचीन काळी करवीरपुर राज्यात धर्मवीर नावाचा एक सामंत राजा रहात होता. त्याला दोन मुली होत्या. सोनाली



व रूपाली दोघी अत्यंत सुंदर होत्या. तरी सुद्धा रूपाली सोनाली पेक्षां जास्त सुंदर आणि स्वभाव गुण सुद्धा जास्त चांगले होते ती अत्यंत महत्वाकांक्षी होती. धन-संपत्ती, अधिकार आणि अलंकार ह्याचे तिला सर्वांत जास्त आकर्षण होते.

एकदा पद्मकेतु नावाच्या एका गंधर्वाने आकाशमार्गे भ्रमण करीत जात असतांना बागेत हिंडत असलेल्या एकट्या रूपालीला पाहिले. तो पृथ्वीवर आला व तिच्या जवळ जात व हळू आवाजात तिला म्हणाला–"सुंदरी!"

ते ऐकून रूपालीनें पाठीमागे वळून पाहिले व तिला अत्यंत आश्चर्य वाटले.

पद्मकेतुनें तिला आपला सविस्तर परिचय करून दिला–"माझे नाव पद्मकेतु मी एक गंधर्व आहे. मी आकाश मार्गे भ्रमण करीत असतांना. तुझे सुंदर सौंदर्य पाहून मी मुग्ध झालो. मी तुझ्याशी लग्न करण्यास तयार आहे."

ते ऐकून रूपालीला जास्तच आश्चर्य वाटू लागले. ती क्षणभर गप्प राहली. नंतर म्हणाली–"मी तावडतोब कसे बरे उत्तर देऊ शकेन मला उद्या संध्याकाळ पर्यंत वेळ द्या!"

पद्मकेतुनं रूपालीचे म्हणणें मान्य केले व तो तेथून निघून गेला.

त्याक्षणापासून रूपाली त्या गंधर्वा विषयीच विचार करीत राहली. आणि शेवटी तिने मनांशी एक विचार पक्का केला.

दुसऱ्या दिवशीं नेहमी प्रमाणें ती वनविहारास गेली. तेव्हां पद्मकेतु तेथें येऊन पोहोचला.

रूपालीने पद्मकेतुला विनयतेने म्हटले–"मी आपण विचारलेल्या प्रश्नाचा गंभीरपणें विचार केला आहे. त्याचे उत्तर ऐकण्यापूर्वी तुम्ही एक काम केले पाहीजे. त्या मधुमालतीच्या वेली पाठीमागे एका चंद्रशिलेवर माझी लहान बहीण सोनाली बसली आहे. तिला पाहून तुम्ही परत इथे या.





पद्मकेतु सोनालीपाशी गेला. ती चंद्रशिलेवर बसून फुलांची माळ गुंफण्यात मग्न होती. तिला पाहून पद्मकेतू पुर्वीपेक्षा जास्तच तिच्यावर आकर्षित झाला. त्याचक्षणी तो रूपालीला विसरून गेला. व सोनालीजवळ जात तिला म्हणाला–"अग सुंदरी."

ती हांक ऐकताच सोनालीने मानवर करीत गंधर्वाकडे पाहिले व तिला अचंबा वाटला ती आश्चर्यचकित नजरेने त्याच्याकडे पाहू लागली.

पद्मकेतु मंदहास्य करीत म्हणाला–"सुंदरी, मी पद्मकेतु नावाचा एक गंधर्व आहे तुझ्याशी बरोबरी करू शकणारी सुंदरी गंधर्व लोकांत शोधूनही सांपडणार नाही. तुझी जर संमत्ती असेल तर मी तुझ्याशी लग्न करण्यास तयार आहे.

गंधर्वाचे बोलणें ऐकताच तिचा आनंद गगनात मावेनासा झाला आणि तिने झटक्यात त्याला होकार दिला.

पद्मकेतुने प्रसन्नतेने तावडतोब गांधर्व-विवाह करण्याचा प्रस्ताव तिच्यापुढे ठेवला तेव्हां तिने भयभीत होत म्हटले–"जर कां असा विवाह केला तर तो सर्वांपासून गुप्त राहील नां! मी तर माझा विवाह मोठ्या थाटमाटात व्हावा अशी इच्छा करते. आपला निर्णय मी माझ्या वडीलांना जाऊन सांगते मोठ्या थाटामाटाने ते आपला विवाह करून देतील.

पद्मकेतुने होकार दिला व तिला परत भेटण्याचे वचन देऊन तो तेथून निघून गेला. सोनाली आनंदाने नाचतच अंतःपुरात पोहोचली व तिने घडलेली सर्व गोष्ट आपल्या बहिणीला रूपालीला मोठ्या उत्सुकतेने सांगितली. परंतु रूपालीला जरा देखिल आनंद वाटला नाही. ती म्हणाली–"ताई, मला सर्व काही माहीत आहे ह्या बाबतीत मी तुला एक सल्ला द्यावा म्हणते.

सोनालीला ताईच्या बोलण्यातील गांभिर्य तितकेस रुचले नाही तिने विचारले–"कसला ग सल्ला?"



ह्याच पद्मकेतुने प्रथम मला पाहुन माझ्याशी विवाह करण्याची इच्छा प्रकट केली होती. त्याच्याबद्दल माझ्या मनांत जरा देखिल आस्था नव्हती. त्या करीता त्याची परिक्षा पहाण्याच्या उद्देशाने मी तुझ्याकडे धाडले तुला पहाताच तो मला विसरून गेला. व तुझ्याबरोबर विवाह करण्याची इच्छा त्याने प्रकट केली. त्यावरूनच त्याचा स्वभाव किती चंचल आहे हे स्पष्ट झाले. अशा माणसाबरोबर लग्न करून तु आपले आयुष्य नासवू नकोस." रूपालीने स्पष्ट शब्दात सांगितले.

आपल्या मोठ्या बहीणीचे बोलणे ऐकताच सोनाली पोट धरधरून हंसू लागली व म्हणाली–"गंधर्वाने स्वतःहून माझ्याशी लग्न करण्याची इच्छा केली. त्याचा मी तिरस्कार कसा करू? चांगली संधी गमावू ताई नशिबात. माझ्या लिहीलेले असेल तर ते होण्याचे टळत नाही. अनावश्यक शंका करून मी माझ्या भाग्याला विनाकारण लाथाडणार नाही.

ह्यानंतर बरोबर एका महीन्याने रूपालीचा विवाह एका राजकुमाराबरोबर व सोनालीचा विवाह पद्मकेतु गंधर्वाबरोबर थाटामाटात पार पडला. रूपालीचे विवाह-सौख्य चांगले चालले परंतु सोनालीच्या विवाह सौख्याला चार दिवसात वाट लागली गंधर्व एका दिवसातच सोनालीला सोडून निघून गेला तो पुन्हां परत कधी आला नाही. सोनालीला अपार दुःख झाले. ती अपमानाने दबून गेली. आपल्या धाकट्या बहीणीचे दुःख पाहून रूपालीला मनोमन अत्यंत वाईट वाटले.

त्या सुमारास करवीरपुरात एक ज्ञानशिख नावाचा महान योगी आला. रूपाली आपल्या लहान बहीणीला सोनालीला घेऊन त्यांच्या दर्शनास गेली.

ज्ञानशिखने सर्व वृत्तांत ऐकला. आणि तिच्याकडे तिक्ष्ण नजरेनें पहात म्हटले–"मुली, तू स्वार्थ बुद्धीने प्रेरित होऊन स्वतःच्या बुद्धीची तारीफ केलीस.

रूपालीला काय बोलावे कळले नाही. ती आपली मान खाली घालून उभी राहली.

त्यावर ज्ञानशिखने सोनालीकडे पहात म्हटले, मी तुला एका मंत्र सांगतो. तो मंत्र जप व पार्वतीची उपासना कर. तुझा घर-संसार चांगला चालू होईल." असे म्हणून साधूने एक मंत्र तिला सांगितला. काही दिवसातच सोनालीची उपासना सफल झाली. पद्मकेतु तिच्याकडे आला व पूर्वीपेक्षाही जास्तच तो तिच्याशी प्रेमळपणे वागू लागला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला–"राजा! रूपाली बरोबर पद्मकेतुने गांधर्व विवाह करण्याची इच्छा केली, परंतु त्याने तिची छोटी बहीण सोनाली बरोबर थाटामाटात विवाह केला. तशा मुलीची स्वार्थी म्हणून ज्ञानशिखने कां निंदा केली? हा तिच्यावर अन्याय नाही का?" याचे उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"त्या दोघी बहीणीमधे सोनाली जात्याच स्वभावाने भोळी भाबडी व इच्छा आकांक्षावर नियंत्रण ठेवू शकणारी. तिचा द्वेष करणे योग्य नाही. आता राहीली रूपालीची गोष्ट. ती मोठी बुद्धिमान होती. त्याकारणाने तिने आपल्या छोट्या बहीणीकडे त्याला पाठविले रूपालीला तेव्हां सहजपणे समजले की पद्मकेतु तिच्यावर फिदा होईल व सोनालीही लग्नास तयार होईल. तिला एका गोष्टीची पण तिला शंका होती की, अशा लहरी चंचल पुरुषाबरोबर लग्न करून कसा त्रास सहन करावा लागेल. त्यामुळेच ज्ञानशिखने तिची स्वार्थी म्हणून निंदा केली. त्यामुळे साधूने काही तिच्याबरोबर अन्याय व अधर्मपूर्ण व्यवहार केला नाही परंतु त्याने दिलेला सल्ला योग्यच होता."

राजाचे मौन अशा प्रकारे भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# जसांस तसे

**श्या**मलालने विरिंचिनगरात प्रथमच आपले सोन्यांचांदीचे दुकान उघडले त्याने दुकानात एका कारकुनाची नेमणुक करण्याचे ठरविले व त्या योग्य व्यक्तिच्या शोधात राहीला. हि गोष्ट शरभराजच्या दुकानात काम करणाऱ्या मोहिंदर नावाच्या नोकरास समजली. त्याने दुसऱ्याच दिवशी श्यामलालची प्रत्यक्ष भेट घेतली व काम करण्याची इच्छा प्रकट केली. परंतु श्यामलालनें त्याला विचारले–" ठिक आहे पण तू सध्या कोणाकडे कामास आहेस ?"

मोहिंदर उत्तर देत म्हणाला–" मालक, मी सध्या शरभराज यांच्या दुकानात काम करतो आहे. परंतु त्याच्यापेक्षां जर दहा रुपये मला जास्त मिळत असतील तर मी तुमच्याकडे काम करण्यास तयार आहे."

श्यामलाल थोडा विचार करीत म्हणाला– "मी तर तुला माझ्या दुकानात नोकरी देईन परंतु एक गोष्ट"खरी खरी सांग की, तू शरभराजच्या दुकानातील नोकरी कोणत्या कारणासाठी सोडून देत आहेस ?" आणि मी कसा विश्वास ठेवू की तू फक्त दहा रुपये जास्त मिळविण्याकरीता त्यांच्या कडची नोकरी सोडून देणार आहेस.

"त्यात खोटे काय आहे मालक? खरे सांगायचे तर शरभराजच्या दुकानात नोकरी करायची म्हणजे तारेवरची कसरतच आहे. मानेने नुसते त्याच्या म्हणण्याला 'हां' 'हूं' केले तरी त्यांच्या नजरेत अपराध घडला असे वाटते. माझी नोकरी अशी आहे कीं, कसेही केले तरी ती चुकच" मोहिंदरनें उत्तर देत म्हटले.

श्यामलालने मोहिंदरला सांगितले की मी माझा निर्णय तुला काही दिवसाने कळवितो. तो निघून गेल्यानंतर काही वेळाने तो तावडतोब शरभराजच्या दुकानात गेला व त्याला विचारू लागला– "काय रे शरभ, तुझ्या दुकानात एक मोहिंदर नावाचा मुलगा काम करतो त्या मुलाबरोबर माझ्या गावचे एक ओळखीचे आहेत त्यांना त्यांच्या मुलीचे लग्न करून देण्याचा विचार आहे. त्यामुळे तो मुलगा स्वभावाने गुणाने कसा काय वाटतो ते खरे खरे सांग."

"अरे मोहिंदर, स्वभावाने अत्यंत शांत व प्रेमळ आहे व विश्वासूपण आहे. माझ्या-कडे कित्येक दिवसापासून तो व्यापारात मला हात भार लावतो. माझ्याकडून हिच गोष्ट तुम्ही मुलीच्या पित्याला सांगा." शरभने उत्तर देत म्हटले.

ते उत्तर ऐकताच श्यामलाल हंसू लागला व म्हणाला "तुम्ही तर त्याची इतकी चांगली स्तुती करता तो तर सांगतो तुमच्या बरोबर काम करणे म्हणजे एक डोकेदुखी आहे. तारेवरची कसरत आहे. तुम्ही त्याला आता जो पगार देता त्याहून जर दहा रुपये जास्त दिले तर तो माझ्याकडे काम करण्यास तयार असल्याचे सांगून गेला.

आता तर तुम्हींच सांगितले की, तुमच्या गावच्या ओळखीच्यांनी मोहिंदरला आपली मुलगी देण्याचीं इच्छा केली आहे. मग काय ती सर्व गोष्ट खोटीच कां?" शरभ-राजने रागाच्या आवेशात विचारले.

"मोहिंदरच्या स्वभावाविषयी खरे खोटेपणा जाणण्याच्या इच्छने मीं मनांशी



रामनाथ शर्मा

कल्पना करून हि गोष्ट सांगितली परंतु त्यामुळे एक गोष्ट स्पष्ट झाली की, त्याला तुमच्या बद्दल तेवढी आपुलकी वाटत नाही." श्यामलाल म्हणाला.

हे उत्तर ऐकताच त्याचा चेहरा लालबुंद झाला. त्याने श्यामलालकडे रोखून पहात म्हटले—"आपल्याला मोहिंदर बद्दल माझे मत काय आहे हे पहावयाचे होते नां? मग मी तर माझे स्पष्ट मत सांगितले त्याला माझ्या प्रति कितीका वाईट भावना असू दे! परंतु माझ्या स्पष्टवक्तेपणा मधे काहीही बदल घडणार नाही.

"आपल्या वागण्याचे मला तर मोठे आश्चर्य वाटते आहे, श्यामलाल म्हणाला.

ह्यात आश्चर्यकरण्यासारखी कोणती गोष्ट आहे. मोहिंदरला उलट दहाच्या ऐवजी वीस रुपये देऊन कामाला ठेवून घ्या. तो अत्यंत हुषार व ईमानदार विश्वासू आहे. माझे हे स्पष्ट मत आहे." त्याला थोडे दरडावतच शरभराज म्हणाला.

श्यामलाल मान खाली घालून मुकाट्याने निघून गेला.

दुकानाच्या दाराच्या आड लपून मोहिंदर त्या दोघांच्यामधे चाललेले संभाषण ऐकत होता. श्यामलाल तेथून निघून जाताक्षणीच तो धावत दुकानाच्या आत आला व शरभ-राजच्या पाया पडत गयावया करीत म्हणाला—"मालक, मला आता समजले की, एखाद्या माणसावर विश्वास व प्रेम करणे ह्या सारखे दुसरे मुल्य दुसरे कोणते नाही. आवश्यकता व परिस्थिती ह्याला अनुरूप विचार बदलून वागणाऱ्या माझ्या सारख्या दुष्ट माणसाला तुम्ही चांगला धडा घालून दिलात.

ह्यानंतर मोहिंदरने अनेक वर्षे शरभ-राजच्या दुकानात मोठ्या ईमानदारीने काम केले त्याच्यापासून व्यापाऱ्यातील खूब्या जाणुन घेतल्या व शरभराजच्या प्रोत्साहानामुळे त्याने स्वत: व्यापार सुरु केला व थोड्या अवधीतच चांगला श्रीमंत बनला.





आपली देवळे :

## तिरूपति

नारदमुनी एकदा महाविष्णुच्या दर्शना करीता गेले होते. त्यांच्या बरोबर गप्पागोष्टी करीत असतांना त्यांनी भारताच्या पूर्व कडील दऱ्याखोऱ्यां मधे सात पर्वत पार शेषाचल येथिल नैसर्गिक सौंदर्या विषयी पुष्कळ गोष्टी ऐकवल्या.

काही काळाने महाविष्णु त्या ठिकाणी थोड्या हवापालटा करीता त्या शेषाचलावर उतरून आले. तेथील अद्भुत नैसर्गिक सौंदर्य पाहून त्यांचे देहभान हरपुन गेले व आनंदाने त्यांनी तेथीलच जवळच्या एका खडकावर बसून ध्यानधारणाकरीत त्यात निमग्न होऊन गेले.





ह्यानंतर महाविष्णु ज्या ठिकाणावरुन निघून गेले त्या त्याच्या बसलेल्या ठिकाणी त्याचे रूप शाश्वत राहीले त्या शिळेमधे विष्णुचा अंश शाश्वत रूपात राहून गेला. काही काळाने त्यांच्या चोहोबाजूला अनेक झाडेझुडपे गवत वारुळे वाढू लागली.



त्या प्रदेशात एक गुराखी नेहमी आपल्या गाईना गवत चारावयास त्या डोंगरांवर घेऊन जात असे. काही दिवसाने त्यांच्या लक्षात आले की आपल्या कळपातील एक गाय रोज वेगळ्या ठिकाणी निघून जाते व आपण निघण्याच्या वेळेवर परत येते. ती गाय घरी पूर्ण दूध पण देत नाही. ह्याचा शोध काढण्याकरीता गुराखी तीच्या पाठोपाठ गेला.

ती गाय जवळच्या एका डोंगरावर चढून आली व एका झाडा आड उभी राहली. पहातो तो काय? तिच्या स्तनातून दुधाच्या धारा वारूळातून खालच्या विग्रहावर पडू लगल्या ते दृष्य पाहून गुराख्याला अत्यंत आश्चर्य वाटले. परंतु जवळ जाऊन पाहण्याचे धाडस त्याला झाले नाही. त्याक्षणी तो धावत पळत डोंगरावरून खाली आला.





गुराख्याने जे जे पाहीले ते येऊन राजापाशी कथन केले. राजा त्या डोंगरावर चढून गेला. त्याला त्या वारूळाखाली असलेल्या विष्णुच्या प्रतिमेचा शोध लागला. त्यानंतर त्याने जवळच असलेल्या एका दुसऱ्या डोंगरावर त्या मुर्तीची प्रतिष्ठापना केली. त्याच्या करीता एक देऊळ बांधविले एका महान शिल्पकाराने त्या मुर्तीला विलक्षण रूप दिले.

सप्तगिरीच्या व्यंकटेश्वराच्या रूपात प्रसिद्ध असलेल्या महाविष्णुच्या बरोबर लग्न करण्याच्या इच्छेने लक्ष्मीदेवी आकाश राजाच्या घरात अद्भुत रूप सौंदर्याने जन्म घेऊन पद्मावतीच्या रूपात अवतरली.





व्यंकटेश्वर एके दिवशी मानव रूप धारण करून वनात विहार करीत होते त्यावेळी त्यांनी पद्मावतीला पाहिले. त्या दिव्यदंपतीनी एकमेकांना आपापसात ओळखून पुन्हां पृथ्वी लोकांत एकमेकांशी विवाह करून घेतला तिरूमल पर्वताच्या पायथ्याशीं निर्मित असलेल्या मंदिरात भक्तांकडून पद्मावतीदेवीची पुजा अर्चा केली जाते.

आपल्या देशातील प्रसिद्ध देवळांमध्ये तिरूपतीचे देवस्थान सर्वात श्रेष्ठ मानले जाते. अनेक राजांनी देवळाची बांधणी करण्याकरीता व देवळांचे प्रांगण वाढविण्याकरीता अफाट सोनेनाणे दिले ह्या देवळाचा कळस पूर्ण सोन्याने आच्छादिलेला आहे.













दररोज देशाच्या कानाकोपऱ्यातून अनेक भक्तलोक येथे येतात व तेथील देवळातील हुंडीत पैसे टाकतात तेथील हुंडीतून जमा झालेल्या पैशांनी देवस्थानांतील लोकांच्या सोईसाठी अनेक योजना अमलात आणल्या आहेत. शिक्षण केंद्र शुश्रुषाकेंद्र व अनेक धर्मकार्यंकरीता देवस्थान खर्च करते.



# भाग्यदेवी

पौराणिक कथांमधून असे समजते की, राम सिता व लक्ष्मण ह्यांनी ह्या-स्थानी आपला काही काळ घालवला होता. ते जेथे राहीले होते त्या ठिकाणाला स्वामीतीर्थ म्हटले जाते. विष्णू स्वर्गातून पृथ्वीवर जेथे उतरले होते तेथील शिळेला विष्णुच्या चरण-कमलांचा स्पर्श झाला असा एक उल्लेख आहे.



आफ्रिकेतील एका गावात एक मासेमारी रहात होता. तो जवळच असलेल्या एका मोठ्या सरोवरातील मासे पकडीत असे. मासे पकडण्याकरीता त्याने गोल व उंच आकाराच्या टोपल्यांचा उपयोग केला होता. तो आपल्या लहान होडीत त्या टोपल्या घेऊन जाई व जेथे खोल पाणी असेल तेथे होडी थांबवून तो दोरीच्या सहाय्यानी टोपल्या खाली सोडी टोपल्याच्या वरच्या भागात त्याने लाकडाचे तुकडे बांधून ठेवले होते म्हणजे त्याला त्यात पहाणे सोपे जाई की कोणत्या टोपलीत मासे अडकले आहेत व टोपल्या कुठे आहेत घरी परतण्याच्या सुमारास तो सर्व टोपल्या बाहेर काढून घेई व त्यात अडकलेले मासें विकून आपली उपजिविका करे.

एके दिवशी मासेमारी आपल्या टोपल्या एकएक करीत बाहेर काढीत होता. दोन टोपल्यात एकही मासा अडकला नाही. तिसऱ्या टोपलीत एक छोटा खेकडाच काय फक्त अडकला. परंतु चौथी टोपली थोडी जड भासू लागली. त्यावर मासेमाऱ्याने विचार केला—"अरे वा, माझे भाग्य उजळले म्हणावयाचे आता माझी गरीबी दूर होणार" असा विचार डोक्यात घोळवित त्याने ती टोपली खेचन आपल्या होडीत घेतली परंतु त्याच्या टोपलीत एक हडकुळी अशक्त म्हातारी बसलेली आढळली.

मासेमाऱ्याचे आश्चर्य क्षणात रागात बदलले त्याने चिडून तिला पुन्हां सरोवरात ढकलण्याचा विचार केला परंतु ती केविल-वाणे गयावया करीत म्हणाली—"बाळा, तू मला पुन्हा पाण्यात ढकलून देऊ नकोस. तू मला तुझ्या बरोबर घरी घेऊन जा. माझ्या कडून तुझे काहीही नुकसान होणार नाही.



ह्या देवळातील देवाची मुर्ती अत्यंत दिव्य प्रेम पसरवणारी व मंदहास्य करीत अत्यंत अद्भुत् तेजाने तळपत असते. पूर्ण मुर्तीवर सोन्या रत्नांचे दागिने घातलेले असतात. भक्त लोक सात पर्वतांचा देव व्यंकटरमण ह्याचे दर्शन करणें म्हणजे मुक्ति मिळाल्याचा



"काय मी तुला माझ्या घरी घेऊन जाऊ? मलाच खायला मिळत नाही तुला काय खायला घालू?

पण म्हातारी गयावया करीत त्याच्या पाठोपाठ चालू लागली शेवटी नाराजीनेच मासेमाऱ्याने तिला थोडेसे खायला दिले. दोघांचे खाणे संपल्यावर मासेमाऱ्याने म्हातारीला विचारले–"अग म्हातारडे, तू म्हणालीस की, माझे नुकसान होणार नाही मग सांग बघू, ते कसे काय?

"उद्या सध्याकाळच्या आत तू एका गुरांच्या कळपाचा मालक बनणार आहेस त्याकरीता तू एक मोठा गोठा बांध." म्हातारी म्हणाली.

मासेमाऱ्याने तिला कैक प्रश्न विचारले परंतु म्हातारीने स्पष्ट शब्दात त्याला म्हटले–" मी जे सांगते ते मुकाट्याने कर!"

मासेमारी मनात काहीतरी पुटपुटू लागला व दुसऱ्या दिवशी सकाळ पासून तो गोठा बांधण्याच्या कामी लागला. त्याने एक माठे कांट्यांचे कुंपण घालून गाईंना ठेवण्याकरीता एक गोठा तयार केला.

त्याच क्षणी गाई गुरांचे हंबरणे ओरडणें ऐकू येऊ लागले. ताबडतोब एका बैला सह अनेक गाईगुरे व वासरे तेथे येऊन पोहोचली. गोठ्यात एकेकांनी प्रवेश केला व जशी काय पूर्वी पासून त्या जागी येऊन बसली

त्या दिवसांपासून मासेमाऱ्याच्या आयुष्यात एकदम बदल झाला. आता तो गरीब राहीला नाही. तर तो खूप पैसेवाला झाला. त्या गावातील चोहोबाजूच्या जमिनी त्याने विकत घेतल्या व लग्न करून एक गृहस्थ बनला. तेथल्या धनवान लोकांत त्याची गणना होऊ लागली जर कां गावातील कोणी त्याचा ह्याबाबत सल्ला विचारण्यास आला तर तो आपली दाढी कुरवाळीत ऐटीत त्यांना म्हणे–"काय हो! माझा काय हाच एक धंदा आहे."

असेच सहा महिने उलटले एक दिवस मासेमारी शेजार गांवी मेजवानीला गेला. तो येईपर्यंत त्याने खाल्ले व भरपेट दारू घेतली. मेजवानी संपताच पुष्कळ रात्र उलटून गेली. तशात मासेमारी लडबडत घरी आला त्याला पाहिल्यास तो कोणावर तरी तुटून पडेल अशा आवेशात होता.

"दार उघडा! म्हणतो नां दार उघडा! मी ह्या घराचा मालक आलो आहे" असे बरळत दार जोरजोरात ठोठावू लागला. परंतु कोणीही येऊन दार उघडले नाही! त्यावर तो भयंकर संतापला! रागाने त्याचे डोळे लालबुंद झाले तो कर्कश ओरडा म्हणाला–"काय ह्या घरात माझी कोणालाच पर्वा नाही कां? त्या सरोवरातून मी त्या म्हातारीला घरी आणले. ती राक्षशीण तरी काय मेली कां? अग ऐ म्हातारडे, उठून दरवाजा तरी उघड नां!"

त्याचे बोलणे पुरे होण्यापूर्वीच म्हातारीनें दार उघडले व त्याच्या समोरे येऊन उभी राहली व त्याच्याकडे तिक्ष्ण नजरेने पहात जोरात ओरडत म्हणाली–"तू मी केलेले उपकार विसरलास माझी निंदा केलीस शिव्या घातल्यास मी एक क्षणभर सुद्धा येथे नाही रहात.

"अग म्हातारे, तू काय मला धमकी घालतेस आनंदाने चालती हो! तुला अडवणारा इथे आहे तरी कोण माझ्या मागचा तुझा पिडतरी सुटेल" मासेमारी म्हणाला.

दुसऱ्या दिवशी उजाडण्या पूर्वीच म्हातारीने आपली पथारी गुडांळली खरकटी भांडी घासली. घराची साफ-सफाई केली त्या घरातील एक कणही न घेता ती गोठ्याचे दार उघडून टाकले त्यानंतर ती सरोवराच्या दिशेने निघाली. तशी सर्व गाईगुरे तिच्या पाठोपाठ निघाली व सरोवरात जाऊन अदृष्य झाली मासे-मारी पुन्हां पूर्वी प्रमाणें मासे पकडून उपजिवीका चालविण्याच्या परिस्थितीत आला अशा प्रकारे त्याची भाग्यदेवी त्याच्या मूर्खपणामुळे त्याचा त्याग करून निघून गेली.



# प्रतिभा

एकदा उत्तरेकडे तिर्थयात्रेस निघालेले ज्ञानानंद व दक्षिणेकडे यात्रेस निघालेले विजयानंद अकस्मात रस्त्यात भेटले. दोघांनी आपल्या यात्रेविषयी वैशिष्ठ एकमेकांना सांगीतले त्यानतंर अशाच गप्पागोष्टी करीत असतांना ज्ञानानंद म्हणाले–"प्रत्येक मनुष्यामध्ये कोणती नां कोणती प्रतिभा नक्की असावी!"

"परंतु ते तर अशक्य आहे कारण प्रत्येक माणूस कोणत्या प्रतिभा राखत असे?" विजयानंद उत्तर देत म्हणाला.

ह्या एका गोष्टीवरून दोघांच्या मधे वितंडवाद सुरू झाला विजयानंद म्हणाले–"मग सर्वात प्रथम तुम्हीं सांगा तुमच्यात कोणती प्रतिभा आहे?"

"समोर असलेल्या व्यक्तिमधे कोणती प्रतिभा आहे हे जाणण्याची माझ्या मधे प्रतिभा आहे" ज्ञानानंदानी उत्तर दिले.

"मग! सांगा पाहू माझ्यामधे कसल्या तऱ्हेची प्रतिभा आहे?" विजयानंदानी उत्तेजीत होत त्याना विचारले.

"समोर असलेल्या व्यक्तिमधिल न समजणारी प्रतिभा माझ्या मधे आहे." ज्ञानानंदाने झटक्यात उत्तर दिले.

ते ऐकताच विजयांनदानी लाजेने मान खाली घातली.





# शिव लीला

मृकंडमहर्षी हे भृगुवंशीय होते. त्यांच्या पत्नीचे नाव मरूव्दती असे होते. विवाह झाल्यावर त्यांना बराच काळ अपत्य झाले नाही. म्हणून तीर्थयात्रा करीत दोघं पतिपत्नी केदार क्षेत्री आली.

एके दिवशी केदारेश्वराची पूजा करून ध्यानमग्न बसली असता त्याना आकाश-वाणी ऐकू आली–"आता तुम्ही आपल्या आश्रमात परत जा. तुम्हाला अपत्यप्राप्ती होईल!"

दोघे गृहस्थाश्रमाची सर्व कर्तव्ये पुरी करीत आकाशवाणी केव्हां खरी होते याची वाट पाहू लागली. काही काळ लोटल्यावर मरूव्दतीला एक सूर्यासारखा तेजस्वी मुलगा झाला. त्याच वेळी एक आकाशवाणी झाली. "हा मुलगा अल्पायु होईल. याला बारा वर्षाचे आयुष्य प्राप्त आहे!"

ती आकाशवाणी ऐकून दोघांचा आनंद लयास गेला. दु:खाने उदास होऊन दोघं बसून राहली. परंतु पुत्रसुख जितके दिवस नशिबीं असेल तितके दिवस मिळेल, पुढे 'ईश्वरेच्छा' असे मनाचे समाधान करून घेऊन दोघं मुलाचे लाड पुरविण्यात स्वत:ला विसरून गेली.

मृकंडने आपल्या मुलाचे नाव मार्कंडेय असे ठेवले. त्याचा उपनयन संस्कार यथा-वेळी झाला आणि त्याला गुरूगृही पाठ-विण्यात आले अकरावे वर्ष लागले तेव्हांच सर्व वेदशास्त्रांचा अभ्यास संपवून मार्कंडेय घरी परत आला. ब्रह्मतेजाने तळपत



असलेला त्याचा चेहरा पाहून आईबापांचे चित्त आनंदित झाले. परंतु त्यांच्या मानेवर उरलेले एक वर्ष तलवारीसारखे लटकत होते. मरुन्दती सारखी रडत बसून रहायची. परतु तिने मार्कंडेयाने तिला कितीदा विचारले तरी आपल्या दु:खाचे कारण सांगितले नाही. शेवटी मृकंडने मनाचा धीर करून मार्कंडेयाला त्याचे आयुष्य एका वर्षानें संपणार असल्याचे धीर करून सांगितले.

ते ऐकुन मार्कंडेयाने विचार करून काय करायचे ते ठरविले आणि म्हणाला—"तुम्ही दोघे मला आशीर्वाद द्या. मी तपश्चर्येला जात आहे. शंकराला सांकडे घालून त्याच्या कृपेने मी मृत्युंजय होईन असे मला वाटते."

असे सांगून त्याने आईवडिलांच्या पायांवर डोके ठेवले. दोघांनी त्याला पोटाशी धरले. आणि 'चिरंजीवी' होण्याचा आशीर्वाद दिला. त्याच वेळी नारद मुनी तेथे आले. मृकंडने त्यांची पादपूजा करून मुलाला यशप्राप्तीचा आशीर्वाद देण्यास विनंती केली. नारदाने मार्कंडेयाच्या दृढ निश्चयाची वाखाणणी करून त्याला आशीर्वाद दिला. म्हणाला— "बाळा मार्कंडेया! तू सरळ गौतमीच्या काठावर जा आणि पंचाक्षरी मंत्राचा जप करीत शंकराची आराधना कर तुझा मनोरथ पूर्ण होईल."

मार्कंडेयाने गौतमी नदीकाठी जाऊन सैकत लिंगाची प्रतिष्ठा केली आणी म्हणाला- "हे चंद्रशेखरा! तुझ्याशिवाय माझे रक्षण कोण करणार? तुझ्या चरणी लीन झालेल्या भक्तावर यमाची वक्रदृष्टी पडणे शक्यच नाही."

तिकडे नारदमुनी त्रिलोकात संचार करीत यमलोकीं गेले आणि यमाला म्हणाले—"मृत्यूवर जय मिळविण्याची प्रतीक्षा करून मार्कंडेयाने शंकराला सांकडे घातले आहे. आता तुझ्या बळाची परीक्षा आहे" असे सांगून नारदमुनीं निघून गेले.

एक वर्ष संपत आले आणि मार्कंडेयाच्या आयुष्यातला शेवटचा दिवस उजाडला. यमाने आपले दूत पाठविले. परंतु यमदूत



मार्कंडेयाच्या ते ध्यानामुळे जवळ जाऊंच शकले नाहीत. ते परतले तेव्हां यमाला स्वतः जावे लागले. तो आपला दंड आणि पाश घेऊन महिष वाहनावर बसून त्याकडे निघाला.

मार्कंडेय शिवलिंगाला आलिंगन करून त्यावर मस्तक ठेवून ध्यानमग्न बसला होता. त्यावेळी यमाने आपला पाश त्याच्या शिवलिंगासह मार्कंडेयाच्या गळयात पाडला. तेव्हां एकदम शंकर रुद्ररुपाने प्रगट झाला यम शंकराचे ते रुद्ररूप पाहून थरथर कांपू लागला. आणि ओरडला–"हरहर शंभो, महादेव! त्राहि माम्!" आणि बेशुद्ध होऊन पडला.

शंकरानें आपला अभयहस्त मार्कंडेयाच्या मस्तकावर ठेवला आणि त्याला आशीर्वाद देऊन म्हणाला–"वत्स! तू मृत्युंजय आहेस. कल्पकल्पांतर पर्यंत तू चिरंजीवी राहशील."

त्यानंतर देवांनी येऊन शंकराला हात जोडून विनंती केली की यमाचा उद्धार करावा, नाहीतर जन्म मृत्युचे चक्र बंद पडेल. शंकराच्या अनुग्रहाने यम उठून बसला. शंकराला नमस्कार करून तो यमलोकी परत गेला.

त्याच वेळी आपल्या मुलाला भेटायला म्हणून मृकंड व मरुद्वती आले. शिवकृपेने मार्कंडेय चिरंजीवी झाल्याचे कळल्यावर त्यांना परमानंद झाला. 'शिव लीला अगाध आहे' असे म्हणत दोघे आपल्या मुलाला घेऊन आपल्या आश्रमात परत आले.

त्यानंतर मार्कंडेय चिरकाल जीवित राहला. त्याच्याहून जास्त दिर्घायु असे अनेक थोर पुरुष पूर्वी होऊन गेले होते.

इंद्रद्युम्न नामक राजाला फार मोठी कीर्ती मिळाली होती. त्या कीर्तीच्या आधारे त्याला स्वर्गसुख प्राप्त झाले होते. परंतु त्याची कीर्ती संपली. त्यानंतर स्वर्गलोकांतील निवासी त्याला म्हणाले–"भूलोकात कोणी तुझी आठवण देखील काढीत नाहीत. आता स्वर्गात तुला रहायला जागा नाही तू भूलोकात परत जा."

इंद्रद्युम्न भूलोकी परत आला. आणि त्याचे नाव म्हणजे कीर्ती शेष आहे का चवकशी करीत इकडे तिकडे भिरभिर फिरु लागला. तो मार्कंडेयाकडे आला. तेव्हां मार्कंडेय त्याला म्हणाला–"हे मला माहीत नाही, पण माझ्याहून मोठा प्रावारकर्ण (घुबड) आहे. त्याला जाऊन विचार."

त्यानंतर दोघे प्रावारकर्णाकडे आले तो म्हणाला–"तू कोण हे मला माहीत नाही, परंतु माझ्याहून मोठा नालीकजंघ आहे चल त्याच्याकडे, त्याला विचारून पाहू या."

नालीकजंघला सुद्धा इंद्रद्युम्न कोण हे माहीत नव्हते. परंतु तो त्याच्याहून वयाने मोठे आकूपार नावाचे जे कांसव होते त्याच्याकडे तिघांना बरोबर घेऊन निघाला.

आकूपारने इंद्रद्युम्नाला पाहतांच ओळखले व म्हणाला–"मी चांगला ओळखतो तू कित्येकदां माझे रक्षण केले आहेस. मी ज्या सरोवरात राहतो ते कसे झाले ठाऊक आहे का तुला? तू अनेक यज्ञ करून गोदाने केलीस त्या गाईंच्या खुरांनी येथे एक सरोवर झाले."



तेव्हां देवदूत इंद्रद्युम्नाची कीर्ती अजून भूलोकात इंद्रलोकांत शेष आहे हे स्वतः पाहून त्याला इंद्रलोकी पुनरपि घेऊन गेले.

भीमावती नगरीत सोमदेव नावाचा एक शिवभक्त रहात असे. शिवराम त्याच्या मुलाचे नाव होते. शिवराम सात वर्षाचा झाला तेव्हां त्याचा बाप मरण पावला आईनेच मुलाला लहानाचे मोठे करून वाढविले.

दिवाळीचा सण येण्यापूर्वी शिवराम आपल्या काही साथीमित्रां बरोबर समिधा, झाडाची पाने वगैरे गोळा करून आणायला जंगलात गेला. सर्व मुले एका वडाच्या झाडाखाली गप्पा मारीत बसली. तेव्हां







त्याच्यात अनेक विषयांवर चर्चा होऊ लागल्या.

मुले म्हणू लागली–"या भाऊबिजेला माझी बहीण आणि माझे मेहुणे येणार आहेत मी जाऊन त्यांना घेऊन येणार आहे." आणखी काही मुले म्हणाली– "बाबांनी ताईला देण्यासाठी नवीन साडी व खण आणले आहेत!" मुलांचे असे बोलणे चालू होते. तेव्हां शिवराम म्हणाला–"मी सुद्धां माझी ताई आली की तिच्या बरोबर खूप गप्पा मारणार आहे. मी तिला भाऊबीज घालीन आणि तिला तिच्या बरोबर खूप खूप मजा करेन. साडीखण देईन."

शिवराम म्हणाला ते ऐकून सर्व मुले खदखदा हंसू लागली म्हणाली–"अरे, तुला बहीण कोठे आहे? म्हणे बहिणीला भाऊबीज घालीन आणि साडीखण देईन! सांग कोठे रहाते तुझी बहीण? तिचे नाव काय रे? आणि तुझ्या मेहुण्याचे नाव काय? ते कोठे रहातात आणि त्यांना किती मुले आहेत?"

शिवरामजवळ त्यांच्या त्या प्रश्नांचे उत्तर नव्हते. तो गहन विचारात डुबून गेला परंतु गप्प बसण्या शिवाय मार्ग नव्हता. तो नाईलाजाने रडत घरी परत आला.

मुलगा रडत घरी परत आलेला पाहून आईने त्याला रडण्याचे कारण विचारले म्हणाली–"कोठे पडलास कां? की कोणी तुला मारले? काय झाल काय रडायला?"

शिवरामने मुलांनी त्याची कशी थट्टा उडविली ते सांगितले आई त्याला म्हणाली– "बाळ, एवढेच ना, ते पुन्हां भेटले तर त्यांना जाऊन सांग तुझ्या ताईचे नाव भ्रमरांबा आहे आणि तुझ्या मेहुण्याचे नाव मल्लिकार्जुन ते दोघे श्रीशैल क्षेत्री रहातात त्यांना गणपती आणि कुमारस्वामी असे दोन मुलगे आहेत सर्व जग त्यांच्या इंगितावर चालते. तुझ्या मेहुण्यासारखा प्रतापी वीर त्रिलोकात नाही."





# लहान-मोठा

एकदा गावातील एक तत्वज्ञानी व शेतकरी ह्याच्यामधे एका क्षुल्लक गोष्टीवरून वितंड वादविवाद सुरु झाला.

"तू आयुष्यभर गवतातील तण काढणे, नांगरणे व शेतकापणे–हेच काम फक्त करतोस ना! बाळ, तुला फक्त शेतातीलच गवताचे तण न काढता आपल्या मनातील हिरवेपणा सुद्धा घालता कामा नये. नाहीतर त्या शेतातील गवतामधे आणि तुझ्यामधे फरक तो काय राहिला." तत्वज्ञानी शेतकऱ्याला म्हणाला.

त्यावर शेतकरी म्हणाला–"तत्वज्ञानी महाशय, आपण बहुदा एक गोष्ट विसरता की, आपल्या पेक्षा माझा उपयोग लोकांना जास्त होतो. आपण जे नुसते तत्वज्ञान सांगता ते फक्त ऐकूनच ह्या जगातील माणसे जिवत राहू शकत नाहीत परंतु मी जे बी पेरून धान्य तयार करतो त्या शिवाय माणूस जगु शकणार नाही. शेतकऱ्याचे बोलणे ऐकताच तत्वज्ञानी विचारमग्न झाला–"महाशय आपण एवढी काळजी कसली करता? मी तुम्हांला एक छोटीशी गोष्ट सांगतो. अशाच प्रकारे एकदा दगड व चिखलामध्ये बोलता बोलता वाद उत्पन्न झाला दगडाने गर्वाने म्हटले–"मला बघ मी कसा स्वच्छ गुळगुळीत व धष्टपुष्ट सुंदर आहे."

तितकेच बोलून त्याच्या मनाचे समाधान झाले नाही फिरून तो म्हणाला–"तुझा स्पर्श होताच तू चिकटून बसतोस माणसे तुझ्याबद्दल घृणा करीत आपले पाय धुवून सुद्धा संतुष्ट होत नाहीत." दगडाने चिखलाची अवहेलना केली.

अभिमानी दगडाच्या तोंडून असे ऐकल्याबरोबर चिखलाचे पौरुष जागे झाले–"अरे दगडा दिसायला जरी मी घृणास्पद असले तरी तुला माहीत आहे कां? मनुष्याचे प्राण वाचविणारा कोण आहे ते? मीच आहे! समजले!"







शेतकऱ्यांच्या तोंडी ऐकलेली गोष्ट समजून तत्वज्ञानी म्हणाला–" अरे बाबा, चिखलाने जे उत्तर दिले त्याचा आम्ही तिरस्कार करू शकत नाही. परंतु त्याच्या दुसऱ्या पक्षाना सुद्धा आपण काही विचार केला पाहिजेना! चिखलाच्या मुळे आपल्याला चांगले धान्य मिळू शकते तसेच मोठमोठया इमारती घरे ह्या कामी दगड व शिळांचाच उपयोग होतो नां! त्यामुळे दोघांचा उपयोग आपल्या आपल्या परीने योग्य होतो.

"ते तर ठिकच आहे. आपण योग्य मार्गावर येत आहात! आपण असे समजता की ह्या संसारात प्रत्येक माणसाची व वस्तुची आवश्यकता आहे. आता मी जी गोष्ट तुम्हांला सांगणार आहे ती तुम्ही ऐकली असेल नसेल ती गोष्ट ऐकल्या नंतर तुम्ही मला आपला विचार सांगा." असे म्हणत शेतकरी गोष्ट सांगू लागला.

"एका जंगलात सागवानाचे व एक वडाचे झाड होते. एकदा वडाने सागवानास म्हटले–"मी बघ, लाखो लोकांना शितल छाया देतो आश्रय देतो. तुझी पाने सुपा एवढी विशाल आहेत परंतु मनुष्य प्राण्याला त्याचा काही उपयोग नाही."

सागवान म्हणाला–" अरे गर्विष्ट वडाच्या झाडा! तू आपला फुकटचा अहंकार सोडून दे. तुझे अस्तित्व तरी काय आहे! तू जी सावली देतोस त्याची काय किंमत. माझ्या लाकडाचा उपयोग करून मानव कैक घरे बांधून आपले आयुष्य सुखपूर्वक घालवतो.." सागवानाने त्याला म्हटले.

शेतकऱ्याच्या तोंडचे बोलणे ऐकताच तत्वज्ञानीने त्याचा आदर केला व त्याला आलिंगन घातले व म्हटले–" दादा, तू खरा सावली देणारा वड आहेस आणि मी मनाला शांती प्राप्त करून देणारा सागवान आहे. शेताला उपयुक्त होणारी माती तू आहेस व मनाचे रक्षण करणारा दगड मी आहे अत्ता समजले कोणी लहान किंवा मोठा होत नाही. जगाला दोघांची आवश्यकता आहे. अशा तऱ्हेने तत्वज्ञानीने शेतकऱ्याला समजावले.





# खरा चोर

रत्नगुप्त एक श्रीमंत व्यापारी होता. त्याच्या घरात एके दिवशी रात्री अचानक दहा हजाराची चोरी झाली. जेथे तिजोरी ठेवली होती. तेथें खोलीत चार नोकर झोपले होते. त्यामुळे रत्नगुप्तच्या मनांत त्यांच्याविषयी शंका आली.

रत्नगुप्त अत्यंत साधा भोळा होता. त्यामुळे त्याला अद्याप कोणावरही रागावणे जमले नाही. त्याच्या व्यापार धंद्यात व किराणा दुकानात सोमशास्त्री नावाचा एक माणूस त्याला सतत मदत करीत असे. तो अत्यंत बुद्धिमान होता. त्यामुळे रत्नगुप्तने रात्री घडलेली घटना सोमशास्त्रीस ऐकवली. व त्याला सुचविले की, तू कोणत्याही नोकरांस न दुखविता चोरी कोणी केली हे गुप्तरीतीने शोधून काढ.

सोमशास्त्रीने रत्नगुप्तचे म्हणणे मान्य केले. त्या चौघां नोकरांना आपल्या खोलीत बोलावले व त्यांना विचारले–" तुम्ही चौघे तिजोरीच्या शेजारच्या खोलीत झोपलेले होता. त्या खोलीत चोरी झाली. रत्नगुप्त हा एक सज्जन माणूस आहे. त्यामुळे त्याने तुम्हांला पोलीसांच्या हवाली केले नाही. जे घडणार होते ते घडून गेले. परंतु संध्याकाळच्या आत जे पैसे चोरीस गेलें ते मुकाट्याने त्याच्या जागी परत ठेवावे जर कां तसे झाले नाहीं तर मात्र तुम्ही मोठ्या संकटात पडाल.

दुसऱ्या दिवशी सोमशास्त्रीने एकेका नोकराला आपला खोलीत बोलावले सर्वात प्रथम धर्मवीर आला. सोमशास्त्रीने त्याला विचारले–" हे बघ, तू चोरी केलीस त्याचा माझ्याकडे एक पुरावा आहे. तू तुझा गुन्हा कबुल करून ते पैसे परत त्या जागी नेऊन ठेव. मी तुझे काहीही नुकसान करणार नाही. तुला सोडून देईन."



धर्मवीर कळवळीने म्हणाला—"अहो, मी मागची दहा वर्षे ह्या घरात काम करीत आहे. परंतु कधीही कोणी माझ्यावर शंका केली नाही, ह्या घरचे मीठ खाल्ले आहे तेव्हां मी द्रोह कसा करीन. तसी माझ्यावर फुकट आरोप लावण्यात येत आहे हा दरिद्री जीव आत्ताच्या आत्ता संपुष्टात आला तर काय वाईट. सोमशात्रीने धर्मवीरला पाठवून दिले व भुषणमल्लला बोलावणे पाठवले. त्याला तेच विचारले त्यावर थरथर कांपत तो म्हणाला—" साहेब, मला ह्यातून सोडवा! खरोखरी ह्याबाबत मला काही माहीत नाहीं. असे म्हणत त्याचे पाय पकडून तो गयावया करू लागला.

"अरे, तू तर गुन्हा केला नाहीस म्हणतोस तर मग इतका घाबरतोस कां? तू केलेल्या गुन्हां संबधी माझ्याजवळ जो पुरावा आहे त्या बाबत मी तुला उद्या काही सांगेन?" असे म्हणत सोमशास्त्रीने भुषणमल्लला पाठवून दिले ह्यानंतर रामनाथला बोलावले.

सोमशास्त्रीने जेव्हां रामनाथला चोर म्हटले तेव्हां तो मोठ्या आवेशाने तुटून पडत म्हणाला—" बाबुजी जरा विचार करून बोला. तुम्ही श्रीमंत व आम्ही गरीब आहोत. त्यामुळे तुम्ही आमच्यावर काहीही खोटेनाटे आरोप लावाल परंतु केव्हांही आम्हांला ते सहन होणार नाही!

"अरे, असल्या धमक्यांना घाबरणारा मी नाही. तुम्ही जेथे झोपला होतात. त्याच्या शेजारच्या खोलीत चोरी झाली म्हणजे ह्याचा अर्थ त्या चोरी पाठीमागे नक्कीच तुमचा हात आहे. तुम्हां लोकांना तर अशा ठिकाणी झोपण्यास जागा दिली होती की, तेथे चोरी होता कामा नये. परंतु तुम्ही तर तुमची जबाबदारी साफ विसरून गेलात जा जा माझ्या पाशी जो पुरावा आहे तो उद्या तुला सांगेन." असे सांगून रामनाथला पाठवून दिले.

सरते शेवटी सोमनाथ आला त्याला सुद्धा रामनाथला जे ऐकवले तेच सर्व सांगितल



तेव्हां सोमशास्त्री म्हणाले सोमशास्त्रीला जेव्हां लुबाडून नेत होते तेव्हां तुम्हीं गाढ झोपेत होतात असे म्हणणें सुद्धा गुन्हाच आहे.

सोमनाथ चिडून म्हणाला—" मला घरा: तील काम करण्याकरीता नेमले आहे. पहारेकरी म्हणून नाही. आम्ही दिवसभर घामगाळून कष्ट करतो. त्यामुळे रात्री गाढ झोपलो तर त्यात आश्चर्य करण्या- सारखी कोणती गोष्ट आहे. पाहीजे तर आम्हाला रात्री पहारेकरी म्हणून ठेवा. मग आम्ही दिवसभर झोपून रात्रभर पहारा देऊ. त्यावेळी चुकून एखादी चोरी झाली तर आम्हाला दोषी ठरवा.

सोमशास्त्रीने सोमनाथला पाठवून दिले. व नंतर रत्नगुप्तच्यापाशी जात म्हटले— "साहेब, ही तर गोष्ट स्पष्ट झाली की ह्या चौघांनी मिळून ही चोरी केलेली नाहीं ह्यात धर्मवीर व रामनाथ तर पूर्णपणे निर्दोषी आहेत. मला शंका येते भूषण- मल्लची त्याने सोमनाथ बरोबर मिळून चोरी केलेली असावी. त्यामुळे तावडतोब त्यांच्या खोलीची झडती घ्यावी.

रत्नगुप्तने ह्या चौघां नोकरांकरींता पाठीमागच्या अंगणात चार खोल्या बांधून घेतल्या होत्या. ते चौघे रात्रीच्या वेळी अंगणात झोपत त्याची कुटुंबे सुद्धा तेथेच रहात होती. बऱ्याच शोधण्यानंतर सुद्धा



काहीही वस्तू भुषणमल्ल व सोमनाथच्या खोलीत सांपडली नाही. त्यावर सोमशास्त्रींने रत्नगुप्तला म्हटले—" तर मग, सोमनाथ सुद्धा निर्दोष आहे फक्त भुषणमल्लच दोषी आहे त्याने स्वतः चोरी केली असावी किंवा त्याला चोरी करणाऱ्याचा ठाव- ठिकाणा माहीत असावा.

"परंतु ही गोष्ट त्यांचा तोंडून कशी काय वदवावी?" रत्नगुप्तने विचारले.

"शेवटी एकच एक उपाय आहे. सावली सारखी त्याच्यावर नजर ठेवली पाहीजे" सोमशास्त्री म्हणाला.

रत्नगुप्तने तशी योजना आंखली ह्या घटने नंतर दहा दिवसाने भुषणमल्ल



शहरातील एका दुकानात रेशमी साड्या विकत घेत होता. सोमशास्त्रीने त्याला पकडले. त्याचवेळी त्याची झडती घेतली तेव्हां शंभर सोन्याची नाणी त्याच्यापाशी सांपडली.

सोमशास्त्रीने दरडावीत विचारले– "सांग इतके पैसे तुला कसे आणी कोठून मिळाले ?"

भुषणमलाला त्यावर उत्तर देता येईनां तो घाबरून भरभर कांपू लागला. सोमशास्त्रींनीं त्याला रत्नगुप्तकडे पकडून नेले.

सोमशास्त्रीच्या सांगण्याप्रमाणें भुषण-मल्लच चोर निघाला त्यावर आश्चर्याने रत्नगुप्तन सोमनाथाला बाकी उरलेले पैसे आणण्याविषयी आज्ञा केली.

तेव्हां थरथर कांपत भुषणमल्ल म्हणाला– "सरकार; ही चोरी मी केली नाही."

"मग सांग पाहू कोणी चोरी केली ?" रत्नगुप्तने दटावणीच्या सुरात विचारले.

"मी खरी गोष्ट सांगितली तर धनगुप्त मला मारून टाकले" भुषणमल्ल उत्तर देत म्हणाला.

धनगुप्तचे नांव ऐकताच रत्नगुप्तला अचंबा वाटला. धनगुप्त रत्नगुप्तच्या बायकोचा धाकटा भाऊ होता. तो घरात नेहमी उडाणटप्पूपणा करीत असे. म्हणून त्याच्या वडीलांनी त्याला ह्यांच्या घरी पाठवून दिले होते.

रत्नगुप्तने भुषणमल्लला विचारले– "असे काय घडले ते खरे खरे सांग ?"

भुषणमल्ल म्हणाला–"मालक, आम्ही जेथे झोपतो त्याच्या शेजारच्या खोलीत आपण तिजोरी ठेवता हे आम्हां सर्वांना चांगले ठाऊक आहे. त्याकारणाने आम्ही चौघे आळीपाळीने जागुन त्या खोलीवर पहारा देत होतो. त्यावेळी धनगुप्त चोर पावलांनी तेथे आला. त्याच्या हातात सुरी होती त्यांनी मला धमकावले घाबरवले तर ही गोष्ट कोणाच्या कानावर गेली तर मला सुरा भोसकून ठार मारण्याची धमकी घातली नंतर खोट्या किल्ल्यांनी दार उघडून तिजोरी होती त्या खोलीत गेला व ती फोडून त्यातील पैसे दागदागिने चोरून वर माझ्या हातात शंभर सोन्याची नांणी मला लांच म्हणून दिली हे धन मी धनगुप्तच्या खोलीतच लपवून ठेवले होते.

त्यानंतर रत्नगुप्तने धनगुप्तच्या खोलीची झडती घेतली तेव्हां आठ हजार सोन्याची नाणी सांपडली. धनगुप्तने मुकाट्याने स्वतः गुन्हा कबूल केला. रत्नगुप्ताच्या बायकोने धाकट्या भावाला रागावून वडी-लांच्या घरी पाठवून दिले.

त्यानंतर रत्नगुप्तने सोमशास्त्रीला आपल्या खोलीत बोलावून विचारले–"तू खरी गोष्ट उघडकीस आणून दिलीस. पण हे सांग तू कसा अंदाज बांधलास की, भुषण-मल्लाच चोरीच्या बाबतीत माहीती आहे बाकी तिथे अज्ञान आहेत ?"

सोमशास्त्री मंदहास्य करीत म्हणाले– "हि तर सर्वात सोपी गोष्ट आहे ! निर्दोष लोकांवर जर गुन्ह्याचा आरोप ठेवला तर ते सहजच दुःखी होतात. धर्मवीर अत्यंत दुःखी झाला त्यामुळे मी जाणले की, त्याने चोरी केली नसावी. धर्मवीर हे सुद्धा मानतो की ज्या घरातर मीठ खाल्ले त्याच्या-शी द्रोह त्याच्या पाशी आत्मसन्मानाची भावना जागृत असते. त्याच्यावर खोटेनाटे आरोप केले तर तो संतापाने उसळून उठतो. रामनाथने सुद्धा तेच केले. जेव्हां त्याला त्याची जबाबदारी पूर्णपणे केली नाहीस म्हटले तेव्हां त्याचा राग अनावर झाला. त्याने आपला राग व्यक्त केला परंतु त्याला तशी सवयच आहे. असा माणूस काय चोर होवू शकतो. जर खऱ्या चोरावर आरोप ठेवला जातो तेव्हां तो माणूस घाबरतो. भुषणमल्लवर जेव्हां चोरीचा आरोप ठेवला तेव्हां तो तावडतोब थरथर कांपू लागला. त्यावरूनच मी ठरवले की, जरी त्यांनी स्वतः चोरी केली नसली तरी त्याला चोरणाऱ्या विषयी नक्की माहीती असावी."

रत्नगुप्तने सोमशास्त्रीच्या हुषारीची तोंडभरून स्तुती केली.



# पोहोणारा वैद्य

वृषभेंद्र नावाचा एक वैद्य होता. तो रात्रंदिवस शेजारगांवी रोग्यांना तपासायला जात असे. एकदा त्याने एका रोग्याला तपासून विचार केल्या शिवायच एक औषध दिले. त्या औषधांचा परिणाम म्हणजे तो रोगी तत्काळ मरण पावला. रोग्याच्या नातेवाईकांना अत्यंत राग आला व त्यांनी वैद्याला घरापाठीमागच्या आम्यांच्या झाडाला बांधून ठेवले व म्हटले–" तुला काय शिक्षा द्यायची हे आम्ही उद्या ठरवू." असे म्हणून निघून गेले.

त्या रात्री मोठ्या प्रयासाने त्याने आपली सुटका केली. व गावाला लागणारी नदी पोहून तो कसाबसा आपल्या घरी पोहोचला. त्यावेळी वैद्यांचा मुलगा वैद्यकी विषयी ग्रंथ वाचण्यात मग्न होता.

वृषभेंद्र आपल्या मुलाच्याजवळ जात सल्ला देत म्हणाले–" बाळ ह्या वैद्यकीच्या ग्रंथामधे डुबंत राहू नकोस. माझ्या सारखा जर वैद्य बनायचे असेल तर सर्वांत प्रथम पोहोण्याची कला अवगत करून घे.





# कर्जवसुली

देवपुर येथे वीरदास नावाचा एक कोटचाधिश रहात होता. तो सावकारीचा धंदा करीत असे. अतिशय गरजुंना कर्ज देऊन त्यांच्याकडून योग्य ते व्याज घेत असे. त्यामुळे गावातील अधिकांश लोक वीरदास कडून कर्ज घेत व ती रक्कम वेळेवर परत करीत.

देवपुरला लागूनच दुसरे एक गांव होते. तेथे भार्गव नावाचा एक धनवान सावकार रहात होता. त्याला वडिलोपार्जित अफाट संपत्ती मिळाली होती तरी सुद्धा पैशांच्या लोभानें तो गरंजु लोकांना कर्ज देऊन दामदुप्पट व्याज त्यांच्याकडून वसुल करीत असे. परंतु गरीब लोक त्याचे व्याज देणे दूरच पण कर्ज काढलेले पैसे परत फेडण्यासाठी सुद्धा त्याला त्रास देत असत. त्यामुळे भार्गवला कर्ज वसुली सांठी गुंड लोकांची मदत घ्यावी लागे.

भार्गवला वीरदासच्या सावकारी विषयी बरीच माहीती समजली होती. तो एक दिवस देवपुरला आला व वीरदासची भेट घेऊन त्याने इकडच्या तिकडच्या गप्पागोष्टी केल्या. व नंतर त्याला विचारू लागला–" काय हो आपण आपल्या कर्जदारांकडून कर्जांची रक्कम कशी काय वसुल करता ?"

त्यावर वीरदास म्हणाला–" माझ्याकडून कर्जाची रक्कम लोकांकडून वसुल करण्याचा प्रश्नच पडत नाही. कर्जदार स्वत: माझ्याकडे येऊन पैसे चुकते करतात.

परंतु काहीजण आडमुठे असतात ना ! त्याच्याकडून आपण कसे पैसे वसुल करता ?" भार्गवने प्रश्न केला.

" मीं कितीका माणूस हट्टी असो त्याच्याकडून सहज पैसा वसुल करतो." वीरदासने पैजेच्या आवेशात सडेतोड उत्तर देत म्हटले.



भार्गव थोडा विचारमग्न झाला नंतर म्हणाला–" ठिक आहे, मी आपल्याकडून दोनशे रुपये कर्ज घेतो. ती रक्कम तुम्ही माझ्याकडून सहा महिन्याच्या आत वसुल करून दाखवा. मी तुमच्याशी एक हजार रुपयाची पैज लावतो.

भार्गवचे बोलणें ऐकून वीरदास मंद हांसला व म्हणाला–" मी आपल्या बाबतीत पुष्कळ ऐकले आहे तरी सुद्धा माझ्या धंद्याचा एक नियम आहे आमच्या गावातील सोडून दुसऱ्या गावच्या व्यक्तिला जर कर्ज घ्यावयाचे असेल तर त्याने त्याची एखादी वस्तु गहाण ठेवावी. तुम्ही तुमची कोणतीही वस्तू गहाण ठेवा व कर्जावू पैसे घ्या."

" ठिक आहे ! पण माझी सुद्धा एक अट आहे. आपण आपले कर्ज वसुल केल्यानंतर माझी गहाण वस्तू मला परत करावी. परंतु त्या कर्जापाठीमागे मी गहाण ठेवलेली वस्तू विकून माझे कर्ज परत केलेले नसावे. माझी अट मान्य आहे नां !" असे म्हणून त्याने एक सोन्याचे कंगण त्याच्या हातात दिले.

वीरदासने भार्गवचे म्हणणे मान्य केले व त्याला दोनशे रुपये कर्जावू दिले.

त्या दिवसापासून भार्गव एकाच विचारात मग्न राहीला की पाहू या वीरदास आपल्या कडून कर्ज कसे वसुल करतो !"

सहा महिने उलटले तरी वीरदासने भार्गवकडे कर्जाचे पैसे परत फेडण्याविषयी काही लग्गाबाजी केली नाही. तेव्हां आपण पैज जिंकलो ह्या विचाराने तो वीरदासला भेटण्यास देवापुरला आला.

वीरदासने भार्गवला पहाताच विचारले– " काय हो पैंजचे पैसे घेऊन आलात नां ?"

भार्गव आश्चर्याने म्हणाला– पैजचे पैसे मी घेऊन येणार ते कसे बुवा ? मी काय पैज थोडीच हारलो आहे ? तुम्हीच माझ्याकडून कर्जाचे पैसे वसुल केले नाहीत म्हणून खरी पैज मीच जिंकलो आहे !"

वीरदास हसत हसत म्हणाला–"आपले कर्जाचे पैसे तर मी केव्हांच वसूल केले !"



"अगदी खोटे ! हे तरी सांगा की, तुम्ही माझ्याकडून कर्ज वसुल केल्याचा तुमच्याजवळ काही पुरावा आहे. पैज हारल्यामुळे ते पैसे वाचविण्यासाठी बेमालुम खोटे बोलता आहात." भार्गव अत्यंत चिडीने म्हणाला.

" मला खोटे बोलण्याची काय आवश्यकता !" असे म्हणत त्याने आपल्या एका नोकराला बोलावले व त्याला भार्गवला दाखवित विचारले–" काय रे तुला हे कोण माहीत आहे नां ?"



त्याला पहाताच भार्गवच्या डोक्यात लख्ख प्रकाश पडला. खरी गोष्ट अशी झाली. चार महिन्यापूर्वी एक दिवस रात्री भयंकर तुफान वादळ पाऊस पडत होता त्यावेळी भार्गव जेऊन ओसरीवर येऊन उभा राहीला. अचानक एक माणूस पावसात भिजत त्याच्यापाशी आला व विनवणीच्या सुरात म्हणाला–" दादासाहेब, मला वाचवा माझी बायको मरणाला येऊन टेपली आहे. ताबडतोब शहरात जाऊन तिच्यावर उपचार करावयास हवेत. कृपाकरून मला वाचवा दोनशे रुपये कर्ज द्या. !"

भार्गव त्याच्याकडे पहात छद्मीपणाने म्हणाला–"वारे वा ! हे छान आहे ! मला माहीत सुद्धा नाहीत तू कोण आहेस आणि कोणत्या गावचा रहाणारा आहेस. मी कसे कर्ज देऊ कोणती तरी वस्तू गहाण ठेवायला घेऊन ये जा."

" दादा, घेऊन आलो आहे ! असे म्हणत त्या माणसाने आपल्या खिशातून एक सोन्यांची बांगडी बाहेर काढली व त्याला देत म्हटले–" हि बांगडी माझ्या बायकोची आहे. ही गहाण ठेवून मला ताबडतोब पैसे द्या." सोन्याची बांगडी पाहून भार्गवचे डोळें आनंदाने चमकले त्याने त्याचक्षणी एक पत्र लिहिले व परल्या व्यक्तिचा त्यावर अंगठा घेतला व ती सोन्याची बांगडी घेऊन त्याला दोनशे रुपये कर्ज दिले.

अशा प्रकारे वीरदासने भार्गव कडून कर्ज वसूल केलें.



भार्गव तडकून म्हणाला—"तुम्ही मला धोका दिलात आपल्या पैंजे नुसार मी गहाण ठेवून घेतलेली वस्तू तुम्ही पैसे देऊन ह्यापूर्वी मला सोपविली पाहीजे होती.

ह्यात धोका खोटेपणातर बिलकुल नाही त्या दिवशी रात्री माझ्या नोकराने तुम्हांला जी दिलेली सोन्याची बांगडी तीतर तुमची बांगडी गहाण ठेवली आहे परंतु फरक एवढाच की, तुम्ही जे कंगण माझ्याजवळ दिले ते फक्त मोडून मी त्याची बांगडी बनवली. पाहीजे तर त्या बांगडीचे वजन करून पहा. आता आपल्याला व्याज परत करण्याची आवश्यकता नाही त्याच पैशाने तुम्ही बांगडी मोडून कंगण करून घ्या." वीरदास म्हणाला.

भार्गवला पैज हरल्याचे एक हजार रुपये द्यायला मन होईना त्याने थोडा विचार केला व म्हणाला—"मी आपल्याला एक हजार रुपये देणार नाही. मला ही पहायचे आहे की ते हजार रुपये तुम्ही कसे काय वसुल करता.

वीरदास खदखदून हंसू लागला व म्हणाला—"मी तर तसा पूर्वीच अंदाज बांधलात होता की, तुम्ही त्याबाबतीत आडमुठेपणा कराल जवळजवळ दोन हजार किमतीचे कंगण तुमचे माझ्यापाशीच आहे. आपल्याला माझ्या नोकराने जी बांगडी दिली आहे. ती खऱ्या सोन्याची नाही. मुलामा लावलेली पितळेची आहे. हजार रुपये व माझ्या नोकराने दिलेली मुलामा चढवलेली बांगडी मला देऊन आपण आपले दोन हजारांचे कंगण घेऊन जा. असे सांगून वीरदासने आपल्या नोकरांकरवी ते कंगण आणून भार्गवला दाखवले.

भार्गव काळजीत पडला व एक हजार रुपये व बांगडी त्याच्या हातात देऊन कंगण घेऊन निघाला त्याच क्षणी त्याच्या डोक्यात एक कल्पना आली त्याने विचारले—"आपण कर्ज देण्यापूर्वी जे वचन दिले होते त्या अनुसाराने मी कर्जाची रक्कम परत केल्या बरोबर मी गहाण ठेवलेली वस्तू परत करावयास हवी होती नां परंतु आपण खोटीं बांगडी देऊन आपले वचन मोडलेत.

"ह्यात वचन मोडण्याचा प्रश्न उरत नाही" असे म्हणून तो पुन्हां हसू लागला तेव्हां त्याला म्हणाला—"भार्गव दादा, मला चांगले ठाऊक आहे की, आपण अत्यंत बुद्धीमान आहात अशा आपल्यापासून पैजेचे पैसे व कर्जाऊ पैसे वसूल करणे म्हणजे मोठे कटकटीचे काम आहे ती योजना मी आधीच आंखली होती. माझ्या नोकराने जी बांगडी तुम्हांला आणून दिली ती खरी सोन्याचीच होती खोटी नाही त्यातून तुमच्या कंगणाच्याच वजनाची सुद्धा होती कितीका त्याचा आकार बदलला तरी माझे कर्ज परत वसूल करण्यापूर्वीच माझ्या वचनानुसार की आपली गहाण ठेवलेली वस्तू आपल्याला परत केली आहे. ही गोष्ट तर आपण मानता नां! वीरदासने विचारले.

हि गोष्ट समजल्यावर सुद्धां मी एवढा दुष्ट नाही की, असे सांगू की आपण आपले वचन मोडले. परंतु कर्जाऊ दिलेल्या पैशांच्या वसुलीसंबधी आपल्यापासून मला बरेच काही शिकावयास पाहिजे." भार्गव तेथून जाता जाता म्हणाला.

वीरदासने भार्गवला थांबवत म्हटले—"अरे, आपण कर्ज म्हणून जो पैसा देतो ते वसुल करण्याकरीता कोणती पद्धत किंवा योजना असत नाही. परंतु आपण गरजुं लोकांना कर्ज देऊन जास्त लोभाला बळी न पडता जास्त व्याज घेण्याच्या पाठी न लागता पैसे दिले तर कोणत्याच कटकटी निर्माण होत नाहीत व सुलभतेने कर्ज वसुल होते. कर्ज घेणाऱ्याच्या मनात आपल्या बद्दल कृतज्ञता निर्माण होते. त्याकरीता कर्ज पाठीस लागून घेतले तर संकटे उभी रहातात.

"वीरदास दादा मला समजले की आपण हे सारे अनुभवाने शिकले आहे, मी आजपासून आपल्याच मार्गाने जायचा प्रयत्न करेन." असे म्हणत भार्गव तेथून गेला.



# अहंकारी

एका वृद्ध राजाने काही ग्रंथाच्या टिका व सारांशावरून भगवद्‌गीतेचे अध्ययन करुन ते काव्य रूपात प्रस्तुत केले. काव्य रचनेच्या समाप्ती नंतर त्याच्या मनांत असा विचार आला की आपल्याहून जास्त जाणणारा मोठा महाकवी कोणी असणार नाही. त्यावेळी सर्वात जास्त महान कवी असणारा विष्णुशर्मा ह्याला राजाने एक निरोप पाठविला की, काव्यात माझी बरोबरी करु शकणारा कवी माझ्याकडे पाठवून द्यावा.

विष्णुशर्माने एका तरुणाला राजाकडे पाठविले. राजाने त्या कवीला म्हटले–"तू कोणी फालतू कवी असशिल ! भगवत्‌गीता माझ्या सारख्या माणसाला समजत नाही. त्याकरीता मला टीकेचा आधार घ्यावा लागला. कवितेमधे रचलेले माझे काव्य तुला समजणार नाही त्या करीता तू परत जाऊन तुझ्या गुरुला माझ्याकडे पाठवून दे.

थोड्या दिवसानंतर विष्णुशर्मा स्वत: राजाच्याकडे गेला. राजाने त्याला त्या कवी तरुणाविषयी सविस्तर सांगितले त्यावर विष्णुशर्मा उत्तर देत म्हणाला–"महाराज, आपण भगवद्‌गीता समजण्याकरीता ज्या टिका-टिपणी वाचल्यात त्या मीच तुम्हांला दिल्या होत्या त्या ग्रंथाचा रचयिता तोच तरुण आहे.

राजा त्याचे उत्तर ऐकून आश्चर्यचकित झाला. त्याने विष्णुशर्माला विचारले–"परंतु त्या तरुणाने मला तसे काही सांगितले नाही. काय तो असा महान कवी आहे.

त्यावर विष्णुशर्मानी नम्रपणे उत्तर देत म्हटले–"महाराज, खरा कवी व पंडीत आपली आत्मस्तुती कधी करत नाहीत."

हे उत्तर ऐकताच वृद्ध राजाचा अहंकार कमी झाला.



# विचित्र जलचर

समुद्रगर्भातील पोवळ्यांच्या खडकांमधे विभिन्न प्रकारच्या माशांनी आपले वास्तव्य केलेले आहे.

ह्या पोवळ्याच्या खडकांमधे तसेच अनेक प्रकारचे विषारी प्राणी सुद्धा रहातात. ह्या जलचरांमधे सर्वात मुख्य प्राणी म्हणजे सी अनिमोनी आहे. सी अनिमोनी (वायुपुष्प) हे दिसायला रंगबेरंगी फुलांसारखेच दिसतात. परंतु हे प्राणी इतर मासे व अन्य जलचर प्राण्यांना फार धोक्याचे असतात. अनिमोनीच्या डोक्यावर एक फुलाची पाकळीसारखी एक वस्तु हलत असते. परंतु ती पाकळी फुलाची नसते तर त्या प्राण्यांच्या विषाने भरलेल्या लांब मिशा असतात. छोटे छोटे मासे त्या प्राण्यांच्या त्या रंगीत मिशांकडे आकर्षित होऊन त्यांच्या जवळ जातात व त्याला स्पर्श करताच दुसऱ्या क्षणी मरण पावतात हे मेलेले मासे हे सीअनीमोनी मजेत खातात. ह्या प्राण्यांच्या मिशा टोकदार सुई सारख्या असतात. ह्या प्राण्याद्वारे विष काही प्राण्यांवरच प्रभाव करु शकते. परंतु त्याच्या जवळ येण्याऱ्या सर्वच प्राण्यांवर नाही.

पोवळ्याच्या खडकांमधे वास्तव्य करीत असलेले हे अनीमोनी साधारणत: २० सेंटिमिटर पासून जास्त लांब असत नाहीत. परंतु आस्ट्रेलिया मधील ह्या प्रकारचा अनिमोनी एक मिटर लांबीचा असतो. हे जलचर जवळ जवळ ३० वर्षांपर्यंत ह्या दगडांना चिकटून असतात. प्रयोग शाळेत काही जलचर ५० वर्षांपर्यंत जिवंत राहीले आहेत काही शास्त्रज्ञ विश्वास करतात की, ह्या जलचरांपैकी काही २०० वर्षापर्यंत जिवंत राहू शकतात. ह्या हिशोबाने जगातील सर्वात जास्त जगणारा प्राणी हाच असु शकेल.

ह्यांची वाढ दोन तीन प्रकारे होते काही आपली अंडी घालून पिल्ले घालतात काही आपल्या शरिरापासून फुटून दुसऱ्या प्राण्यांत जन्म घेतात.

पाण्यात तळाशी पोवळ्याच्या खडकांमधे अनेक तऱ्हेचे मोठे मोठे खेकडे गोगलगाई व लहान मासे रहातात. हर्मिट ब्राब्न नावाचे काही खेकडे गोगलगाईनी सोडलेल्या कवड्यां-मधे लपून शत्रुपासून आपले संरक्षण करतात.

येथे आढळून येणारा आणखी एक प्रकारचा जलचर आहे त्याला स्टारफिश म्हणतात. हा नक्षत्राच्या आकाराचा असतो. हे अनेक प्रकारचे असतात. हे कीडी असलेल्या छोट्या माशांना पकडून त्याच्यावरच्या टरफलांना काढून टाकून खातात.





# THE HERITAGE

A monthly magazine that satisfies your family's need for intelligent reading and good taste.



Dear Friend:

Every age in history had its own trends. One of the trends of our time is our eagerness to know much of many things.

As a response to this yearning there has been a magazine boom. Every now and then a new periodical is announced.

We too are bringing to you the news of a new English monthly, THE HERITAGE.

Is it to keep pace with this trend that we are launching THE HERITAGE?

Strange though it may sound, THE HERITAGE will set a new trend—you'll be proud of.

We who have worked hard for decades to give our young a clean and healthy reading fare, are now launching a magazine of sound values and enjoyable literature for your whole family, from January'85.

Essays that stimulate your thinking, features that speak of many little-known aspects of Indian culture, stories and novels that are remarkable for human values and artistic merit, will make THE HERITAGE.

With over a hundred pages of variety, blended with colour and black-and-white pictures, THE HERITAGE will refuse to compromise with anything that is unworthy of you.

We address this letters to you, because we feel that you will be one of those who would like to see the success of such a magazine.

A year's subscription to THE HERITAGE cost Rs.72.00, but you can still enroll yourself or a friend of yours at the pre-launch price of Rs.60.00. Please send a M.O. or Demand Draft (drawn in favour of Dolton Agencies) To. **Dolton Agencies, Chandamama Buildings, Vadapalani, Madras-600 026.**

With best wishes,

*The Publishers.*

**From the publishers of Chandamama**

THE HERITAGE

# चांदोबा

संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी

अधिकार प्राप्त असणाऱ्यात जर दयाभाव व न्याय ह्या गुणांचा लोप झाला तर तशा साधारण व्यक्तिचे जीवन नरकतुल्य बनते. परंतु जर असा साधारण माणूस अधिकाराच्या बोजाने मान न वांकविता शौर्याने त्याला तोंड देऊ लागला तर त्याचे चांगले परिणाम होण्याची संभावना असते. ह्याचे सातत्य आपल्याला 'उच्च न्यायालय' ह्या गोष्टीत वाचावयास मिळेल.

## अमर वाणी

सद्विधा शक्यते लब्धं गुरुणा उपदेशतः ।
शीलं स्वाभाविकं तत्तु लभ्यतेनोपदेशतः ।।

[गुरुच्या उपदेशाने उत्तम विद्या प्राप्त केली जाते परंतु उत्तम स्वभाव फक्त उपदेशाने प्राप्त होत नाही.]

वर्ष : ३६ जुलै १९८६ अंक : १
एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००



## चांदोबातील नवलाई



### धुराचा त्रास

धुराच्या त्रासाने सर्व जगातील मिळून जवळ जवळ दर दिवसाला २९,००० हजार माणसे मृत्युला बळी पडतात. ह्या पेक्षां जास्त माणसे वेगवेगळ्या प्रकारच्या रोगाने पछाडली जातात. सध्या कलकत्ता येथे भरलेल्या चौथ्या कुटुंब कल्याण योजनेच्या समारंभामधे हि गोष्ट प्रामुख्याने प्रकट करण्यात आली.

### मृत्युच्या तोंडातून बाहेर पडलेली तरुणी

चीनची रहिवासी यान बोक्कान हि २२ वर्षांची तरुणी एकदा सायकलवरून प्रवास करीत होती. तीने जवळचा रस्ता समजून बर्फाच्या नदिच्या रस्त्यावरून सायकल नेली पुढे गेल्यानंतर बर्फ वितळल्यामुळे ती पाण्यात बुडाली जवळपासच्या लोकानी तिला बाहेर काढले व रुग्णाल्यात दाखल केले. तेथे जाताना तिचे हृदय पूर्णपणें थांबले परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे ऐंशी मिनीटांनी तिचे हृदय पुनः चालू झाले.





### डोळ्यांचे संरक्षण

नुकताच दिल्ल येथे एका नेत्र संरक्षण समारंभ साजरा झाला त्या समारंभात अशी गोष्ट स्पष्ट झाली की, आपल्या देशात विविध कारणांनी दरवर्षी सुमारे ४,००० मुले आपल्या दृष्टी-पासून वंचीत होत आहेत. नव्वद लाख आंधळे म्हणजे जगातील जवळ जवळ एक तृतियांश लोक आपल्या भारत देशात रहाणारे आहेत.

## तुम्हांला माहीत आहे कां ?

१. नेपालियनच्या जन्म संबधींत असलेल्या भागाचे नांव काय ?
२. अमेरिकेच्या स्वातंत्र्य चळवळीचा नेता कोण ?
३. दिल्लीच्या गादीवर बसणारी पहिली मुसलमान तरुणी कोण ?
४. आपला देश सोडून दुसऱ्या राज्यात पधंरा वर्षे घालवणारा मोगल सम्राट कोण ?
५ 'नाइटिंगेल आफॅ इंडिया' नावाने कोण प्रसिद्ध आहे ?

[ उत्तरे पान ६५ वर पहावीत ]

# दुर्मंद

इंद्राच्या दरबारात सौंदर्या मधे प्रथम नाव ऊर्वशीचे घेतले जाई. तिच्या अनुपम सौंदर्यावर मुग्ध होऊन दुर्मंद नावाच्या गंधर्वाने तिच्याशी लग्न करण्याची इच्छा प्रकट केली. परंतु ऊर्वशीने त्याला आपला नकार कळविला.

कारण ऊर्वशीने चंद्रवंशी राजा पुरुरव ह्याला मनाने वरले व त्याच्याशी विवाह करण्याचा निश्चय केला. एका पौर्णिमेच्या दिवशी उर्वशीने पुरुरवला भेटण्याचा संकल्प केला व ती नंदनवनात पोहोचली बकुळीच्या झाडाखाली बसून प्रियकराची वाट पाहू लागली.

हि गोष्ट माहीत होताच दुर्मंद पुरुरव चक्रवर्तीचे रूप धारण करून उर्वशीच्या जवळ आला. उर्वशीने मंदस्मित करून त्याचे स्वागत केले. दुर्मंदाने उर्वशीच्या गळयात फुलांची माळ घातली नंतर थोडा वेळ दोघांनी अत्यंत प्रेमाने गप्पागोष्टी केल्या. तितक्यात खरा पुरुरव राजा तेथे येऊन पोहोचला. तेव्हां त्याच्या रूपात असलेला दुर्मंद परिहासाने हंसू लागला उर्वशीला दुर्मंदाची लबाडी समजली व तिने रागाने त्याला शाप दिला–"तू राक्षस होशिल."

तेव्हां दुर्मंदाने कळवळीने उर्वशीला विनविले की मी केलेल्या अपराधाला क्षमा कर व मला आप दे. ती दुर्मंदाची प्रार्थना ऐकून उर्वशीने त्याला उःशाप देत म्हटले–"तू भूलोकात मानवाच्या रूपात जन्म घेशिल तुला युद्धात अत्यंत वाईट तऱ्हेने मृत्यु येईल !"





# पुण्य-फलप्राप्ती

कौमुदी राज्यातील उद्यानात जीवानंद नावाच्या ऋषींचा आश्रम होता. त्यांच्या जवळ सुबोध नावाचा एक शिष्य शिकत होता. सुबोधने गुरूंपाशी राहून अनेक आचारातील वेद-वेदांचे समग्र अध्ययन केले. जीवानंद गुरु आपल्या शिष्यांला नेहमी सांगत असत की काशी विश्वेश्वराचे दर्शन केल्याने कसे पुण्य प्राप्त होते. त्यामुळे सुबोधच्या मनांत काशी विश्वेश्वराचे दर्शन करण्याची अतिशय उत्कंठा लागली. ते पाहून जीवानंदनी त्याला दर्शन करण्यासाठी पाठविले.

सुबोध तिर्थयात्रेला निघाला बरेच दिवस पायी प्रवास केल्यानंतर एक दिवस वाटेत त्याची चप्पल तुटली. त्याचे लक्ष रस्त्याच्या कोपऱ्यावरच्या एका चांभाराकडे गेले तो एका आडोशाला बसून कोणाची तरी चप्पल शिवीत होता. सुबोध त्याच्याजवळ गेला व त्याने चप्पल त्याच्या हातात दिली. त्या चांभाराचे नाव कालिदास होते. सुबोधची चप्पल हातात घेऊन शिवत त्याने विचारले–"महाशय, आपण कोठे चालला आहात ?"

"मी कौमुदी राज्याचा रहाणारा आहे काशी विश्वेश्वराचे दर्शन करण्याच्या उद्देशाने निघालो होतो." सुबोधने उत्तर देत म्हटले.

ते उत्तर ऐकताच कालिदासचे डोळे चमकले तो म्हणाला–"काशी विश्वेश्वराचे दर्शन करणे काय तोंडच्या गप्पा आहेत आपण खरोखरी भाग्यवान आहात."

ह्यानंतर सुबोधने शिवलेली चप्पल घातली. व कालिदासाला एक चांदीचे नाणे दिले परंतु कालिदास ते नाणे न घेता म्हणाला–"महाशय, माझे नाव कालिदास आहे. आपण काशी विश्वेश्वराचे दर्शन

शितल भट



केल्यानंतर माझे नांव घेऊन हे चांदीचे नाणे हुंडीत टाका.

सुबोधने त्याचे म्हणणे मान्य केले. व हि गोष्ट आपण विसरुन जाऊ ह्या विचाराने त्याने ते नाणे आपल्या उपरण्याच्या टोकाला बांधले व तो चालू लागला.

सुबोधला काही अंतर चालून गेल्यावर एक जंगल लागले जंगलात प्रवेश करताच घोडयावर एक अग्निशिख नावाचा दरोडेखोर त्याला सामोरा आला व दरडावून म्हणाला—"तुझ्यापाशी जे काय धन दौलत असेल ती इथे काढून ठेव."

सुबोधनें आपल्या बरोबर वाट खर्चासाठी म्हणून शंभर रुपये घेतले होते. ते त्याने त्या चोरांच्या हाती दिले. त्यावेळी अग्निशिखची नजर त्याच्या उपरण्याच्या गाठीकडे गेली.

"त्या उपरण्याच्या टोकांशी काय बांधून ठेवले आहेस रे? सोने आहे?" अग्निशिखने दरडावीत विचारले.

सुबोधनें उपरण्याचे टोक हातात घेऊन त्यांची गांठ सोडून एक चांदीचे नाणें बाहेर काढले व त्याला म्हटले—"कृपा करा पण हे नाणे काही मागू नका! एका चांभाराने मला हे देऊन देवाच्या हुंडीत घालण्यास विनविले आहे. ते उत्तर ऐकताच अग्निशिख थोडा विचार मग्न झाला व मनांत म्हणाला एक किरकोळ चांभार देवाला एक चांदीचे नाणें अर्पण करीत आहे तो माझ्या समोर किती थोर होतो?"

ह्यानंतर त्याने शंभर नाणीं सुबोधच्या हाती देत म्हटले—"माझे नाव अग्निशिख आहे. तू माझ्या नावाने हे सारे पैसे विश्वेश्वराच्या हुंडीत घाल?" असे म्हणत तो आपल्या वाटेनें निघून गेला.

ह्यापुढे सुबोधने एक महिनाभर प्रवास केला. नंतर त्याला वाटेत एक घनदाट जंगल लागले तो पायवाटेने चालत पुढे जात असतांनाच एका रुधिरवर्ण नावाचा ब्रह्मराक्षसाने त्याला दोन्ही हातानें पकडले.





सुबोधची घाबरुन दांतखिळ बसली. तो थरथर कांपु लागला व कळवळत म्हणाला—"राक्षसोत्तमा माझी एक विनंती आहे. मी काशी विश्वेश्वराच्या दर्शनास निघालो आहे. हेच जर काम पुरे झाले असते तर मी नक्कीच तुझा आहार बनलो असतो. परंतु येतांना वाटेत एका चांभाराने मला एक चांदीचे नाणे देऊ केले आहे व एका चोराने माझ्याजवळून लुटून घेतलेले धन मला परत देऊन ते देवाच्या हुंडीत घालण्याविषयी सांगितले आहे. जर कां मी तुमचा आहार बनलो तर हे पुण्यकार्य माझ्या हातून घडणार नाही व मी पापाचा भागीदार होईन. तरी माझ्यावर मेहरबानी करून मला सोडून द्या. मी पुन्हां परत आलो की, खात्रीने तुमचा आहार होईन."

रुधिरवर्णला सुबोध खरे सांगतो आहे वाटले त्याने त्याच्या सांगण्यावर विश्वास करून त्याला सोडून दिले. त्यानंतर काही दिवस प्रवास करून सुबोध काशीनगरात पोहोचला. तेथे त्याने काशी विश्वेश्वराचे दर्शन केले व कालिदासने दिलेले एक चांदीचे नाणे व अग्निशिखकडून मिळालेल्या पैशांपैकी काही पैसे त्याने देवाच्या हुंडीत घातले.

परतीच्या प्रवासात सुबोध राक्षस रुधिरवर्णचा आहार बनण्याच्या इच्छेने जंगलातून जावू लागला. तेव्हां त्याला दूरवर एक भिल्ल दृष्टीस पडला. सुबोधला अत्यंत आश्चर्य वाटले की, एका ब्रह्मराक्षसाच्या जंगलात एक भिल्ल कसा निर्भय संचार करतो आहे?

परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे तोच भिल्ल भक्ति भावाने सुबोधला नमस्कार करीत पुढे येत म्हणाला—"महानुभाव मीच तो ब्रह्मराक्षस रुधिरवर्ण आहे. मी तुमचा आहार न करता तुम्हांला काशीविश्वेराच्या दर्शना करीता मुक्त केले होते त्याचेच पुण्य फळ मला मिळाले. त्यामुळे सर्व जन्मात श्रेष्ठ असा मानव जन्म मला मिळाला.

सुबोधने रुधिरवर्णला आशिर्वाद दिला. व तो तेथून पुढे चालू लागला. थोडा पुढे











गेल्यावर त्याला काही जंगली लोक दृष्टीस पडले व ढोलवयांचा आवाज ऐकू आला. ते पाहून त्याला वाटले ते काही उत्सव साजरा करीत असावेत.

त्या गर्दीत मध्यावर एक मचाणासारख्या उच्च आसनावर एक मनुष्य बसलेला होता ते मचाण फुलापानांनी सुशोभित करण्यात आलेले होते. त्याच्या डोक्यावर सुगंधीत फुलांचा मुकूट घातला होता.

सुबोधला येतांना पाहूनच तो खाली उतरुन त्याच्या समोर आला व त्याला प्रणाम करीत म्हणाला–" स्वामी, मी अग्निशिख आहे. ह्या जंगलातील लोकांनी आपल्या पद्धतीनुसार राजाची निवडणूक करण्यासाठी एक पोपट उडवला तो उडून माझ्या डोक्यावर येऊन बसला. त्यामुळे त्या लोकांनी त्यांच्या रिवाजाप्रमाणे मला राजा केले. हि सर्व तर आपली कृपाच आहे, श्री काशी विश्वेश्वराकडून मला प्राप्त झालेले हे पुण्यफळ आहे.

त्यानंतर सुबोध एक दिवस पाहुणाचार घेऊन तेथून निघाला थोडा प्रवास केल्यानंतर तो चांभार कालिदासच्या गांवी येऊन पोहोचला. त्या चांभाराच्या जागेत एक मौल्यवान वस्त्रे धारण केलेला माणुस त्याला दिसला.

सुबोधने त्याच्याजवळ जात विचारले– "साहेब, ह्या येथे कालिदास नावाचा एक चांभार रहात होता. त्याच्याविषयी तुम्हांला काही माहीती आहे कां ?"



दुसऱ्याक्षणाला त्या माणसांने त्याला साष्टांग दंडवत घालत म्हटले–" स्वामी, तो कालिदास तर मीच आहे. काही महिन्यापूर्वी ह्या राज्याचा राजा येथून जात होता. माझे जोडे शिवण्याची कुशलता पाहून त्यांनी माझ्याजवळून एक जोडा शिवून घेतला. त्या दिवसापासून माझे ग्रह पालटले. त्यावेळेपासून गावातील सर्व प्रतिष्ठीत माणसे माझ्याकडूनच जोडे शिवून घेत आहेत. हि तर सगळी आपली कृपा आहे आणि त्या काशी विश्वेश्वरा-कडून मिळालेले पुण्य-फळ आहे."

सुबोधला ह्या सर्व गोष्टी पाहून अत्यंत संतोष वाटला की, ह्या तिन्ही व्यक्तिंना तात्काल पुण्यफळ मिळून त्यांची परिस्थिती सुधारली. परंतु आपण तर स्वतः काशी विश्वेश्वराचे दर्शन घेतले. तरी अजुनपर्यंत थोडे सुद्धा पुण्यफळ आपल्याला कसे प्राप्त झाले नाही. आता शांतीवनात जाऊन गुरुंच्या सेवेत काही विद्याभ्यास करावा ?"

शांतीवनात परत येऊन सुबोधने गुरुजींना सारा वृत्तांत कथन केला व आपल्या मनांतील शंका प्रकट केली.

जीवानंदांनी मोठ्या तन्मयतेने त्यांचे म्हणणे ऐकले व विचारले–" सुबोध, तू प्रवासखर्चाकरीता आपल्या बरोबर थोडे पैसे घेऊन गेला होतास ते सर्व डाकूने लुटले. मग तू काशीविश्वेश्वराचे दर्शन घेई पर्यंत आपली तहान भुक कशावर भागविलीस ?"





"गुरुदेव, काशीनगरात पोहोचेपर्यंत मी अग्निशिखकडून मिळालेल्या पैशांतील एक पैसा सुद्धा खर्च केला नव्हता. जंगल-मार्गाने जातांना कंदफळे-मुळे खाल्ली गावा-तून जातांना कोणीतरी पाहुणचार देत होते. परंतु काशी नगरात शिरल्यानंतर मी अग्निशिखकडून मिळालेल्या पैशांचा खर्च केला." सुबोध म्हणाला.

"असा काय मोठा खर्च झाला?" गुरूंनी विचारले.

"त्या नगरातील काही तिर्थयात्रेकरूंशी ओळख झाली. ते लोक एका धर्मशाळेतून दुसऱ्या धर्मशाळेत जात होते. मी त्यांना कारण विचारले तेव्हां त्या लोकांनी सांगि-तले की, त्या धर्मशाळेत चांगले खाणे मिळत नाही दुसरीकडे थोडे पैसे जास्त दिले. तर चांगली सोय करतात. तेव्हां मी सुद्धा त्यांच्या बरोबर गेलो. त्यामुळे अग्निशिख-कडून मिळालेल्या शंभर रुपयांतील काही खर्च मी केला." सुबोध म्हणाला.

जीवानंद मंदस्मित करीत म्हणाले– 'सुबोध हिच तुझी चुक झाली. अग्निशिख डाकू आहे. चोरी करणें हा त्याचा धंदा आहे. जेव्हां त्याने तुझे पैसे लुबाडले तेव्हां ते सर्व त्याचे झाले. ते त्याने त्याच्या इच्छेने काशीविश्वेश्वराच्या हुंडीत घालण्यासाठी तुझ्यापाशी दिले. ते तू परक्याचे धन खर्च केलेस त्यामुळे पुण्यफळप्राप्ती झाली नाही. ही तुझी सर्वात मोठी चुक आहे!

"चुक! गुरुदेव ती कशी? मला समजेल असे सांगा?" सुबोधने नम्रतेने विचारले.

जीवानंद एकक्षण थांबले नंतर अत्यंत प्रेमभराने त्याचा खांद्यावर थोपटत म्हणाले– "झाडाखाली उन्हापावसाचा विचार मनांत न करता चप्पल शिवणारा चांभार अत्यंत दरिद्रि होता. त्यामुळे त्याला तावडतोब पुण्यप्राप्ती मिळाली. त्याचे दारिद्रच दूर व्हायला हवे होते. आता अग्निशिखची गोष्ट तो वाटसरूंना लुबाडून त्यांच्या पैशांवर आपले निकृष्ट जिवन कंठत होता. जो कोणी मागुनही पैसे देत नसत त्यांना ठार मारून तो लुबाडत होता. त्यामुळे त्याला जर तावडतोब पुण्यप्राप्ती दिली नाही तर बिचाऱ्या भोळ्याभांबड्या वाटसुरूंना आपले प्राण गमवावे लागतील व स्वर्गप्राप्ती सुद्धा मिळणार नाहीं. त्या-मुळे त्याला तावडतोब पुण्यप्राप्ती मिळाली. आता राहली रुधिरवर्ण ब्रह्मराक्षसाची गोष्ट त्याचे एकच मुख्य काम म्हणजे आपली भुक तावडतोब भागवणें त्यामुळे तो कोणताही मनुष्यप्राणी दिसला तर त्याला पकडून स्वतःची भुक भागवित होता. त्यामुळे अशा व्यक्तिला तावडतोब पुण्यप्राप्तीची आवश्यकता होती. जर तसे झाले नसते तर अनेक माणसे त्याची शिकार झाली असती. सुबोध आता तरी तुझ्या सर्व लक्षात आले नां?"

"हो, गुरुदेव माझ्या लक्षात सर्व आले तरी एक शंका मला डाचत आहे. मी इतके कष्ट झेलून वाटेत येणाऱ्या अनेक संकटाना तोंड देऊन शेवटी काशी विश्वेश्वराचे दर्शन घेतले. तरी थोडे फार पुण्यफळ मला कां नाहीं?" सुबोधने विचारले.

"कां नाही? अरे, सुबोध, एक दरिद्रि, चोर, व एक ब्रह्मराक्षस ह्याच्या सारखे तावडतोब पुण्यफळ मिळविण्याची तुला आवश्यकता नाही. तुला दरिद्रयाची व्यथा नाही. दुसऱ्यांना विनाकारण त्रास देण्याची तुझी वृति नाही. ह्याक्षणी तू एक विद्यार्थी आहेस. तू भविष्यात विश्वेश्वराचे दर्शन करून नक्कीच पुण्यफळ मिळवशिल." असे समजुतीने सांगून जीवानंदानी त्याला आशिर्वाद दिला.

ह्यानंतर काही दिवसांनीं गुरूंचीं वाणी खरी ठरली. सुबोधने गुरूंच्या कडून समस्त शास्त्रांचे पूर्णरूपांने अध्ययन केले व अपार यश प्राप्त केले आपली बरोबरी करणारा दुसरा कोणी नाहीं असा विश्वास त्याने संपादन केला, हा समाचार ऐकताच राजाने सुबोधचे स्वागत केले व त्याला आपल्या दरबारात राजगुरुचे पद देऊन त्याचा सन्मान केला.



# आधिक्य

रामपुर गावातल्या रहिवाश्यांनी आपल्या गावातील राम मंदिराची डागडुजी करण्याचा मनाशी संकल्प केला. गावच्या पाटलाने गोविंदराजने त्यांना एक उपाय सांगत म्हटले आपण गावच्या लोकांनी एक संगीताचा कार्यक्रम योजावा त्या समारंभाला उपस्थित रहणाऱ्या प्रत्येक व्यक्तिकडून वर्गणीच्या रुपाने थोडे थोडे पैसे जमा करावे व त्याने काम पूर्ण करावे."

त्यांच्या गावात शास्त्रीय संगीताचे ज्ञान असलेला एक सारंगपाणी नावाचा तरूण व सोमदत्त नावाचा एक वाणी पण होता त्याना समारंभात पादाचरण करण्याकरीता त्या गावकऱ्यानी त्या दोघांना आपणहून प्रत्येकी शंभर रुपये मानधन देण्याचे ठरविले त्यात सारंगपाणीने तावडतोब आपली तयारी दर्शविली.

परंतु सोमदत्त आढेवेढे घेत म्हणाले–"हे कसे काय ? विद्वत्तेत हा तरूण काय माझी तुलना करणार तसे असेल तर त्याला जे मानधन देण्यात येईल त्यापेक्षा मला एक रुपया अधिक मिळाला पाहीजे.

गोविंदराजने सोमदत्तची अट मान्य केली. एका आठवड्यानंतर संगीत समारंभाचा कार्यक्रम सुरू झाला. समारंभाच्या समाप्ती नंतर प्रेक्षकांना संबोधून गोविंदराज म्हणाले– "उपस्थित प्रेक्षकहो, सोमदत्तने जी अट घातली होती. की सारंगपाणींना जे मानधन दिले जाईल त्यापेक्षा त्यांना स्वतःला एक रुपया जास्त मानधन देण्यात यावे. परंतु देवाचे कार्य म्हणून सारंगपाणीने मानधन घेण्यास साफ नकार दर्शविला त्याकरीता मी सोमदत्तना एक रुपया मानधन देतो. त्यावर सोमदत्तानी लाजेने मान खाली घातली. व रुपया हातात घेत तेथून निघून गेले.






नर्मदानदीच्या कांठी धवलगिरी नावाचे राज्य पसरलेले होते. त्या राज्यावर तारकेश्वर नावाचा राजा राज्य करीत होता. त्या राजाला दोन मुलगे होते. त्याच्या जेष्ट मुलाचे नांव शूरसेन व दुसऱ्याचे चित्रसेन होते. मोठा पंचवीस वर्षाचा व धाकटा अठरा वर्षाचा होता.

एके दिवशी प्रातःकाळी दोघे राजकुमार आपल्या साथीदारांसह जंगलात शिकारीला निघाले. जंगलात बऱ्याच दूर चालून गेल्यानंतर त्यांना एक हरणांचा कळप दृष्टीस पडला. दोघे राजकुमार घोड्या-वर स्वार होऊन व हरीणांचा पाठलाग करू लागले. हरीणांचा पाठलाग करून त्यांचावर बाणांचा वर्षाव केला. व स्वतः बरोबर आलेल्या साथीदारांपासून बऱ्याच लांब येऊन पोहोचले.

अचानक त्यांना एका झाडापाठीमागून सिंह गर्जना ऐकू आली. राजकुमार तत्-क्षणी धनुष्यावर बाण चढवून आलेल्या आवाजाच्या रोखाने नेम करू लागले. तितक्यात झाडीतून दोन मोठ्या सिंहानी त्याच्यावर उडी मारून हल्ला केला. ते पाहून दोघे अत्यंत घाबरले व ते पाठीमागे वळून सैरावैरा धावू लागले.

धाकट्या राजकुमाराचा घोडा लगाम खेचून देखील थांबू शकला नाही. झाडीतून तो वेगाने पळत निघाला व थोड्या अवधीतच एका डोंगराळ भागात येऊन पोहोचला त्याच्या तोंडातून फेस उफाळून



येऊन तो धाडदिशी जमिनीवर कोसळून मरण पावला.

चित्रसेन अतिशय थकला होता. त्याने चोहोबाजूला नजर टाकून आपल्या भावाला पाहिले. परंतु त्याला तो कुठेही आढळला नाही. त्याला आता वाटू लागले की, आपण आपल्या सर्व सोबत्यांपासून बऱ्याच दूर निघून आलो आहोत. तो सर्व भाग उंच उंच झाडांमुळे अंधारमय वाटत होता. तेथील उंच वृक्षावर बरीच माकडे इकडून तिकडे उड्या मारीत पळत होती. बऱ्याच तऱ्हेचे पक्षी किलकिलाट करीत होते. मोठ मोठे सर्प अजगरे झाडांवर लोंबकळत होती. ते पाहून चित्रसेनला आश्चर्या-बरोबर भयंकर भीती वाटू लागली. आणि त्याला समजायला वेळ लागला नाही की, आपण कोठे आणि कसल्या परिसरात येऊन पोहोचलो आहोत जेथे मानव दिसू शकणार नाही. आता त्याला धवलगिरी-नगरात पायीच जाणें भाग होते. त्याला हे सुद्धा समजत नव्हते की ते नगर कोणत्या दिशेला आहे.

चित्रसेन स्वतःवर आलेल्या विचित्र संकटामुळे अत्यंत दुःखी कष्टी होऊन तेथून निघाला. जंगलात बरेच चालल्यानंतर त्याला एक हिरण्यागार झाडांनी आच्छादलेला एक डोंगर दिसला त्या डोंगराच्या एका कड्यावरून झरा वहात होता. पाणी पहाताच त्याला तहानेने घसा कोरडा पडला असल्याचे जाणवले. मग काय तो उड्या-मारीत गेला व त्या झऱ्यातील थंडागार पाणी पिऊन त्याने आपली तहान भागविली. नंतर थोडी विश्रांती घेतली मग झऱ्याच्या कांठावर बसूनच तो आपल्या भविष्य-काळच्या कामा विषयी विचार करू लागला. एखादेवेळेस आपला थोरला भाऊ, सिंहाच्या तावडीतून सुटून पळून गेला असेल अशी एक दाट शंका त्याला येऊ लागली. त्याच्या घोड्याने सुद्धा त्याला अशाच प्रकारे ह्या दाट जंगलात आणून सोडले असावे असे वाटले.

तो विचार येता क्षणीच तो ताडकन उठून उभा राहीला. व जोरजोरात किंचाळून ओरडू लागला—" दादा शुरसेन !"

चित्रसेनचे ओरडणे जंगलातील त्या डोंगरातील गुहेमधून निनादू लागले. तितक्यात त्या झऱ्याच्या पाठीमागील भागातून एक स्वर ध्वनी ऐकू येऊ लागला—" तू कोण आहेस ? ह्या प्रदेशात माणसाचा शब्दध्वनी कसा ऐकू येतोय ? मुला तू किती भाग्यवान आहेस ! माझ्याजवळ ये !"

गुहांमधून येणारे ते शब्द ऐकून त्याला अत्यंत विस्मय वाटला. तो आपले धैर्य एकवटून म्हणाला—"तू कोण आहेस रे ? राक्षस कां नरमांसभक्षी प्राणी ? गुहेतून बाहेर तरी पड ! मग तुला मी माझ्या तलवारीचा इंगा दाखवतो."

चित्रसेनचे वाक्य पुरे होत नाही तोच गुहेमधून विचित्र हास्य ध्वनी ऐकू आला. नंतर आवाज आला, "अरे बाळा ! तू किती शूर आहेस ! मी तुझ्या सारख्या शुर माणसाचीच वाट पहात आहे. मी नरमांस भक्षी राक्षस नाही की भिल्ल नाही. मी एक सिद्ध आहे. ज्ञानी आहे. आज पर्यंत मी जे कष्ट करून जी अमुल्य वस्तू प्राप्त केली आहे ती तुला देऊन जाणार आहे."

चित्रसेनानी त्याचक्षणी मनाशी एक विचार केला, की जर कां गुहेत खरोखरी




राक्षस असला तर येथून सुटून जाणे असंभव त्यामुळे जो कोणी आहे त्याच्या बरोबर लढा देऊन त्यात प्राण गेले तरी उत्तम ते एक क्षत्रिय धर्माचे उत्तम लक्षण होईल. आणि जर खरेच त्या गुहेत सिद्ध पुरुष असेल तर आपले काही नुकसान होणार नाही.

असा निश्चय करीत त्याने आपली तलवार म्यानेतून बाहेर खेचून काढली व त्या झऱ्यातील गुडघाभर पाण्यातून तो पार करून दुसऱ्या बाजूला गेला. तेथे डोंगरात अनेक गुहां होत्या. त्यामुळे त्याला समजले नाही की कोणत्या गुहेतून तो आवाज आला तो एकेका गुहेत डोकावून पाहू लागला. तेव्हां जवळच्याच एका गुहेतून



त्याला पुन्हां आवाज ऐकू आला–"बाळ घाबरू नको! इकडे ये. चित्रसेनाने तलवारीची मुठ हातात घट्ट पकडली व तो त्या गुहेच्या तोंडापाशी पोहोचला जेथून आवाज आला त्या गुहेत आता एक सिद्ध-पुरुष दृष्टीस पडला त्याची मोठी दाढी व डोक्याचे केस पिकलेले होते. तो गुहेच्या मध्यावर एका उंच वेदीवर बसलेला होता. गुहेच्या वरच्या भागांतून सूर्याची किरणे पसरून अंधुक प्रकाश पसरलेला होता.

त्या म्हाताऱ्या सिद्धला पाहून चित्रसेनला स्वत:च्या करतुतीचे दु:ख झाले. त्याने तलवार म्यानेत खोचली. त्या सिद्ध-पुरुषाच्या जवळ जाऊन त्याने नमस्कार केला व विनविले–"महात्मन कृपा करून मला क्षमा करा."

तो सिद्ध मंदस्मित करीत म्हणाला–"मुला तू एक कुशल क्षत्रिय वाटतो आहेस. मी माझे साठ वर्षांचे आयुष्य तपश्चर्याकरून झिजवले त्याचा त्याग केला व एक अपूर्व वस्तु प्राप्त केली. परंतु त्याचा उपभोग घेण्याची योग्यता माझ्यात नाही. ती साध्य करावी ह्या प्रयत्नात मी म्हातारा झालो. मी आज रात्री अष्टमीच्या चंद्राच्या अस्ताबरोबर मरण पावणार आहे. अनेक दिवसांपासून माझ्या मनात विचार आहे की ही अपूर्व वस्तू कोण्या योग्य व्यक्तिच्या होती सोपवून नेहमीं करीता डोळे मिटावे माझ्या शेवटच्या घटकेच्या वेळी बरोबर दैवी शक्तिने तुला माझ्याकडे खेचून आणले माझे नशीबच भाग्याचे–"घे! ही एक अपूर्व वस्तू आहे!" असे म्हणत त्या सिद्ध पुरुषाने एक टोपली चित्रसेनच्या हातात दिली.

चित्रसेन टोपली हातात पकडून मोठ्या एकाग्रतेने त्या टोपलीचे झांकण उघडू लागला. तेवढ्यात योग्याने आपल्या पंज्याने ते घट्ट दाबून ठेवले व त्याला समजावले–"अरे मुला गडबडीने ते टोपलीचे झांकण उघडू नकोस तू ज्या प्रदेशात तुझे हित होईल असे वाटेल तेथे उघड."





चित्रसेनने योग्याने सांगितलेल्या गोष्टीवर मान हलवून स्विकृति दर्शविली व म्हटले–"महात्मन्! आपल्या कृपेचा मी फार ऋणी आहे. माझ्याकडून जी काय सेवा शुश्रुषा तुम्हांला हवी असेल ती करावयास मी तयार आहे.

ते उत्तर ऐकताच तो योगी खदखदून हसू लागला. नंतर म्हणाला–"मुला, तुझी नम्रता व भक्तिप्रेम ह्यावर मी अत्यंत आनंदीत झालो आहे. मी आता लवकरच मरणार आहे. तेव्हां आता ह्या परिस्थितीत तू माझी काय सेवा करणार परंतु मी तुझ्या कडून एक काम करून घेऊ इच्छितो. तू गुहेच्या बाहेर जाऊन पूर्वेच्या दिशेला पक्का असलेला दगड खाली खेच. हे तुझे माझ्यावर अनंत उपकार होतील.

चित्रसेन सिद्धला नमस्कार करून गुहेच्या बाहेर पडला योग्याने सांगितल्यानुसार त्यांनी दोन्ही हातांनी दगड ढकलला दुसऱ्याक्षणी भयंकर ध्वनी झाला व सारा आसमंत दुमदुमला गुहेच्या पुढच्या भागावर त्याने ती ढकलेली शीळा अशा तऱ्हेने बसली की कोणासही गुहा आहे हे समजणार नाहीं.

थोडावेळ चित्रसेन तेथेच स्तब्ध उभा राहिला नंतर तेथून निघून दऱ्याखोऱ्या पार करून त्याने जंगलात प्रवेश केला. त्यालाच समजेनासे झाले की, आपण कुठे आलो. आपल्याला राजधानीला जावयाचे झाले तर आपण कोणत्या दिशेला जावे तो अशा रस्ताने चालू लागला की दोन्ही बाजूने गर्द झाडी होती थोडावेळ वाटचाल केल्यानंतर सूर्य अस्तास जाऊ लागला. तेव्हां त्याला भुकेची जाणीव होऊ लागली.

अतिशय दमून भागून तो तसाच थोडा जंगलाचा रस्ता पार करून गेला पुन्हां त्याला एका उंचवट्या सारख्या ठिकाणी आल्यासारखे वाटले तेथे झाडे अजिबात नव्हती. थोडी विश्रांती घेतल्यानंतर त्याला अचानक खांद्यात अडकवलेल्या टोपलीची आठवण झाली. त्याला मनापासून वाटू लागले की, त्या योग्याने

आपल्याला दिलेल्या टोपलीत अशी कोणती अपूर्व वस्तु आहे. त्याला ती टोपली उघडण्याची प्रबळ इच्छा उत्पन्न झाली आणि त्याला योग्याने सांगितलेली गोष्ट लक्षात राहीली नाही.

चित्रसेनने खांद्यात अडकविलेली टोपली खाली जमिनीवर ठेवली व घाईघाईने त्या टोपलीवरचे झांकण उघडले व एकाग्र स्थिर नजरेने ती वस्तु काय आहे ते न्याहाळू लागला. तत्क्षणी त्याच्या डोळ्यासमोर एक प्रकाश उजळून निघाला. व त्या प्रकाशाने क्षणभर त्याचे डोळे दिपले. डोळे उघडल्यावर पहातो तो काय त्याच्या समोर अनेक उंचवृक्षांच्या मधे एक भव्य असा महाल उभा असलेला दिसला.

ते अद्भुत असे दृश्य पाहिल्यावर चित्रसेन क्षणभर दगडासारखा निश्चल झाला. आणि दुसऱ्या क्षणी त्याला योग्याने सांगितलेली गोष्ट लक्षात आली. आणि आपल्या घाईने उघडण्याचे त्याला अतिशय दुःख झाले. तो मनांशीच पुटपुटू लागला—"अरेरे! असा कसा मी मुर्खपणा करून बसलो बरे, घाईने ह्या अशा घनदाट जंगलात महाल तयार झाला. तो माझ्या काय कामाचा?" हाच जर धवलगिरी मधे असता तर काय छान झाले असते. माझ्या मूर्खपणाने योग्याने दिलेल्या सिद्धीचे उपकार मी व्यर्थ घालवले.

त्याच अवस्थेत चित्रसेनला जंगलाच्या मध्यभागातून एक कर्णकठोर आवाज ऐकू आला. पहातापहाता जंगलातील वृक्ष वेली अशा तऱ्हेने हलू लागल्या की; जणू काय वादळच उठले की काय. ते पाहून त्याला अत्यंत आश्चर्य वाटू लागले. तोच आपल्या हाताने झाडे झुडपे बाजूला सारीत एक राक्षस त्याला त्याच्या बाजूने येत असतांना दिसला. तो झटक्यात उठून उभा राहिला व त्याने आपल्या म्यानेतून तलवार खेचून बाहेर काढली.

राक्षस गडगडाटीहास्य करीत चित्रसेनच्या जवळ जवळ आला व त्याला दरडावीत म्हणाला—"अरे दुष्टा! तुझी ही हिम्मत ह्या उग्राक्षाला पहाताक्षणी मानव भयभीत होऊन आपले प्राण घालवतो परंतु तुझ्या सारखा म्यानेतून तलवार खेचून काढून माझ्या सामोरा येणार माणूस मी आजपर्यंत पाहिला नव्हता." असे म्हणत त्याने बाजुला वळून पहात त्याला विचारले—"काय रे हे घरटे तूच बांधले आहेस काय?"

"हो, हो!" चित्रसेन थोडासुद्धा न डगमगता त्याला म्हणाला.

ते उत्तर ऐकताच पुन्हा राक्षसाने गडगडाटी हास्य केले व त्याला दरडावून विचारले—"काय रे, हे जंगल काय तुझ्या बापजाद्याने पाणी शिंपून तयार केले काय? माझ्या परवानगी शिवाय तू हे घर बांधलेस. माहीत आहे हे जंगल उग्राक्षाचे आहे. तेव्हां सावध रहा! मी तुला तुझ्या घरासकट एका मोळी सारखे बांधून ह्या डोंगरावरून त्यापलीकडच्या डोंगरावर















चेंडू सारखे फेकून देईन." असे म्हणत तो खाली वांकून चित्रसेनला पकडण्याचा प्रयत्न करू लागला.

चित्रसेनने त्याच्या तावडीतून स्वत:ला वाचवून म्हटले–"उग्राक्ष! उतावळा होऊ नकोस. मी जर येथे घर बांधून राहिलो तर त्याने तुझे काय रे बिघडणार आहे? जर कां तुला वाटत असले मी हे घर सोडून निघून जावे. तर मी इथून निघून जाईन"

ते काही चालणार नाही. माझ्या जंगलात माझा धिक्कार करून तू हे घर बांधलेस जर कां तुला तुझे प्राण प्रिय असतिल व ते वाचवावे असे वाटले तर मी घालतो ती अट मान्य कर." उग्राक्ष त्याला म्हणाला.

"कोणती अट?" चित्रसेनने विचारले.

"तू ह्या घरात राहून आपले आयुष्य सुखाने घालव. मला त्यापासून काही त्रास नाही. तुला जी मुल होतील त्यातील मोठ्या मुलाला अठरावे वर्ष लागले की माझ्या हाती सोपव." उग्राक्षाने आपली अट त्याला बोलून दाखविली.

राक्षसाची ती विचित्र अट ऐकून त्याला कसेनुसे वाटू लागले. तो विचार करू लागला– अजून पर्यंत आपले लग्न सुद्धा झाले नाही. तेव्हां अशा स्थितीत जर राक्षसाची अट जर मान्य केली तर आपले त्याने काय नुकसान होणार आहे? त्या कारणाने आपण आता त्याच्या तावडीतून निसटून तरी जाऊ शकतो व आपले प्राण वाचवू शकतो,

अशा प्रकारे चित्रसेनने विचारपूर्वक त्याला म्हटले–"उग्राक्ष! मी तुझी अट मान्य करतो. जेव्हां माझा मुलगा अठरा वर्षाचा होईल तेव्हां तुम्ही मला नविचारता त्याला घेऊन जाऊ शकता.

हे उत्तर ऐकताच राक्षसाचा आनंद गगनात मावेनासा झाला तो म्हणाला– "ऐक, तुला मी आत्ता मुक्त करतो. परंतु तू मला दिलेले वचन पाळावयास हवे." असे म्हणत राक्षस तेथून निघून गेला.



# दोष कुणाचा?

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने मौन पणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–" राजा, तू इतके श्रम करीत आहेस त्याला कारण काय असेल मला कळत नाही. पूर्वजांनी घातलेली उक्तिची तर आपल्याला चांगली माहीती आहे. की परक्यांची बुद्धी प्राण-घातक असते परंतु विवेकशील व्यक्ति तर केव्हां केव्हां हि गोष्ट विसरून जाते व स्वत:च्या बुद्धीचा तिरस्कार करून मजेचे कारण बनते ह्याचे उदाहरण म्हणून मी तुला एका व्यक्तिची गोष्ट सांगतो लक्ष देऊन ऐक असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

सुवर्णदेशावर शशांक नावाच्या राजाचे राज्य होते. त्याची पत्नी सुनंदा अत्यंत



रुपवती होती. राजाचे तिच्यावर प्राणापेक्षां जास्त प्रेम होते. ती जी काही इच्छा करत असे त्याची पूर्ती करण्याकरीता तो स्वतःच्या जीवाची सुद्धा पर्वा करीत नसे.

सुनंदाला कपडयालत्याचा व दागदागिन्याचा अत्यंत शौक होता. म्हणून राजाने अनेक दूरदूरच्या गावातून कुशल विणकर व सोनार आपल्या दरबारात आणून ठेवले होते. त्यात चंदन नावाचा एक विणकर व शोणक नावाचा एक सोनार होता. ते दोघे स्वतःच्या कलाकुसरीत अत्यंत निष्णात होते. त्यांचे नाव फक्त सुवर्ण देशातच नाही तर आजुबाजुच्या राज्यातून सुद्धा लोकमात्र झाले होते.

शशांक राजा राणीचा वाढदिवस दरवर्षी मोठ्या थाटाने साजरा करीत असे. त्याकरीता राणीसाठी आवश्यक ते कपडे व दागिने चंदन व शोणक कलात्मकतेने बनवून देत असत. ते दोघे एकदा एक नमुना तयार केला की, परत तसाच चुकूनही करीत नसत. त्यामुळे राजदरबारातील लोक नेहमी त्यांची स्तुती करीत की, असे कुशल कारागीर लाखांत सापडणें कठीण.

शशांक राजाचा सारंग नावाचा एक जिवश्च कंठश्च मित्र होता. राजा कोणताही सल्ला घ्यावयाचा झाला तरी प्रथम त्याचा विचार घेत असे. मग तो राज्यकारभारतील असो किंवा व्यक्तिगत त्याला विचारल्या शिवाय निकाल देत नसे. परंतु सारंगने कधीही स्वतःचे तोंड उघडून ह्या गोष्टीविषयी खरे जाणण्याचा प्रयत्न केला नाही. तो फक्त डोके हलवून गप्प बसत असे. राजाचा मंत्री मकरंद ह्याला हि गोष्ट अतिशय विचित्र वाटली व त्याबद्दल कुतुहल निर्माण झाले.

एकदा मकरंदने राजाला विचारले– "महाराज, मी बरोबर असतांना आपण साऱ्या महत्वपूर्ण गोष्टी सारंगला का ऐकवता तरी त्याने कधीही आपल्याला त्याचा विचार सांगितला नाही, तरी तुम्ही त्याचा सल्ला कां घेता ह्या पाठीमागचे काय गूढ आहे माझ्या ध्यानात येत नाही!"

"मी सारंगचे मन चांगल्या तऱ्हेने ओळखतो. जेव्हां कोणतीही गोष्ट तो सहन करू शकत नाही तेव्हांच तो त्याचे तोंड उघडतो, त्यामुळे त्याचा सल्ला फक्त शब्दांनेच ऐकण्याची जरूरी नाही" राजाने त्याला उत्तर देत म्हटले.

काही दिवसानंतर राणीचा वाढदिवस जवळ आला चंदन व शोणकने राणी करीता अत्यंत सुंदर असे दागिने वस्त्र तयार करवून पाठविले परंतु राणीने त्या वस्तू आवडल्या नसल्याचे सांगून परत पाठवून दिल्या.

हे ऐकताच राजाला अत्यंत आश्चर्य वाटले त्याने चंदन व शोणकला बोलावून घेतले व आज्ञा केली की, जोपर्यंत राणीला दागीने वस्त्रे मनपसंत पडतील तोपर्यंत नविन नविन नमुने तयार करून पाठवित रहावी.

प्रयत्नांची पराकष्टा करून सुद्धा त्या दोघांनी बनवलेले दागिने व कपडे राणीच्या पसंतीस उतरले नाहीत.

त्यावर राजाने आज्ञा केली की बहुदा तुम्हां लोकांच्या वाढत्या वयापरत्वे तुमच्या कलेतील सौंदर्य कमी झाले आहे. हि बातमी राजमहालात रहाणाऱ्या लोकां बरोबर मंत्री सारंगच्या सुद्धा कानावर जाऊन पोहोचली. ते सर्वजण राजा शशांककडे आले व म्हणाले–"महाराज, आपण चंदन व शोणकच्या बाबतीत जी आज्ञा





केली त्यावर आम्ही असे ऐकले आहे. ते म्हणजे त्याच्या वार्धक्यामुळे त्यांची निपुणता कमी होत चालली आहे हे काही आम्हाला योग्य वाटत नाही. आजपर्यंत आम्ही त्यांचे कौशल्य पहात आलो. आता अशी शंका घेणे म्हणजे बरोबर नाही. महाराणीने आपल्या कारागिऱ्यां कडून तयार केलेले कपडे व अलंकार आवडले नाहीत म्हणून पाठवून दिले हे काही योग्य कारण वाटत नाही. माझ्या मते ह्या गोष्टींवर आपण काळजीं-पूर्वक विचार करावयास हवा. आपण त्या कारागीरांना देशाबाहेर हाकलवून देणे म्हणजे देशातील कलेला हांकलल्यासारखे आहे. हे मला तरी उचित वाटत नाही.

राजाने मंत्र्याच्या सांगण्यावर लक्षपूर्वक विचार केला व त्याने अंतपुरात जाऊन राणीला समजावले.

राणी सुनंदाने गप्प राहून थोडा मनाशी विचार केला व आपल्या पतीला म्हणाली– आपल्या प्राणप्रिय मित्राने माझे डोळे उघडले आपण चंदन व शोणकला दर-बारातून हाकलून न लावता त्याचा भर दरबारात सन्मान करा हिच माझी इच्छा आहे."

राणीची इच्छा पाहून राजा शशांकला अत्यंत आनंद झाला राणीचे म्हणणे त्याला डावलता आले नाही. त्यांनी मंत्र्याना सांगून चंदन व शोणकचा उचित रूपाने सत्कार करण्यासाठीं आवश्यक तो प्रबंध दरबारात करावयास सांगितला.

राजाचा निर्णय ऐकून मंत्र्याला अंचबा वाटला शिक्षा देण्याऐवजी त्याचा सत्कार करण्याचा निर्णय ऐकून मंत्री तथा दरबारी लोकांमधे एक गंमतीचा विषय बनला.

कसा कां होईना एका आठवड्यात चंदन व शोणकचा राजदरबारात भव्य सत्कार करण्यात आला व त्यांना अमुल्य अशा भेटी देण्यात आल्या. दोघांचा यथो-चित सन्मान केला गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, आपल्या पतीकडून सारंगने सांगि-तलेल्या गोष्टी ऐकून त्याने आपला विचार कां बदलला? तो त्याचा एक जिवश्चकंठश्च मित्र होता. म्हेणून तर नाही नां? त्यामुळे त्याला नाराज करणें बरोबर नाही. असे तिला वाटले कां? ह्या शंकाचे समाधान कारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

त्याचे उत्तर देत विक्रमादित्य म्हणाला– "तू जे काय म्हणतोस ते काही राणीचे मन बदल्याचे कारण नाही. सारंगने सांगितले की चंदन व शोणक आपापल्या कलाकुसरीमधे कुशल होते. त्यामुळे दोष आहे तो त्याच्या कलाकुसरीत नाही तर त्याचा कमीपणा दुसऱ्या कुठल्या प्रकारात होता. त्याने सांकेतीक रूपे जी गोष्ट सांगितली. ती राणीच्या चांगल्या प्रकारे लक्षात आली. वयोपरत्वे प्रत्येक माणसाचा अनुभव वाढत जातो. ह्याचबरोबर कला-कारांच्या निपुणते मधे त्याचे कौशल्य उजळून निघते परंतु मनुष्याच्या शरिरात वय वाढल्यामुळे त्याचा क्रमाने अंत होतो. हा शरिराचा धर्म आहे. त्याचे वर्चस्व सुद्धा घटत जाते. अशा प्रकारे चंदन व शोणक मार्फत तयार केलेले कपडे व दागिने राणीला अनुकूल वाटले नाही परंतु ते सांगण्याचे धैर्य राणीने स्वत: विचार करून सांगितले नाही. की आपले शरिर व वय हे ते दागिने व कपडे घालण्यायोग्य नाहीत. सारंगने सांगितल्यावर राणीला सत्य परिस्तीतीचा बोध झाला. तिला समजून आले की, कलाकारांच्या कला-कुसरीमधे काही कमतरता नाही. परंतु वय वाढल्यामुळे आपल्या शरिराची ठेवण शोभा गेल्यामुळे आहे. त्यामुळे तिने आपल्या पतीला निवेदन केले की त्या कारागिराचा भव्य सत्कार करण्यात यावा!"

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृष्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# अधिकाऱ्याची निवडणुक

लक्षण देशावर राजा केतु राज्य करीत होता. जरूर पडली तरच राजाला मंत्र्या बरोबर राजगुरु लक्ष्मीनाथ पंडीत योग्य तो सल्ला देत असत.

एकदा राजाने दरबारात एक नविन जागेची योजना करून त्या जागेकरीता कोणा एका योग्य व्यक्तिची निवड करण्याचा निश्चय केला. ते पद सांभाळणारी व्यक्ति राजाचा मुख्य सल्लागार होईल असे सांगण्यात आले. राजाचा विचार होता. की, तो अधिकारी राज्यातील प्रमुख विभागातील कामाची पहाणी करण्यास नियुक्त करण्यात यावा.

अशा विशिष्ट जागेच्या पदावर नियुक्त करण्यात येणाऱ्या व्यक्तिची निवड करणे म्हणजे कठीण ते अत्यंत समर्थ योग्य अशा माणसाकडूनच होणें योग्य होते. त्या योग्य व्यक्तिमधिल उपयुक्तता शोधण्यासाठी वेगवेगळ्या विषयांवर विचारण्यात येणारे प्रश्नाजाने वेगवेगळ्या निपुण लोकांवर सोपविले. त्यात लक्ष्मीनाथ पंडीत सुद्धा एक होते.

राजाने सर्वांत प्रथम असा विचार व्यक्त केला की, उमेदवारांना फक्त शास्त्र संबधीत प्रश्न विचारले जावेत. त्यावर लक्ष्मीनाथ पंडीतानी राजाला म्हटले— "सुकेतु राज्यकारभाराच्या कामात मुख्य पद निभाऊन नेणारी व्यक्ति आपल्या पूर्वसुचना देऊन व आचार विचार ह्याची योग्यता ठेवणारी असावी. त्याच बरोबर त्या व्यक्तिला ह्या गोष्टीचे ज्ञान सुद्धा हवे की, घरात व बाहेर लोकांबरोबर कोणता कसा व्यवहार करावयास हवा. ह्या करीता मी निवडून येणाऱ्या लोकांकरीता अगदी शेवटी चार प्रश्न विचारीन जो त्या प्रश्नांची सडेतोड उत्तरे देऊ शकेल तोच ह्या पदाला उपयुक्त म्हणून निवडला जाईल !"

राजगुरुने दिलेल्या सल्ल्यावर राजासकट इतर सर्वांनी मान्यता दर्शविली.

ह्यागोष्टी नंतर बरोबर एका आठवड्याने महाराजाने आपल्या मुख्य सल्लागाराच्या पदासाठी योग्य व्यक्तिची निवड करण्यास सुरवात केली. विभिन्नक्षेत्रामधिल अत्यंत हुषार निपुण व्यक्तिनी अनेक उमेदवारांना विविध तऱ्हेचे प्रश्न विचारले अगदी शेवटी सर्वांना लक्ष्मीपंडीत यांनी असे प्रश्न केले ते पाहून सर्वजण आवाक् होवून पाहू लागले.

एक हरण न केल्या जाणाऱ्या धनाचे हरण करणारी वस्तू काय ? अशी कोणती गोष्ट आहे की ती बायकोलाही सांगता येत नाही ? एका मुख्य राज्यअधिकाऱ्या साठी आवश्यक योग्यता व व्यवहार पद्धती कोणती ?

ह्यापूर्वी जे इतर सर्व प्रश्नाची उत्तरे देण्यात उतिर्ण झाले होते. त्यांना सुद्धा लक्ष्मीनाथ पंडीत ह्यांच्या प्रश्नांला उत्तरे देता आली नाहीत. मुख्यतर हरण न करणाऱ्या धनाचे पुन्हां हरण कसे ? हा प्रश्नतर कोणाच्याही डोक्यात शिरला नाही.

लक्ष्मीनाथ पंडीताच्या प्रश्नांचे समाधान न देऊ शकणारी माणसे लाजेने तेथून निघून गेली. ते पाहून राजाला अत्यंत दु:ख होऊ लागले म्हणजे ह्या पदासाठी योग्य व्यक्ति नाहीच कां ? त्याच



     



वेळी काशीनगरात शास्त्र शिकलेला विश्वनाथ नावाचा एक युवक समोर आला त्याचे वय पाहून सर्वांनी मनाशी विचार केला की, हा तरुण पंडीतांच्या प्रश्नाची उत्तरे देऊ शकेल? परंतु त्यांनी त्यांच्या प्रश्नांची तंतोतंत बरोबर उत्तरे देऊन सर्वांना आश्चर्यात पाडले, व तो सर्व परिक्षेत उतिर्ण झाला.

लक्ष्मीनाथ पंडितने त्याला चार प्रश्न विचारले त्याची विश्वनाथने अशी उत्तरे दिली–"हरण न केले जाणारे धन म्हणजे ज्ञानधन ह्याचे हरण करणारी वस्तु म्हणजे अहंकार आहे!"

हे उत्तर ऐकून लक्ष्मीनाथ पंडीत प्रसन्न झाले व त्याला म्हणाले–"अरे वा! बरोबर उत्तर दिलेस. परंतु हे सांग बायकोला सुद्धा न सांगता येणारी अशी गोष्ट कोणती?

विश्वनाथ म्हणाला–"रहस्य!"

"शाबास!" आता माझा तिसरा प्रश्न अनर्थ निर्माण करणारी गोष्ट कोणती?" लक्ष्मीनाथ पंडीतानी विचारले.

"आवश्यकतेपेक्षां कोणतीही अनावश्यक वस्तू अनर्थ निर्माण करते."

हे सुद्धा बरोबर उत्तर आहे. आता शेवटचा प्रश्न. एका मुख्य राज अधिकाऱ्याला कोणती योग्य व व्यवहार बुद्धी पाहिजे." त्यांनी विचारले.

त्यावर तो तरुण म्हणाला–"ह्यापूर्वी आपण ज तिन प्रश्न विचारलेत व त्याची जी उत्तरे मी दिली तिच उत्तरे ह्या चौथ्या प्रश्नाला लागू आहेत. जो माणूस ह्या मुख्य पदावर निवडून येईल तो अहंकारा पासून दूर असावा अगदी जवळच्या माणसाला सुद्धा राज्यातील रहस्य न सांगणारा व प्रत्येक विषयातील चांगले व वाईट जाणून स्वतःच जाणून व्यवहार करणे हे अत्यंत आवश्यक आहे!"

ती उत्तरे ऐकून लक्ष्मीनाथ पंडीतां बरोबर इतर सर्वांनी विश्वनाथचे तोंडभरून कौतुक केले राजा सुकेतुनें राज्याला अनुसरुन योग्य तो सन्मान करुन त्याला आपला सल्लागार म्हणून नियुक्त केले.





आपली देवळे :

## चिदंबरम

कोण्या एका काळात दारुकारण्यात ऋषीचा एक आश्रम होता. त्या आश्रमात रहाणारे मुनी ज्ञान व महिमां जाणण्याची अद्‌भुत शक्ति प्राप्त झालेले होते. त्यामुळे त्या शक्तिचा त्यांना फार गर्व होता. त्यांचे असे मत होते की, आपण त्या करवी सर्वांकडून आपली पूजा प्राप्त करून घेण्याची अहंता ठेवली.

एके दिवशी मुनी जेव्हां आश्रमातून बाहेर गेले होते. तेव्हां एक तरुण भिक्षुक मधुर आवाजात गाणे म्हणत व कथा सांगत त्या आश्रमाच्या बाजूला आला. त्या तरुण संन्याशाला पहाताच आश्रमातील मुनीपत्नी त्याच्यावर आकृष्ट झाल्या व सर्वांनी त्याला चोहोबाजूने घेरले.





परतलेल्या मुनींनी ते सर्व दृष्य पाहिले व त्यांना भयंकर संताप आला. ऋषींनी आपापल्या पत्नींना घरात जाण्याविषयी धमकावणीच्या सुरात सांगितले परंतु त्याच्या बोलण्याचा परिणाम कोणावरही झाला नाही. ऋषीपत्नींनी व त्या तरुणांनी त्या मुनीकडे डोळे वर करून सुद्धा पाहिले



त्यावर ऋषींनी आपल्या अद्‌भुत् शक्तिचा प्रयोग करण्याकरीता संकल्प केला व एका वाघाची सृष्टी केली व त्याला त्या तरुणावर सोडले. तो वाघ भयंकर डरकाळ्या फोडत त्या भिक्षुका वर तुटून पडण्याकरीता त्याच्या-जवळ येऊन पोहोचला.

तेवढ्यात त्या तरुण भिक्षुकाने मंदहास्य करीत त्या वाघाला स्पर्श केला. दुसऱ्या क्षणी तो वाघ अदृश्य झाला. त्या वाघाचे कातडे फक्त त्या तरुणाचे कटी वस्त्र म्हणून राहून गेले ते पाहून सर्वांनाच अत्यंत आश्चर्य वाटले.





परंतु तेवढ्यावरच त्या ऋषींनी आपल्या प्रयत्नाचा त्याग केला नाही. त्यांनी आपल्या शक्तिनी एका गिड्डया राक्षसाची सृष्टी केली व त्या राक्षसाला त्या तरुण भिक्षुकावर सोडून दिले. तो गिड्डा राक्षस भयंकर अक्राळ विक्राळ रूपात गर्जना करीत त्या तरुणाजवळ आला. आणि दुसऱ्या क्षणी त्या तरुणाच्या पायाखाली सांपडला.

ते दृश्य पहाताच सर्व ऋषिंच्या मनांत ज्ञानोदय झाला. व त्यांना कल्पना येऊ लागली की, तो तरुण साधारण व्यक्ति नसून कोणी देव असावा व वेष पालटून आपली परिक्षा घेण्या-करीता येथे आला असावा. त्यानंतर सर्व ऋषी त्या तरुणा समोर आले व त्याला हात जोडून नमस्कार करीत विनयाने म्हणाले–"महात्मन्, आपण कोण आहात ?"





त्यावर त्या तरुणाने आपले स्वस्वरूप दर्शन त्या सर्व ऋषींना करविले. ते साक्षात परमेश्वर शंकर होते. आपले भक्त बनलेल्या त्या ऋषींचा अहंकार काढून टाकण्याच्या उद्देशांनी त्यांनी हे सर्व कारस्थान रचले होते. देव्हां ऋषी-पत्नींनी सुद्धा त्यांच्या महिमांना महत्व दिले नाही. तेव्हांच त्यांचा गर्व हळूहळू नष्ट झाला व सर्व ऋषींनी शंकराला साष्टांग नमस्कार केला.

ह्यानंतर सर्व ऋषीमुनी शंकराच्या समोर बसून त्याचे गुण गान गाऊ लागले. त्या त्यांच्या गीताने तन्मय होऊन शंकर नाचू लागला. शंकराचे नृत्य पाहून सर्वजण परमानंदित झाले. परंतु थोड्यावेळात शंकर अंतर्धान पावला.











शंकराच्या त्या अद्भुत नृत्याच्या अनेक गोष्टी आदिशेषने ऐकल्या व त्याच्या मनांत शंकराचे दर्शन करुन त्याचे नृत्य पहाण्याची उत्कंठा लागली. त्यांनी शंकराकडे प्रार्थना केली की, आपली मनोकामना पूर्ण व्हावी. परंतु विश्व विधान असे होते की, कोणी कां असेना त्याला शंकराचे नृत्य पहावयाचे झाले तर त्याला मानव जन्म धारण करावा लागेल.

आदिशेषाने पंतजालिचे रुप घेऊन जन्म घेतला व त्याने शंकराचे दर्शन घेऊन त्याचे नृत्य पाहिले. नटराजांच्या मुर्तीच्या पायांशी एक गर्विष्ट अहंकारी राक्षस आहे. त्या मुर्तीच्या एका हातात डमरू म्हणजे ते एक जीवन संगीताचे द्योतक आहे. दुसऱ्या हातात अग्नी हि परमशक्ति आहे. तिसरा हात भक्तांच्या करीता अभय हस्त केलेला व चौथा हात शरण आलेल्यांचे रक्षण करणारा.





शंकराने जेथे नृत्य केले ते ठिकाण अत्यंत प्राचिन काळापासून चिदंबरम् नावाने शंकराचे प्रसिद्ध स्थान आहे. बत्तीस एकर जमीनच्या क्षेत्र-फळभागामध्ये निर्माण झालेले हे ठिकाण प्रचंड असे हें मंदिर दोन हजार वर्षे जुने आहे. ह्या देवळांतील अद्भुत शिल्प दर्शकांच्या मनाचे समाधान करते व आनंद देते.



# हा पहा मीआलो!

एक हजार वर्षांपूर्वी चीन देशातील हांगीचं नावाच्या एका शहरात एक प्रसिद्ध चोर रहात होता. परंतु हे कोणालाही माहीत नव्हते की, खरे त्याचे नांव काय आहे. व तो कसा आहे. त्याने अनेक घरात घुसून चोऱ्या केल्या व दरोडे घातले परंतु कोणी त्याला अद्याप पाहू शकले नव्हते. जेव्हां तो चोरी करण्यास जाई. तेव्हां तो त्यांच्या घरावर लिहीत असे–"पहा मी आलो!"

त्या कारणाने सर्वजण त्या चोराला "पहा मी आलो!" असे संबोधु लागले

कालक्रमाने 'पहा मी आलो!' च्या चोऱ्या करण्याची हद्द फारच वाढली लोकांनी सरकारकडे तक्रार केली की, त्यांनी आपल्या पाठीमागची चोराची कटकट थांबवावी त्यावर शहरातील न्यायाधीशाने कोतवालाला आज्ञा करीत सांगितले की, "पहा मी आलो!" का लवकरात लवकर पकडून आणावे त्या करीता एक मुदत दिली.

शहराचे संरक्षण करणारे सर्व शिपायी मोठ्या संकटात सांपडले कारण चोर अत्यंत हुषार होता. त्यातून तो कोण आहे? कसा दिसतो व कुठे रहातो. ह्याचातर कोणालाही गंध नव्हता. अशा व्यक्तिला पकडणें म्हणजे काही तोंडच्या गप्पा नव्हत्या सरते शेवटी शिपायाने एका माणसाला पकडून न्यायाधिशाकडे आणले व म्हटले की–'सरकार! 'पहा मी आलो' चोर! ह्याला शिक्षा देऊन आमच्या मागची कटकट मिटवा"

न्यायाधिशाने विचारले–"हे सांग, हा चोर आहे, ह्याला तुझ्याकडे काय पुरावा आहे?"

"सरकार! आम्ही मोठ्या सावधगिरीने ह्याचा मागोवा काढून ह्याला पकडून आणले आहे.



"नाही मालक, हे लोक आपले कर्तव्य पार पाडण्याच्या उद्देशाने कोणलाही पकडून आणू पहातात. दुर्दैवाने मींच त्यांच्या हाती सांपडलो" त्या माणसाने कळवळून म्हटले. न्यायाधिशाला संकोच करत असलेला पाहून शिपायांच्या सरदार कोतवालाने जरा जोर करीतच म्हटले–"सरकार, तुम्ही ह्यांच्या म्हणण्याला कळवळा येऊन ह्याला अजिबात सोडून देऊ नका हाच खरा चोर आहे. ह्याला पकडण्याकरीता आमचा अर्धा क्षीण गेला. जर कां त्याला सोडून द्याल तर तो चुकूनही पुन्हां हाती लागणार नाही"

कोतवालाच्या म्हणण्याला न्यायाधिशाने संमती दर्शविली व म्हटले ठिक आहे, सध्या ह्याला आपल्या तुरुंगात कैदी म्हणून बंद करून ठेवा तो म्हणतो त्या तक्रारीचे खरेपण उघड होईल.

पकडण्यात आलेली व्यक्ति खरी चोर होती. त्याने तुरुंगात पाऊल ठेवता क्षणीच शिपायांना मोठ्या अदबीने निवेदन केले व म्हटले–"हुजूर, जेव्हां शिपायांनी मला बंदिस्त केले तेव्हां जी संपत्ती माझ्यापाशी होती ती त्यांनी हिसकावून घेतली जर कां तुम्हाला संकट वाटणार नसेल तर मी डोंगरातील देवीच्या देवळापाशी एका फुटक्या विटे खाली लपवून ठेवली आहे ती तुम्ही घ्या"

तुरुंगातील अधिकाऱ्याने प्रथम त्याच्या म्हणण्यावर विश्वास केला नाही. परंतु त्याने जेव्हां त्या डोंगरावरच्या देवळाजवळ त्या फुटक्या विटा काढल्या तेव्हां त्याचा स्वतःच्या डोळ्यावर विश्वास बसेनां तेथे एक शेर चांदी सांपडली.

त्या दिवसापासून तो अधिकारी त्या चोरा बरोबर मैत्रीपूर्ण व्यवहार करू लागला.

असेच काही दिवस लोटले–"एक दिवस संधी पाहून तो चोर त्या अधिकाऱ्याला म्हणाला–"साहेब, मी त्या पुला खाली थोडेफार धन पुरून ठेवले आहे तुम्ही ते सुद्धा कां जाऊन घेत नाहीत"

अधिकाऱ्याने विचारले–तेथे सतत माणसांची वर्दळ असते मग मी कसा काय घेऊ?





परंतु अधिकाऱ्याने त्याचा पूर्णपणे फायदा घेतला तेथून पाच शेर चांदी उकरून काढली. ह्यानंतर दोघांच्यात गाढ मैत्री निर्माण झाली. एक दिवस रात्री अधिकारी कैद्या बरोबर पिण्याकरीता दारूची बाटली घेऊन आला.

"हे बघ बाबा! आज रात्री मी माझ्या घरी जाऊन येतो. सकाळ पर्यंत पुन्हां परत येईन तुझी शपथ घेतो. हे समजून घाबरू नकोस की मी पळून जाईन मी पळून गेलो तर ह्याचा सरळ अर्थ मी माझा गुन्हां कबुल केला. त्यातून पळून जाणे म्हणजे अनर्थ आहे. कारण की आज नाही तर उद्या न्यायाधिशाला मला मुक्त करणे भाग आहे. मी तर अपराधी नाही नां कैद्याने विश्वासुपणे त्याला सांगितले.

कैद्याला तुरुंगातून सोडून देणे म्हणजे धोक्याचे आहे समजून सुद्धा त्याच्यावरच्या मैत्रीमुळे अधिकाऱ्याचा नाईलाज झाला त्याने शिपायांना आज्ञा केली परंतु त्या कैद्याने तुरुंगाच्या बाहेर जाण्याकरीता दरवाजाचा उपयोग केला नाही. तर तो वरून उडी मारून बाहेर निसटला.

आणि पुनः परत त्या छताच्या फटीतून परत आला व खाली झोपलेल्या अधिकाऱ्याला उठवून म्हणाला–"हा पहा मी आलो! हा पहा मी आलो!"

"अरे वा! तू तर आपले वचन तंतोतंत पाळलेस चांगला सज्जन गृहस्थ आहेस!" अधिकारी प्रसन्नतेने म्हणाला.

"असे कसे मी जर तसे केले नसते तर आपली अब्रु धुळीला मिळाली असती नां! बाबा, तू जे उपकार माझ्यावर केलेस. ते मी आयुष्यात विसरणार नाही. आपल्या कृतज्ञतेवर प्रसन्न होऊन मी आज आपल्या घरात एक भेट वस्तु ठेऊन आलो आहे. ती पाहून या! त्यावर तुरुंगाचा अधिकारी घरी निघून गेला.

"अहो, मी आपल्याला आत्ताच निरोप पाठवणार होते. तर तुम्हीच स्वतः आलात माहीत आहे, आज कशी विचित्र

    

गोष्ट झाली. आपल्या घराच्या पत्र्यावर कसला तरी आवाज झाला. आणि एक गांठोडे आपल्या खोलीत वरून पडले उघडून पहाते तो काय त्यात सोन्या चांदीच्या थाळया होत्या" तुरूंगाधिकारीच्या बायकोने आश्चर्याने सांगितले.

अधिकाऱ्याला तात्डतोब लक्षात आले की त्या कैद्याने दिलेली भेट हिच आहे. त्याने पत्नीला सांगितले–" अग, तुला पुण्य लागेल तू जोरात आवाज करून बोलू नकोस ह्या वस्तू मोठ्या काळजीपूर्वक लपवून ठेव ह्यानंतर संधी मिळताच ह्या वस्तू विकून आपल्याला पैसे करता येतील.

त्या दिवशी न्यायालयात जे गुन्हेगार आले त्यातील सहा सातजणांनी न्यायाधिशाला निवेदन केले–" सरकार, काल रात्री आमच्या घरात 'पहा मी आलो' चोर घुसला त्याने आमचे सर्व घरातील सामान लुटले व भिंतीवर आपले नाव लिहून तो पळून गेला. त्याला कृपा करून पकडा. मी त्याचवेळी मनांत विचार करीत होतो. की शिपायांनी खोट्या चोराला पकडले नाही कोण्या अशातशा माणसांसच पकडून आणले खरा चोर तर शहरात लुटालुट करीत फिरत आहे! न्यायाधिशाने मनोमन जाणले. ह्यानंतर न्यायाधिशाने असा आदेश तुरूंगाधिकाऱ्याकडे पाठविला की, तुरूंगातील कैद्याची मुक्तता करण्यात यावी कारण एका निरपराध्यावर फुकटांफाकट अन्याय होत आहे! नंतर त्याने कोतवालाकडे असा निरोप सांगुन आज्ञा केली. 'पहा मी आलो' नावाच्या चोराला अमुक एका वेळीच कैद करावे.

अशा प्रकारे खरा चोर तुरूंगात येऊन सुद्धा सुटून गेला. अशा तऱ्हेने तो पळून गेलेला माणुसच खरा चोर आहे. परंतु ही गोष्ट फक्त तुरूंगाधिकाऱ्या शिवाय कोणालाही माहित नव्हती कारण त्याने जो चोरलेला माल होता तो अधिकाऱ्या जवळ होता त्यामुळे अधिकाऱ्यांला त्याच्या विषयी तोंडातून व काढण्याची हिमंत झाली नाही.





# शिवलीला

तुझ्या मेहुण्यासारखा प्रतापी वीर त्रिलोकात नाही. आईकडून आपल्या ताईचे व मेहुण्याचे नाव गाव कळल्यावर शिवरामला परमानंद झाला तो म्हणाला– " आई, तरमग मी या दिवाळीला आपल्या ताईला आणि मेहुण्यांना बोलावून घेऊन येणार आहे. सर्वांच्या घरी भाऊबिजेच्या दिवशी बहीण व मेहुणे येणार आहेत नां? आपण आजपर्यंत आपल्या ताईला किंवा मेहुण्यांना बोलाविले नाही!"

"बाळ! तुझे बाबा गेल्यापासून त्यांना बोलावून आणणार कोण तू अजून लहान आहेस. वाटेत जंगल आहे. आणि जंगलात रानटी श्वापदे आहेत तुझे मेहुणे फार ऐश्वर्यवान आहेत ते आपल्या सारख्या गरिबाच्या घरी कसे काय येतील? ते आले तरी एकटे येणार नाहीत त्याचे नोकरचाकर पण बरोबर येतील? इतक्या लोकांच्या राहण्याची व खाण्यापिण्याची व्यवस्था आपण कशी करायची? तू मोठा होऊन मिळवू लागलास म्हणजे बोलावून घेऊन ये!" आईने मुलाची समजूत घालण्याचा प्रयत्न करून पाहिला.

शिवराम काहीच बोलला नाही. दुसऱ्या दिवशी पहाटे कोणी जागे होण्यापूर्वी उठला आणि आईला सांगितल्याशिवाय घराबाहेर पडला. श्रीशैल पर्वताची वाट विचारीत कुर श्वापदाची फिकीर केल्याशिवाय श्रीशैल क्षेत्री आला. तेथे सर्वदेवांचे दर्शन करून व तीर्थस्नान करून










त्याने आपल्या बहिणीची व मेहुण्यांची चवकशी केली त्याने एकाला विचारले– "काय हो! मल्लिकार्जुन कोठे राहतात?" त्या गृहस्थाने त्याला मल्लिकार्जुनाचे देऊळ दाखविले. देवळात शिवरामला फक्त शिवलिंग दिसले.

शिवराम दमून गेला होता. तो पिंडीसमोर बसून म्हणाला–"अहो तुम्हांला आणि ताईला घेऊन जायला मी आलो आहे. दिवाळीं आली आहे नां? सर्वांच्या घरी त्यांची ताई व मेहुणे येणार आहेत. माझी आई तुमची आणि माझ्या ताईची वाट पहाते आहे. तुम्हांला आजपर्यंत आम्ही कधी बोलाविले नाही, म्हणून रागावलात का? तुम्ही किती मोठे आणि श्रीमंत असला तरीं आपले नाते कधी सुटते का? आम्ही गरीब आहो, म्हणून तुम्हीं आला नाहीत तर ते नाही मला आवडणार! मी तुम्हाला दोघांना बरोबर घेऊन जाऊनच परतणार!"

शिवराम म्हणाला ते त्या दगडाच्या देवाला कळले की नाही, शिवरामला कळले नाही. तो आपली बहीण भ्रमरांबेच्या देवळांत गेला आणि तिला घरी येण्यासाठी खूप आळविले. शेवटी तो अगदी वेडापिसा झाला आणि त्याने डोंगराच्या कड्यावरून उडी मारून आत्महत्या करण्याचे ठरविले. एकटा परत गेला तर इतर सवंगड्यांसमोर त्याची मान खाली होईल. तो अपमान त्याला असह्य वाटला आपल्या ताईसमोर आणि मेहुण्या समोर त्याने आपला शेवट करून घेतला तर पाप त्या दोघांच्या शिरांवर येईल असे त्याला वाटले.

असा विचार करून शिवराम डोंगराच्या कड्यावर जाऊन उभा राहला. इतक्यात कोणी तरी पाठीमागून येऊन त्याच्या दोन्ही खांद्यावर हात ठेवले. त्याच्या एका बाजूला एक पुरुष व दुसऱ्या बाजूला एक स्त्री होती.

कोण तुम्ही? माझ्या ताईला व मेहुण्यांना माझी फिकिर नाही तर तुम्ही



"कां आलां मला मधे अडवायला?" शिवरामने विचारले.

"शिवराम! अरे मीच तुझी ताई भ्रमरांबा आणि हे तुझे मेहुणे! तू पूर्वी कधी आम्हांला पाहिले नाहीस. म्हणून ओळखले नाहीस कोणी तरी आम्हांला सांगितले की सोमदेवांचा मुलगा इकडे आला आहे, म्हणून हुडकत आम्ही आलो." ती स्त्री म्हणाली.

शिवरामने आनंदाने दोघांना नमस्कार केला. त्यांनी शिवरामची आणि गणपती व कुमारस्वामीची ओळख करून दिली. शिवरामने आपल्या भाच्यांना दिवाळीला त्याच्या घरी यायचे बोलावणे केले. त्यांनी होकार दिला.

तिकडे शिवराम दिसलां नाही तेव्हां त्याच्या आईने पुष्कळ चवकशी केली. तिला शंका आली की मुलगा आपल्या ताईला आणि मेव्हण्यांना आणण्यासाठी श्रीशैल क्षेत्री तर गेला नसले!

काही दिवस लोटले. दिवाळी आली शिवराम घरी येऊन आईला म्हणाला—"आई! मी ताईला मेहुण्यांना आणि आपल्या भाच्यांना बरोबर बोलावून घेऊन आलो आहे आणि ते सर्व गावातल्या देवळाजवळ वाट पाहात आहेत. शिवरामची आई त्याच्या बरोबर धावत देवळात गेली. पार्वती-परमेश्वर आणि गणपती कुमारस्वामी सर्वांना तिनें घरी येण्याबद्दल फार आग्रह केला. सर्व घरी आले तोपर्यंत घराचे रूपच बदलले होते. लहानश्या घराच्या जागी त्यांना एक सुंदर महाल दिसला पाहुण्यासह शिवराम व त्याच्या आईनें घरात प्रवेश केला. गावकरी तो दिव्य महाल पाहून आश्चर्य चकित झाले. त्या महालाचे बाहेरचे मुख्य द्वार बंद होते. परंतु आत पुष्कळ लोक असल्याचा भास होत होता.

दिवाळीच्या दिवशी शिवरामच्या घरी पाहुणे म्हणून आलेले शिवपार्वतीच ते त्यांनी मायलेकांना बरोबर घेऊन कैलास लोकी गमन केले.



गयासुर नामक एक राक्षस त्रिलोक जिंकून कैलास लोकावर चालून आला. तेव्हां शंकराने आपली जटा झाडली. त्यातून एक भयंकर मुख धारण करून एक महाकाय व्यक्ति जन्मली आणि त्या राक्षसाला गिळायला धावली. गयासुर भीतीने थरथर कांपू लागला आणि शंकराच्या पाया पडून क्षमा मागू लागला. शंकराने त्याला अभयदान दिले. भयंकर मुख असलेला तो महाकाय ओरडू लागला की—"मला खायला द्या!" शंकराने त्याला स्वतःचा देह भक्षण करण्याचा आदेश दिला. शंकराच्या आज्ञेप्रमाणे त्याला स्वतःच्या देहाचे भक्षण करावे लागले. त्याने आपल्या देहाचे भक्षण केले. आता त्याचे मुख काय ते उरले. शंकराने "कीर्तीमुख" हे नाव देऊन वरदान दिले. की तो सर्वदा देवांच्या डोक्यावर वास करील व त्यांची कीर्ती वाढवील.

अशा तऱ्हेने शंकराचाच एक अंश "कीर्तीमुख" रूपे मकरतोरणाच्या मध्यभागी देवांच्या शीर्षस्थानी सुशोभित होऊ लागला.

प्राचीनकाळी बदरिकाश्रमात दुर्वास ऋषि तपश्चर्या करीत होते. एके दिवशी दुपारी ते देवांची अर्चना करून आहुती देण्यांच्या काही गोष्टी हरिणाच्या बछड्यांना खाऊ घालीत होते त्यावेळी एक गंधर्व आकाश-



मार्गे आपल्या पत्नीसह जात होता. त्याचे नांव तुंबुर होते. त्याने त्या हरणांच्या बछड्यांना पाहून चुटकी वाजविली त्या आवाजाने घाबरून ती पिल्ले पळाली. त्यावर दुर्वासांना अत्यंत संताप आला ते स्वभावतच अत्यंत रागीट होते. त्यांनी तुंबरला शाप दिला कीं तू मानव जन्म धारण करशिल.

तुंबर शाप ऐकून घाबरून गेला व खाली उतरून म्हणाला—"स्वामी, मी हरीणांच्या पिल्लांना पाहून त्यांच्यांवर मुग्ध झालो व हाताने चुटकी वाजविली. ती मला शाप बनली. तुमचा शाप अमोघ आहे. तो बदलणे शक्य नाही. त्यामुळे तुमच्या शापानुसार मी मनुष्याचा जन्म घेईन परंतु









माझी आपल्यास एक विनंती आहे. की मनुष्य जन्मात माझी शंकरावर भक्ति असावी." त्यावर दुर्वासाने तुंबरला त्याची इच्छापूर्ण होण्याकरीता त्याच्यावर अनुग्रह केला. दुर्वासांच्या शापामुळे तुंबरने कांचीपुर येथे वैश्य कुटुंबात चिरुतोंड नावाने जन्म घेतला. त्याची पत्नीसुद्धा मानव जन्मात तिरुवेंगनाची झाली. त्यांना चिलया नावाचा एक मुलगा झाला.

चिरुतोंड हा खूप मोठा शंकरभक्त होता. तो नेहमी एकनाथची अर्चना करून शंकर-भक्तांना लागणाऱ्या वस्तू पुरवीत होता.

एक दिवस त्याच्या घरी एक शिवभक्त आला. त्याने चिरुतोंडला आशिर्वाद दिला. चिरुतोंडने त्याची पुजा केली. त्यावर त्या शिवभक्तानें म्हटले–"बाळ दररोज उसाच्या रसाने शंकराचा अभिषेक करण्याचा माझा रिवाज आहे. तेव्हां पांचशेर उसाचा रस मला पाहिजे आहे.

चिरुतोंडला अत्यंत आनंद झाला. तो त्याक्षणी पैसे घेऊन घराबाहेर पडला.

पांचशेर रस काढायला शंभर उस तरी पाहिजे त्यामुळे चिरुतोंडने शंभर उस खरेदी केले. त्याची एक मोळी बांधली परंतु ती एवढी जड मोळी त्याला काही उचलता आली नाही. त्यावेळी शंकर भगवान स्वतः मनुष्यरूपात आले व त्यांनी ती मोळी उचलली व ते अदृष्य झाले.

ते पाहून चिरुतोंडला अत्यंत आश्चर्य वाटले त्याने आपल्या चरख्यात रस पिळून काढला व तो त्या अतिथीच्याजवळ नेऊन दिला. शंकराचा अभिषेक झाला.

कैलासावर शंकराचा देह घामाने थबथबलेला पाहून पार्वतीनें त्याला त्याचे कारण विचारले. शंकराने तिला चिरुतोंड विषयी सर्व हकिकत सांगितली व म्हटले– "माझा परमभक्त ती उसाची मोळी उचलू शकला नाही. म्हणून मी त्याला थोडी मदत केली मग काय त्याला दरदरून घाम फुटला आणि ते पाहून मला सुद्धा घाम आला." त्यावर पार्वतीने त्या भक्ताला पहाण्याची इच्छा शंकरा जवळ व्यक्त केली.





# उच्चा न्यायालय

चम्पक देशावर लिलाधर नावाचा राजा राज्य करीत होता. त्याच्या बायकोचे नाव नंदिनी होते. राजाचे राणीवर फार प्रेम होते. तो तिच्याशी अशा तऱ्हेने वागत होता की, चुकूनही तिचे मन दुखावले जाणार नाही.

राणीचा धाकटाभाऊ नागसेन बहिणीकडे आश्रयास होता व तो राज्यकारभारात मन मानेल तसे व्यवहार करीत होता. आणि त्याला जर कोणी विरोध करू लागला तर त्यांना तो धमकी देत असे की हे सर्व मी राजाच्या सांगण्यानुसार करीत आहे.

नागसेनाचा अत्याचार वाढू लागला. राजदरबारी अधिकाऱ्यांनी ह्या बाबत राजाकडे तक्रार केली. परंतु राजा असे समजून गप्प राहला की जर कां आपल्या मेहुण्याला रागावले व त्याला शिक्षा दिली तर राणीला त्याचे फार दुःख होईल.

एकदा जयमल्ल नावाचा एक तरुण दोन घोडयांना घेऊन राजधानीला विकावयास आला. बाजारात विकावयास ठेवलेल्या घोडयांकडे नागसेनचे लक्ष गेले. तो त्या तरुणांजवळ गेला.

जयमल्लनें विचार केला की, तो कोणी ग्राहक असावा. तो घोडयांची किंमत सांगणार तोच नागसेनने त्याला दटावून म्हटले– "ऐक, तुला किंमतीच्या रूपात चांदीची पंचवीस नाणी द्यावयास हवीं. नाही दिलीस तर तुला एक घोडा द्यावा लागेल!"

जयमल्लला अतिशय अचंबा वाटला तो म्हणाला–"खरे तर घोडे विकले सुद्धा नाहींत तर मी कुठचे पैसे देऊ!"

ते उत्तर ऐकताच नागसेनचे डोके भडकले तो चिडून त्याला म्हणाला– "काय रे तू मला कोण समजलास?"









असे म्हणत त्याने एक थप्पड लगावली. ते पाहून जयमल्लचा राग उफाळून आला त्याने तलवार खेचून बाहेर काढली. थोडावेळ दोघांच्यात खूप चकमकी सुरू झाल्या त्यात नागसेन जखमी होऊन पळून गेला.

तो सरळ राजापाशी येऊन पोहोचला. त्यावेळी मंत्री मकरंद आणि राणी नंदिनी दोघे तेथेच होते.

नागसेनने राजाला तक्रारीच्या सुरात सांगितले—"महाराज, घोड्याची विक्री करणारा एक खेडूत ह्या शहरात आला आहे. तो खूप दुष्ट आहे. त्याने मला मारून जखमी केले. आता तो बाजारात आहे. तुम्ही ह्याक्षणी त्याला तावडतोब बांधून घालून आणा व त्याला कठोर शिक्षा करा. राजानें त्यावर शिपायांना बोलावणे पाठवले. तेवढ्यात मंत्री राजाला म्हणाला—"प्रभू ! कठोर शिक्षा नंतर द्यावी प्रथम त्यापूर्वी तेथील त्या व्यापाऱ्या बरोबर इतर साक्षीदारांना बोलवावे तेव्हांच तर न्याय अन्याय खऱ्या तऱ्हेने होऊ शकेल.

त्यात नंदिनीने मधे पडत म्हटले—"राजबंधुवर हात चालवणे ह्यापेक्षा दुसरा कोणता मोठा गुन्हा होऊ शकतो. तावड-तोब त्याला पकडून फांसावर चढवा. अशी आज्ञा फर्मावून राणी तेथून निघून गेली.

शिपायांनी नगरात जाऊन जयमल्लला पकडून राजापाशी आणले. जयमल्लने राजाला हात जोडीत नम्रतेने निवेदन केले. की आपल्याला कोणत्या कारणाकरीता नागसेनवर हल्ला करावा लागला व त्याला जखमी केले. राजाला त्याचे म्हणणे योग्य वाटले. परंतु राणी निराश होईल असा विचार मनांत येताच त्याने त्याला फांशीची शिक्षा फर्मावली शिपायी जय-मल्लला पकडून तुरुंगात घेऊन गेले. फांशीची शिक्षा दुसऱ्या दिवशी देण्यात येणार होती.

राजाचे मन त्याला खाऊ लागले तो व्याकुळ होऊ लागला त्याने एका निर्दोष माणसाला आपणहून शिक्षा केली. त्या-च्यावर अन्याय केला त्यामुळे. विचारांनी काही केले तरी रात्रभर त्याचा डोळा लागला नाही.

राजाने मंत्र्याला बोलावून विचारले—"मंत्री महाशय, असा काही उपाय आहे कां की ह्यामुळे जयमल्लची शिक्षा रद्द केली जाईल व राणीला सुद्धा राग येणार नाही. ?"

मंत्र्याने थोडा विचार केला नंतर म्हणाला—"प्रभू ! ह्याकरीता एक उपाय आहे. जर कां जयमल्लने राणी व नाग-सेनची क्षमा मागितली तर त्याला आपण प्राण दान देऊ शकतो. नंतर त्याला थोडा तुरुंगवास-भोगण्याची शिक्षा देता येईल.

हि योजना आखून मंत्री व राजा तुरुं-गाच्या जवळ आले. मंत्र्याने जयमल्लला सल्ला देत म्हटले—"जयमल्ल जे घडले ते घडले परंतु तुला जर मरणापासून मुक्त





      

व्हावयाचे असले तर तू राणी नंदिनी व नागसेन ह्यांच्यापाशी प्राणाची भिक्षा माग व आपण केलेल्या चुकीची क्षमा माग."

जयमल्ल स्मित करून म्हणाला—"मी थोडचा वेळातच राजाने दिलेल्या सुनावणीबद्दल उच्च न्यायालयात तक्रार सुनावणी करणार आहे. मला क्षमा करा. खरे तर मला कोणापाशी सुद्धा क्षमा मागण्याची आवश्यकता नाही.

हे उत्तर ऐकताच राजा भयंकर संतापला व म्हणाला—"अरे मुर्खा, ह्या राज्यात राजाच्या न्यायालयाहून उच्च न्यायालय कोणते आहे काय ? मी तुला मृत्युदंड दिला आहे तरी सुद्धा तुझ्यावर दया येऊन तुला प्राणसंकटातून सोडविण्याच्या इच्छेने आलो तर माझ्या समोर ऐट मारतो आहेस कां ? तू एक नंबरचा गर्विष्ठ आहेस असे दिसते ?"

जयमल्ल राजाचे बोलणे ऐकून जराही विचलीत झाला नाही. तो गंभीर होत म्हणाला—"असे सांगतात की राजा म्हणजे पृथ्वीलोकांतील देवांचा प्रतिनिधी असतो. प्राणापेक्षा सर्वांचा मान सन्मान करून तो उचित न्यायदंड करतो आणि त्याने केलेल्या न्यायदंडाला पुर्नःविचार करून उचित न्याय देण्याकरीता त्याची प्रार्थना कोणी मानव परमेश्वराजवळच शेवटी करू शकतो. आपल्या दिलेल्या शिक्षकरीता मी उच्च न्यायालयात त्याची तक्रार घेऊन जाणार आहे. आपण निश्चित होऊन मला फांसावर चढवा."

जयमल्लचे बोलणे ऐकून राजाचे डोळे उघडले. त्याने स्वतःनेच विचार मनाशी करवून घेतले की, राज्यकारभार कसा पवित्र व्हावयास पाहिजे.

राजा लिलाधरने त्याचक्षणी त्याची तुरुंगातून मुक्तता केली आणि त्या दिवसापासून तो जनतेला योग्य तो न्याय देऊ लागला. थोडचाच दिवसांत सर्व प्रजेतील लोक राजाला धर्मात्मा म्हणून लागले व तो सर्वांचा आवडता झाला. व चांगल्या तऱ्हेने राज्यकारभार करून आनंदाने राहीला.





# उपकार

वरप्रसाद नावाचा एक व्यापारी नागपट्टण मधे नावाजलेला होता. एके दिवशी त्याला त्याचा बालपणचा मित्र शेषनाथ भेटण्याच्या उद्देशाने त्याच्याकडे आला व म्हणाला—"मित्रा, मी माझ्या आयुष्यात अनेक टक्केटोणपे खाल्ले आहेत. परंतु आता ह्या स्थितित मी माझ्या बायकोमुलांना व आईवडिलांना सांभाळण्याच्या परिस्थितीत नाही. मी आपली लहानपणची मैत्री आठवून तुझ्यापाशी आलो आहे, तू मला मदत कर."

वरप्रसाद व शेषनाथ लहानपणी एकाच गावात शेजारी शेजारी रहात होते. शेषनाथ जास्त्याच कमी बोलणारा व संकोचशील होता. परंतु वरप्रसाद धांदरट व खटयाळ होता. तो जी काय चुक करेल ती दुसऱ्यावर लादत असे परंतु शेषनाथ त्याच्या अगदी उलट कितीही चुका होवोत तो गुपचुप मार शिव्या सहन करीत असे.

परंतु काही दिवसांनी वरप्रसादने शेषनाथचा चांगला स्वभाव ओळखला व ते दोघे अत्यंत गाढ मित्र झाले. ह्यानंतर काही वर्षांनी वरप्रसाद व्यापार करण्याकरीता शहरात गेला व त्याची परिस्थिती चांगली सुधारली शेषनाथ गावातच राहला.

शेषनाथने सांगितलेले ऐकून वरप्रसादला अत्यंत वाईट वाटले तो म्हणाला—"तुझ्या सारख्या मित्राला मी मदत केली नाही तर माझ्या सारख्याची संपत्ती काय कामची तू गावांतील आपली शेतीभाती सर्व विकून टाक आणि इथे येऊन रहा. तुझ्या पैशांतील एक हिस्सा घेऊन मी तुला माझ्या धंद्यात भागीदार करतो.

वरप्रसादने सांगितलेले शेषनाथने मान्य केले. वरप्रसादने शेषनाथ करीता एक चांगल्यापैकी घर शोधले व तो त्याच्या घरी जाऊन जातीने काय हवे नको पाहू



लागला. सोबत दरमहा हजार रुपये पगाराच्या बोलीने त्याला देऊ लागला. शेषनाथची स्थिती आता चांगली सुधारली. त्याच्या घरातील सर्व माणसे वरप्रसादचा आदर करून देवता समान मानू लागले.

एक दिवस वरप्रसादने शेषनाथला म्हटले–" मित्रा, तू माझ्या व्यापार धंद्यात काही चुका होत असल्या तर मला निसंकोच सांगत चल.

परंतु शेषनाथ आपली योग्यता जाणून त्याच्या बरोबर विनयपूर्वक वागू लागला त्याने केलेल्या कामाविषयी त्याची स्तुती करीत राहला. एकदा सुद्धा त्याने चुक दाखवून दिली नाही.

खरी गोष्ट तर अशी होती की, शेषनाथला व्यवहार ज्ञान व धंद्याविषयी जास्त अनुभव होता. तो तर अशा गोष्टी करीता इतका प्रसिद्ध होता की त्याच्याकडे जो कोणी सल्ला घेण्यास येई. त्याला नेहमी चांगला फायदा होत असे. त्यामुळे त्याचे नाव शहरात हळूहळू प्रसिद्ध झाले. ती गोष्ट वरप्रसादच्या कानावर आली की शहरातील अनेक लोकांनी शेषनाथचा सल्ला घेऊन आपल्या धंद्यात सुधारणा केली तो वाढवला.

वरप्रसादला ह्या सर्व गोष्टीचे आश्चर्य वाटले एक दिवस त्याने शेषनाथला विचारले–" मित्रा, मी कधीच विचार केला नाही की, तुझ्यात अशा तऱ्हेची प्रतिभा आहे. तू माझ्या काही चुका लक्षात घेऊन मला सल्ला का देत नाहीस.

"तुझ्यात काही कमी असेल तरच ना सांगू?" शेषनाथने उत्तर देत म्हटले.

ते उत्तर ऐकताच अभिमानाने त्याची छाती भरून आली.

त्याच सुमारास वरप्रसादच्या एका मुलाने गरीब घराण्यातील एका मुली बरोबर लग्न करण्याचा आपला विचार वडिलांना सांगितला. पण वरप्रसादला त्या मुलीला आपली सुन करून घेणे योग्य वाटले नाही. त्यामुळे मुलाने लग्न करून दिले नाहीत तर मी घर सोडून निघून जाईन अशी धमकी वडिलाना घातली.

तेव्हां वरप्रसाद शेषनाथला म्हणाले– "जर माझा मुलगा घर सोडून जाऊ लागला तर त्याला मी अडवणार नाही. गरीबीचा अनुभव त्याला चाखू दे." ते ऐकून शेषनाथ डोके न हलविता गप्प राहला.

त्याच सुमारास आणखी एक व्यापारी धनगुप्त ह्याच्या पुढे कठीण समस्या उभी राहली तो त्याने गरीब मुलीला सुन करून घरी आणले. वरप्रसाद त्या गोष्टीचा शाहानिशा लावण्याच्या उद्देशाने धनगुप्तच्या घरी गेला.

धनगुप्तने वरप्रसादला समजावत म्हटले–" भाऊ जर का एकदा कोणाचे मन मोडले तर ते जोडणे कठीण असते. तुम्ही जर ह्या विवाहाला संमती दिलीत तर तुमचा मुलगा व सुन तुम्हांला जिवंत असे पर्यंत तुमचे ऋणी राहतील व तुमची सेवा करतील. आणि जर तुमचा मुलगा घरातून निघून गेला तर तुमची पत्नी दुःखी होईल. घरात सुख शांती राहणार नाही जिवनात सुख शांती नसेल तर तो पैसा काय कामाचा!"

हा सल्ला ऐकून वरप्रसाद अत्यंत प्रसन्न झाला व त्याला म्हणाला–" तू सुद्धा अतिशय सुज्ञ आहेस. असा सुंदर विचार



माझ्या डोक्यात आलाच नव्हता. सर्वांना उत्तम सल्ला देण्यात यशस्वी झालेल्या शेषनाथला सुद्धा ही गोष्ट समजली नाही

धनगुप्तने आश्चर्यचकित होत विचारले– "हे तुम्ही काय म्हणता आहात? हा विचार माझ्या डोक्यात आला नाही तुमचा मित्र शेषनाथनेच मला हा सल्ला दिला!"

हे उत्तर ऐकताच वरप्रसाद गडबडला ताबडतोब तेथून बाहेर पडून घरीं परत आला. त्याने शेषनाथ सोबत ह्या बाबतीत काही विचारणा करण्याचे ठरविले परंतु दुसऱ्या क्षणाला त्याच्या डोक्यात एक विचार चमकला की, जेव्हां शेषनाथची परिस्थिती चांगली नव्हती तेव्हांच तो त्याच्यापाशी

आला म्हणून द्वेष करीत असावा शेषनाथ सर्वांना सल्ला देतो. परंतु आपल्याला नाही. त्याने त्याला अगदी खजिल झाल्या सारखे वाटले. तो मनांतुन दुःखी झाला त्याने विचार केला की आपल्या कडून मदत मिळवून सुद्धा त्याने आपल्याला मदत केली नाही. त्यामुळे आता उभ्या आयुष्यात कोणाला मदत करावयाची नाही.

दुसऱ्या दिवशी सदानंद वरप्रसादांना भेटावयास आला. सदानंद वरप्रसादाचा कुलगुरू होता. दरवर्षी तो त्याच्या घरी येऊन खुशाली विचारे त्यांनी झालेल्या गोष्टी कथन करून आपले दुःख प्रकट केले.

त्यावर त्यांनी समजावल–"अरे वा! तू कसा गृहस्थ आहेस. त्याच एका कारणा-करीता मी येथे आलो आहे. शेषनाथने आपणहून मला बोलावणे पाठवले की, ह्या क्षणी तुमची मला अत्यंत गरज आहे.

वरप्रसादनां अत्यंत आश्चर्य वाटले त्यांनी विचारले–"तो जी स्वतः सहाय्यता करू शकत असतांना त्यांनी अशा कामा करीता आपल्याला काय म्हणून बोलावणे पाठवले. त्यापाठीमागे काय उद्देश असावा?"

सदानंद मंदस्मित करीत म्हणाले– "तू तर आयुष्यात उन्नति केली आहेस परंतु शेषनाथची स्थिती वाईट होती अशा परिस्थितीत तू त्याला मदत केलीस व त्याची स्थिती सुधारली त्याकारणाने तो तुला सल्ला देण्यास संकोच करीत आहे. मदत करण्याकरीता ज्याला संकोच होत नाही. तो सल्ला देतो आणि तो कमतरता भरून काढण्यासाठी नाही.

वरप्रसाद ते ऐकून चकित झाला. शेवटी त्याला त्याच्या गुरूंच्या गोष्टीमधील मर्म समजून आले तो त्याच्या पाया पडला.

वरप्रसादला मनांतून खात्री झाली की, त्याने शेषनाथ बरोबर एका देणेकऱ्यासारखा व्हयहार केला. परंतु मित्र म्हणून नाही. म्हणुन शेषनाथने सुद्धा त्याच्याबरोबर तसाच व्यवहार केला. तेव्हांपासून त्यांनी आपल्याला सुधारले व शेषनाथपासून सल्ल्याचा लाभ घेऊ लागला. सुखानें राहीला.



# फायदा

भीमराज अत्यंत खर्चीक होता. एके दिवशी त्याच्या मनांत अचानक विचार आला आपण फायदा मिळवावा. त्याकरीता त्याने आपला अगदी जवळचा मित्र रंगनाथ याच्याजवळ त्यासबंधी सल्ला विचारला. रंगनाथने एक मातीची हुंडी त्याला देऊन त्या-पासून फायदा मिळविण्याची गोष्ट त्याला सांगितली.

भीमराजने त्या मातीच्या हुंडीत चारपांच दिवस थोडे थोडे पैसे घातले नंतर एका आठवड्याने काही कामाकरीता म्हणून ती हुंडी फोडून त्याने पैसे काढले व खर्च करुन टाकले. ती बातमी ऐकताच रंगनाथने भीमराजला एक लोखंडी हुंडी दिली व त्याला कुलूप घालून त्याची चावी घरासमोरील झाडीत फेकून दिली.

एका आठवड्याने रंगनाथ भीमराजला भेटण्याच्या इच्छेने त्याच्या घरी गेला पहातो तो काय भीमराज झाडीत काहीतरी शोधत होता. कारण विचारले तर त्याने सांगितले की आपल्याला पैशांची नड पडली त्यामुळे दोन दिवस झाले मी किल्ल्या शोधत आहे.

त्यावर रंगनाथ हसून म्हणाला–"ह्या दोन दिवसात तुझी ती जरूरी पुरी होईल. तुझ्यात सर्वात जास्त कमतरता ह्याच गोष्टीची आहे की, तुझ्या समोर एखादी छोटी गोष्टीची जरी जरूरी पडली तरी तू जमा केलेला पैसा खर्च करुन टाकतोस ह्या झाडीत ती किल्ली केव्हांही सापडणार नाही व्यर्थ श्रम करू नकोस.

भीमराजने सिवकली सुचक मान हलवीली आणि म्हटले "कशा तऱ्हेने शेवटी तू मला फायदेमंद बनविलेस."





# फसवणुक

एका गावात एक शेतकरी रहात होता. त्याला एकुलता एक मुलगा होता. तो जात्याच बुद्धीमान नव्हता. परंतु त्याची बायको मात्र हुषार होती.

एक दिवस शेतकऱ्याचा मुलगा ओसरीवर बसून आपल्या फावड्याकरीता लाकडाची मुठ तयार करीत होता. तेव्हां तीन माणसे त्याच्या घरात घुसली व त्याला म्हणू लागली—"हे बघ बाबा, तुला बोलावून आणण्यासाठी आमच्या समुद्र राजाने आम्हांला पाठविले आहे चल.

समुद्रराजा तर देवांचा अंश आहे मग हे तिघे इतके काळे कुट्ट व कुरूप बुटके कसे! खरे तर ते तिघे राक्षसांच्या राजाचे दूत होते. परंतु त्या शेतकऱ्याच्या मुलाच्या डोक्यात ते काही शिरले नाही.

"तुमच्या राजाचे माझ्याजवळ काय काम?" शेतकऱ्याच्या मुलाने विचारले.

"असे ऐकले की, ह्या देशात तुझ्यासारखा बुद्धीमान व हुषार दुसरा कोणी नाही. राजाला तुझ्याकडून एक काम करून घ्यावयाचे ते तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाच करता येणार नाही.

हुषार म्हणाल तर माझ्याहून सुद्धा माझे वडिल कांकणभर जास्तच बुद्धीमान हुषार आहेत. तुम्हांला पाहिजे तर त्यांना बरोबर घेऊन जा. ते आत्ताच शेतावर गेले आहेत. संध्याकाळ पर्यंत परत येतिल." शेतकऱ्याचा मुलगा म्हणाला.

"तर मग, तुम्ही दोघेही या. आम्ही तुम्हांला न्यायला परत काही येणार नाही. आमची होडी त्या किनाऱ्यावर आहे उद्या सकाळी तुम्ही दोघे तेथे या आमची होडी तुम्हांला आमच्या देशात घेऊन जाईल." असे म्हणत ते तिघे निघून गेले.

त्या रात्री मुलांनी वडीलांना सांगितले—"बाबा, समुद्रराजाने आपल्या दूतांना आपल्याला घेऊन जाण्याकरीता धाडले होते. ते काही खास काम आपल्याकरवी करवून घेणार आहेत. जर कां आपण त्याचे काम पूर्ण करून दिले तर ते आपल्याला उत्तमात उत्तम बक्षीस देतिल."

शेतकऱ्याने विचारले—"काय रे ते आपल्या राजाची काही खास खूण घेऊन आले होते कां?"

"नाही, ते परत सुद्धा येणार नाहीत. आपण जर उद्या सकाळी किनाऱ्यावर गेलो तर त्यांची होडी आपल्याला घेऊन जाईल." शेतकऱ्याचा मुलगा म्हणाला.



"मी किनाऱ्यापर्यंत पायी चालत जावू शकणार नाहीं तो दूर आहे. जर कां तू किनाऱ्याचे अंतर कमी करू शकलास तर सांग. मी तुझ्या बरोबर यायला तयार आहे." असे म्हणून शेतकरी झोपी गेला.

मुलाने समुद्रराजाचे बोलणे आपल्या पत्नीस सांगितले—"बाबा म्हणतात की किनाऱ्याची वाट जर कमी केलीस तर ते यायला तयार आहेत नाहीतर नाही. हे कसे काय शक्य आहे?"

त्याची बायको म्हणाली—"किनाऱ्यापर्यंत पोहोचण्याची वाट कमी करण्याचा एकच एक उपाय आहे. रस्त्याने जातांना तुम्ही वडीलांना एक एक गोष्ट ऐकत चला.

शेतकऱ्याचा मुलगा बायकोच्या हुषारीवर अत्यंत खुष झाला. तो झटक्यात उठून बसला व वडिलांना हलवून जागे करीत म्हणाला—"बाबा, चला उठा, तुम्ही म्हणाला होतात नां की किनाऱ्या पर्यंतची वाट कमी केलीस तर मी तयार आहे.

ह्यानंतर ते दोघे किनाऱ्यावर जाण्याकरीता रस्त्याला लागले. रस्त्याने मुलगा वडिलांना गोष्टी ऐकवू लागला. त्यांचा वेळ गेला शेवटी दोघे किनाऱ्यावर येऊन पोहोचले. किनाऱ्यावर एक मोडकी तोडकी बोट व तिन काळी माणसे उभी होती.



"अरे बाळा हि कसली ओबडधोबड बोट हि तर विचित्र वाटते आहे." तो म्हणाला.

ती काळी माणसे म्हणाली–"आमच्या राजाच्या सर्व बोटीं मधे हिच सर्वांत जास्त वेगाने चालते. त्यामुळे त्यांनी हि आपल्या साठी पाठविली आहे.

त्यानंतर ते दोघे बापलेक बोटीत चढून बसले.'व बोट किनाऱ्यापासून दूर निघाली. थोड्या वेळात ती बोट एका अनोळख्या जागी येऊन लागली. तेथे झाडेझुडपे काय पण एक वाळकी काटकी सुद्धा दृष्टीस पडत नव्हती. ती जागा एका राक्षसांच्या टोळीची होतीं. ते त्या दोघांनी ओळखले. परंतु त्यांचा नाईलाज झाला ते लाचार बनले.

त्या दोघांना नावेतून खाली उतरवले व आपल्या राजापाशी आणले. त्याचा राक्षस राजा तर त्यांच्या पेक्षां जास्तच काळा विद्रूप होता.

"आम्हांला इथे कां बोलावण्यात आले आहे ?" शेतकऱ्याने राक्षसाला विचारले.

"तसे काही विशेष खास काम नाही पण आमच्यापाशी प्रचंड विशाल असा हंडा आहे. त्या हंड्या खाली आमची माणसे आग पेटवू शकत नाहीत. तुम्ही आग लावू शकलात तर फारच उत्तम नाहीतर तुम्हांला जिवानिशी येथून जाणे अशक्य." राक्षस राजा दरडावित म्हणाला.

"मग प्रथम आम्हांला तो हंडा दाखवा." शेतकरी म्हणाला.

नंतर राक्षस त्यांना एका अति प्रचंड खोलीत घेऊन गेला तेथे खोलीच्या मध्या-वर सात आठ हात उंच एक तांब्याचा हंडा होता. शेतकऱ्याने राक्षसाना खोलीच्या बाहेर पाठवून दिले व खोलीला आतून कोयंडी लावली नंतर दोघांनी चोहोबाजूला फिरून त्या हंड्याचे निरीक्षण केले.

शेतकरी आपल्या मुलाला म्हणाला– "अरे बाळा, तुला ह्या हंड्या विषयी काही माहीती आहे कां ? हे एक अक्षय पात्र आहे. आपल्या राज्यातील राजाचे पणजोबा ह्या भांड्यात अन्न शिजवून दररोज सर्व





भिकाऱ्यांना वाटत होते. ते ह्या राक्षसांनी उचलून आणून इथे ठेवलेले आहे.

"पण बाबा, आता ह्या राक्षसांच्या तावडीतून आपण कसे निसटायचे ?" मुलाने घाबरत विचारले.

"मी एक उपाय योजतो." असे म्हणत शेतकऱ्याने दाराची कडी उघडली व राक्षसांना बोलावले. राक्षसांनी विचारले– "कायरे तुम्ही आग लावलीत कां ?"

"आग लावू, हो टिचकी मारल्या बरोबर आग पेटते की काय ? जांभुळ' आंबा. चिंच, वड पिंपळ बेल सागवान देवदार वेळू इत्यादी सर्व झाडाची लाकडे कापूस व एकमेकांवर घासायला गार-गोटीचा दगड घेऊन या. तसेच एक लोख-डांची लांब सळई ते सर्व आणताच क्षणात आग लावून देईन." शेतकरी म्हणाला.

राक्षसांनी शेतकऱ्याने सांगितलेल्या गोष्टी आपल्या राजाला सांगितल्या ते ऐकताच त्याला अत्यंत संताप आला म्हणाला–"तुम्हांला वेडबीड तर लागले नाही नां ? आमच्या इथे गवत उगवणे मुष्किल मग झाडे कोठून मिळणार ?"

तुमच्या देशात नाही तर आमच्या राज्यात जिकडे पहाल तिकडे लाकडेच लाकडे पहावयास मिळतात माझ्या सुनेला सांगून तिच्याकडून तुम्ही मागून आणू



शकता नां तुमच्या सेवकांसोबत तुम्ही तुमच्या मुलाला सुद्धा पाठवा म्हणजे माझ्या सुनेचा विश्वास बसेल नाहीतर तीला विश्वास वाटणार नाही." शेतकऱ्याने राजाला सांगितले.

"माझ्या सेवकांनी लाकडे आणून देई पर्यंत तुम्ही दोघे येथेच ह्या खोलीत बसा !" असे म्हणून राजाने त्या दोघां पितापुत्रांना त्या हंड्याच्या खोलीत कोंडून ठेवले व आपल्या मुला सोबत नोकरांना त्याच्या गावी नावेतून पाठविले.

राक्षस राजाचा मुलगा शेतकऱ्याच्या घरी गेला व त्याच्या सुनेला म्हणाला– "मी राक्षस राजाचा मुलगा आहे. तुझे

सासरे व तुझा पती आमच्या राज्यात आहेत. तुझ्याकडून त्यांनी बेल, आंबा, चिंच, वड, पिंपळ सागवान देवदार जांभूळ वेळू ह्यांची लाकडे कापूस व गारगोटी लोखंडाची सळई आणण्याकरीता पाठविले आहे. त्या सर्व वस्तू लवकर दे आम्हांला घाईने जायचे आहे.

शेतकऱ्याच्या सुनेला त्या सांगण्यावरून समजले की आपले सासरे व पती संकटात सांपडले आहेत. त्यांची फसवणूक केली गेली आहे. तिने राक्षस राजाच्या मुलाला म्हटले–"तुम्हांला जी जी लाकडे हवी आहेत ती सर्व त्या अंधाऱ्या कोठडीत आहेत तुम्ही आत जा व घ्या.

राक्षसाचा मुलगा व सेवक त्या अंधाऱ्या कोठडीत शिरले ते पाहून तिने घाईघाईने पाठीमागून जाऊन दार बंदकरून कुलूप घातले.

नंतर ती बाहेर आली व नावाड्यांना म्हणाली–"तुमच्या राजाचा मुलगा अंधार कोठडीत बंद झाला आहे. कितीही शोधले परंतु त्याची चावी सापडत नाही. तुमच्या राजाला सांगा की, आमच्या कुटुंबातील त्या दोघांनाच चावी माहीत आहे.

राक्षस नावाडी आपल्या नावेत बसून परत आपल्या राज्यात परत आला व राजा-पाशी जात त्यांनी शेतकऱ्याच्या सुनेने सांगितलेली गोष्ट ऐकविली.

राक्षस राजा संतापाने लालबुंद झाला दांत वाजवित राहला राजाने आपल्या मुलाला परत बोलावण्याच्या इच्छेने शेतकरी व त्याच्या मुलाला तावडतोब पाठवू लागला परंतु शेतकरी म्हणाला–"आम्ही आमचे काम पूर्ण करूनच मोठे बक्षीस घेऊन येथून जावू तशी आम्हांला जाण्याची काही एक घाई नाही."

राक्षसाच्या राजाने सोन्याचा एक मोठा थैला त्यांना बक्षीस म्हणून दिला व त्या दोघांना नावेत बसवून त्याच्या राज्यात पाठ-वून दिले व मुलाला परत आणले.

त्या दिवसापासून शेतकरी त्याचा मुलगा व सून आपले आयुष्य आनंदाने घालवू लागले.



## पक्षी आणि प्राणी :

दक्षिण अमेरिकेत एक विशेष प्रकारची डोळ्याबाजूने झालर असलेली अशी अस्वले पहावयास मिळतात त्यांच्या डोळ्या भोवताली असलेल्या रिंग मुळे त्यांना चष्मेवाली अस्वले म्हणतात.

**विचित्र चश्मे**





### धोका

समुद्री वैर नावाने संबोधली जाणारी ऑस्ट्रेलियन बाक्स जेली हि अत्यंत धोकादायक अशी मासोळी समजली जाते. तिच्या शरिरात जवळजवळ चार कोटी असे धागे लटकलेले असतात ह्या धाग्यांमुळे माणूस दोन-तिन मिनिटात मरतो.



बकोलीच्या शरिरात जवळजवळ २,००० मांसल पेशी आहेत. परंतु मनुष्याच्या शरीरत केवळ ७००, मांसल पेशी असतात.

# चांदोबा

संस्थापक : 'चक्रपाणी'
संचालक : नागिरेड्डी

मानव हा समाजाचे जोडलेले एक अंग आहे. त्या कारणामुळे त्याच्या जीवनपद्धती त्याच्या चालण्या-बोलण्याच्या व्यवहाराने सुधारू शकतात. ह्याचा बोध आपल्याला 'विलक्षण उपाय' ह्या गोष्टीत वाचावयास मिळेल.

## अमर वाणी

धनानि जीवितं चैव परार्थे प्राज्ञ उत्सृजेत ।
सन्निमित्ते वरं त्यागो विनाशे नियते सति ।।

[ज्ञानी व्यक्ति परोपकारासाठी आपली संपत्ती किंवा प्राणाचा त्याग करण्यास सुद्धा मागेपुढे पहात नाही, कारण की त्याना ह्या गोष्टीची खात्री असते की, केव्हां ना केव्हां तरी ह्या वस्तूचा नाश होणारच.]


वर्ष : ३६ ऑगस्ट १९८६ अंक : २

एक प्रत : २-५० :: वार्षिक वर्गणी : ३०-००





Fullscreen

127





8
/68












## फ्लोरिडामधे ताजमहाल

डोनाल्ड सोल्डिनी नावाच्या अमेरिकन रहिवाश्यांनी फ्लोरिडा येथे ताजमहाला सारखाच कलात्मक महाल बांधण्याचा विचार मांडला आहे. सध्याच्या स्थितीत भारतातील ताज-महाल काही तुरळक अमेरिकन लोकच पाहू शकतात परंतु हाच जर अमेरिकेत असेल तर लाखो लोकांना, तो पहाण्याची संधी मिळेल. ह्याच एका प्रेरणेने उत्तेजित होऊ डोनाल्डने हा महाल बांधण्याचा निश्चय केला आहे.

## पिरॅमिडसच्या युगातील हवा

जवळजवळ ४,६०० वर्षांपूर्वी चियोप्स पिरॅमिडचे बांधकाम झाले सध्या काही वैज्ञानिक पिरॅमिडच्या तळातील एकत्र जमलेला वायु बाटल्यामधे भरून त्याचे संशोधन करीत आहेत. त्यावरून पृथ्वीच्या पोटातील जलवायुच्या अदांजाने ह्या गोष्टीचा सुद्धा शोध लागेल प्राचिन काळचे निवासी मौल्यवान वस्तू इतकी वर्षे कशी सुरक्षित ठेऊ शकत होते.





## फक्त महिलांसाठी

सौदी अरेबिया मधे फक्त बायकांनाच काम करण्यासाठी एक कारखाना स्थापन करण्यात आला आहे. त्या देशात असा नियम आहे की, स्त्री व पुरुषांना एकत्र मिळून काम करता येत नाही. त्यासाठी ही सोय केली आहे.

## तुम्हांला माहीत आहे कां ?

१. जगातील सर्वात मोठे प्राचीन राज-धानीचे शहर कोणते ?
२. मास्कोतील पूर्वरूसची राजधानी कोणती ?
३. नार्वेची राजधानी ओस्लो नगराचे पूर्वनाव काय होते ?
४. कानबेर्रा के पूर्व ऑस्ट्रेलियाच्या राज-धानीचे शहर कोणते ?
५. इजिप्तची राजधानी कैरो ह्या शहराचे दुसरे नाव काय ?

[ उत्तरे पान ६५ वर पहावीत ]

# कार्तवीर्यार्जुन

प्राचीनकाळात नर्मदा नदी काठी वसलेल्या महिष्मती नगरात राजा कार्तवीर्यार्जुन राज्य करीत होता. त्याची प्रबळ तीव्र इच्छा होती की कोणतेही कार्य असो ते स्वतःच्या हाताने संपन्न होण्याची शक्ति प्राप्त व्हावी त्यांनी दत्तात्रेयाची उपासना करून एक हजार हात वराच्या रूपाने प्राप्त केले.

एक हजार हात वररूपाने प्राप्त झालेले पाहून कार्तवीर्यार्जुनाच्या मनातील अहंकार वाढत गेला एके दिवशी तो नदीत स्नान करीत असता त्याच्या मनांत आले की, हा नदीचा प्रवाह हाताने थांबवावा त्या कल्पनेने तो हुरळून गेला व त्याने आपले हात पसरले त्याच्या परिणाम व्हायचा तोच झाला नदीत तुफान माजले. व रावणाची सेना बुडाली ते पाहून रावणाला अत्यंत संताप आला. आणि त्याने कार्तवीर्या बरोबर युद्ध केले व तो त्यात हारला त्याकारणाने कार्तवीर्याचा अहंकार जास्तच वाढला.

एकदा कार्तवीर्याने गिरीनगरचे जंगल जाळण्याची अग्निदेवाला अनुमती दिली. अपव नावाच्या मुनींचा आश्रम जळून गेला. त्यानी क्रुद्ध होऊन कार्तवीर्याला शाप दिला–"तू एक हजार हात मिळवून गर्विष्ठ झाला आहेस. त्यामूळे तू त्याला वंचित होशिल." नंतर काही दिवसांने कार्तवीर्याने जमदग्नींच्या आश्रमातून त्याची कामधेनु चोरण्याचा प्रयत्न केला व तो निष्फळ झाला. त्यांनी जमदग्नींना मारून टाकले. ह्यानंतर जमदग्नीचा मुलगा परशुराम आश्रमात परत आला आणि ते पाहून त्यांनी कार्तवीर्याच्या हजार हातांना सपासप कापून काढले. शेवटी रागाने वध केला.





# त्रिकालचे पांडित्य

चंडिकापुर गावात जगन्नाथ नावाचा एक ब्राह्मण रहात होता. त्याला लागोपाठ तिन मुलींच्या पाठीवर एक मुलगा झाला. त्याचे नाव त्याने त्रिकाल असे ठेवले. बऱ्याच वर्षांने त्यांच्या घरात मुलगा जन्मला त्यामुळे सर्वांनी त्याचे अत्यंत कोडकौतुकाने लाड केले. त्यामुळे तो अतिशय उडाणटप्पु निघाला. त्याच्या तीन मोठ्या बहिणी लग्न होऊन आपापल्या सासरी निघून गेल्या. तेव्हां आईवडिलांना त्याची खूप चिंता वाटू लागली. कारण त्रिकालचे अभ्यासात अजिबात लक्ष नव्हते.

एके दिवशी एक साधु जगन्नाथच्या दारासमोर येऊन उभा राहीला व हांका मारून म्हणाला–"माई, मला भिक्षा घाला व आपल्या विवंचना दूर करा."

ती हांक ऐकून जगन्नाथ धावतच बाहेर आला आणि त्या साधूला पाहून म्हणाला–"स्वामी, आमच्या घरची भिक्षा स्विकार करावीत."

तेव्हां त्या साधूने जगन्नाथच्या घरचे जेवण जेवून संतुष्टी दर्शवली आणि म्हणाला–"तुम्ही मला संतुष्ट केलेत. तेव्हां सांगा आपल्याला कसली चिंता आहे."

जगन्नाथने साधूला मुलांविषयी सर्व गोष्टी ऐकवल्या आणि विचारले–"महात्मन, आम्हांला उद्या आहोत का नाही ते माहीत नाही. तेव्हां आम्हांला काळजी वाटते. पुढे आमचा मुलगा आयुष्य कसे जगणार."

साधुने मुलाला पहाण्याची इच्छा प्रकट केली. जगन्नाथने आपल्या बायकोला शेजाऱ्याच्या घरी पाठवून त्याला आणावयास सांगितले.

साधूने त्रिकालला आपल्या जवळ बसवत त्याचा हात निरखून पाहिला व जगन्नाथला म्हटले–"महाशय, तुम्ही तुमच्या मुलाची



अजिबात काळजी करू नका. त्याला राजाश्रय प्राप्त होणार आहे. ते वैभव पहाण्यासाठी तुम्ही जगणार आहात."

"स्वामी, त्रिकालला कोणत्याही शिक्षणाची आवड नाही. असे असताना तो राजाश्रय कसा काय मिळवु शकेल?" जगन्नाथने व्याकुळतेने विचारले.

तुझे म्हणणे खरे आहे. परंतु कोणत्याही गोष्टीसाठी साधनेची जरूरी असते. तू त्रिकालला संस्कृत शिकव. तो ह्याच भाषेद्वारे राजाश्रय प्राप्त करेल." साधूने सांगितले.

जगन्नाथने चिंतेने विचारले–"महात्मन, हा साधारण विद्या सुद्धा शिकत नाही तेव्हां संस्कृत कसे काय शिकेल?"

तेव्हां त्रिकाल वडिलांना म्हणाला–"बाबा, तुम्ही उगाच कशाला काळजी करता. मी कष्टाने संस्कृत शिकेन. पहा हो, तुमच्या मुलाच्या उपजत गुणांची झल्लक त्याला तर आताच संस्कृताची अभिरुची निर्माण होवू लागली आहे. माझ्या सांगण्यावर विश्वास ठेवा." असे सांगून साधू निघून गेला.

जगन्नाथला संस्कृत भाषेची थोडीफार माहीती होती. त्यामुळे त्याने, आपल्या मुलाला त्या दिवसापासून संस्कृत शिकविण्यास सुरवात केली. परंतु त्रिकाल एक शब्द देखिल शिकू शकला नाही.

एक दिवस जगन्नाथ व्यथित होत पत्नीला म्हणाला–"ऐकलस कां, आपला मुलगा अगदीच बुद्दु आहे. भाषेचे ज्ञान त्याला झाले नाही तर त्याचे भविष्यपण व्यर्थ तेव्हां मला समजतच नाही मी आता काय करावे?"

"तुम्ही कायहो साध्या साध्या गोष्टी सुद्धा समजण्यासारख्या सांगत नाहीत. तेव्हां त्रिकाल सस्कृत काय शिकणार कप्पाळ! त्याला चांगल्या गुरुची आवश्यकता असते." त्रिकालच्या आईने नवऱ्याला समजावत म्हटले.

जगन्नाथला बायकोंचे म्हणणें पटले पण त्याच्या गावात संस्कृत शिकविणारा एकही



गुरू नव्हता. पण शेजार गावी माताचरण नावाचा एक संस्कृत पंडीत रहात होता. त्याच्याबद्दल अशी प्रसिद्धी होती की, तो मनुष्यालाच काय पण जनावरांना सुद्धा संस्कृत शिकवून प्रवीण करत असे. तेव्हां जगन्नाथने त्रिकालला त्या गुरूंच्या पाशी नेले व त्याला त्यांचा हाती सोपवले.

तेव्हां गुरूंनी जगन्नाथना म्हटले–"महाशय, भाषा शिकणे म्हणजे एक कला आहे. त्यात संस्कृत ही भाषा सर्वात कठीण तरी सुद्धा दोन वर्षाच्या आत मी तुमच्या मुलाला संस्कृत शिकवून तरबेज करेन त्याला भाषांचे पूर्ण ज्ञान देईन."

"गुरुदेव, खरोखरी माझ्या मुलाला संस्कृत येईल कां? तुम्ही त्याचे म्हणता सारे आयुष्य संस्कृत भाषेवरच अवलंबून आहे." जगन्नाथ म्हणाला.

"तुम्ही हताश होवू नका. मी अशी प्रतिज्ञा केली आहे की माझ्या पाशी यऊन जो संस्कृतचे ज्ञान न घेता परत जातो त्या दिवसा पासून मी संस्कृत शिकवणे सोडून देतो आणि आजपर्यंत असा कोणताही विद्यार्थी निघाला नाही की, तो संस्कृतचे शिक्षण न घेता परत गेला आहे." माताचरणने त्यांना म्हटले.

जगन्नाथना त्याचे बोलणे ऐकून अत्यंत आनंद झाला. माताचरणांनी त्रिकालला



संस्कृत शिकविण्यास सुरवात केली आणि शेवटी ते अशा निर्णयाला पोहोचले की, त्रिकालला संस्कृत शिकविणे आपल्याला कदापी शक्य होणार नाहीं. परंतु ही गोष्ट त्यांनी जर स्विकारली नाही तर आपल्याला आपला पेशा चालवणे कठीण होईल.

त्या कारणानी माताचरणांनी दोन वर्षे मोठ्या कष्टाने त्रिकालला शिक्षण दिले. नंतर म्हणाले–"ऐक, आता तुझे शिक्षण संपले. तुझी संस्कृत भाषेत बरोबरी करणारा कोणी विद्वान नाही. परंतु एक लक्षात ठेव. तू नेहमी मोठ्या पंडितांबरोबरच गप्पामोष्टी कर. साधारण लोकांबरोबर नको. संस्कृत ही देवभाषा आहे. त्यामुळे



ती साधारण लोकांसोबत बोलण्याची नाही.

त्रिकालने प्रसन्नतापूर्वक गुरूनां साष्टांग नमस्कार घालला व त्याचा निरोप घेत निवेदन केले. "गुरुदेव, मी आपले ऋण जन्मभर विसरणार नाही. तुम्ही माझ्या भविष्याबद्दल एक चांगला मार्ग दाखविलात. मीं तुम्हांला गुरुदक्षिणेंच्या रूपाने काहीतरी देईन कृपा करून सांगा तुम्हाला काय हवे ?"

"बाळ एक लक्षात ठेव जर तुला कोणी विचारले की तुला संस्कृत कोणी शिकवले तर चुकून सुद्धा तू माझे नाव सांगू नकोस हीच मला तुझी गुरुदक्षिणा समज." गुरू म्हणाले.

त्रिकालने गुरूंनी सांगितलेली गोष्ट मान्य केली व आपल्या घरी परत येऊन वडिलांना म्हणाला–"बाबा, मी पूर्णरूपाने संस्कृतचे ज्ञान प्राप्त केले आहे. तेव्हां त्यांना आपल्या मुलाच्या ज्ञानाची परिक्षा घ्याविशी वाटली.

तेव्हां त्रिकाल त्यांना म्हणाला–"बाबा, गुरूंची आज्ञा आहे की मी फक्त महा-पंडीतांच्या बरोबरच संस्कृत मधे बोलावे अन्य लोकांच्या बरोबर नाही. त्यामुळे मी आपल्या बरोबर बोलू शकत नाही. जर का तुम्ही कोणता चांगला मुहूर्त काढलात तर मी देशाटनाला जावे म्हणतो. माझा असा मानस आहे की, देशातील संस्कृत पंडीतांना शास्त्रार्थात मी पराजित करून दाखवीन.

जगन्नाथला आपल्या मुलाचे बोलणें ऐकून अत्यंत आनंद वाटला. ते म्हणाले–"बाळ, मला खात्री आहे. त्या साधुचे बोलणे खरे होणार तू नक्कीच देशाटनाला जा." असे म्हणत त्यांनी एक शुभमुहूर्त काढला व आपल्या मुलाला पाठवले.

राजधानीच्या वाटेवर असलेल्या स्वर्ण-पुरच्या ठिकाणी त्याने आपला मुक्काम ठोकला आणि एका चांगल्या गृहस्थाच्या ठिकाणी उतरला. त्याची बायको अत्यंत भांडकुदळ होती. परक्या माणसाला घरात आश्रय दिला हा आरोप नवऱ्यावर लादून ति त्याच्याशी भांडू लागली.

ते ऐकून त्रिकाल अत्यंत शांत स्वरात म्हणाला–"बाई. मी संस्कृतचा एक महान पंडीत आहे. माझ्या येण्याने तर तुमचे घर पवित्र झाले तुम्ही खुश व्हा."

त्रिकालचे बोलणे ऐकून ती भांडकुदळ बाई त्याच्यावर जास्तच उखडली म्हणाली–"अरे, संस्कृतमधे पंडीत होणें म्हणजे काय मोठे शहाणपण आहे? मी सुद्धा पंडीत आहे!"

ते उत्तर ऐकून तो प्रसन्न झाला व म्हणाला ही तर चांगलीच संधी आहे आपण दोघे संस्कृतमधेच गप्पा मारू" असे म्हणून तो तिच्याशी संस्कृतमधे बोलू लागला.

त्रिकालचे बोलणे ऐकून ती भांडकुदळ बाई दचकुन गेली. तिने आजतागायत अशी भाषा कधी ऐकलेली नव्हती. तिला वाटले की त्रिकाल कोणी महान मांत्रिक असावा ती घाबरत म्हणाली–"महाशय, मला शाप देऊ नका. माझ्या पतीने मला चांगला धडा मिळावा ह्या कारणाने आपल्याला बोलावलेले दिसते आहे. मी ह्यापुढे माझ्या नवऱ्याने सांगितलेले सर्व ऐकने."

त्रिकालने विचार केला की, आपल्या पांडित्यानेच त्या बाईच्या वागण्यात अदभुत बदल घडला. आपल्या भांडकुदळ बायकोच्या स्वभावात बदल झाल्यामुळे गृहस्थाने त्रिकालला शंभर सोन्याची नाणी बक्षीस दिली व म्हटले–"आमच्या स्वर्णपुर गावात





कवितानंद नावाचा एक संस्कृत पंडीत आहे त्यांनी प्रतिज्ञा केली आहे की त्यांना जो कोणी पराजित करेल त्याला एक हजार सुवर्णमुद्रा बक्षिस मिळतील तुम्ही त्यांना आजच जाऊन भेटा ?"

दुसऱ्या दिवशी त्रिकालने पहाटे कवितानंदाची भेट घेतली व आपल्या येण्याचे कारण सांगत संस्कृत मधे बोलू लागला. त्याचे ते बोलणें कवितानंदाच्या बिलकुल डोक्यात शिरले नाही. ते आपल्या अर्धवट ज्ञानाला खुप मोठे समजून स्वतःला विद्वान मानत होते.

त्रिकालचे बोलणे ऐकून तें बिचकले त्यांनी मनाशी विचार केला की, हा कोणी आपल्याहून महान पंडित असावा. ते म्हणाले—"महाशय, तुमच्या बरोबर शास्त्रार्थ करून जर कां मी हारलो तर स्वर्णपुरमधील माझी प्रतिष्ठा धुळीस मिळेल. मी तुम्हांला एक हजार सुवर्णमुद्रा देतो. तुम्ही परत जा. नाहीतर आमच्या देशाचा राजा वराहसेन संस्कृत भाषेचा गाढा आहे. त्यांच्या समोर तुम्ही आपले पांडित्य दाखवा."

त्रिकालने कवितानंदाचे म्हणणे मान्य केले व त्यांच्यापासून एक हजार नाणीं घेऊन तो सरळ राजधानीच्या मार्गाला लागला. तेथे पोहोचल्यावर चौकशी अंती त्यांना असे समजले की राजदरबारात चतुरपाद नावाचा एक संस्कृत पंडीत आहे प्रथम त्यांची भेट केली तरच राजाची भेट होते. त्रिकाल चतुरपाद पंडीताना भेटला व त्यांच्या समोर आपल्या पांडित्याचे प्रदर्शन केले.

चतुरपादने त्रिकालला दटावीत म्हटले—"मुला, संस्कृत भाषा अत्यंत मधुर असते. तुझ्या तोंडून ती भ्रष्ट होऊन बाहेर पडते आहे. तुझ्या उच्चारामधे सुद्धा भाषा व व्याकरण ह्याचा अभाव आढळतो आहे. आमच्या देशाचे राजा वराहसेन ह्यांनी जर कां तुझ्या तोंडी भाषा ऐकली तर ते तुझी जीभ छाटून टाकतील. तू कष्ट करून तुझे



आयुष्य आनंदाने घालव परतीच्या वाट खर्चास जर तुला पैसे पाहीजे असतील तर मी तुला शंभर सोन्याची नाणी देतो.

चतुरपादच्या बोलण्यावर त्रिकालचा विश्वास बसला नाही. तो चिडून त्याला म्हणाला—"तुम्ही माझ्या पांडित्याचा द्वेष करता आहांत आणि असा विचार करून घाबरता की मी राजाचे दर्शन घेतले तर तुम्हांला तुमच्या पदाची भीती निर्माण होईल." असे म्हणत त्यांनी चतुरपादची निंदा केली.

चतुरपाद शांतपणे म्हणाले—"मी तर तुझ्या हिताची गोष्ट सांगितली ते सोडून तू मलाच दोष देतोस. इथे काही दिवसांपासुन महाराजांचे आरोग्य ठिक नाही. ते अस्वस्थ आहेत. तुला मी राजाचे दर्शन करवतो. त्यानंतर जे काय व्हायचे ते तुझे नशिब."

"राजाचे दर्शन घेतल्यानंतर नक्कीच मला राजदरबारात नोकरी मिळेल. ह्याची मला खात्री वाटते तसे झाले तर मी आपला अत्यंत आभारी होईन." त्रिकाल त्यांना म्हणाला.

"ऐक, राजाच्या समोर ही गोष्ट उघडी करू नकोस की माझ्या मुळे तुला राजाचे दर्शन खूप झाले. तेवढे सांभाळलेस तरी खूप." चतुरपाद म्हणाले.



त्याच दिवशी त्रिकालला राजाचे दर्शन झाले. राजा वराहसेनने विचारले—"तू कोण ? आणि कशा करीता आला आहेस ?"

"माझे नाव त्रिकाल आहे. मी संस्कृतचा महापंडीत आहे. मी माझ्या पांडित्याचे प्रदर्शन करून राजाश्रय मिळविण्याच्या हेतूने आलो आहे." त्रिकाल एका दमात त्यांना म्हणाला.

त्यावेळी राजा अत्यंत थकलेले होते. त्यांनी त्रिकालला म्हटले—"तू तर अगदी लहान दिसतो आहेस. मग तुला एवढे संस्कृतचे अगाध ज्ञान कसे ?"

"एका गुरुनीं मला दोन वर्षाच्या आत निष्णात पंडीत बनवले आहे" असे सांगून

त्रिकाल राजा बरोबर संस्कृत मधे बोलू लागला.

त्रिकालचे बोलणे ऐकून वराहसेन राजाला खदखदून हंसू आले. त्यांनी हसणे कसेबसे सावरले व म्हटले–"सांग, कोणत्या गुरुपाशी तू ही विद्या प्राप्त केलीस.

"माझ्या गुरूने मला सांगितले आहे की माझे नाव गुप्त ठेवणे हिच तुझी मला गुरुदक्षिणा आहे. म्हणून मला त्यांचे नावं सांगता येणार नाही." त्रिकाल म्हणाला.

राजाला त्याचे उत्तर ऐकून पुन्हां हंसू येऊ लागले त्यांनी त्रिकालकडून सर्व गोष्टीची माहीती काढली आणि त्या रात्री त्याला आपल्या शयनगृहात झोपण्यास सांगितले.

दुसऱ्या दिवशी राजवैद्याने येऊन राजाला तपासले व अत्यंत आनंदाने म्हटले–"महाराज, एका रात्रीत आपल्या तब्बेती मधे फार मोठा बदल घडला आहे. मला वाटते की, माझ्या औषधाचा आपल्यावर चांगलाच उपयोग होवू लागला आहे.

"जेव्हां माणसाचे शरिर व मन सहमत असते तेव्हांच औषधांचा त्याला उपयोग होतो. मी अनेक कारणांनी त्रासलो होतो. तशा स्थितित त्रिकालच्या संस्कृत भाषेने माझ्या मनाचे मनोरंजन झाले. मग काय मी मागच्या साऱ्या गोष्टी क्षणात विसरून गेलो." राजा वराहसेन म्हणाले.

ह्यानंतर त्रिकालला राजदरबारात राजाश्रय प्राप्त झाला. तो संस्कृतच्या भाषेने राजदरबारी लोकांचे मनोरंजन करू लागला. हेच त्याचे रोजचे काम झाले.

अशाप्रकारे राजाश्रय मिळाल्यानंतर त्रिकालने आपल्या आईवडिलांना राजधानीला बोलावून घेतले आपल्या मुलाची प्रगती पाहून आनंदाने त्याचे वडिल जगन्नाथ मनात म्हणून लागले कसे कां होईनां साधूने वदवलेली वाणी सत्य सिद्ध झाली.





# अग्नि द्वीप

[ २ ]

[धवलगिरीचा राजकुमार चित्रसेन शिकारीला गेला. त्याने एका पहाडीभागातील गुहेमधे एका सिद्धपुरूषाला पाहिले. त्या सिद्धपुरूषाने त्याला एक वेताने बनवलेली टोपली दिली. त्याच्या आत त्याला अदभुत सुंदर महाल दिसला. तेवढ्यात भयंकर उग्राक्ष नावाचा राक्षस अवतिर्ण झाला. चित्रसेनने आपला पहिला मुलगा देण्याचे त्याला वचन दिले. ह्यानंतर...]

उग्राक्ष त्या घनदाट जंगलात एकदम अदृश्य झाला. चित्रसेनला मोठे हायसे वाटले की, चला राक्षसाची पाठीमागची कटकट तरी मिटली. आपण जिवानिशी सुटलो. आता त्याला त्याच्या पुढे एकच गहन प्रश्न निर्माण झाला की, आता कोणताही प्रयत्न करून धवलगिरी नगरात पोहोचावयास हवे. ते कसे साध्य करायचे? हाच विचार करीत चित्रसेन ताडकन् उठून उभा राहीला. त्याने पश्चिम दिशेकडे वळून पाहिले. आता सूर्यास्ताला अगदी थोडा अवधीच उरलेला होता. त्याच्या दृष्टी समोर आकाशाला भिडणारा गगनचुंबी एक महाल उभा होता. त्याच्या चारी तटावर सूर्याची लाल पिवळी किरणे चमचम करीत होती. त्या प्रकाशाने सर्व किल्ल्यांचे तट सुद्धा तेजाने झळकुन निघत होते.



"अरे वा! किती सुंदर महाल आहे. ह्या महालाच्या आत कोणाचे वास्तव्य असावे? अस्वले गिधाडे तर रहात नसतील नां? असा विचार मनाशीं करीत तो दुसऱ्या बाजूला वळून चालू लागला.

चित्रसेन चारपांच पावले चालत गेला असेल नसेल तेवढ्यात त्याला एक मंजुळ ध्वनी ऐकू आला–"महाराज!" महाराज कोण आहे? ह्या अशा जंगलात माणसाचा आवाज कसा बरे? असा विचार करीत चित्रसेन आश्चर्य करु लागला. त्याने मागे वळून पाहिले. त्याच्या डोळ्यावर विश्वास बसेना तीन माणसे अत्यंत मौल्यवान किंमती वस्त्रे आभुषणे घातलेली व त्याच्या पाठीमागे काही शिपायी सैनिक उभे असल्याचे त्याला दिसले. तो विचित्र प्रकार पाहून चित्रसेनने स्वतःला चिमटा काढून पाहीला. तो काही बोलणार इतक्यात त्यातील एक माणूस पुढे आला व त्याला प्रणाम करीत म्हणाला–"महाराज, आपण बराच वेळ होऊन गेला तरी राजमहालात परत आला नाहीत म्हणून आम्ही आपल्याला जंगलात खूप शोधले शेवटी आपली इथे भेट झाली."

"मी महाराज आहे?" आश्चर्यचकित होत चित्रसेनने विचारले.

ते उत्तर ऐकताच चित्रसेनला महाराज म्हणणारी व्यक्ति झटक्यात मागे झाली व अत्यंत केविलपणे सेनापतीला म्हणू लागली–"सेनापती, असे वाटते की महाराज खूप थकलेले आहेत भोई लोक कोठे गेले?"

"मंत्री महाशय, आपण त्या लोकांना झाडाच्या आडोश्याला लपून राहून आपण आज्ञा करण्याची वाट पहायला सांगितले होते नां! असे म्हणून सेनापती त्यांच्या पासून थोडा दूर गेला व तेथून जोरात टाळ्या वाजविल्या तितक्यात संकेत करीत काही लोक पुढे आले. पाठोपाठ त्यांना काही शब्द ऐकू आले–"सरकार, आम्ही आलोच आहोत." असे म्हणत एका





अवजड मेणा उचलून घेऊन चार बलदंड माणसे समोर आली.

सेनापतीकडून आदराने मंत्री म्हणवला गेलेला माणुस मोठ्या श्रद्धेने चित्रसेनच्या समोर आला मान झुकून प्रणाम करीत म्हणाला–"महाराज, मी पालखी मागविली. आपण त्यात चढून बसावे. हे भोई लोक मोठ्या सावधतेने आपल्य ला राजमहालामधे नेऊन पोहोचवतील. आपल्याला कोणतेही शारिरीक कष्ट पडणार नाहीत."

मंत्र्याच्या बोलण्याने चित्रसेनला खरोखरीच आपण खूपच परिश्रम केले की काय असे उगाचच वाटू लागले आणि त्याने अगदी एक पाऊलही उचलवत नसल्यासारखे भासवून एकदम पालखीत उडी मारली. मंत्र्याने भोयांना आज्ञा केली. "हूं" आता तुम्ही जाऊ शकता. तितक्यात एका माणसाने जवळ येत मंत्र्याच्या कानामधे काही तरी येऊन सांगितले. मंत्र्याने त्या माणसास समजावीत म्हटले–"खजिनदार, क्षमा करा ह्या क्षणी महाराजाना विश्रांतीची अत्यंत जरूर आहे. त्यामुळे ह्या विषयावर नंतर चर्चा केली जाईल ही वेळ गप्पांची नाही."

पालखीत स्थानापन्न झालेला चित्रसेन मनातल्या मनात कल्पनेनेच दंग झाला–"अरे वा, माझ्यासाठी राजमहालच काय पण मंत्रीं, सेनापती खजिनदार वगैरे सुद्धा आहेत."

थोड्या वेळातच भोयांनी चित्रसेनला राजमहालातील सर्वात वरच्या महालात उतरविले. चित्रसेनने पालखीतून खाली उतरुन मोठ्या दालनात प्रवेश केला. तेथे असलेले वैभव पाहून त्याचे डोळ्याचे पारणे फिटले. जमिनीवर मऊमऊ गालिचे घातले होते. गाद्यालोड तक्के अतिशय मुलायम होते. खांबावर असंख्य फुलेपाने काढलेली होती. त्याला आपण स्वप्नात तर नाही ना असे क्षणभर वाटू लागले.

शेवटी त्याने विचार केला की, हे सारे सिद्धपुरुषाच्या महिमांचे फळ आहे. त्याने

आपल्या मनाची खोटी समजुत घातली. ज्या सिद्धपुरुषाला एका छोटया टोपलीतून महाल उत्पन्न करता आला. त्याला काय सेनापती मंत्री नोकर चाकर सेवकांना निर्माण करणे कठीण होईल ?"

चित्रसेन मनातून आपल्यावर उपकार करणाऱ्या त्या सिद्धपुरुषाला आठवून त्याचा विचार करीत होता. तेवढयात त्याच्या समोर पंचपक्वान्नाने भरलेले थाळे ठेवण्यात आले. त्याला दुपारपासून अतिशय भुक लागलेली होती. त्यामुळे त्यानें समोरचे पदार्थ मिटक्या मारीत पोटभर खाल्ले त्यानंतर मऊ गादीवर विश्रांती घेत पुढे काय करावे ह्याचा विचार करू लागला.

त्याच विचारात पेंग येऊन तो झोपी गेला. जेव्हां त्याची झोप उघडली तेव्हां त्याच्या अंगावर सूर्याची कोवळी कोवळी किरणे राजमहालाच्या झरोक्यातून सरळ त्याच्या शयनशय्येवर येऊन पडली होती. त्यावर त्याने मनाशी म्हटले की, ह्या अपूर्व महालात आपण एक पूर्ण रात्र आनंदाने घालविली. आता काय ? पहाट झाली. त्याने उठून प्रातर्विधी आटोपले व तो त्या दालनातून बाहेर पडू लागला तितक्यात दारातच त्याची व मंत्र्याची भेट झाली. ते म्हणाले–"मला खात्री वाटते की आपण पूर्ण रात्र सुखनिद्रेचा अनुभव घेतला असावा. आपली आज्ञा असेल तर मी राज्या संबंधीत काही मुख्य गोष्टी आपणास निवेदन करू इच्छितो.

तसे पाहिले तर, चित्रसेनला राज्य राज्यकारभाराविषयी काहीही माहीती नव्हती, त्याचे वडील धवलगिरीवर राज्य करीत होते. त्याच्या नंतर तर त्याचा मोठा भाऊ शुरसेन राज्याचा वारस होता. त्या कारणामुळे त्याने कधी राज्या बाबतीत जिज्ञासा ठेवली नाही की रूची घेतली नाही. परंतु मंत्र्याने जेव्हां हि समस्या त्याच्या समोर ठेऊन त्याचे ध्यान तिकडे वळविले त्यावेळी क्षणभर त्याला आपल्या आईवडिलांची आठवण झाली. जर कां आपला मोठा भाऊ सुखरूप धवल-गिरीला पोहोचला असेल तर आपल्या विषयी कुशल क्षेम विचारून ते दोघे चिंतेने व्याकुळ होऊन जातील, त्याकरीता सर्वात प्रथम आपण कुशल असल्याचा समाचार अवगत करून घेतला पाहिजे.

तसा विचार करून चित्रसेन मंत्र्याला म्हणाला–"मंत्रीराज, आपण धवलगिरी राज्याविषयी काहीतरी जाणत असालच. तेव्हां त्या राज्याचा राजा तारकेश्वर ह्यांच्याकडे मी कुशल असल्याचा समाचार ताबडतोब पाठविण्याची व्यवस्था करा नंतर इतर गोष्टींच्या बाबतीत आपण खुलासेवार चर्चा विनिमय करू."

"जशी आज्ञा महाराज, मीं आताच तसा निरोप पाठवून देतो. राजा, खजिन-दाराने खजिन्यात असलेल्या संपत्तीची एक







नोंदणी केली आहे. ती तुमच्याकडे आणून देण्यासाठी मी सेवकांना सांगू काय ?" मंत्र्याने राजाला विचारले.

"खजिनदाराला इथे येण्याची जरूर नाही, परंतु खजिन्यातील संपत्तीची नोंदणी माझ्याकडे पाठविण्याची आज्ञा करा." तो म्हणाला.

थोड्या वेळाने सेवकांनी खजिन्यातील नोंदणी राजापाशी आणून दिली. खजिन्यातील संपत्तीची नोंदणी पाहून चित्रसेन अत्यंत चकित झाला. इतके रत्न मोती माणिक जडजवाहीर त्याने पूर्वी कधी पाहीले ही नव्हते त्याने विचार केला की एवढी संपत्ती आपल्या पित्याकडे सुद्धा नसावी.

त्या दिवशी संध्याकाळी चित्रसेन खजिनदारा समवेत संपत्तीची पहाणी करीत होता. तेव्हां दूतांनी येऊन राजाला समाचार दिला कीं, त्याचे पिता तारकेश्वर सहपरिवार भेटीस येत आहेत.

तो समाचार मिळताच चित्रसेन महालाच्या समोर येऊन उभा राहला.

आपल्या मुलाला पहाताक्षणी तारकेश्वरला अतिशय गहिवरून आले. त्याने मुलाला प्रेमभराने जवळ घेऊन आलिंगन केले आणि म्हणाले—"बेटा, तुझ्या मोठ्या भावाने येऊन जी हकीकत मला सांगितली तेव्हां मला वाटले की, तुला कोणी जंगलातील रानटी श्वापदाने खाऊन टाकले असावे. परंतु तुला प्रत्यक्षात अशा अवस्थेत पाहून माझा आनंद गगनात मावेनासा झाला आहे. येथील काही सेवकांनी आम्हांला सांगितले की, तू ह्या ठिकाणाचा राजा आहेस. काय हे सर्व खरे आहे का? हा अद्‌भुत महाल तुझा आहे का ?"

वडिलांच्या प्रश्नाची खरी उत्तरे देण्यासाठी चित्रसेनने उगाच मान हलविली.

"हे असे महान मोठेपण तुला इतक्या सहजासहजी कसे काय प्राप्त झाले. ह्यापूर्वी ह्या महालात कोणता राजा रहात होता. आता ह्याक्षणी ते कोठे आहेत ?" तारकेश्वराने त्याला एका पाठोपाठ विचारले.







"ह्या सर्व गोष्टीचे रहस्य मी आपल्याला एकांतात सांगेन राजदरबारी लोकांना ह्या गोष्टी समजता कामा नये." चित्रसेनने गुप्तपणे सांगितले.

त्या दिवशी रात्री धवलगिरीचा राजा तारकेश्वर व त्याच्या बरोबर आलेल्या सहपरिवारांना मोठ्या थाटाने मेजवानी व मनोरंजनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. त्या समारंभात राजदरबारी लोकांनी व जंगली सरदारानी जातीने भाग घेतला होता. जेव्हां प्रजेतील लोकाना समजले की धवलगिरीचा राजा तारकेश्वर ह्याचाच मुलगा चित्रसेन आपला राजा आहे. तेव्हां त्यांना अतिशय आनंद वाटला.

मेजवानी व समारंभ आटोपताच एकांत पाहून चित्रसेनने आपले पिता तारकेश्वर ह्यांना सारा वृत्तांत कथन केला. तेव्हां पासून की सिंहाना पाहून आपला घोडा उधळला होता. तेथून ते राक्षसाने जे वचन दिले तेथेपर्यंत त्याने सर्व घडलेल्या गोष्टी सांगितल्या.

"बाळ, तु जे राक्षसाला वचन दिलेस. कसे काय पाळणार आहेस? त्यातून आपल्या सारख्या क्षत्रिय धर्माच्या राजाने आपला प्रथम पुत्र अशा प्रकारे राक्षसाच्या हाती सोपवणे म्हणजे ते काही न्यायसंगत होणारे काम नाही." तारकेश्वरने सांगितले.

"बाबा, अजुनपर्यंत माझे लग्न सुद्धा झाले नाही. ही समस्या तर तेव्हांच उत्पन्न होईल जेव्हां माझे लग्न होईल व मला पहिला मुलगाच होईल व तो अठरा वर्षे जगेल. तेव्हां काही तरी मंत्रतंत्राचा उपयोग करून त्या वचनातून सुटण्याचा प्रयत्न करता येईल," चित्रसेन म्हणाला.

तारकेश्वरला मुलाचे म्हणणे तितकेसे पटले नाही. गोष्ट अशी होती. उग्राक्षाचा संहार करणे फार कठीण होते. त्यावर विचारान्ती तारकेश्वर मुलाला म्हणाला—"एक बाळ, तुझे राज्य धवलगिरीच्या सीमेपाशीच जोडलेले आहे. जेव्हां तुला माझी आवश्यकता वाटले तेव्हा मला पूर्वसुचना दे." मी तावडतोब मदतीस येईन. (क्रमशः)



# मत्सराचे फळ

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू श्रम करीत आहेस ते प्रशंसनीयच आहे परंतु तुला माहीत आहे का, तुला दुसऱ्याची उन्नती झालेली डोळ्यांनी पहावत नाही. तू त्याचा प्रतिकार करण्यासाठी अपूर्व शक्ति प्राप्त व्हावी म्हणून तर झटत नाहीस नां! तसे असेल तर तुला केव्हाना केव्हां तरी हार मानावीच लागले. ह्याचे उदाहरण म्हणून मी तुला एका पिता पुत्राची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

लवंग देशात चक्रभुपती नावाचा एक मोठा जमिनदार होता. त्याला बरीच वर्षे मुलबाळ झाले नाही. त्यामुळे तो चिंता



मग्न असे की, आपल्या इस्टेटीला कोणी वारस नाही. तो नेहमी उपासतापास पुजा-अर्चा तिर्थयात्रा वगैरे पुत्रप्राप्तीच्या आशेने करीत होता. तरी सुद्धा त्याला मुल झाले नाही.

चक्रभुपतीच्या घरीं गोपाळ नावाच एक नोकर होता. तो सुमारे त्याच्याच वयाचा होता आश्चर्य व संयोगाची गोष्ट म्हणजे त्याला सुद्धा मुलबाळ झाले नाही. त्या एकाच गोष्टीमुळे ते दोघे मालक व नोकर हा भेदभाव मनात न ठेवता घनिष्ट मित्र बनले.

अशा प्रकारे अनेक वर्षे उलटली. एकदा त्या गावात एक साधु आला. तो लोकांच्या समस्या दूर करतो अशी बातमीं सर्वत्र झाली तेव्हां गांवातील लोक त्या साधुचे दर्शन करण्यास येऊ लागले.

बऱ्याच दिवसानंतर चक्रभुपतीच्या मनात साधूचे दर्शन करण्याचा विचार आला. तो साधु सात्वीक आहे व अनेक महिमा जाणणारा आहे असे समजले.

एके दिवशी जमिनदार आपल्या बायको-सह साधूचे दर्शन घेण्यासाठीं आला.

साधुने चक्रभुपतीच्या बायकोचा हात पाहुन त्याच्यावरील रेघा निरखून पाहिल्या व मंदहास्य करीत तिला आशिवाद दिला व तिच्या हातात एक ताईत देत त्यांना म्हणाला–" उभयतांनो, चिन्ता करु नका ह्या ताईताच्या प्रभावानें तुम्हांला निश्चित मुल होईल."

साधूने सांगितलेले ऐकून प्रसन्नतेने दोघे घरी परत आले. दुसऱ्याच दिवशी चक्र-भुपतीला एक गोष्ट समजली की, गोपालच्या पत्नीने सुद्धा साधूचे दर्शन घेतले. तेव्हां तिला सुद्धा साधुने एक ताईत देऊन तसेच सांगितले जसे आपल्या सांगितले.

यथासमयी दोघीं गरोदर राहील्या व त्या सुखरूप बाळंत होऊन दोघीनाही मुलगे झाले. त्या दोघांचा आनंद गगनात मावेनासा झाला. दोघांनी आपापल्या ऐपतीप्रमाणे दानधर्म केला. भुपतीने आपल्या



मुलाचे नाव 'कमल भुपती' ठेवले व गोपाळने 'चंद्र' असे ठेवले.

कमल व चंद्र खूप कोडकौतुकात वाढू लागले. ह्यानंतर दोघांनाही दुसरे अपत्य झाले नाही. त्यामुळे ते आपापल्या मुलावर जिवापाड प्रेम करून डोळ्यात तेल घालून त्यांची काळजी वाहू लागले.

ऐषआराम व सुख ह्यामुळे कमल फार हट्टी व खोडकर निघाला. पण उलट चंद्रला लहानपणीच जाणतेपणा आला तो फार समजुतीने वागू लागला.

त्या दोन्ही मुलांमधे हि जी भावना निर्माण झाली ती त्यांचे वय दहाबारा वर्षाचे होईपर्यंत जमिनदाराच्या लक्षात आली नाही.

कमल शाळेत न जाता घरीच शिके त्यामुळे त्याचे शिक्षण असुन नसल्यासारखे होते. चक्रभुपतीला ते समजण्यास अवधी लागला नाही की आपला मुलगा शिक्षणात अगदी कच्चा आहे. परंतु ही गोष्ट तो आपल्या मोठेपणामुळे उघड करून कधी बोलून दाखवित नसे त्याचा परिणाम चंद्रावर तो ईर्ष्या करू लागला व स्वतःच्या मुलाच्या काळजीने तो चिंतामग्न राहू लागला.

भुपतीने आपल्या मुलाला सुधारण्याचा आटोकाट प्रयत्न केला. परंतु आपला एकुलता एक मुलगा असल्याकारणाने त्याला रागावणे कधी जमले नाही. त्यामुळे त्याचा



परिणाम उलट झाला तो दिवसेदिवस मानसिक वेदनांमुळे खंगू लागला.

गोपालचा मुलगा शिक्षणात प्राविण्य संपादन करून शाळेत शिक्षकांच्या प्रेमास पात्र बनला. तेव्हां त्याला काशी नगरात जाऊन,एखाद्या चांगल्या विद्यालयात शिक्षण घेण्याची प्रबळ इच्छा उत्पन्न झाली.

हि गोष्ट चंद्रने आपल्या वडिलांना बोलून दाखविली. तेव्हां गोपालने मुलाला समजावणीच्या सुरात सांगितले–" बाळा, काशीमधे एक वेळ तुझी खाण्यापिण्याची व रहाण्याची सोय होईल. परंतु प्रवास खर्चा करीता तर पैसा पाहिजे नां! मी कोठून इतका आणू? हि गोष्ट तर माझ्या हाता

बाहेरची आहे. आपल्या वडिलांची आर्थिक स्थिती समजून चंद्रने मनांतल्या मनात ती गोष्ट दडपुन टाकली.

दोन दिवसानी चंद्रच्या गुरुंनी गोपालला भेटून म्हटले–"काय हो, तुम्ही आपल्या मुलाला काशीला पाठवत नाहीत का? कित्येक श्रीमंत मुलापेक्षा तुमचा मुलगा दुप्पट हुषार आहे. असे वाटते ही गोष्ट तुम्हांला माहीत नाही. अशा मुलाला तर तुम्ही चांगला पाठींबा देऊन शिकवले पाहिजेत परंतु त्याला निराश करणे योग्य नाही.

गुरुंनी सांगितलेले ऐकून गोपालला खुप वाईट वाटले. त्याने त्या दिवसापासून मनोमन निश्चय केला की कसेही झाले तरी आपल्या मुलाला आपण काशीला पाठवायचेच. अशा विचाराने तो आपल्या मालकाच्या घरी गेला.

त्याने आपला सारा वृत्तांत भुपतीला ऐकवला व विनंती केली–"मालक, मला थोडे पैसे आपण उधार द्या व पैसे माझ्या पगारामधुन थोडे थोडे कापुन घ्या."

भुपतीला प्रथमच आपल्या मुलाचे दुर्गुण व गोपालच्या मुलाची शिक्षणातील प्रगती पाहून अत्यंत ईर्ष्या वाटत होती. त्यामुळे त्याच्या मनांत त्याच्या विषयीचा राग उफाळून आला वडयाचे तेल वांग्यावर असा प्रकार झाला.

चक्रभुपती चिडून म्हणाला–"तू तर आता म्हातारा झाला आहेस तुला किती रूपये उधार पाहिजे आहेत रे. त्यातुन कितीही पैसे तू कर्ज म्हणून घे. ते तुला महीना थोडे थोडे असे परत किती दिवस म्हणून करता येतील. तू तुझी प्रकृती प्रथम पहा मगच हात पसर. प्रथम तुझ्या मुलाचे शिक्षण बंद करून त्याला कोठेतरी कामाला लावून टाक."

चक्रभुपतीला भयंकर राग आलेला पाहून गोपाल मुकाटयाने तेथून निघून गेला.

आपली मानसिक शांती ढळलेली विसरण्यासाठी भूपती थोडया गार हवेत फिरण्याच्या उद्देश्याने तेथील तळयाच्या काठी आला. तळयाच्या कांठावर एका ठिकाणी बसण्याच्या विचारात असतानांच थोडया दूरवर एका झाडाखाली कमल व चंद्र एकमेकांशी गप्पा गोष्टी करीत असलेले त्यांनी पाहिले.

चक्रभुपतीच्या मनांत कुतुहल निर्माण झाले की, ते दोघे कसल्या गप्पा गोष्टी करत आहेत की हाडवैऱ्यासारखे भांडत आहेत ते ऐकावे तसा विचार येताच ते लपत छपत जवळच्याच एका झाडाच्या आडोशाला येऊन उभे राहिले की तेथून त्या दोघांचे बोलणे आपल्याला स्पष्ट ऐकू येईल.

कमल कठोर शब्दात त्याला रागवित होता–"चंद्रा ऐक! मी तुझे प्रयत्न चालू असलेले पहात आहे कितीही झाले तरी तुला उच्च शिक्षणा करांता काशीला जायला मिळणार नाही.







ते ऐकून चंद्र शांत स्वरात त्याला म्हणाला–"भाऊ, तू तर माझ्यावर असा आरोप करीत आहेस की मी शिक्षण घेण्यास काशीस चाललो ते वाईट परंतु ह्या पाठीमागे काय कारण सांगितलेस माझ्या वडिलानी तर दृढ निश्चय केला आहे की मी उच्च शिक्षणास काशीला जावे. त्यांनी मला असे पण सांगितले की ते तुझ्यावडिलांकडुन उधार पैसे घेणार आहेत माझा पूर्ण विश्वास आहे की ते मला नक्की मदत करतील."

"तू उधारीवर पैसा घेऊन उच्च शिक्षण कां घेऊ पहातोस? ऐक, तू माझे म्हणणे ऐकून हि गोष्ट आपल्या मनातून काढून टाक. मी तुला पाहीजे तितके पैसे देईन. तू कोठेही दुसरीकडे जाऊन कामधंदा कर. पण शिकू नकोस." कमलने त्याला सांगितले.

"सध्या मला माझ्या शिक्षणा करीता पैशांची जरूरी आहे आणि तसे झाले नाही तर मला पैसा कशाला पाहीजे आहे?" चंद्रने त्याला दृढ स्वरात विचारीत म्हटले.

ते ऐकताच कमलला भयंकर संताप आला व तो तसाच उठला आपल्या घराकडे परत निघाला.

हे सर्व संभाषण ऐकून चक्रभुपतीला अत्यंत आनंद झाला त्याने घरी येताच गोपालला बोलावणें पाठवले. गोपाल येता क्षणीच त्याला ते म्हणाले–"गोपाल, हे पांचशे रूपये तू घे. तू आपल्या मुलाला उच्च शिक्षणासाठी काशीला पाठव, ह्यानंतर सुद्धा तुला जर पैशांची जरूर पडली तरी संकोच न करता सांग मी तुला देईन. चंद्रच्या शिक्षणा करीता जो काय खर्च होईल तो सर्व मी तुझा पुरा करीन. तुला त्यातील एक पैसा सुद्धा परत करावयाची जरूर नाही."

वेताळने येथवर गोष्ट सांगून विचारले–"राजा, चक्रभुपतीच्या मनामधे जो अचानक बदल झाला त्याचे काय कारण असू शकेल? चंद्रच्या मनामधे उच्च शिक्षण घेण्याची जी प्रबळ इच्छा झाली ती पाहून तर जमिनदाराचे मन बदलले नसेल नां? कारण आपल्या मुलाची शिक्षणामधील दिव्य प्रगती पाहून तर त्याचे मन दुबळे बनले नसेल नां? त्या कारणाने तर भुपतीने अशा निस्वार्थ भावाने उदारता दाखवून चंद्र करीता पैशांची मदत केलीच नसावी. ह्या पाठीमागे त्याचा काय हेतू असावा? या सर्व शंकाचे समाधान कारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमादित्य म्हणाला–"आपला मुलगा व चंद्र ह्यां दोघांच्यात जो वार्तालाप झाला. तो ऐकून भुपतीला सत्य परिस्थितीची कल्पना आली की चंद्रच्या शिक्षणामधे होत असलेले उज्वल यश पाहून कमल त्याचा मत्सर करतो आहे. आपल्या मनामधील उत्कर्ष करण्याची प्रबळ इच्छा जागृत होण्याने सुद्धा कोणताही व्यक्ति दुसऱ्याची महानता हृदयपुर्वक स्विकार करतो. भुपतीला पटले की हा बदल आता कमलमधे दिसून येत आहे त्याची वागणुक बदलण्याकामी हाच शिक्षणाचा पाया योग्य आहे. त्याच कारणामुळे तर चंद्र बद्दलची कमलच्या मनात द्वेष भावना जागृत आहे. तरी तसे असुन सुद्धा चंद्र आपल्या निश्चयावर निश्चल राहीलेला पाहून कमल तेथून चुपचाप निघून गेला. परंतु त्याच्यावर अत्याचार करण्याचा त्याने चुकून सुद्धा प्रयत्न केला नाही. अशा प्रकारे चक्रभुपतीने आपल्या मुलामध्ये झालेला बदल पाहिला त्यामुळे भुपतीने चंद्रच्या उच्च शिक्षणा करीता पैशाची मदत केली ती त्याच्या मनामधील शिक्षणाची आंच व त्याची दृढ मनोकामना ह्या कारणासाठी नाही. त्याने मदत केली ती स्वार्थ बुद्धीच्या प्रेरणेनी केली नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाच्या फांदीला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# ज्ञानोपदेश

विलासपुर गावात एकदा एक साधुयोगी आला व गावच्या वडाच्या पारावर बसून न्याय, धर्म, कर्तव्य, सदाचार ह्या विषयांवर उपदेश करु लागला. गावातील बरेच गांवकरी त्यांचा उपदेश ऐकण्यासाठी तेथे जमु लागले. उपदेशानंतर साधुयोगी लोकांना सांगे की, सर्वांनी येतांना आपल्या बरोबर एक मुठ तांदुळ व पाच पैसे घेऊन यावेत.

एक दिवस उच्च शिक्षा प्राप्त केलेल्या शंकर नांवाच्या एका माणसाने साधुला श्रद्धापुर्वक नमस्कार करीत विचारले–"स्वामी, आपला उपदेश ऐकून अनेक दुराचारी लोक सदाचाराने मार्ग क्रमु लागले आहेत. ह्याकारणाने गावातील अनेक मारामाऱ्या अत्याचार कमी झाले आहेत. परंतु आपण लोकांशी करीत असलेला व्यवहार पाहून मला राहून एक शंका येते. पण जर संमती देत असाला तर ती शंका मी आपल्या समोर उघड करतो."

"संकोच न करता निर्भयतेने विचार बाळ!" साधु म्हणाला.

"आपण आपल्या उपदेशाने तर लोकांना सत्संग वृत्तीने रहाण्याचा सल्ला देत आहात मग गावकऱ्याना तुम्ही तांदुळ व पैसे आणण्यासाठी सांगता हे काही उचित काम आहे कां?" शंकरने विचारले.

शंकरचे बोलणे ऐकून स्वामी मंदहास्य करीत म्हणाले–"बाळ. तुझ्या बोलण्याने तर असे स्पष्ट होते की, माझ्या हितोपदेशाने तुझ्या गावातील गावकऱ्याचे अकल्याण होत आहे हेच कल्याण मला शेजारगावच्या लोकांवरही करायचे आहे. त्याकरीता मला जिवंत राहीले पाहिजे ना! मी माझा चरितार्थ कसा करायचा?"

मग काय ह्यानंतर दुसऱ्या दिवसापासून गावातील लोकांनी स्वामीना तांदुळा बरोबर डाळ मीठ भाजीपाला सुद्धा आणून देण्यास सुरवात केली.



आपली देवळे :

## श्रीरंगम

श्रीरंगमच्या देवळात शेषशयन रंगनाथ स्वामीच्या मुर्तीची प्रतिष्ठापना केली आहे. असे ऐकिवात आहे की, हि मुर्ती कोण्या एका काळात आयोध्यानगरात होती. श्रीरामचंद्रचे पुर्वज ह्याच मुर्तीची पुजा करीत होते आणि ही मुर्ती अयोध्येच्या रामभवनातुन येथे आणण्यात आली.



रावणाचा नाश करुन रामचंद्र जेव्हां सीतेला घेऊन लंकेमधून अयोध्येला परत आले तेव्हां बिभिषण पण त्यांच्या बरोबर आला. तो अयोध्येच्या राजमहालात स्थापित असलेल्या त्या मुर्तीला पाहून अत्यंत प्रभावित झाला. त्यावर रामचंद्रानी ती प्रतिमा त्याला देऊन टाकली.





ती प्रतिमा देताना एक अट घालण्यात आली की, ती प्रतिमा लंकमध्ये घेऊन जाईपर्यंत ती मुर्ती कोठेही खाली ठेवता कामा नये. परंतु ती घेऊन जाताना श्रीरंगम येथे एका ठिकाणी बिभिषणाने ती खाली उतरवून ठेवली. त्यानंतर किती प्रयत्न करुन सुद्धा त्याला ती मुर्ती उचलता आली नाही.












ती मूर्ती होती त्याच्या चोहोबाजुला बांधकाम करून देऊळ बांधण्यात आले तेव्हांपासून हे ठिकाण दिव्य क्षेत्र म्हणुन प्रसिद्धिस पावले. असंख्य भक्त-गण व यात्रेकरू श्री रंगनाथाच्या देवळात दर्शन करण्यास येऊ लागले. आण्डाल (गोदादेवी) नावांची एक भक्तिण रंगनाथाची सेवा करीत त्यात विलिन झाली.

कालक्रमाने रंगनाथाचे देवळात अनेक विभिन्न कार्यक्रमाचे स्थान बनू लागले. सुप्रसिद्ध तामीळ कवी कम्बन ह्यांनी रामायणाची रचना सर्वप्रथम भक्तांच्या समोर ह्या देवळातील देवाला समर्पण केली होती.





१२ व्या १३ व्या शतकात दिल्लीच्या सुलतानांनी ह्या देवळांवर हल्ला केला एका सुलतानाने गर्भगृहातील स्थित मूर्ती उचलून नेण्याचा प्रयत्न केला. परंतु भक्तगणांनी ती मूर्ती हलवून तिरुपती क्षेत्री सुरक्षित जागी नेऊन ठेवली परंतु उत्सव मूर्ती तो सुलतान उचलून बरोबर घेऊन गेला.

रामानुजाचार्यांनी सुलतानाला भेटून ती उत्सव मूर्ती पुन: श्रीरंगमला घेऊन जाण्याकरीता अनुमती मागितली. सुलतानाने त्याला आपला होकारही सांगितला.






परंतु सुलतानाच्या मुलीने त्या मुर्तीवर आपले अत्यंत प्रेम जडल्याचे सांगितले. व ती त्या मुर्तीला घेऊन जात असलेल्या गाडी पाठोपाठ चालू लागली. तिची स्मृती चिन्ह म्हणून रूपात श्रीरंगमच्या देवळात काही काही मुसलमानांचे संप्रदाय घालण्यात आले आहेत.

एकदा सुलतानाच्या एका सेनापतीने गुप्तरूपाने मंदिराची तोडफोड करण्या-करीता एक षडयंत्र रचले. ह्याबाबतीत त्या सेनापतीने आपल्या साथीदार लोकात जे गुप्तगु केले ते एका राज-दरबारी नर्तकीने गुप्तरूपे ऐकले.





त्या नर्तकीने सेनापतीला असे लोभीत केले व सांगितले की गोपुराच्या शिखरावर खजिना लपवून ठेवला आहे आणि त्याच्या बरोबर गोडगोड गप्पा करीत त्याला गोपुरावर चढून घेऊन गेली. तो जेव्हा असावध होता तेव्हा ती संधी साधून तिने त्याच्या पायाखालचा एक दगड अलगद हलवला तेव्हा तो कोलमडून खाली पडला व मरण पावला.

सात प्राकार एक हजार खांब व ओंकार विमान ह्या सर्वांनी सुशोभित असलेल्या श्रीरंगमच्या देवळात अनेक अपूर्व व अदभुत् शिल्प कोरलेले आहेत.





ह्या देवळात प्रामुख्याने मानल्या जाणाऱ्या उत्सवात प्रमुख पर्व म्हणजे वैकुंठ एकादशी आहे. योगमाया स्वरूपिणी बनलेल्या एकादशी देवीने मुरा नावाच्या राक्षसाचा ज्या दिवशी संहार केला तोच दिवस एकादशी. एकादशीच्या मुख्य दिवशी श्रीरंगनाथाचे दर्शन करणे म्हणजे पुण्य मिळते असा लोकांचा गाढ विश्वास आहे.



# विलक्षण उपाय

सोमनाथ नंबर एकचा पाजी माणुस होता.

त्याच्या घराच्या आजुबाजुला सुरीनाथ व मल्लिनाथ ह्या दोन सज्जन माणसांची घरे होती. शेजाऱ्या पाजाऱ्यांना कशा ना कशा तऱ्हेने शिव्यागाळ करून व भांडणे उकरून काढणे व त्यात आनंद मिळवणे ह्याची सोमनाथला अत्यंत घाणेरडी सवयच होती. तो अचकट विचकट गाणी म्हणून मोठमोठ्या आवाजात शेजाऱ्यांना त्रास देई. रस्त्यात जर त्याचे शेजारी त्याला भेटले तर अकारण चेष्टा मस्करी करून तो त्यांच्याशी न बोलताच गुर्मीने त्यांच्या समोरून निघून जात असे.

मल्लिनाथ त्याच्या त्या वागण्याला अजिबात दाद देत नसे. परंतु सुरीनाथ जात्याच स्वभावाने वेगळा होता त्याला ते अजिबात सहन होत नसे. त्यामुळे तो सोमनाथबरोबर भांडण करी. सोमनाथला सुद्धा तेच पाहिजे होते. तो सुरीनाथ भांडायचाच अवकाश की आकाश, पाताळ एक करीत धावून जाई ते पाहून तो घाबरून जात असे.

सोमनाथला तेवढे तो फावे उलट कांगावा करून ओरडत बसे–"काय रे मूर्खा, मला भडकवून मी गप्प बसेन वाटले काय? कान देऊन ऐक! मी तुला चांगला धडा देईन शपथ घेऊन सांगतो."

सोमनाथ अचकट विचकट बोलत आपल्या घरातील जो काय कचरा असेल तो शेजाऱ्यांच्या घरासमोर मुद्दामच फेकून देत असे त्याचा विचार असा होता की, सुरीनाथ बरोबर जर मल्लिनाथ सुद्धा आपल्याशी भांडायला आला तर काय मस्त मनोरंजन होईल. परंतु मल्लिनाथ तिकडे बिलकुल लक्ष देत नसे. परंतु सुरीनाथला मनापासून वाटे की मल्लिनाथने आपल्याला दुजोरा दिला तर याला चांगला धड शिकवता येईल.



सुरीनाथने जेव्हां हे सर्व मल्लिनाथला सांगितले तेव्हा तो हसून म्हणाला–"हे बघ बाबा, मला शेजारपाजाऱ्यांबरोबर भांडणे बिलकुल आवडत नाही.

ते ऐकताच सुरीनाथला अत्यंत राग आला. त्याने आपल्या अंगणात टाकलेले कचऱ्याचे टोपले उचलले व त्याच्या अंगणात फेकले, तरी सुद्धा मल्लिनाथ गप्प बसला.

अशा प्रकारे दोन दिवस उलटले. तिसऱ्या दिवशी सुरीनाथने मल्लिनाथला. हांका मारीत म्हटले–"मल्लिनाथ, आपल्या दोघांमधे भांडणे लावून देण्यासाठी हा सोमनाथ रोज कचऱ्याच्या टोपल्या आपल्या अंगणात आणून टाकतो. दिवसेंदिवस ह्या खोड्या वाढतच चालल्या आहेत. त्या करीता आपल्याला काहीतरी केले पाहिजे."

त्यावर मल्लिनाथ त्याला समजावणीच्या सुरात सांगे–"अरे पण तुला त्याचा दुष्ट-स्वभाव चांगला माहीत आहे. तेव्हां आपण त्याच्याकडे दुर्लक्ष केले की काम संपले."

सुरीनाथने आश्चर्यचकित होत त्याला म्हटले–"अरे पण रोजच्या रोज जर कां सारा कचरा त्याने तुझ्या घरासमोर फेकला तर तू काय गप्प रहाशील?"

मग त्यात भांडण्यासारखे काय आहे. आपण तर आपल्या घरा समोरचा कचरा काढतोच नां! त्याच बरोबर तोही काढून टाकावा." मल्लिनाथने सांगितले.

"तू तर एक नंबरचा भित्रा माणूस आहेस. त्यामुळेच सोमनाथच्या वर्तणुकीला घाबरतोस. काही झाले तरी त्याचे डोळे उघडलेच पाहिजेत." सुरीनाथ हिरीरीने म्हणाला.

मल्लिनाथ शांतपणे त्याला म्हणाला–"मित्रा, एक गोष्ट विसरू नकोस. आपल्या घरासमोरचा केरकचरा काढण्यास जो काय वेळ लागतो त्यात असा किती फरक पडणार आहे. त्या करीता जर सोमनाथ बरोबर भांडण करशिल तर सारा वेळ भांडणातच फुकट जाईल."



"अरे, असे समजून जर आपण गप्प राहीलो तर तो आपल्याला असमर्थ समजले." सुरीनाथ म्हणाला.

"पण खरोखरी तर आपण असमर्थ नाहीत नां! मग त्याने आपल्याला असे म्हटले तरी आपल्या अंगाला काय त्याच्या म्हणण्याने भोके कां पडणार आहेत? आपले काय बिघडणार आहे" मल्लिनाथने आपले मत सांगितले.

सुरीनाथ थोडा विचार करीत म्हणाला–"आपण तर त्याला त्याच्या करण्याच्या दुप्पटीने त्रास देऊ."

"ते कसे काय रे मल्लिनाथ! सोमनाथला तर काही कामधंदा नाही तो उनाड आहे. आपल्याला तर कामातून मोकळ वेळ मिळणे कठीण त्यातुन जो समजुतदार आहे तो त्याच्या समस्या आपल्या आपण अनकुल करून घेतो. माझे तर असे म्हणणे आहे की सोमनाथने तसे वागुन आमच्यावर उपकारच केले!" मल्लिनाथ म्हणाला.

"काय सांगतोस! सोमनाथचे तुझ्यावर उपकार?" आश्चर्याने सुरीनाथने त्याला विचारले.

"हो, हो, सोमनाथच्या वागण्याचा त्रास मी व माझे कुटुंब सहन करू शकत नव्हतो. त्याच्या नुसत्या विचारने आमच्या अंगाचा कांप होत होता. त्यामुळे आम्ही निश्चय केला की, चुकूनही त्याच्या विषयी विचार मनात आणायचा नाही. त्या करीता











आम्ही काही ना काही काम काढून करीत रहायचे." मल्लिनाथ म्हणाला.

"मग त्या करीता तू काय उपाय योजना केलीस" सुरीनाथने आश्चर्याने विचारले.

"मी जास्त वेळ शेती करण्यात घालवितो. माझ्या कुटुंबातील इतर बायका टोपल्या विणणे, चटई विणणे खेळणी तयार करणे अशा कामामधे हळूहळू तयार होऊ लागल्या आहेत. त्यामुळे आमच्या घरात वर कमाई जास्तहोवू लागली आहे. त्या मुळे तर स्पष्टच आहे की हे सोमनाथच्या वाईट वागण्यामुळेच शक्य झाले ते उपकारच झाले म्हणावयाचे. काय तुला तसे वाटत नाही का ?" मल्लिनाथने विचारले.

ते ऐकून सुरीनाथ अवाक् होऊन पहात राहिला. त्यानंतर त्याचा निरोप घेऊन तो घरात परत आला व सर्व किस्सा त्याने आपल्या बायकोला सांगितला.

"ओहो! माझ्या डोक्यात ही कल्पना कशी आली नाही. आजपासून आपण सुद्धा मल्लिनाथचे अनुकरण करू या." सुरीनाथची बायको आनंदाने पतीला म्हणाली. त्या दिवसापासून सुरीनाथचे कुटुंब मल्लिनाथाच्या वागण्याप्रमाणे वागू लागले. त्यामुळे एका बाजूला त्याची कमाई वाढू लागली व सोमनाथच्या वागण्याचा विचार करण्यास त्यांना वेळच मिळेनासा झाला.

असेच दिवस निघुन गेले. सोमनाथच्या घराच्या आजुबाजुला चांगली पक्की घरे उठली. आपल्या खोडया शिव्यागाळीकडे कोणाचेच लक्ष नाहीसे पाहून त्याच्या जीव कासावीस होवू लागला.

आपल्या त्रासाच्याबरोबर दोन्ही बाजूंना बांधलेली चांगली मजबुत घरे पाहून त्यांची मानसिक शांती ढळली. तो विचार करु लागला की आपल्या त्रासाला कटाळून ह्या दोघाना चांगली स्थिती प्राप्त झाली. मी जर येथेच आणखी काही काळ राहीलो तर नक्कीच ते महाल सुद्धा बांधतील" असा विचार करून सोमनाथने आपली झोपडी स्वतात विकली व तो दुसऱ्या ठिकाणीं निघून गेला.






पार्वतीने शिवभक्त चिरुतोंडला पहाण्याची प्रबळ इच्छा शंकराजवळ प्रकट केली. त्यावर शंकराने इंद्राकरवी कांचीपुरवर एकवीस दिवस सतत पाऊस पडत ठेवला होता. बावीसाव्या दिवशी पाऊस कोसळायचा थांबला. हे तीन आठवडे चिरुतोंड रात्रप्रहर भक्तांना भोजन घालीत राहिला. सर्व जळण संपून गेले होते. त्यामुळे फाटक्या चिंध्या तेलात बुडवून अग्नी पेटवून तो स्वयंपाक करीत राहीला. परंतु इतकी संकटे आपत्ती येऊन सुद्धा त्याने आपल्या व्रताचा भंग केला नाही.

परंतु ज्या दिवशी पाऊस पडणे थांबले. त्या दिवशी चिरुतोंडच्या घरी कोणी अतिथी आला नाही. चिरुतोंड कमीत कमी एकास भोजन घालून मगच जेवत असे असा त्याचा नेम होता. त्याने दुपारी दाराबाहेर डोकावून पाहिले. घराबाहेर ओसरीवर त्याला कोणीही शिवभक्त नजरेस आला नाही. त्यामुळे चिरुतोंड घराबाहेर पडून गल्लीबोळांतून हिंडत कोणी अतिथी सांपडतो का म्हणून शोधू लागला. किल्ल्याच्या तटापर्यंत त्याला कोणीही सांपडले नाही. त्यामुळे तो किल्ल्याचा तट पार करून बाह्य प्रदेशात जाऊन शिवभक्त सांपडतो का ते पाहू लागला.

एका बागेच्या जवळच्या एका झोपडीत एक वृद्ध जोडपे त्याच्या नजरेस पडले. त्या म्हाताऱ्याच्या पांढऱ्या केसाच्या जटा झाल्या होत्या. त्याच्या कपाळावर भस्माच्या आडव्या



रेघा ओढलेल्या दिसत होत्या. म्हातारी आंधळी होती. तो म्हातारा वाघाचे कातडे पसरून त्यावर पडला होता. त्यांनी निवेदन करीत त्यांना म्हटले–"आज आपण दोघे माझ्या घरी पाचारण करून शिवार्चना करून मला कृतार्थ करावे."

त्यावर वृद्ध म्हणाला–"आज एकवर्षापासून मी शिवभक्ति करीत निराहार व्रत केले आहे. त्या व्रताची समाप्ती एका नरमांसच्या द्वारेच पूर्ण होणार आहे. तो नरप्राणी ब्राह्मण, क्षत्रिय अथवा वैश्य कोणत्याही जातीचा चालेल. तो लहानवयीन व सुदृढ असला पाहीजे. त्याचा वध त्याच्या आईवडीलांनीच करावयास हवा व त्यांनीच त्याचे मांस शिजवून मला वाढले पाहिजे त्याच बरोबर माझी एक अट आहे त्यांनी माझ्या पंक्तिला बसून भोजन करावयास हवे.

"महानुभाव, माझे नांव चिरुतोंड नंबी आहे. माझे व्रत शिवभक्तांच्या व्रताचे पालन करणे आहे. आपल्या इच्छेनुसार मी आपल्याला भोजन वाढीन. आपण कृपया माझ्या घरी चलावे. चिरुतोंडने निवेदन करीत म्हटले.

"माझी अट फक्त तू पाळून चालणार नाही तुझ्या पत्नीने सुद्धा त्याचा स्विकार करावयास हवा." तो म्हातारा म्हणाला

त्यावर चिरुतोंड आपल्या बायकोने मान्य करावे ह्यासाठीघरी परत आला व त्याने सर्व हकिकत आपल्या बायकोला तिरुवेंगनांचीला ऐकवले.

"आपण तर काय आपले मांस कापून सुद्धा शिजवून त्याला खायला घालू आपण तावडतोब जाऊन त्यांना बोलावून घेऊन यावे." त्याची बायको म्हणाली.

तेवढ्यात वृद्ध रूपात असलेले शंकर भगवान वेगळे रूप धारण करून चिरुतोंडचा मुलगा चिलयाबाळच्या पाठशाळेत गेले. व त्या मुलाला म्हणाले–"बाळ, तुझे वडील दुष्ट आहेत. तुला मारून तुझे मांस शिजवून कोण्या साधूला खायला घालणार आहेत तू तावडतोब येथून पळून जा.



"महाराज, आपले बोलणे मला विचित्रच वाटते आहे असे म्हटले जाते परोपकारार्थ मिदं शरीरं काय हो, दधीची शिबी, इत्यादी लोक काय अज्ञानी होते." चिलायाने उत्तर दिले.

त्यानंतर चिरुतोंड पुन्हा देवळात परत आला. त्याने त्या वृद्ध ब्राह्मणाला आपल्या खांद्यावर उचलून घेतले. आंधळ्या म्हातारीचा हात हातात घेतला व दोघांना बरोबर घेऊन हळूहळू सावकाश त्यांना घरी घेऊन आला.

चिलयाच्या आईवडीलांनी त्याला चांगले अभ्यंगस्नान घातले. व त्याला चांगले अलंकार घालून म्हटले–"बाळ, तू शिवयोग्याचा आहार बनण्यास तयार आहेस नां?"

"मला फार आनंद वाटले बाबा. एका शिवयोग्याचा आहार बनलो तर मला पुण्यच मिळेल. ते हातचे कां घालवू." बाळ चिलयाने त्यांना म्हटले.

त्यानंतर आईने आपल्या मुलाला मांडीवर घेतले व विळचाने त्याला ठार मारले नंतर चिलयाचे मांस शिजवून त्यांनी त्या दोघा वृद्ध दम्पतीना वाढले त्यावर वृद्ध चिरुतोंड-नंबीला म्हणाला–"आता तुम्ही दोघे व तुमचा मुलगा आमच्या पंक्तीला बसून भोजन करावयास या. आम्ही खोळंबलो आहोत लवकर या."

"महानुभाव, आमचा मुलगा कोठे खेळावयास बाहेर गेला आहे वाटेत. स्वयंपाक थंड होईल आपण कृपा करून भोजनास आरंभ करा आमच्या साठी थांबू नका." चिरुतोंड म्हणाला.

"तू तुझ्या बायकोला सांग की त्याला हांका मार तो ती हांक ऐकून धावत पळत इथे येईल" वृद्ध शिवयोगी म्हणाला.

त्यावर तिरुवेंगनाची मुलाला जोरजोरात हांका मारु लागली. बाळ चिलया. ये बाळा आम्ही सर्व तुझ्यासाठी वाट पहात आहोत"

दुसऱ्याक्षणी चिलया बाळ बाहेरून धावत धावत घराच्या आत आला. त्यावर चिरुतोंड व त्याच्या पत्नीने आश्चर्याने त्या म्हाताऱ्या जोडप्याकडे वळून पाहीले तेव्हां शिवपार्वती त्यांना त्यांच्या स्वस्वरूपात प्रत्यक्ष दिसले. त्यांच्या शिवभक्तिवर ते अत्यंत प्रसन्न होते. त्यांनी त्याच्या पुर्वजन्मीचा वृत्तांत त्यांना ऐकवला.

प्राचीन काळी दक्षिण भारतात पोत्तपिनाडु नामक प्रदेशात एक फार मोठे अरण्य होते. त्यात शबर जातीचे लोक रहात असत. त्या प्रदेशाची राजधानी अडमरू ही होती. शबर लोक शिकार किंवा शेतकी करून आपला उदर निर्वाह चालवीत.

शबर जातीच्या राजाचे नाव नादनाथ आणि राणीचे नाव तंडे असे होते. त्यांना तिन्नडु नावाचा मुलगा होता. मोठा झाल्यावर त्याला सर्व शस्त्रास्त्र विद्या शिकविण्यात आली. हळुहळु तो पळणाऱ्या हरणाला व आकाशात उडणाऱ्या पक्ष्याला सहसुलभतेने नेम मारून ठार करु लागला.

शबर जातीच्या लोकांनी आपल्या युवराजाला शिकार करण्याची विद्यापण उत्तम प्रकारे शिकवावी असे सुचविले त्यांनी शंकरा जवळ हात जोडून नवस केला. कित्येक जनावरांचा बळी दिला. महुवा नावाच्या फुलाची दारु प्याले आणि नृत्यगान करीत एक मोठी मिरवणुक काढली.



दुसऱ्या दिवशी ते शिकारीसाठी जाळी दोऱ्या, फांस, शिकारी कुत्री इत्यादि घेऊन निघाले. तिन्नडु वाजत गाजत शिकारीला निघाला ते लोक तिरुपतीच्या डोंगराळ प्रदेशाकडे निघाले. वाटेत अनेक श्वापदांची व पक्ष्यांची शिकार केली. त्यांचे मांस काढून ते विस्तवात भाजले आणि जंगलातल्या मधात बुडवून खाल्ले. अशा तऱ्हेने शिकार करीत ते अनेक दिवस हिंडले व फिरले.

एक दिवशी शिकारीला गेला असता तिन्नडु दमुन गेला. आणि बकुळाच्या झाडाखाली झोपला. स्वप्नात त्याला एक महापुरुष दिसला. त्याच्या सर्वांगावर विभुती

लावलेली होती. त्याच्या कमरेला व्याघ्रचर्म बांधलेले होते. डोक्याला जटा होती. गळ्यात मुंडमाळ होती. आणि त्याच्या मध्यभागी शिवलिंग होते. तो महापुरुष स्वप्नातच तिम्रडूला म्हणाला–"बाळ! या डोंगराच्या पायथ्याशी सुवर्णमुखी नदीच्या कांठीवटवृक्षाखाली शंकर निवास करीत आहे तू त्याची पुजा कर."

तिम्रडु दचकून जागा झाला त्याने आश्चर्यचकित होऊन चारीबाजूला पाहिले त्याचे अनुयायी शिकार खेळण्यात मग्न होते. इतक्यात एक रानडुक्कर ओरडत त्या बाजूला आले. तिम्रडुने त्या डुकराचा पाठलाग केला परंतु ते डुक्कर एकाएकी अदृश्य झाले त्या जागी तिम्रडुला एक शिवमंदिर. दिसले स्वप्नातच त्यां महापुरुषाने त्याच शिवलिंगाविषयी सांगितले होते. म्हणून तिम्रडुला ती सर्व शिवलीला आहे असे वाटले. तेव्हां त्याने त्या शिवलिंगाला साष्टांग नमस्कार घातला आणि म्हणाला– "प्रभो, या डोंगराळ प्रदेशात ज्या जागी वाघ आणि सिह विहार करतात अशा या जागी नदींकाठी तू कां रहातोस? तुला भुक लागली तर तुला अन्नपाणी कोण आणून देईल? तू आमच्या गावी ऊडमु येथे कां येऊन रहात नाहीस? माझ्या वहीणी तुला डुकराचे हरणाचे व पक्ष्यांचे मांस शिजवून अगर भाजून खायला देतील. परंतु तू आला नाहीस तर मी देखील येथून हलणार नाही. तुझी वाट पहात येथेच तिष्ठत बसेन."

इतक्यात इतर शबर त्याला शोधीत त्या जागी येऊन पोहोचले. ते त्याला म्हणाले–"मालक! आपण ज्या रानडुकराचा पाठलाग केलात ते डुक्कर कोठे आहे? चला घरी." तिम्रडूने त्या प्रश्नाचे एवढेच उत्तर दिले–"शंकराने माझ्याबरोबर यायचे कबुल केले तरच मी येईन नाहीतर येणार नाही. तुम्ही जा. नंतर तो शंकराचे स्मरण करून ध्यानमग्न झाला तेव्हा तो काही येत नाही पाहुन सर्व निराश होऊन तेथून निघून गेले.





## शेतकरी बनला राजा

प्राचीन काळात फिजिया नगरात गोर्डियन नावाचा एक शेतकऱ्याचा तरूण मूलगा रहात होता. तो एक दिवस आपली बैलगाडी जुंपुन नगराच्या दिशेने निघाला.

गाडी बरीच वेगात थोडया दूरवर गेली नाही तितक्यात आकाशातून उडत उडत एक गरूड पक्षी आला व बैलांच्या जोताच्या मध्यावर येऊन बसला. ग्रीक लोकांचा असा गाढ विश्वास होता की, गरूड पक्ष्याने अशा तऱ्हेने जोत्यावर येऊन बसणे म्हणजे शुभशकुन आहे. गोर्डियन तो विचार करून आश्चर्यचकित झाला मनात म्हणू लागला आता ह्या शुभ शकुनाचे काय फळ मिळणार आहे बरे!

त्याच सुमारास टेलिमिसस नगराच्या राजाचा अचानक देहान्त झाला होता. व राज्यभर अराजकता माजली होती. त्याच सुमारास एका भक्तिणीच्या अंगात दैवी संचार झाला. तिने देवळात एकत्र जमा झालेल्या लोकांना उद्देशून म्हटले.

"तुम्ही निराश होऊन जाऊ नका. तुमचा राजा एका बैलगाडीवर स्वार होऊन इकडेच येत आहे. गाडीवर त्याच्या बाजूलाच तुम्हां लोकांची होणारी राणी बसली आहे. बैलगाडीच्या जूं वर एक गरुड पक्षी बसला आहे.

हि बातमी समजताच सर्व प्रजेतील लोक आपल्या नविन राजाची प्रतिक्षा करू लागले.

त्या भक्तिणीचे बोलणे ऐकणाऱ्यांमध्ये एक तरुण मूलगी होती. ती तावडतोब धावत पळत नगराबाहेर पडली.

थोडया दूर पळत गेल्यावर तिला समोरून एक बैलगाडी येत असतांना दिसली. गाडीच्या जूं वर एक गरुडपक्षी बसलेला दिसला. गाडीत एकटाच तरुण होता. परंतु त्याच्या बाजूला कोणी स्त्री दिसली नाही.

नगरातून धावत पळत आलेल्या तरुणीने गाडीच्या समोर येत त्या तरुण गोर्डियनला म्हटले–"थोडे थांब, मला पण गाडीत घे."

गोर्डियनने गाडी थांबवून त्या तरुणीला आपल्या शेजारी गाडीत बसवून घेतले. ती म्हणाली तू माझ्याशी लग्न केलेस तर संध्याकाळपर्यंत तुला एक अद्‌भूत गोष्ट प्राप्त होईल.

गोर्डियनने त्या गरुड पक्ष्यांला जोत्यावर बसता क्षणीच मनात तसा विचार केला होता त्यामुळे त्या तरुणीनं तसे सांगताच त्याला आश्चर्य वाटले त्याने तिला पायापासून माथ्यापर्यंत निरखून पाहिले. तुझ्यात जर विवेकशील पणा असेल तर मी लग्न करून घेईन.

"तुम्हांला माझ्या विवेकशीलपणावर शंका घेण्याची अजिबात आवश्यकता नाही." असे म्हणून तिने त्याला गावातील एका देवी भक्तिणीच्या अंगात दैवी संचार होऊन तिने वदविलेलं कथन केले. आणि गोर्डियनला म्हणाली–"याद राख, जर का मी गाडीत तुझ्या शेजारी राहीले नाही तर तू केव्हांही राजा बनणार नाही." गोर्डियनने स्विकृती दर्शक मान हलविली. तिसऱ्या प्रहारापर्यंत गाडी नगरात येऊन पोहोचली. सर्व प्रजेतील लोकांनी त्यांच्या नावाने जयजयकार करण्यास सुरवात केली–"हाच आपला राजा आहे."

अशा प्रकारे गोर्डियन टेल्मिससचा राजा बनला. ह्यानंतर गोर्डियनने आपले भाग्य उजळलं म्हणून तो बैलांची जोत जू एकत्र गांठ बांधून ते दोन्ही देवाच्या देवळात ठेवले व लोकांना म्हटले ह्याची गांठ सोडणारा माणूस साऱ्या जगाचा सम्राट बनेल.

गोर्डियनने जी विचित्र गाठ बांधली होती. ती सोडविण्याचा अनेक लोकांनी प्रयत्न केला. परंतु ती गांठ कोणत्याही व्यक्तिला सोडवता आली नाही.

एवढेच नाही पण जगातील विजेता बनण्याचा संकल्प केलेल्या सिकंदरने सुद्धा ती गांठ सोडण्याचा यथा शक्ति प्रयत्न केला. शेवटी न रहावून त्याने ती उखडून आपल्या तलवारीने कापून काढली.





# भुतांची भविष्यवाणी

अम्बापुर गावात शंकरलिंग नावाचा एक तरुण रहात होता. तो आपल्या घराच्या मागील परसात भाजीपाला लावून तो बाजारात नेऊन विकून आपला उदरनिर्वाह करीत असे.

एके दिवशी त्याने भाजीपाला टोपलीत भरला व बाजारात नेला परंतु तो सर्व विकता विकता संध्याकाळ झाली. निराश होऊन तो तशीच टोपली डोक्यावर घेऊन घरी यायला निघाला. बरीच रात्र उलटली वाटेतील चिंचेच्या झाडाखालून तो निघाला. नेमके त्याच वेळी आकाशात काळे कुट्ट ढग जमुन आले व विजा चमकून काही वेळातच मुसळधार पावसाला सुरवात झाली. त्याने धावतच एका चिंचेच्या झाडाचा आसरा घेतला. त्याला तेथे उभे राहून जवळ जवळ एक तास उलटला परंतु पाऊस थांबण्याचे काहीच लक्षण दिसले नाहीं.

तो मनातल्या मनांत विचार करू लागला. आता काय करावे बरे! असा विचार करीत तो चौफेर पाहू लागला. थोड्या दूर एका कोपऱ्यांत त्याला ज्वालाग्नी पेटलेला दिसला. इतक्या रात्री पावसात आगीच्या ज्वाळा कशा बरे राहील्या आणि क्षणार्धात त्याने किंकाळी फोडली. त्या ज्वाळेच्या भोवताली कोंडाळी करून तीन भुते बसलेली त्याने पाहिली.

शंकरलिंगच्या किंचाळण्याने त्या भुतांनी वळून पहात त्याला विचारले–"ऐ पोरा ऐक, इथ येऊन बस. आम्ही तुला काही गिळून टाकणार नाही. अम्बापुरचा रहाणारा आहेस नां? सांग, उद्या तुमच्या गावांत काय काय घडणार आहे ते?"

भुतांच्या तोंडचे बोलणे ऐकून त्याने आपले धैर्य एकवटले हळूहळू पुढे जात म्हणाला–"मी भाजीपाला विकून पोट भरणार मला काय माहीत असणार?"












" ठिक आहे, मी तुला सांगतो भविष्य " असे म्हणत त्यातील एक भुत थोडे पुढे आले व अग्नीतील एक ज्वाळा गिळत म्हणाले–" तुमच्या गावाच्या शाळेला लागून एक कडू लिंबाचे झाड आहे नां ? वादळ पाऊसात झोडपले गेल्याने ते कुजून वाकले गेले आहे उद्या सकाळपर्यंत ते झाड शाळेवर कोसळणार आहे." डोळे किलकिले करीत ते भूत म्हणाले.

त्यातील भुतीणीने त्या ज्वाळेतून एक पेटता निखारा हातात घेतला व आपल्या डोक्यावर उधळत म्हणाली–" संध्याकाळी देवाची जी उत्सवमुर्तीची मिरवणूक निघणार आहे ! तेव्हां त्याच्या समोरील हत्ती वेडापिसा होऊन उधळणार आहे." तिसरे भूत त्या भडकलेल्या अग्नीवर फुंकर घालित म्हणाले– " आज रात्री तुमच्या गावातील त्या मोठ्या तळ्याला एक भेग पडणार आहे."

भुतांनी एका पाठोपाठ सांगितलेले भविष्य ऐकून शंकरलिंगला अत्यंत आश्चर्य वाटले. तितक्यात ती भुते खळाळून हंसू लागली आणि एकदम अदृश्य झाली. पाऊस थांबताच शंकरलिंग गावात येऊन पोहोचला तेव्हां बरेच फटफटले होते व बरीच मुले शाळेत जाण्यास निघाली होती. तितक्यात त्याला भुतांनी सांगितलेली गोष्ट लक्षात आली. तो धावत पळतच शाळेत आला व मुख्याध्यापकांच्या खोलीत सारा वृत्तांत सांगत म्हणाला–" साहेब, कृपा करून आजचा दिवस शाळेला सुट्टीं द्या."

अध्यापक नेमके त्यावेळी आपल्या घरगुती कामकाजामधे विचारमग्न होते. त्यामुळे त्यांनी शंकरलिंगचे ऐकून लगेच शाळेला सुट्टी देऊन टाकली. तो सर्वांना घेऊन शाळेची भित ओलांडून जात नाही तोच कडकडाट करीत झाड शाळेवर पडले.

थोड्या वेळातच भुतांच्या भविष्याची गोष्ट साऱ्या गावभर पसरली. गावातील काही प्रतिष्ठित माणसे शंकरलिंगला भेटून विचारू लागले–" बाळ त्या भुतांनी अजून काही सांगितले नाही नां रे ?"

" संध्याकाळी निघणाऱ्या देवाच्या पालखी समोरील हत्ती पिसाळणार आहे व मध्यरात्री आपल्या तळ्याला मोठा तडा पडणार आहे." शंकरलिंगने सांगितले.

ह्यानंतर गावच्या मंदीराच्या पुजाऱ्यांनी माहुताला सांगून हत्तीला गावाच्या बाहेर नेऊन बांधले. परंतु देवाची पालखी उचलून निघाली तसा हत्तीने कर्कश धिंकार करीत हिसडे देऊन साखळदंड तोडूले रानाकडे व सुसाट पळून गेला.

संकट टळल्याकारणांनी गावकऱ्यांनी शंकरलिंगचे तोंडभरून कौतुक केले. आणि मशाली घेऊन ते सर्व तळ्यापाशी आले सर्वजण डोळ्यात तेल घालून पहात राहीले. अर्ध्यारात्रीनंतर तळे पूर्णभरून गेले त्या पाण्याच्या जोराने तळ्यांच्या बांधाला तडा गेला परंतु सर्व लोकांनी पूर्वीच तो दगडविटा माती घालून बुजवला.

" अरे शंकर, भुतांचे भविष्य खरे झाले. उद्या रात्री पुन्हां जाऊन पहा ती भुते काय सांगतात ?" असे म्हणत सर्व गावकऱ्यांनी त्याला जोर केला.

अंधार होताच शंकरलिंग भुतांना भेटण्यासाठी निघाला. लांबुनच शंकरलिंगला येत असलेला पाहून भुते त्याला म्हणाली– " काय अम्बापुरच्या रहाणाऱ्या आमचे भविष्य खरे झाले नां ?"



" का नाही होणार ? तुम्ही जे जे सांगितलेत ते सर्व खोटे होईल असे कधी झाले आहे का ? बर सांगा आज रात्री काय काय होणार आहे." शंकरलिंगने सांगितले.

भुतांनी त्याला सांगितले की, उद्या रात्रीं जमिनदाराचे घर लुटले जाणार आहे. आणि गावचे पाटील धनंजय ह्याच्या मुलीच्या लग्नाच्या प्रसंगी जी कढी बनवली जाणार आहे त्यात पाल पडणार आहे." असे म्हणत तो अदृश्य झाला.

शंकरलिंगने ताबडतोब गावात येऊन जमिनदार व पाटील ह्यांना तशी कल्पना दिली. तेव्हां दोघे पूर्वीपासूनच सावध राहींले व त्यांनी आपली संकटे निवारण केली.



दुसऱ्या दिवशी सकाळी जमिनदार आपल्या घोडागाडीतून शंकरलिंगच्या घरी आले त्याला म्हणाले–"अरे आज रात्री तू भुतांना विचारून हि गोष्ट काढ की आम्हांला मुलगा केव्हां होणार ?" मी तुला तुझ्या केलेल्या कामाचे चांगले बक्षीस देईन." असे म्हणत जमिनदारने त्याच्या हातात शंभर सोन्याची नाणी ठेवली व तो निघून गेला.

ह्यानंतर त्या गावातील सावकार शंकरलिंगच्या घरी येऊन त्याला म्हणाला–"आमचे पूर्वज व माझ्या बायकोच्या पूर्वजांच्या सात आठ पिढ्यापासूनच्या लोकांनी नौका व्यापार करून करोडो रुपये कमावले आहेत. तेव्हां माझी बायको माझ्या पाठीस लागली आहे की, हे फुटके दुकान काय कामाचे त्यामुळे तू जाऊन भुतांना विचार मी समुद्र व्यापारात सफल होईन का नाही?" असे सांगून सावकाराने त्याच्या हातात एक चांदीचे व सोन्याचे नाणें ठेवले आणि तेथून निघाला.

अशाप्रकारे सकाळपासून संध्याकाळपर्यंत गावकऱ्यांनी येऊन आपापल्या अनंत अडचणी त्याला ऐकवल्या व त्यांच्याकडून प्राप्त झालेली संपत्ती पाहून त्याला चक्रावल्या सारखे झाले. ती सर्व मिळून एक हजार नाणी होती. शंकरलिंगने सर्वांनी सांगितलेल्या गोष्टीची एक यादी तयार केली व त्यातील पांचशे नाणी एका फडक्याचा बांधून त्याची पुरचुंडी तयार केली व तो त्या रात्री भुतांना भेटावयास गेला.

भुते त्याला पहाताच हंसू लागली व म्हणाली–"ये अम्बापुरवासी, ये."

शंकरलिंग निर्भयतेने पुढे जाऊन त्यांच्या घोळक्यात बसला व म्हणाला–"तुम्ही नेहमी होणाऱ्या वाईट गोष्टींचा खुलासा देता. आणी तुम्ही चांगल्या घडणाऱ्या गोष्टी सांगितल्यात तर बहुदा सोन्याचा पाऊसच पडेल." असे म्हणत त्याने सोन्याची नाणी दाखविली.

ह्यानंतर घडलेल्या साऱ्या गोष्टी त्यानें भुतांना सविस्तर सांगितल्या आणि गावकऱ्यांच्या अनंत मनोकामनांची एक यादी त्यांचा समोर ठेऊन तो म्हणाला–"तुम्ही ह्या साऱ्या प्रश्नांची उत्तरे देऊन हि पांचशे नाणी घ्या. माझा वाटा पांचशे रुपये मी घेऊन टाकला आहे. एका दिवसात एवढी मोठी मिळकत. मी आजपासून कामधंदा सोडला.

शंकरलिंगचे बोलणें ऐकून भुतांचे डोळे अंगार पाखडू लागले. त्यांनी ग्रामवासीयांनी सांगितलेल्या गोष्टीच्या कागदाची गुंडाळी व पैसे अग्निकुंडात टाकून राख केले व त्याला दटावत म्हटले–"अरे मुर्खा, तू चुकनही ह्या बाजूला पुन्हां येऊ नकोस. जर कां आलास, तरी तुला आम्ही दिसणार नाहीत." असे म्हणून ती भुते एकदम अदृश्य झाली.

शंकरलिंगला एकदम आश्चर्य वाटले. त्याने एका काटकीने त्या अग्नीमधे डिवचून पाहीले परंतु त्याला एकही सोन्याचे नाणे आढळले नाही. आता सकाळी तर सर्वांना पैसे परत करावयास पाहीजेत होते आता काय करावे बरे? तो खूप दुःखी झाला.

फटफटीत उजाडले त्या रस्त्याने जाणाऱ्या एका वृद्ध माणसानें त्याला पहाताच विचारले–"बाळ, काय झाले ? तू असा चिंतामग्न कां दिसतो आहेस ? असा तोंड करून कां बसला आहेस ?"

शंकरलिंगने त्या वृद्ध गृहस्थास घडलेली गोष्ट सांगितली ते सर्व ऐकून तो वृद्ध त्याला म्हणाला–"बाळ, तुला भुते मुर्ख म्हणाली नां! ते बरोबरच आहे. भुतांना ते धन कशाला ? त्यांनी जे दुष्ट काम केले त्यांचे प्रायश्चित म्हणुन त्यांना काही चांगले काम करावेसे वाटत होते. त्यामुळे त्यांनी तुझ्या गावांवर येणाऱ्या संकटाची सुचना तुला दिली. त्यांच्या उत्तम गुणांचा तू जो व्यापार करणार होतास त्यानेच त्यांना अत्यंत राग आला व ती अदृष्य झाली.

म्हाताऱ्याच्या बोलण्याने त्याला त्याची चुक लक्षात आली. त्याने मनांशी निश्चय केला की चार पांच महिने कष्ट अंग मेहनत करून गावकऱ्याचे पैसे त्यांना परत करावयाचे अशा विश्वासाने तो घरी परत आला.





# सेनापतीची निवड

धवलगिरीचा सेनापती जयमल्ल अकस्मात मरण पावला. त्याकारणाने राजा प्रसन्नला त्याच्या जागेवर योग्य व्यक्तिची निवड करणे आवश्यक वाटले. त्याच्या सैन्यात अक्रम अमर आणि अहृंत असे तिघे-जण त्या पदाला योग्य असे होते परंतु तिघामधे कोणाला एकाला त्या पदावर नियुक्त करावे ह्याचा राजा गंभीरतेने विचार करू लागला. तितक्यात प्रवल-गिरीचा मुख्य सेनापती राजाला भेटला.

धवलगिरी व प्रवलगिरी ह्या दोन्हीं राज्यांचे सलोख्याचे संबंध होते. प्रवल-गिरीच्या राजाला कानोसा लागला होता की शेजारदेशचा राजा आपल्या राज्यावर हल्ला करणार आहे. व तो सैन्य जम-विण्याच्या तयारीत आहे. त्यामुळे त्याने आपला मुख्य सेनापती सिंह ह्याला त्याच्या-कडे पाठवले.

सिंहनी दुसऱ्या राज्याच्या बाजूने गुप्त-रूपात जी युद्धाची तयारी चालू होती ह्याचा सविस्तर खुलासा केला व म्हटले—"महाराज, आमच्या महत्वाच्या गुप्तहेरांकडून मिळविण्यात आलेली ही ताजी बातमी आहे. आम्हांला अत्यंत सावधतेने राहीले पाहिजे असा आमच्या राजाचा विचार आहे. अशा कठीण प्रसंगी-तर आपला योग्य व समर्थ सेनापती जय-मल्लचा सुद्धा देहान्त झाला. ही दुर्दैवाचीच गोष्ट आहे म्हणावयाची.

"हो, ही गोष्ट तर खरीच आहे. परंतु मी त्या जागेला युक्त अशा व्यक्तिची निवड करू इच्छितो. असे म्हणत त्याने आपल्या पुढील सारी समस्या सेनापतीच्या समोर मांडली व म्हटले—"कोणत्याही परिक्षेच्या मार्फत अक्रम अमर व अहृंत ह्या तिघांपैकी कोणाला तरी एकाला निवडावे असे म्हणतो हि तर चांगली गोष्ट आहे नां? ह्या बाबतीत आपला काय सल्ला आहे?"

सिंहने राजाचे म्हणणे लक्षपुर्वक ऐकले व दुसऱ्या दिवशी त्या तिघांच्या वेगवेगळ्या परिक्षा घेण्याचे आश्वासन दिले.

दुसऱ्या दिवशी राजा प्रसन्न व सेनापती सिंह एका महालातील जागेत स्थानापन्न झाले. त्यांनी सर्वांत प्रथम अहृंतला बोला-वले. अहृंतला सिंहने विचारले—"आम्हांला समजले आहे की, आपले काही शेजार-देशचे राजे आपल्या राज्यावर हल्ला करण्याच्या तयारीला लागले आहेत. काय तू सांगू शकतोस की, त्याचे सैन्यबळ किती आहे?"

ताबडतोब अहृंतने त्या त्या राज्यातील राजाचे सैन्यबळ, घोडदळ हत्तीदळ व इतर आयुधे सामुग्री ह्याचे खुल्लमखुल्ला वर्णन करून सांगितले.

सर्व गोष्टी ऐकल्यानंतर सेनापतीने अहृंतला विचारले—"ठिक आता हे सांग तुझ्या धवलगिरी राज्याचे सैन्यबळ किती आहे?"

अहृंतने जरा देखिल संकोच न करता आपल्या राज्यातील विविध सैन्यबळांची माहिती दिली आणि हे सुद्धा सांगितले की किती सैन्य कोणकोणत्या सीमेवर तयार आहे.

सिंहने त्याची पाठवणी केली नंतर अमरला बोलावले आणि त्याच्या समोरही



त्याच सर्व गोष्टी ठेवल्या ज्या अर्हतला विचारल्या होत्या.

अमरने सुद्धा अर्हत सारखेच सर्व खुलासेवार वर्णन करून सांगितले.

सिंहने अमरला पाठवून दिले व अक्रमला बोलावून घेतले. अक्रमच्या समोर त्याच सर्व गोष्टी मांडल्या ज्या पहिल्या दोघांना विचारल्या होत्या. अक्रमने शेजारपाजारच्या राज्यातील व्यवस्थित माहीती सांगितली परंतु आपल्या राज्यातील एकही गोष्ट उघड केली नाही. फक्त एवढेच सांगितले की, त्या संबंधी आपण काही जाणत नाही. अक्रमला पाठवून देऊन सिंहने प्रसन्नराजाला म्हटले— "महाराज, अक्रमच आपल्या राज्याचा सेनापती होण्यायोग्य आहे.

त्यावर राजाला अत्यंत आश्चर्य वाटले त्याने उत्सुकतेने विचारले—"सेनापती, जो व्यक्ति आपल्या राज्यातील सैन्यबळ किती आहे हे सुद्धा समजू शकत नाही. अशा व्यक्तिला मुख्य सेनापतीच्या पदावर निवडणे योग्य होईल कां ?"

"महाराज, अक्रमला देशातील सैन्यबळाची संपूर्ण माहीती आहे. परंतु त्याने ती गोष्ट माझ्या समोर गुप्त ठेवली. आपण कृपया ह्यावावतीत त्याच्याशी विचार-विनिमय करावा.' सिंहने राजाला सुचवले.

सिंह जेव्हां आपल्या राज्यात परत आला तेव्हां राजाने अक्रमला महालात बोलावले व विचारले—"काय तुम्हांला आपल्या राज्यातील सैन्यबळाची अजिबात माहीती नाही का ?"

त्यावर अक्रम अत्यंत नम्रतेने म्हणाला— "महाराज, आपला देश व धवलगिरी अगदी मित्रदेश असले तरी आपण अशा गोष्टी कधीही सांगता कामा नये कारण भविष्यात किती तरी बदल घडू शकतो. तेव्हां माझा आपला विचार आहे की, शेजार राज्याला आपल्या राज्यातील सैन्यबळ सांगणे अजिबात योग्य नाही.

हे उत्तर ऐकून राजा अत्यंत प्रसन्न झाला. त्याच क्षणी त्याने अक्रमला सेनापती पदावर नियुक्त करण्याचे जाहीर केले.





# शहाणा

कोण्या एका गावात एक शेतकरी रहात होता. त्याला एकुलता एक मुलगा होता. त्यामुळे शेतकऱ्यांने त्याला लाडाने लहानाचे मोठे केले. त्याचा विश्वास होता की, तो एक समर्थ व्यक्ति बनेल. शेतकऱ्याचा मुलगा सुद्धा मनात नेहमी असाच विचार करीत असे की, आपण एक ना एक दिवस नक्कीच शहाणे होवू. त्याच्या मनात जेवढी आशा होती तेवढी त्याच्या वडिलांच्या मनांत नव्हती. एक दिवस शेतकऱ्यांने आपल्या मुलाला म्हटले—"बाळा, आता तू मोठा झालास तू मला कोणतीच मदत करीत नाहीस. तुझी बुद्धी दिवसेंदिवस मंद होत चालली आहे कां ?"

"मी जर बुद्धिमंद असलो तर सांगा दुसरा कोण शहाणा आहे ? मी काय करू ते सांगा. माझ्या गुणांचीची ओळख कशी पटवून देऊ." मुलगा आपल्या वडीलांना म्हणाला.

"आपल्या घरीं मेंढीचे चामडे आहे. ते बाजारात नेऊन विक!" शेतकरी म्हणाला.

"मी काय एका मिनीटात चामडे विकून पैसे घेऊन येईन." मुलगा वडीलांशी पैज लावीत म्हणाला.

"अरे वेड्या, चामडे विकून पैसे आणण्यात काय शहाणपणा! हे काम काय कोणीही करू शकेल. तू पैशांसोबत कातडे सुद्धा आणले पाहिजेस." शेतकरी म्हणाला.

मुलगा झटक्यात म्हणाला—"अरे वा! तसेच करेन. पहातच रहा उद्या संध्याकाळ पर्यंत मेंढीचे कातडे व त्यांची किंमत सुद्धा घेऊन येतो.

दुसऱ्या दिवशी सकाळी शेतकऱ्याच्या मुलाने ते मेंढीचे कातडे गुंडाळी करून खाकोटीस मारले आणी तो बाजाराकडे निघाला त्याने बाजारात पाऊल ठेवले न



ठेवले तोच एक व्यक्ति समोरून आली व त्यांनी विचारले–"अरे बाबा, हे मेंढीचे कातडे केवढ्या किमतीला विकणार आहेस?

मी कोणत्याही किमतीला मेंढीचे कातडे. विकेन परंतु मला चामडे व त्याची किंमत पाहीजे आहे." शेतकऱ्याचा मुलगा म्हणाला.

त्यावर तो गिऱ्हाईक खदखदून हसू लागला व म्हणाला–"वाह रे, काय मस्त कल्पना आहे. आजपर्यंत कोणाच्याही डोक्यात असे आले नसेल. तरी सुद्धा काही लोकांचा शोध काढ की, कोणी चामडे घेतल्याशिवाय त्याचे पैसे देतो काय?" असे म्हणत तो आल्यावाटेने पुन्हां गेला.

बाजारात अनेक लोकांनी शेतकऱ्याच्या मुलाला त्या चामड्याची किंमत विचारली. सर्वांना त्यांनी तेच उत्तर दिले. त्यावर सर्वजण हसत आपापल्या वाटेने निघून गेले.

दिवस ढळू लागला. शेतकऱ्याच्या मुलाने जे चामडे आणले होते. ते अजुनपर्यंत त्याच्या खाकोटीतच दबलेले होते. सर्व बाजार हिंडून त्याचे पाय दुखू लागले. तो शेवटी एका माणसांच्या घोळक्यापाशी तो आला व डोकावून पाहू लागला.

त्या गर्दीच्या मध्यभागी एक जादुगार सर्व लोकांना जादू करून दाखवीत होता. शेतकऱ्याच्या मुलाला पहाताच तो म्हणाला–"अरे मेंढीचे कातडे माझ्याकडे दे. मी एक जादू करून दाखवतो.

शेतकऱ्याच्या मुलाने आपल्या हातातले कातडे जादुगाराच्या हातात दिले. त्याने ते चामडे जमीनीवर उभे केले. त्यावर आपले उपरणे टाकून ते झाकले आणि प्रेक्षकांना टाळ्या वाजविण्यास सांगितल्या नंतर त्याने उपरणें काढले. तेव्हां त्या उपरण्या खाली चामड्या ऐवजी एक आंब्याचे झाड होते. त्या झाडाला एक आंबा लागलेला होता.

शेतकऱ्याच्या मुलाला अचंबा वाटला. तो जादुगाराकडून आपले चामडे मागणार तेवढ्यात तो जादुगारच अदृश्य झाला.





शेतकऱ्याचा मुलगा त्याला इकडे तिकडे शोधू लागला व तो रडकुंडीस आला. कारण त्याने आपल्या वडीलांना चामड्यासकट त्याची किंमत सुद्धा आणून देईन म्हणून वचन दिले होते. त्या चामड्याची किंमत तर दूर परंतु चामडे सुद्धा नाहीसे झाले होते. जर रिकाम्या हाताने परत गेलो तर आपण एक मूर्ख बावळट आहोत ही गोष्ट सिद्ध होईल ही भीती त्याला वाटली. भुकेने त्याच्या पोटात कावळे ओरडू लागले. समोर आंब्याच्या झाडाला आंबा लागलेला होता. त्याने विचार केला की, तो तोडून खाऊन आपली भुक तरी भागवता येईल असा विचार करून त्याने तो आंबा तोडला. परंतु दुसऱ्याक्षणी ते झाड अदृश्य झाले व तेथे चामडे जसेच्या तसे उभे दृष्टीस पडले.

"अत्यानंदाने त्याने एका झेपेत ते चामडे उचलले व खाकोटीस मारले. आणी तो गावाच्या दिशेने निघाला.

सूर्य मावळायला थोडाच अवधी शिल्लक होता. सर्व रस्ता व सामसुम झाला होता. थोडा दूर जातो तोच त्याला कोणाची तरी हांक ऐकू आली त्याने वळून पाहीले तो जादुगार मागून चालत येत होता.

जादुगार त्या शेतकऱ्याच्या मुलाजवळ आला आणि त्याच्या बरोबर चालू लागला. त्याला म्हणाला–"मी तुला एक सल्ला देऊ इच्छितो. तू विसरू नकोस. तुझे भले होईल."

"कोणता बाबा असा सल्ला आहे? मुलाने विचारले.

"रस्त्यात जर कोणी बायका दिसल्या तर त्यांना कुशल प्रश्न विचारावे." जादुगार म्हणाला.

थोडे दूर चालून गेल्यावर ते वेगवेगळ्या दिशेने निघून गेले. तो मुलगा संध्याकाळ पर्यंत एका तळ्यानजिक येऊन पोहोचला त्याच्या बाजुलाच एक घर होते. त्या घरातून एक सोळा वर्षाची मुलगी बाहेर आली व तळ्यातून पाणी भरून घेऊन जाऊ लागली तेव्हां त्याने तिला जवळ जात क्षेम विचारले.

तुम्ही पण सर्व ठिक आहात नां? त्या मुलीने त्याला विचारले नंतर थोड्याफार गप्पागोष्टी केल्याने त्या मुलीच्या लक्षात आले की शेतकऱ्याच्या मुलाने सकाळपासून काही खाल्लेले दिसत नाही. तीने त्या मुलाला आपल्या घरी नेले. ज्वारीची भाकरी व झुणका खायला दिला. त्यानंतर तिने त्या मेंढीच्या कातड्या विषयी विचारले.

माझ्या वडिलांनी ह्या कातड्या सोबत ह्याची किमतपण घेऊन यायला सांगितले आहे. परंतु मी तसे काही करू शकलो नाही.

"बस, एवढेच ना! थांब मी तुला चामडे व त्याची रक्कम देते." असे म्हणत तिने त्याच्या जवळून ते कातडे घेतले त्याच्या वरची सर्व लोकर काढली व त्याची किमत देऊन ते कातडे त्याचे त्याला परत केले.

तो मुलगा खूप आनंदला. तिचा निरोप घेऊन तो घरी निघाला. घरी आल्यावर आपल्या मुलाने चामड्यासकट पैसे सुद्धा आणलेले पाहून त्याला आश्चर्य वाटले त्याने विचारले–" मुला, तुला ह्याचा उपाय कोणी कसा सांगितला?

एका तरुणीने सांगितला असे म्हणत त्याने घडलेला सारा वृत्तांत वडीलांना सांगितला.

" मुला, हाच तुझा चांगुलपणा आहे? जर अशी मुलगी भेटली तर तिच्याशी लग्न करावयास पाहीजे होतेस वेडा म्हणून मी नेहमी म्हणत असतो. तू अगही बावळट आहेस!"

शेतकऱ्याच्या मुलाला राग आला तो उठून घराबाहेर पडला व त्या तळ्याकांठच्या घराशी येऊन पोहोचला व घरात जात त्या मुलीला म्हणाला–" अग ऐक, तू माझ्या बरोबर लग्न करशिल?

ती मुलगी पोट धरून खदरखदून हंसू लागली व लग्नाला संमत्ती दर्शवून ती त्या तरुणाबरोबर त्याच्या घरी आली.

शेतकऱ्याने दोघांचे लग्न थाटाने लावून दिले.





अमेरीकेतील नौका संशोधन संस्थानाने सन् १९७६ मधे एक विचित्र शार्क माशाचा शोध लावला आहे ह्या माशांच्या तोंडात सात ओळी मधे सुई सारखे दात असतात. ह्याची लांबी ४.४२ मीटर असते. आणि ह्याचे वजन ७४५ किलोग्रॅम. ह्याला प्रचंड तोंडाचा शार्क (मेगा माऊथ शार्क) असे संबोधतात.



## मेगा माऊथ शार्क



## घुबडचे कान

काही प्रकारच्या घुबडाच्या डोक्यावर काना-सारखा जो भाग दिसतो. ते खरे कान नसतातच. ते खरे त्याचे पंख असतात. खरे तर कान डोक्याच्या दोन्ही बाजुला पंखाच्या आतल्या बाजुला लपलेले असतात.

जगातील सर्वात छोटे वटवाघुळ हे थायलंड मधे आहे. ह्याचे पंख १०० मिलीमिटर इतके लांब व ३.३ मिली-मिटर लांब शरीर असते.





### डासांना पळवून लावणारे संगीत

नुकतेच मांट्रियल मध्ये एक नविन यंत्रनिर्माण करण्यात आले आहे. ह्या यंत्राचे बटण दाबताच आपल्या कानाना कोणतेही संगीत ऐकू येत नाही. परंतु त्या यंत्रामधून निघणारे ध्वनी डासांना दूर पळवून लावतात.

### जगातील वृद्ध बाई



जपान मधील १२० वर्षांचे आयुष्य असणाऱ्या बाईचा मृत्यु झाला. त्याकारणामुळे ब्रिटन मधील ११२ वर्षांचे आयुष्य असणारी म्हातारी जगातील सर्वांत वृद्ध बाई समजली जाते.



### पुस्तके हेच माध्यम उत्तम

सध्याच्या काळात दूरदर्शन द्वारा शिक्षण देण्याची पद्धत सुरु करण्यात आली आहे. तरीही पहाणे व ऐकणे ह्या माध्यमातून शिक्षण घेण्याच्या अपेक्षा पुस्तकाद्वारे शिकलेले ज्ञान हेच विद्यार्थी जास्त चांगले लक्षात ठेवू शकतात. ह्या गोष्टींचा शोध संशोधना द्वारे लावण्यात आला आहे

### फळांना पकडणारी बंदूक



पेट्या व मेंडोळ्या ह्यामध्ये लपवून बेकायदेशिर रुपात नेली जात असलेली फळे व रोपे ह्यांना नेम करून पकडणारी बंदूक अमेरिकेमध्ये तयार केली जात आहे.

# कच

देव व दानव ह्यांच्यामधे कित्येक दिवस युद्ध होत राहीले. युद्धात जे राक्षस मरण पावले त्यांना राक्षसांचे गुरु शुक्राचार्य यांनी संजीवनी मंत्राने पुन्हा जिवंत केले त्याकारणामुळे राक्षसांना पराभुतकरणे देवांना अशक्य झाले. देवांनी शुक्राचार्यापासून संजीवनी मंत्र शिकुन घेण्याच्या इच्छेने बृहस्पतीचा मुलगा कच ह्याला शुक्राचार्यांकडे पाठविले.

कच शुक्राचार्यांची भक्तिभावाने सेवा करु लागला. गुरुंच्या कृपेस पात्र झाला. शुक्राचार्यांची मुलगी देवयानी कचाबरोबर प्रेम करु लागली. राक्षसाना समजले की, कच कोणत्या उद्देशाने आला आहे. त्यांनी कचाला ठार मारण्याचा कट केला. एक दिवस कच गुरुंच्या गाईना घेऊन चरावयास गेला असता त्यांनीं कचाचा वध केला. व त्याला एका झाडाला बांधले. तो समाचार मिळताच शुक्राचार्यांनीं त्याला आपल्या संजीवनीच्या मंत्राने पुन्हां जिवंत केले. राक्षसांनी कचाला ठार करून जाळले व त्याचे भस्म मद्यामधे मिसळुन त्यांना दिले.

शुक्राचार्यांनी आपल्या अंर्तज्ञानाने राक्षसांची दुष्ट वृत्ती ओळखली व आपल्या पोटांत असलेल्या कचाला जिवंत करण्याचा संजीवनी मंत्र शिकविला. त्यावर कच शुक्राचार्यांचे पोट फाडून बाहेर आला. व त्याने त्यांना मृतसंजीवनीचा मंत्र म्हणून पुन्हां: जिवंत केले. त्यानंतर गुरुंपासून निरोप घेऊन जात असलेल्या कचाला पाहून देवयानीने त्याला आपल्या बरोबर विवाह करून घेण्याची वनंती केली.

"तू गुरुची मुलगी आहेस त्यातून मी तुझ्या वडिलांच्या पोटातून बाहेर आलो म्हणून तुला भावासमाना आहे" असे म्हणून त्याने तिचे म्हणणे डावलले.

ते ऐकून देवयानीला अतिशय संताप आला तिने शाप दिला–"मृत संजीवनी मंत्र तुला उपयोगी पडणार नाही." त्या शापाकडे कचाने दुर्लक्ष केले. त्याने विचार केला माझ्याकडून उपदेश प्राप्त करणाऱ्यांना तर उपयोगीं होईल म्हणत कच देवलोकी पोहोंचला.





# उदार मन

यादगिरी नावाचे एक छोटेसे गाव होते. त्या गावाला लागुनच एक नदी वहात होती. त्या नदीजवळच्या देवळात एकदा कुंभमेळा भरला. त्याकारणाने हजारो लोक नदीत स्नान करून दर्शन घेऊन जाऊ लागली. अशा तऱ्हेने आठ दहा दिवस मोठा पर्वणीचा ठरला.

त्या दिवसातच गावात रहाणाऱ्या गंगाराम नावाच्या शेतकऱ्याच्या मुलीचा सुमतीचा वाढदिवस होता. तेव्हां गंगा-रामची बायको आपल्या नवऱ्यास म्हणाली–"आज अंधार पडण्यापूर्वी तुम्ही घरी परत या. शिप्याने मुलीचा रेशमी परकर पोलका आतापर्यंत शिवला असेल. तो घालून तिला देवळात घेऊन जायचे आहे ना! आता आधीच देवळात गर्दी वाढू लागली आहे.

शिप्याकडे गेला तेव्हां परकर अर्धवटच शिवलेला होता. पूर्ण झाला नव्हता तेव्हां शिप्याने त्याला थोडावेळ थांबवले व परकर शिवून दिला. परकर पोलका घेऊन जेव्हां गंगाराम घरी निघाला तेव्हां नुकताच अंधार पडायला लागला होता.

गंगाराम घराच्या जवळ पोहोचला तेव्हां घरातून एक तरुण घाबरत बाहेर पडत असतांना त्याला दिसला. त्या मुलाला पूर्वी कधी गंगारामने पाहिले नव्हते.

त्या तरूणाचा घाबरलेला चेहरा पाहूनच गंगारामच्या मनात शंका आली की तो चोर असावा. तो धापा टाकीतच जवळ आला व त्याची मानगुट पकडीत त्याला म्हणाला–"तू कोण आहेस? ह्या घरातून काय चोरलेस ?"

त्या तरूणाची घाबरून बोबडीच वळली त्यामुळे त्याच्या तोंडून एक शब्दही बाहेर पडला नाही. तेव्हां गंगारामने त्याच्या पाठीवर थापटी मारली रागावीत म्हटले–

"अरे मूर्ख, चोरा तू चोरलेली वस्तु कुठे आहे दाखव पाहू ?"

तो आवाज ऐकून गंगारामची बायको मुलगी व आजुबाजुचे लोक तेथे धावतच आले.

"ह्या वयातच हा चोरी करावयास लागला आहे ह्याला लाथामारून ठिकाणावर आणला पाहिजे नालायक" गर्दीतील एक व्यक्ति म्हणाली.

"प्रथम त्याची झडती घेऊन पहा तर त्याने काय चोरले आहे ते !" दुसरा एकजण म्हणाला.

गंगारामने त्याचे खिसे चांचपडून पाहिले त्यात फक्त थोडेफार सुट्टे पैसे होते.

तो तरुण हात जोडून म्हणाला–"अहो, मी चोर नाही मला सोडून द्या."

"असे ऐकिवात आहे की अलिकडे गुंडाची टोळी लहान मुलांना पळवून नेते. आता तर मेळा चालू आहे. त्यामुळे आता तर काय मोकळेपणाने मुलांना उचलून घेऊन जातील. त्याकरीताच आला असेल." त्यातील एक बाई म्हणाली.

ते ऐकताच पहाणाऱ्यापैकी आणखी दोन माणसे गर्दीतून घुसून पुढे आली व त्याला मारायला धावली. तेव्हां तो तरुण म्हणाला- "घरात देवघरापाशी लालरंगाची एक थैली आहे ती घेऊन या."

सुमती धावतपळत देवघरात गेली. व तिने ती लाल रंगाची थैली उचलून आणली. त्यात चांदीचे रुपये भरलेले होते. गंगारामला समजेना की ही लाल रंगाची थैली आपल्या घरात कशी आली.

तो तरुण स्वत:चा घसा खाकरून म्हणाला–"ह्या थैलीत चांदीचे एक हजार रुपये आहेत. मीच ही थैली आपल्या घरात नेऊन ठेवली आहे. सांगू कां मी ही थैली कोणत्या कारणासाठी तुमच्या घरात नेऊन ठेवली आहे ते....."

गंगारामच्या बरोबर इतर जमा झालेले सर्वलोक त्याच्याकडे आश्चर्याने पाहू लागले त्याने असे सांगितले–"बारा वर्षापूर्वी मी खूप आजारी पडलो होतो. तेव्हां वैद्याने माझ्या वडीलांना सांगितले की, ह्याला शहरातली चांगल्या दवाखान्यात ठेऊन चांगल्या वैद्यांचा ह्यावर उपचार करावा नाही तर हा जगणे अशक्य आहे. परंतु तेव्हां वडीलांजवळ बिलकुल पैसा नव्हता. शेजार गावात त्यांचा एक जिवलग मित्र रहात होता. त्यांना विश्वास होता की तो नक्कीच आपल्या अचडणीच्या वेळी आपल्याला मदत करेल. परंतु त्याना तेथे गेल्यावर समजले की, त्यांचा मित्र मेळ्यात गेला आहे. तेव्हां ते मित्राच्या शोधार्थ तेथे पोहाचले व संध्याकाळ पर्यंत शोधत राहीले. परंतु गर्दीत त्यांना काही तो दिसला नाही.

सरते शेवटी कंटाळून ते निराश होवून आपल्या गावात येऊ तहान भागविण्यासाठी एका चौरस्त्याच्या बाजुला असलेल्या घरापाशी थांबले व त्यांनी दार ठोठांवले. त्या घराच्या मालकीणीने दार उघडून

















तो सर्व वृत्तांत सांगून तरुण गंगारामला म्हणाला–" महाशय, ह्यानंतर माझ्या वडीलांनी त्यांचे कर्ज फेडण्याचा पूर्णपणे प्रयत्न केला. परंतु त्यांना ते शक्य झाले नाही. माझे वडील आजारी पडले एक महिन्यापूर्वी मरण्या आधी त्यांनी मला ही सर्व हकीकत सांगितली व म्हटले माझ्या क्रियाकर्माला जास्त पैसा खर्च न करता घरात जे काय आठशे रुपये आहेत त्यात आणखी दोनशे जोडून तू त्यांना नेऊन द्यावे.

ह्याकरीता मी एक हजार रुपये तुमच्या घरात देवघराशी नेऊन ठेऊन दिले हे सर्व पैसे आपलेच आहेत." असे म्हणत त्याने हात जोडून नमस्कार केला.

त्या तरुणाच्या ईमानदारीवर तेथे एकत्र जमलेले लोक आश्चर्य करू लागले.

"वहा रे, खरे काय तेच समजल्याशिवाय कोणालाही पकडून चोर म्हणून ओरडणे काय चांगले झाले का?" असे म्हणत गंगारामाला उलटसुलट बोलून तेथून सर्वजण निघून गेले.

तो तरुण तेथून जाताच गंगारामने आपल्या मुलीच्या हातून ती थैली घेत म्हटले–"बाळे, तुझ्या वाढदिवसाच्या दिवशी एक चांगलीच भेट मिळाली आता ह्या पैशाने तुझ्या करीता एक सोन्याची चेन करू.

गप्ततेले

त्यांना पाणी दिले व पुन्हां दार बंद केले. ते वळून जाणार तितक्यात त्यांना दाराच्या उंबरठ्याच्या सापटीत काहीतरी वस्तु चमकताना दिसली. त्यांनी उचलून पाहिली तेव्हां ती हिऱ्याची अंगठी होती. त्यांनी पुन्हां दार वाजवून ती अंगठी त्या मालकीणीला द्यायचा विचार केला तितक्यात त्यांना मी आजारी असल्याची आठवण आली. तेव्हां त्यांनी विचार बदलला ती खिशात घातली व ते घरी परत आले.

ती अंगठी शहरात 'विकून' त्यांनी माझ्यावर उपचार केले व अशा प्रकारे मला मरणाच्या दाढेतून वाचविले.

त्यावर गंगारामची बायको त्याला दटावत म्हणाली–"अरे वारे, आजकाल लहान मुलांना सोन्याचे दागिने करणे म्हणजे चूक संकटात पडण्यासारखे आहे. आता ह्या पैशाने मी मलाच चांगल्या बांगड्या बनवून घेईन.

सुमतीने ती पैशांची थैली खेचून घेत वडिलांना म्हटले–"बाबा, आता मी किती वर्षाची झाले हो?"

"बाळे, तुला काय वाटते मला तुझे वय काय माहीत नाही तू आज नऊ पूर्ण होऊन दहाव्या वर्षात पदार्पण करीत आहेस." गंगाराम म्हणाला.

"मग ह्या तरुणाने जे कर्ज फेडले ते बारा वर्षापूर्वीचे आहे. हे घर आपण खरेदी केले त्यानंतर वर्षाने मी जन्माला आले. ह्याचा अर्थ आपल्याला घर विकलेल्या रामनाथ दादाची हि अंगठी आहे. त्यातून आज तर त्यांना परिस्थितीमुळे आपल्या मुलाचा सांभाळ सुद्धा नीट करता येत नाही. त्यातून त्यांची तब्बेत सुद्धा चांगली नसते. ते तर आत्ता खूप अडचणीत आहेत. मला वाटते हे सारे पैसे त्यांना एकदा तरी चांगल्या कामाला येतील. मी आत्ताच दादाना देऊन येते थांबा!" असे म्हणत सुमती तेथून निघाली.

गंगाराम व त्याच्या बायकोला आपल्या मुलीचे उदार मन पाहून खूप आनंद वाटला. गंगारामने अतिशय प्रेमाने तिला जवळ घेतले व म्हटले–"बाळ, हे पैसे आपण दादांना उद्या नेऊन देऊ. आपल्याला आता देवळात जायचे आहे ना!"

"बाबा, आज देवळात गेलो नाही तर फार मोठे नडणार नाही आहे. त्यातून दादाना जर आजच पैसे नेऊन दिले तर मला दुप्पटच पुण्य मिळेल. असे म्हणत सुमती थैली घेऊन रामनाथच्या घराच्या दिशेने जोरात पळाली.

वयाने लहान असून सुद्धा मनाची मोठी उदार असलेली आपली मुलगी पाहून आईवडिलांचा आनंद उमाळून आला. त्यांनी मनोमन तिचे खूप कौतुक केले.





# विलक्षण धाडसी

नारायणवर येथील शेतजमीनी पैकी थोडी फार जागा जमिनदाराची होती आणि त्या जागेवर बरीच संपन्न गावे वसलेली होती परंतु तेथील कचेरीत एक वर्ष पूर्ण होऊन सुद्धा कोणी कर, शेतसारा भरीत नसे. तेव्हां जमिनदार आपला कारकुन कृष्णस्वामी ह्याला म्हणाला–"दिवाणजी, सांगा तरी आता काय करायचे ?"

"सरकार, हाच विचार करीत बसून राहीलात काय शहाणपण! ते लोक येऊन कर व शेतसारा सर्वच्या सर्व भरतील, एकदा कां होईना असे झाले आहे कां ? हि गोष्ट त्यांना पटली की आपल्याकडून कर वसुल झाले नाही तरी काही नुकसान होणार नाही. तर मात्र आपण त्याच्या नजरेतुन खाली होऊ त्यामुळे मी स्वतः जाऊन काही काही गावातून कर वसूल करून आणतो आणि बाकीच्या ठिकाणी आपल्या नोकरांना पाठवून त्यांना पूर्व सुचना देऊन ठेवतो."

जमीनदाराला त्याची ती कल्पना आवडली. दुसऱ्या दिवशी दिवाणजी चार-नोकरांना घेऊन कर वसुलीच्या कामा करीता निघाला. एक आठवडा हिंडून त्यांनी अनेक शेतकरी लोकांकडून सारा वसूल केला. नंतर ते चौघे नोकर इतर गावास गेले व त्यांनी तेथल्या लोकांना पूर्वसुचना दिली की, त्यांनी ताबडतोब येऊन कचेरीत कर व शेतसारा भरावा.

दिवाणाने कर वसुलीची रक्कम चार वेगवेगळया ठिकाणी चार गाठोड्यातून बांधली व नोकरांना आज्ञा केली. त्यांनी ही चार गाठोडी उचलून आणावीत व दिवाणजी त्यांच्या पुढे घोड्यावर निघाला.

गजेन्द्र कुलकर्णी

सूर्य मावळेपर्यंत ते एका मोठ्या तळ्यापाशी येऊन पोहोचले तेथून अर्ध्या मैलावरच एक खेडेगांव होते.

दिवाणजीने विचार केला की त्या खेडेगावात रात्र काढणें काही बरोबर होणार नाही. त्यामुळे तो नोकरांना म्हणाला–"ऐका, आता काळोख पडू लागला आहे. ते लांबवर जे गांव आपल्याला दिसते आहे ते काही फार मोठे नाही दहा पांच घरे जेमतेम असतील. पाटील तलाठी कोणीच नसणार त्यामुळे माझे आदरातिथ्य तेथे होणे अशक्य माझ्या घोड्यांना चारापाणी सुद्धा मिळणे मुष्किल तेव्हां मी सरळ शहरात निघून जाईन. पण तुम्ही सर्वजण आता काय करणार ?"

नोकरांना दिवाणाचा उद्देश काय तो समजला त्यातील एक जण म्हणाला–"मालक, दिवसभर हे ओझे उचलून आमचे अंग खिळखिळे झाले आहे. आज ह्या वडाच्या झाडाखाली आम्हीं स्वयंपाक करून रात्र काढू व उद्या पहाटे पुन्हां निघू.

"ठिक आहे, तसेच करा. पण एक चांगले ध्यानांत ठेवा ह्या पैशांची चांगली राखण करा" असा इशारा देत दिवाण तेथून निघून गेला.

दिवाण निघून जाता क्षणी चारी नोकर त्या वडाच्या वृक्षाखाली आले व तेथे शिधा



काढून त्यांनी गप्पा मारता मारता स्वयंपाक बनवला व तो खाल्ला. नंतर चारी गाठोडीं एकत्र ठेवून त्याच्या चारी बाजूंनी ते झोपले.

थोड्यावेळाने त्यातील शोभराज नावाचा माणूस घोरायला लागला बाकी तिघे त्या आवाजाने चिडून तेथून उठले व एका नंतर एकाने एकेक तास पहारा द्यावयाचा अशा निश्चयाने ते निघाले. तितक्यात वडाच्या फांद्यांमधुन सळसळ असा काहीसा आवाज ऐकू येऊ लागला.

त्या तिघांची घाबरगुंडी उडाली. त्यांनी निरखुन पाहीले तेव्हां एक केस पिंजारलेली आकृती त्या झाडाच्या फांद्या खाली खेचित उतरत म्हणाली–"अरे ए, गधड्यानो

तुमची ही हिम्मत माझ्या झाडाखाली येऊन स्वयंपाक पाणी केलेत आणि आता झोपताय का?" असे म्हणत ती आकृती फांद्यावरून सरसटत खाली उतरून येऊ लागली.

त्या भयंकर आकृतीला पाहून तिघांची बोबडी वळली ते मागे न पहाता मुसाट पळू लागले. त्या सर्व प्रकारमधे शोभराजची झोप मोडली. तो आपल्या सोबत्यांना पळतांना पाहून मागे वळून पाहू लागला की ते कां पळत आहेत. तेव्हां त्याला केस पिंजारलेली एक पिशाचिण दिसली.

ते तिघेजण जीव मुठीत धरुन धावत पळत कचेरीत शिरले व त्यांनी घडलेली घटना जमीनदाराला सांगितली. ते त्या नोकरांवर भयंकर संतापले व आणखी चार नोकरांना बरोबर घेऊन तेथे झाडाखाली येऊन पोहोचले. त्यांनी पाहिले की शोभराज पैशांच्या गाठोड्यांवर हात पसरून पहारा देत बसलेला आहे.

जमिनदाराला त्याच्या साहसाचे अत्यंत कौतुक वाटले. त्याने बक्षिसी म्हणून त्याला शंभर रुपये दिले. पैसे घेऊन तो शहरात आला. जे तिघेजण घाबरून पळून आले होते त्याच्याकडून ती बातमी सर्व गांवभर पसरली. शोभराज जेव्हां घरी आला तेव्हां त्याची बायको स्तुती करीत म्हणाली—"मला कल्पना सुद्धा नव्हती. तुम्ही एवढे धाडसीवीर असाल म्हणून!"

त्यावर शोभराज झटक्यात म्हणाला—"अग मीं कसला शूर वीर हि गोष्ट तर फक्त मी व ती जटावाली दोघांनाच ठाऊक आहे, बाकी तिघांना तरीं पळण्याची ताकत होती माझ्यात ती सुद्धा नव्हती म्हणून मी बेशुद्ध होऊन तेथल्या तेथे पडलो. सकाळी जेव्हां घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकला तेव्हां मी शुद्धीवर आलो.

"ओहो असे काय! असे म्हणत शोभराजची बायको आश्चर्य करू लागली आणि म्हणाली—"तरमग हे रहस्य फक्त तुम्हाला व मला दोघांनाच माहीती आहे. परंतु चुकूनही हे रहस्य दुसऱ्यांसमोर उघड करून बोलून दाखवू नका हं!"






[ ३ ]

[ चित्रसेनला त्या विचित्र महालातून आलेले मंत्री व सेनापती राजमहालात घेऊन गेले. त्या महालात राजाला आवश्यक असणाऱ्या सर्व सोई उपलब्ध होत्या. दुसऱ्या दिवशी चित्रसेनचे पिता महाराज तारकेश्वर त्याला भेटावयास आले व त्याला असे आश्वासन देऊन गेले की, कधीही जरूरत पडली तर मी मदतीस तयार आहे. पुढे......]

दुसऱ्या दिवशी पहाटेच चित्रसेननें आपल्या वडिलांचा निरोप घेतला व आपल्या सहचऱ्यांसह तो महालात परत आला. तो परत येऊन पाहातो तो काय महालाच्या जवळपास नागरिकांची ही प्रचंड गर्दी जमली होती. ते सर्वजण रडत भाकत राजाला विनवित हातवारे करीत म्हणू लागले—"महाराज, आमचे रक्षण करा. ह्या जंगलात पूर्वीपासून रहाणारा उग्राक्ष राक्षस ह्या आधी आमच्या पशुपक्ष्यांनाच उचलून घेऊन जात होता. परंतु आंता तो माणसांना सुद्धा उचलून घेऊन जाऊ लागला आहे. आम्हांला त्याच्यापासून वाचवा.

उग्राक्षाचे नांव ऐकताच चित्रसेन उभा हादरला. परंतु त्याच क्षणाला त्याच्यातील पौरुषत्व जागे झाले. दुसऱ्या क्षणाला तो विचार करून मनांत म्हणू लागला की



आता आपण काही असहाय्य नाहीं. राज्य, प्रजा सैन्य इत्यादी बाळगणारे राजा झालो आहोत. आपल्या राज्यातील रहाणाऱ्या प्रजेला छळणारा मग तो राक्षस असो किंवा मानव कोणी कां असेना त्यांचा संहार करण्याची जबाबदारी आपली आहे. तो उग्राक्ष सुद्धा कां असेना त्याची चांगलीच अद्दल आपण मोडायला पाहिजे.

चित्रसेनने शंका येत लोकांना विचारले–"तुम्हां लोकांना कसे ठाऊक की तुमचे पशुपक्षी उग्राक्ष राक्षसच उचलून घेऊन जात आहे? दुसरे कोणी नाही?"

हा प्रश्न ऐकताच तेथील लोकांच्या झुंबडीत एकच हलकल्लोळ माजला. काही वेळानंतर त्यांच्यातील चार प्रमुख माणसे पुढे येत म्हणाली–"महाराज उग्राक्ष व त्यांच्या सेवकांनी आमची जनावरे व माणसे उचलून नेतांना आमच्यातील काही लोकांनी स्वत:च्या डोळयांनी पाहीली आहेत. नरमांस खाणाऱ्या राक्षसां शिवाय दुसरे कोण माणसे उचलून घेऊन जातील?"

नागरिकांमधील त्या प्रमुख व्यक्तिच बोलणे ऐकून चित्रसेनला मोठे विचित्र वाटले. त्याने विचार केला की, तसे पाहिले तर पशुपक्षी उचलून नेणारे उग्राक्षाचे सेवक असू शकतिल परंतु माणसे पळवून नेणारी दुसरी कोणची तरीं टोळी असावी."

"ठिक आहे, तुम्ही सर्वजण आता आपापल्या घरी जा. एक दोन दिवसात मी उग्राक्ष व त्यांच्या सेवकांना रोखून ठेवण्याचा प्रबंध करतो." चित्रसेन म्हणाला.

चित्रसेनचे उत्तर ऐकताच मंत्री त्याच्यापाशी आला व त्याच्या कानात कुजबुजत म्हणाला–"महाराज मी आपल्या दूतांकडून उग्राक्ष राक्षसांच्या संबंधी ऐकले आहे. तो महाभयंकर राक्षस आहे."

चित्रसेन महालाच्या पायऱ्या चढीत बोलला–"असेल! तो महाभयंकर राक्षस सुद्धा असेल परंतु आपल्या जनतेला देत असलेला त्रास पाहून आपण काय गप्प रहायचे. आमचा सेनापती कुठे आहे?





हा प्रश्न ऐकताच राजाच्या पाठीमागून चालत येत असलेला सेनापती झटक्यात पुढे आला व म्हणाला–"महाराज, काय आज्ञा आहे."

"आपले सैनिक कुठे आहेत? ते सर्व पराक्रमी व शस्त्रास्त्रात निष्णात हुषार आहेत नां?" चित्रसेनने विचारले.

सेनापतीला थोडेसे आश्चर्य वाटले तो म्हणाला–"महाराज, त्यांची हुषारी व पराक्रम ह्या बाबतीत दुसरा कोणी बरोबरी करणार नाही. पाहीजे तर ते सर्व डोंगराचा चुरा करून दाखवतील."

"ओहो! कोणताही शक्तिशाली बलिष्ठ माणूस डोंगर फोडून दाखवेल. माझ्या म्हणण्याचा अर्थ तो नाही. जरूर पडली तर आपले सैनिक त्या उग्राक्ष राक्षसाला सामना देण्यास समर्थ आहेत कां नाही? हे मला पहायचे आहे."

हा प्रश्न ऐकताच सेनापतीची दांतखीळ बसली तो गर्भगळीत होऊन ततपप् करीत म्हणाला–"महाराज, तो राक्षस......ह्यानंतर तो आणखी काही बोलणार तितक्यात चित्रसेनने तो घाबरून गेला असल्याचे पाहिले व त्याला क्षणभर हंसू आले. तो म्हणाला–"सेनापती राक्षसाचे नुसते नांव काढले तर तुमची अशी अवस्था मग शत्रूचे तर नावच काढायला नको. ठिक आहे आता सांगा ते लोक कोणत्या ठिकाणी रहातात?"

त्यावर सेनापती पुढे होत पश्चिमेकडे असलेल्या तटापाशी गेला. चित्रसेन जेव्हां जवळ गेला तेव्हा त्याने दूरवरच्या डोंगरमाथ्यावर व जंगलात असलेली ठिकाणे दाखवित म्हटले–"महाराज, त्यांच्या लोकांनी रहावयास त्या जागेचा उपयोग केला आहे. आपले हजारो सैनिक त्या बाजुलाच तंबु बांधुन तेथे पहारा देत आहेत.

चित्रसेनने पाहिले कित्येक लोक तेथे काम करत होते. कित्येकजण हातात कुदळ_फावडी घेऊन जागा समतल करण्यात गुंतले होते. ते पहाताच चित्रसेनला









अभिमान वाटला की आपल्या जवळ केवळ संपत्तीच नसुन मनुष्यबळ सुद्धा आहे. असा विचार येताच त्याला स्फुरण आले. त्याला अत्यंत प्रसन्न वाटले. आपल्यावर महान उपकार करणाऱ्या सिद्धाचे क्षणभर त्याला स्मरण झाले व त्यांने कृतज्ञतेने मान झुकवली.

त्याचवेळी मंत्र्याने राजाला एक सल्ला देत म्हटले–"महाराज, आपण आपल्या सैनिकांना त्यांच्यावर हल्ला करावयास पाठविण्यापूर्वी थोडा विचार करावा."

"मी आपल्या सैनिकांना उगाच राक्षसांवर हल्ला करण्यास पाठवू इच्छित नाही. मी स्वत: त्यांच्याशी बोलण्यास जाईन" असे म्हणत सेनापतीकडे वळत चित्रसेन म्हणाला–"काय तुम्ही मला राक्षसांची रहाण्याची बरोबर जागा दाखवाल नां!"

"मी आपल्या गुप्तहेरांपासून त्या उग्राक्ष राक्षसाचे रहाण्याचे ठिकाण नुकतेच शोधले. आहे." परंतु "महाराज, आपण असे ऐकटेच........" सेनापती स्वत:शी पुटपुटू लागला.

"मी एकटाच त्याच्या ठिकाणापाशी जाणार नाही. तर त्याच्या पाशी रस्ता दाखविण्यासाठी माझ्या बरोबर काही सैनिक पाहीजे हवे तर तू सुद्धा माझ्या बरोबर यावे." चित्रसेन म्हणाला.

"महाराज, तुम्ही हे काय म्हणता आपल्या करीता मीच काय पण प्रत्येक सैनिक प्राण अर्पण करावयास तयार बसलेले आहेत." सेनापती राजाला म्हणाला.

ह्यानंतर चित्रसेन सेनापती व थोड्या सैन्यानिशी उग्राक्ष राक्षस जेथे रहात होता तिकडे निघाला काही गुप्तहेरांना राक्षस रहात असलेले ठिकाण माहीत होते. त्यामुळे ते सर्वांत पुढे झाले. व त्यांना मार्ग दाखवू लागले. बरोबर मध्यान्हा पर्यंत ते एका घनदाट जंगलात बऱ्याच लांब येऊन पोहोचले. तेथून जवळच उग्राक्षराक्षस रहात असलेले ठिकाण दिसत होते.

डोंगरमाथ्यावरच्या सपाट जागी उग्राक्ष राक्षसाच्या सेवकांनी चित्रसेन व त्याच्या सैनिकांना येत असलेले पाहिले. व ते आनंदाने नाचु गाऊ लागले व खिदळत आपापसात म्हणाले–"अरे वा रे! हे मनुष्यप्राणी किती बुद्धिमान आहेत. हे लोक आमचा व आमच्या मालकाचा आहार बनण्यासाठी स्वत:हूनच इतक्या लांब चालत येथे आले पहा!"

त्या सेवकांना पाहून चित्रसेन त्यांना म्हणाला–"अरे ऐका, माझे नांव चित्रसेन आहे. तुम्ही आपल्या नायकाला जाऊन सांगा की, मी त्यांच्या भेटीसाठी आलो आहे."

ते ऐकताच राक्षस जोरजोरात खिदळू लागले व म्हणाले–"सर्व माणसांचे मांस तर एकच प्रकारच असते. तुझे मांस काय वेगळे आहे कां? तुझे कपडे तर अत्यंत मौल्यवान आहेत. तू काय कोणता राजा तर नाहीस नां?"















"हो, हो, मी राजाच आहे. महाराज चित्रसेन आहे. ज्यास्त फाजीलपणे बोललात तर एकेकाची चामडी लोळवीन. येथून पांच सहा मैलावर लांब असलेल्या किल्ल्या संबंधी काही तुम्हांला माहीती नाही." चित्रसेनने जरा चिडीनेच विचारले.

त्या महालाचे नांव ऐकताक्षणीच राक्षस घाबरून गेले व त्यांना म्हणू लागले—"प्रभू, आम्हांला क्षमा करा. आमची चूक झाली. आमच्या नेत्याने आपल्या विषयी सर्व काही गोष्टी सांगितल्या आणि एक गोष्ट सुद्धा सांगितली की आमच्या भविष्य काळातील होणाऱ्या महानेत्याला आपण पाठवणार आहात कृपा करून यावे. आमचा नेता

किल्ल्याच्या आत आहे." असे म्हणत चित्रसेन व त्याच्या बरोबरची माणसे उग्राक्षच्या किल्ल्याच्या बाजूने पुढे पुढे जाऊ लागली.

उग्राक्षचा रहाता किल्ला मोठा विचित्रच वाटत होता. त्याने जंगलाच्या मध्यभागी असलेले छोटे छोटे पहाड फोडून त्यामधे छोटी दालने दारे बुरूज वगैरे बांधलेले होते. त्या किल्ल्याला चौफेर उंच भिंती व चोहोबांजुने बुरूज होते त्याचे दार म्हणजे एक मोठी शिळा फोडूनच तयार करण्यात आली होती. जर कां कोणी मानवाने हल्ला केला तर त्यावर कब्जा करणे अशक्य होते. मग दुसरा राक्षस सुद्धा त्यावर हक्क गाजवणे कठीण.

चित्रसेनने त्या विचित्र वाटणाऱ्या किल्ल्याकडे स्तंभित नजरेने पहात त्याचे मुखद्वार पार केले व आत गेला. तेव्हां त्याला उग्राक्ष राक्षसाचे विकट हास्य ऐकू आले तो आपल्या महालातील एका उंच आसन असलेल्या शिळेवर बसलेला होता.

"अरे, चित्रसेन तू तर तुझा जेष्ठ मुलगा द्यायचे वचन दिले होतेस तो कुठे आहे?" असे म्हणत चित्रसेनच्या बरोबर आलेल्या सर्व लोकांना तो निरखून पाहू लागला.

"हे पहा, उग्राक्षा, तुला स्मृतीभ्रंश तर नाही झाला. परवाच तर तुला मी तसे वचन दिले होते तेवढ्यात तुला अठरा वर्षे होऊन गेली असे वाटले की काय?" चित्रसेन म्हणाला.

चित्रसेनचे बोलणे ऐकून उग्राक्ष खळाळून हंसू लागला.

"राक्षस जेव्हां शुद्धीत असतो तेव्हां मानव जातीला तो अती भयंकर होतो असा स्थितीत जर कां त्याची मतीभ्रम झाली तर तो मानव प्राण्याचा सर्वनाशच करेल" उग्राक्ष म्हणाला.

"मी सर्वमानव जातीच्या बाबतीत काही जाणत नाही परंतु माझ्या राज्यातील मानवप्राणी नष्ट होवू लागले आहेत नां!" चित्रसेन म्हणाला.

"तुझे राज्य...." असे-म्हणत उग्राक्षला आश्चर्याचा धक्का बसला नंतर हसत म्हणाला—"हो, हो, उग्राक्षाचे हे सारे जंगल म्हणजे तुझेच राज्य आहे. नर्मदानदीच्या किनाऱ्यावर पसरलेले धवलगिरीचे राज्य सोडले तर बाकी तिन्ही दिशेला पसरलेले उग्राक्षाचे हे जंगल शंभर योजनें तरी लांब पसरलेले आहे." उग्राक्ष म्हणाला.

"ह्या जंगलातील वसलेली गावे व खेडी. यामधे रहाणाऱ्या माणसांचा तुमचे अनुचर संहार करीत आहेत. पशुपक्ष्यांना उचलून घेऊन जात आहेत. हे तू घातलेल्या अटीच्या विरुद्ध आहे. तू तर मला



ह्या प्रदेशात शांततापूर्वक राज्य करण्यास सांगितले होतेस ना!" चित्रसेन म्हणाला.

चित्रसेनचे बोलणे ऐकून उग्राक्षाचा चेहरा खाली पडला. तो काही बोलणार तितक्यात थोडा थांबून त्याला म्हणाला—"तुम्ही सर्वांनी त्या समोरच्या दगडांवर जाऊन बसा" असे म्हणत तो चित्रसेनकडे केविलवाणे पहात म्हणाला—"चित्रसेन, तू चुकीची समजुन करून घेत आहेस ह्या जंगलात मनुष्याचे जे अपहरण होत आहे ह्याला कारणीभूत माझे अनुचर नाहीत. परंतु दुसरे आहेत."

"तू काय माझा विश्वास संपादन करू पहातोस की काय आपले अनुचर मनुष्यांचा

संहार करीत नाहीत काय वेडबीड लागले नाही नां !" चित्रसेन संतापाने त्याला म्हणाला.

मी काही तसे म्हणत नाही कीं माझे अनुचर तुम्हां लोकांना त्रास देत असतील. एखादे वेळेस काही एका सण उत्सवा प्रित्यर्थ त्यांनी एखाद्या माणसाचा बळी घेतला असेल. परंतु गांवावर धाड घालून माणसे पळवून नेणारे हे दुसरे कोणी तरी असतील. ते राक्षसांपेक्षा जास्त क्रुर आहेत. आणि भयंकर सुद्धा" असे म्हणत रुद्राक्ष क्षणभर थांबला व त्याला म्हणाला– "चित्रसेन तू कधी अग्नी द्वीपचे नाव ऐकले आहेस कां ?"

"मी आजपर्यंत त्याचे नाव कधीही ऐकले नाही" चित्रसेन आश्चर्य वाटून म्हणाला.

तर मग आजची रात्र तू व तुझे साथीदार येथे रहावयास तयार व्हा. म्हणजे रात्रीच्या वेळी येथे येणारे क्रुर प्राणी मी तुम्हांस दाखवून देतो. ते शक्तिने आम्हां राक्षसांची बरोबरी करू शकत नाहीत. परंतु ते एका भयंकर व बिचित्र अशा पक्षी प्राण्यांवर बसून येतात ते प्राणी पंख असून उडत उडत येथे येतात. त्यामुळे आम्ही त्यांना पक्षीप्राणी म्हणतो. त्यांना तोंड देण्याची शक्ति आमच्या मधे नाही. तरीही मोठ्या मुष्किलीने अग्नीद्वीप मधून उडत आलेल्या एका पक्षावरील माणसास आम्ही आमच्या नजर कैदत बंदी केले होते. परंतु कसल्या-तरी व्याधीने ती व्यक्ति दुसऱ्याच दिवशी मरण पावली. जर कां तुला त्याच्या हाडाच्या सांपळा पहायचा असेल तर चल तू माझ्याबरोबर मी तुला दाखवतो." उग्राक्ष त्याला म्हणाला.

"सांपळा नाही......जर कां तू म्हणतोस ती गोष्ट खरी असेल तर मी त्या दुष्टांना विचित्र पक्षांवर बसून येणाऱ्या क्रुर लोकांना स्वतःच्या डोळ्यानेच पाहू इच्छितो." चित्रसेन म्हणाला.

उग्राक्षाने त्याच्या म्हणण्यास संमती दर्शवून व मान हलविली. (क्रमशः)



# चांगला वाईट

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे श्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा! तू इतकी मेहनत करतो आहेस. परंतु त्यामुळे तुझ्या हातून नीतिधर्माचे पालन होते आहे की नाही. याचा विचार केला आहेस का? कारण ह्या जगात चांगला किंवा वाईट ह्या संबंधीचा सुक्ष्म धर्म समजणे सुद्धा शक्य नाही. त्यामुळे आपण नेहमी पहातो की चांगला माणुस नुकसान सहन करतो व वाईट त्याचा फायदा उठवतो. ह्याचे उदाहरण म्हणून मी तुला दोन व्यापाऱ्यांची गोष्ट सांगतो लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कोण्या एका नगरात सत्यपाल व वज्र-नाभ नावाचे दोन व्यापारी रहात होते.



सत्यपालने नेहमी सदाचार इमानदारीने व्यवहार करून लाखो रुपये कमावले होते. परंतु वज्रनाभने उलट अनेक अत्याचार लांचलुचपत अन्याय करून लोकांना लुबाडून पैसा कमावला होता. त्यामुळे नगरातील अधिकांश लोकांना त्याची भीती वाटत होती.

वज्रनाभच्या आजोबांना त्याच्या त्या वागणुकीचे अतिशय दुःख होत होते. त्यांनी नातवाला अनेक प्रकाराने समजून सांगण्याचा प्रयत्न केला तरी तो त्यांना टोलवा टोलवी करून म्हणे–"मी तर धर्माचे पालन करतो. अधर्मपूर्ण व्यवहार करीत नाही ना!"

ते म्हणत–"बाळा, व्यापार धर्मापेक्षा मानवधर्म कित्येक पटीने श्रेष्ठ असतो तू तर त्याची उपेक्षा करतोस तू तशा कामासाठी नेहमी सत्यपालचा आदर्श डोळ्यासमोर ठेव." अशा प्रकारे पद्मनाभने आपल्या नातवाला बऱ्याचदा समजवायचा प्रयत्न केला. परंतु त्याने त्यांच्या बोलण्याकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले.

शेवटी पद्मनाभच थकून गेला. गावाबाहेरील एका आश्रमात पूर्वीपासून रहात असलेल्या साधुचे त्याने दर्शन घेतले व त्यांना आपल्या नातवाचा सारा वृत्तांत कथन केला व म्हटले–"स्वामी मला फक्त एकाच गोष्टीची भीती आहे की, माझा नातू त्याच्या कर्तृत्वाचे नक्कीच चांगले प्रायश्चित्त भोगेल. तरी कृपा करून सांगा की, कोणत्या कारणाचे त्याचे मन परिवर्तन होईल.

साधूने क्षणभर विचार केला व म्हटले–"सत्यपाल ह्या नगरातील सर्वात मोठा व्यापारी आहे. त्याने व्यापारात लाखो रुपये कमावले आहेत. तरी सुद्धा इतर व्यापारी वज्रनाभचेच अनुकरण करू पहातात. कारण की व्यापारात अनीति दुराचार हा सरळ मार्ग नाही. जर का वज्रनाभच्या मनाचे परिवर्तन घडले तर इतर व्यापारी नक्कीच सुधारतील ह्यावर मी उपाय सांगेन. तू नातवाला पाठवून दे.

आपल्या आजोबांच्या संमतीने वज्रनाभ साधूचे दर्शन करण्याच्या उद्देशाने आला. साधूने त्याला आशिर्वाद दिला व म्हटले–"वत्स, जवळच्या जंगलात वराहगिरी आहे. त्या पर्वताच्या शिखरावर एक गुहा आहे त्या गुहेच्या आत हिरवेगार दगड आहेत. ते दगड चौकोनी आकाराचे आहेत व ते चमकतात. जर का तशा प्रकारचा एक दगड जरी कोणापाशी असेल तर त्याला मातीचे सुद्धा सोने करता येते. परंतु त्या गुहेपाशी तुला जर पोहोचावयाचे झाले तर तुझ्याबरोबर असा एक साथीदार पाहिजे की, तो व्यापारात खरेपणा व ईमानदारीने व्यापार करतो. मी तुझ्या आजोबांच्या सांगण्यानेच तुला हे रहस्य सांगत आहे."

साधूचे बोलणे ऐकून वज्रनाभ अत्यंत प्रसन्न झाला. त्याने जाणले की आपल्याबरोबर येणारा एकटा सत्यपालच आहे.

त्यानंतर वज्रनाभ सत्यपालच्याकडे जात म्हणाला–"मित्रा, व्यापाराच्या नावावर मी अनेक पापकर्म केली आहेत. तरी त्या पापांचे प्रायश्चित्त करावे म्हणतो. ते फक्त एका उत्तम चरित्र असलेल्या व्यापाऱ्यासोबत वराहगिरीच्या गुहेमधे असलेल्या देवाला साष्टांग नमस्कार करण्यानेच होवू शकेल. तू माझ्याबरोबर त्या गुहेपर्यंत येशिल कां?"

वज्रनाभच्या मनामधे होत असलेला बदल पाहून सत्यपालला अत्यंत आनंद वाटला. त्याने त्याला मदत करण्याकरीता





होकार दिला. त्यानंतर ते दोघे वराहगिरीच्या गुहेकडे निघाले. चार दिवसाच्या कठीण प्रवासानंतर ते वराहगिरी डोंगरावरच्या गुहेपाशी येऊन पोहोचले.

गुहेच्या आत खूपच अंधार पसरला होता. त्या दोघांनी जसा गुहेमधे पाय ठेवला तसा गंभीर आवाज स्पष्ट ऐकू आला– "कोण आहे रे? दुसऱ्या क्षणी गुहेचे दार फट्कन् बंद झाले.

भीतीने वज्रनाभच्या घशाला कोरड पडली. परंतु सत्यपालने गंभीरच स्वरात उत्तर दिले–"आम्ही देवाचे दर्शन घेण्याच्या इच्छेने आलो आहोत ! आत कोण आहे ?"

"काय तुम्हांला मला पहाण्याची इच्छा आहे." म्हणत खदखदा हसण्याचा आवाज ऐकू आला.

दुसऱ्या क्षणी सर्व गुहेत लख्ख प्रकाश पसरला. समोर प्रचंड अक्राळ विक्राळ आकृतीला पाहून दोघांची घाबरगुंडी उडाली. दोघे थरथर कांपू लागले. थोड्या वेळाने सत्यपालने थोडेसे धैर्य करून विचारले– "तुम्ही कोण आहात ? ह्या गुहेत कशाला रहाता ? आम्ही आपले काय उपकार करावेत ?"

तो अक्राळ विक्राळ आकाराचा विकृत रूपात हंसू लागला व म्हणाला–"ह्या गुहेत हिरवा दगड आहे. तो दगड ज्याच्या जवळ असेल त्याने जर मातीला जरी स्पर्श केला तरी मातीच सोने होते. ते प्राप्त होणाऱ्या योग्य व्यक्तिच्या वाटेकडे मी डोळे लावून आहे. तो दगड त्याच्या हाती सोपवताच मला ह्या भयंकर विकृत रूपापासून मुक्ती प्राप्त होईल."

"तो हिरवा दगड प्राप्त करण्यासाठी कोणत्या प्रकारची योग्यता हवी ?" सत्यपालने विचारले.

"उत्तम चरित्र हेच एक योग्य मात्र आहे." भयंकर आकृतिचा माणूस म्हणाला.

हे उत्तर ऐकताच वज्रनाभ स्वत:ला सांभाळून खुश होत म्हणाला–"मी एक उत्तम चारित्रवान आहे. मलाच तो हिरवा दगड द्या."

तू उत्तम चारित्र ठेवणारा नाहीस. तू व्यापारात अनेक वाईट कामे केली आहेस. सिताबाई नावाच्या एका गरिब बाईला फसवून तू दहा हजाराचे सोने फक्त चारशे रुपये देऊन घेतलेस हो नां!" भयंकर माणूस म्हणाला.

आपले गुपित त्या भयंकर आकृतीवाल्याला कसे कळले बरे तरी तो जरा सुद्धा घाबरला नाही. परंतु उलट म्हणाला– "जर कां व्यापारात फायदा करावयाचा असेलतर थोडीशी लुटगिरी करावयाच पाहिजे. माझा सोबती रत्नगुप्तने सीताबाईच्या घरावर अन्यायपूर्वकच जप्ती घातली आहे. त्याची जर बरोबरी केली तर माझा अन्याय धरताच येत नाही.

परंतु तो अक्राळ विक्राळ माणूस त्याच्या सांगण्याने संतुष्ट झाला नाही. त्याने त्याचे सर्व घोर अपराध उघडकीस आणून दिले. तरी वज्रनाभने आपल्याहून जास्त घोर अन्याय करण्याची त्याच्यासमोर तुलना केली.

शेंवटी तो विक्राळ माणूस कानावर हात ठेवत म्हणाला–तुझ्या नावाने तर सारे लोक खडे फोडत आहेत. तुझ्यासारखा पापकर्मे करणारा तिन्ही जगात सापडणार नाही. तेव्हां तो हिरवा दगड मी सत्यपाललाच देणार कारण तोच एक उत्तम चरित्रवान व्यक्ति आहे.





होकार दिला. त्यानंतर ते दोघे वराहगिरीच्या गुहेकडे निघाले. चार दिवसाच्या कठीण प्रवासानंतर ते वराहगिरी डोंगरावरच्या गुहेपाशी येऊन पोहोचले.

गुहेच्या आत खूपच अंधार पसरला होता. त्या दोघांनी जसा गुहेमधे पाय ठेवला तसा गंभीर आवाज स्पष्ट ऐकू आला– "कोण आहे रे? दुसऱ्या क्षणी गुहेचे दार फट्कन् बंद झाले.

भीतीने वज्रनाभच्या घशाला कोरड पडली. परंतु सत्यपालने गंभीरच स्वरात उत्तर दिले–"आम्ही देवाचे दर्शन घेण्याच्या इच्छेने आला आहोत! आत कोण आहे?"

"काय तुम्हांला मला पहाण्याची इच्छा आहे." म्हणत खदखदा हसण्याचा आवाज ऐकू आला.

दुसऱ्या क्षणी सर्व गुहेत लख्ख प्रकाश पसरला. समोर प्रचंड अक्राळ विक्राळ आकृतीला पाहून दोघांची घाबरगुंडी उडाली. दोघे थरथर कांपू लागले. थोड्या वेळाने सत्यपालने थोडेसे धैर्य करून विचारले– "तुम्ही कोण आहात? ह्या गुहेत कशाला रहाता? आम्ही आपले काय उपकार करावेत?"

तो अक्राळ विक्राळ आकाराचा विकृत रूपात हंसू लागला व म्हणाला–"ह्या गुहेत हिरवा दगड आहे. तो दगड ज्याच्या जवळ असेल त्याने जर मातीला जरी स्पर्श केला तरी मातीच सोने होते. ते प्राप्त होणाऱ्या योग्य व्यक्तिच्या वाटेकडे मी डोळे लावून आहे. तो दगड त्याच्या हाती सोपवताच मला ह्या भयंकर विकृत रूपापासून मुक्ती प्राप्त होईल."

"तो हिरवा दगड प्राप्त करण्यासाठी कोणत्या प्रकारची योग्यता हवी?" सत्यपालने विचारले.

"उत्तम चरित्र हेच एक योग्य मात्र आहे." भयंकर आकृतिचा माणूस म्हणाला.

हे उत्तर ऐकताच वज्रनाभ स्वतःला सांभाळून खुश होत म्हणाला–"मी एक उत्तम चारित्रवान आहे. मलाच तो हिरवा दगड द्या."

तू उत्तम चारित्र ठेवणारा नाहीस. तू व्यापारात अनेक वाईट कामे केली आहेस. सिताबाई नावाच्या एका गरिब बाईला फसवून तू दहा हजाराचे सोने फक्त चारशे रुपये देऊन घेतलेस हो नां!" भयंकर माणूस म्हणाला.

आपले गुपित त्या भयंकर आकृतीवाल्याला कसे कळले बरे तरी तो जरा सुद्धा घाबरला नाही. परंतु उलट म्हणाला– "जर कां व्यापारात फायदा करावयाचा असेलतर थोडीशी लूटगिरी करावयाच पाहिजे. माझा सोबती रत्नगुप्तने सीताबाईच्या घरावर अन्यायपूर्वकच जप्ती घातली आहे. त्याची जर बरोबरी केली तर माझा अन्याय धरताच येत नाही.

परंतु तो अक्राळ विक्राळ माणूस त्याच्या सांगण्याने संतुष्ट झाला नाही. त्याने त्याचे सर्व घोर अपराध उघडकीस आणून दिले. तरी वज्रनाभने आपल्याहून जास्त घोर अन्याय करण्याची त्याच्यासमोर तुलना केली.

शेंवटी तो विक्राळ माणूस कानावर हात ठेवत म्हणाला–तुझ्या नावाने तर सारे लोक खडे फोडत आहेत. तुझ्यासारखा पापकर्मे करणारा तिन्ही जगात सापडणार नाही. तेव्हां तो हिरवा दगड मी सत्यपाललाच देणार कारण तोच एक उत्तम चरित्रवान व्यक्ति आहे.





"छान, छान, मला सांग तरी त्याची काय खुबी आहे." वज्रनाभ संतापातिरेकाने म्हणाला.

"सत्यपाल व सीताबाईचा सारा वृत्तांत त्याने वज्रनाभला सांगितला त्यानंतर तिच्यावर दया येऊन त्याने तिला आपल्या व्यापारातील हिस्सा दिला." भयंकर आकृतिवाला म्हणाला.

वज्रनाभ झटदिशी म्हणाला—"सत्यपालने आपल्या व्यापारातील वाटा देण्यासाठी सीताबाईकडून पंचविस रुपये घेतले. परंतु गुणसेन नावाचा आणखी एक व्यापारी आहे त्याने तिच्याकडून एकच रुपया घेतला सत्यपालहून त्याची उदारता जास्त नाही कां? कारण त्याने तिच्या पासून जास्त पैसे घेतले. हे वाईट काम नाही कां झाले?

त्यावर तो भयंकर आकृतीवाला गप्प राहीला नाही. त्याने त्याचे वेगवेगळे गुण सांगून त्याचा मोठेपणाच दाखवून दिला. तेव्हां अचानक गुहेत एक प्रचंड प्रकाशाचा लोळ आला व पापणी लवायच्या आत त्या विचित्र भयंकर प्राण्याच्या जागी एक गंधर्व सादृश्य झाला. त्याने त्या दोघांना नमस्कार केला व म्हणाला—"आपल्या लोकांमुळें मला ह्या जगातील उत्तम कार्ये समजु शकली. त्याने मला जे पुण्य प्राप्त झाले त्याचे फळ म्हणून माझी हि विकृत काया नष्ट झाली. म्हणून मी आपल्या दोघांचा फार फार ऋणी आहे. परंतु मी गुहेत असलेला तो हिरवा दगड एकालाच देऊ शकतो. तुम्हीच सांगा तो मी कोणाला देऊ?"

"तुमच्या मनात ज्या कोणाला द्यावयाचा आहे त्याला द्या." सत्यपाल म्हणाला.

"सत्कार्य फक्त ऐकल्यानेच तुम्ही शापापासून मुक्त झालात तर मग सत्कार्य केले तर तुम्हाला केवढे पुण्य प्राप्त होईल. मी आज आतापासूनच माझा स्वभाव गुण धर्म बदलतो. तो हिरवा दगड मलाच द्या." वज्रनाभ म्हणाला.

ह्यानंतर त्या गंधर्वाने तो हिरवा दगड वज्रनाभचा हाती दिला व तो अदृश्य झाला. दुसऱ्या क्षणाला गुहेचे तोंड बंद करणारा दगड खाली घरंगळत पडला व गुहेतील वाट उघडली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, माझ्या मनात काही शंका आहेत. गंधर्वाने चांगले चरित्र असलेल्या सत्यपालला तो हिरवा दगड न देता वाईट चारित्र्याच्या वज्रनाभला कां दिला? काय त्यामुळे गंधर्व शापापासून मुक्त झाला म्हणून तर नाही ना! कां ह्या गोष्टीवर विश्वास ठेऊन दिला की, त्याने त्याला आश्वासन दिले की तो भविष्यात उत्तम माणुस म्हणून व्यवहार करेल तसे तर नाही नां!" या शंकाचे समाधान कारक उत्तर दिले नाहीस तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला—"गंधर्वाने वज्रनाभला हिरवा दगड दिला. त्यावरुनच स्पष्ट दिसून येते की वाईट चालीचा माणुस लाभ मिळावा म्हणुन झटत आहे व उत्तम स्वभावाच्या माणसाचे नुकसान होत आहे. परंतु विचार करुन पाहिला तर ते खरे होणारे नाही. सत्यपालने चांगल्या मार्गाने व्यापार करुन करोडो रुपये मिळवले अशा माणसाकडून समाजातील लोकांचे काही नुकसान होणार नाही. सत्कार्यानेच उत्तम फळ मिळू शकते. ते स्वतः वज्रनाभने डोळयाने पाहिले व त्यानेसुद्धा त्याचाच मार्ग आक्रमायचे मनाशी ठरविले. परंतु तसें ठरवून सुद्धा व्यापारात त्याला लाभ झाला नाही तर तो पुन्हां पूर्वीचेच आचरण करुन अन्यायाने लोकांना लुबाडेल व त्यामुळ पुन्हां अनेक लोक त्याला बळी पडतील. महायोग्याने सांगितल्या प्रमाणे फक्त स्पर्श करताच सोने बनणारा तो हिरवा दगड त्याच्यापाशी असेल तो कितीही लोभाला बळी पडला तरी वाईट कार्ये करणार नाही ह्या धर्मसुत्राला आधारुन त्या गंधर्वाने तो हिरवा दगड वज्रनाभला दिला."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला. व झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)









# अक्कल हुषारी

एकदा संध्याकाळी जमीनदार आपल्या घराच्या पुढच्या अंगणात फिरत होता. तेव्हां त्याचा गुमास्ता काही कामासाठी म्हणून तेथे आला. जमीनदाराने त्याच्याशी इकडच्या तिकडच्या गप्पागोष्टी केल्या आणि नंतर तो तेथून जाऊ लागला तो जात असलेला पाहून जमीनदाराने त्याला अडवित आपली हिऱ्याची अंगठी दाखवित म्हटले— "पहा हि अंगठी ज्याने बनवली आहे. तो चांगलाच कुशल कारागीर असावा. हिरा सुद्धा अत्यंत किमती आहे. हा पहा. कसा चमकतो आहे? आता तूच सांग बरे? चमकतो ना!"

गुमास्ता म्हणाला—"सरकार, क्षमा करा आपण प्रथम जर विचारले असतेत की ही अंगठी कशी चमकते आहे तर मी माझे त्या बद्दल मत सांगितले असते पण जर तुम्ही स्वतः त्याची स्तुती करु लागलात तर मी तुमच्या विचारांची शृंखला मधे तोडण्याची हिम्मत कशी करावी आणि तुमच्या विचारांशी जरी मी एकमत झालो तरी त्यात आनंद तुम्हांला वाटला नसता. त्यामुळे मी गप्प राहीलो.

गुमास्ताने थोडक्यात आपल्या उत्तराने जमिनदारला अशा विचित्र ढंगाने समजावले की कोणासमोर कशा प्रकारे बोलाचाली करावयास हवी. त्यावर जमिनदाराने प्रसन्न होऊन खुष होत त्याला ती अंगठी बक्षीस म्हणून देऊन टाकली.





आपली देवळे :

## उडुपि

श्रीकृष्ण जेव्हां लहानाचा मोठा झाला तेव्हां त्याची आई देवकीदेवीच्या मनात त्याला बाळरूपात पुन्हां पहाण्याची इच्छा उत्पन्न झाली. तिच्या इच्छानुरूपाने देवतांचा शिल्पकार विश्वकर्मा त्याने बालकृष्णाची मुर्ती तयार करुन तिच्या हातात दिली.

ती मुर्ती काही वर्षांनि अर्जुनाच्या हाती आली. प्रभास तीर्थामधे श्रीकृष्णाने आपला अवतार पूर्ण केला. तेव्हां अर्जुनाने त्या मुर्तीला त्या क्षेत्री वाळूमधे लपवून ठेवले. तेव्हां त्या मुर्ती लपवलेली जागा चमकायला लागली.





हजारो वर्षे उलटली १४ व्या शतकाच्या सुमारास एक जहाज तेथे येऊन किनाऱ्याला लागले. तेथील चमकत असलेली वाळू पाहून त्यातील लोकांना अत्यंत आश्चर्य वाटले. त्यांनी तेथील वाळू उकरून पिशव्यातून भरुन घेतली व ते जहाज निघून गेले.












मध्वाचार्यांनी एक दिवस कर्नाटकामधील उडुपी येथील समुद्र किनाऱ्यावर बसून ध्यान धारणा केली. थोड्या वेळाने त्यांनी एक जहाज समुद्रातुन येत असताना पाहिले.

अचानक समुद्रात तुफान वादळ उठले जहाज समुद्राच्या हेलकाव्यांनी कोलमडू लागले. जहाजातील प्रवाशांना काय करावे सुचेनासे झाले ते सर्व घाबरून गेले.





समुद्राच्या काठावर बसलेल्या मध्वाचार्यांनी आपल्या जवळ असलेले एक वस्त्र हवेत उंचावर हलवले. ते जहाजातील लोकांनी पाहीले. त्यांनी अत्यंत प्रसन्नतेने देवाचे आभार मानत आपले जहाज किनाऱ्याकडे वळवले.

लोकांनी मध्वाचार्यांच्या पायावर डोके ठेवत नमस्कार केला. व म्हटले– "स्वामी, आपण आमचे प्राण वाचविलेत व ह्या वादळाच्या तडाख्यातून सोडवलेत ह्या जहाजातील जी कोणती वस्तु आपल्या हवी असेल ती घ्या." मध्वाचार्य थोडावेळ शांत होऊन म्हणाले–"असे आहे कां तर मी पहातो जहाजात काय काय आहे?"





मध्वाचार्य जहाजाच्या आत गेले. त्यांना आत अनेक मौल्यवान वस्तु दृष्टीस पडल्या परंतु त्यातील एकाही वस्तुनीं त्यांना मोहीत केले नाही. सरते शेवटी जहाजातील एका कोपऱ्यातील पोत्याकडे त्यांची नजर गेली. त्यांनी अत्यानंदाने त्या पोत्याला जाऊन मीठी मारली.

"स्वामी, ह्या पोत्यात फक्त वाळू भरून ठेवली आहे. जहाजात लाखो रूपये किमतीच्या वस्तु भरून ठेवल्या आहेत आपण त्या कां नाही घेत?" जहाजाच्या कप्तानांनी विचारले. मध्वाचार्यांना हंसु आले ते पोते फोडून त्यांनी त्यातील वाळू उकरून त्यात असलेली बालकृष्णाची मुर्ती बाहेर काढली.


















मध्वाचार्यांनी त्या जागी एक देऊळ बांधून त्यात त्या बालकृष्णाची मूर्ती स्थापन केली. त्याकरीता त्यांनी आपले आठ शिष्य निवडून देवळाची कामगीरी सोपवीली त्यांना भक्तीतत्वाचा उपदेश दिला. आठ शिष्यांनी त्याची स्थापना केली.

मध्वाचार्यांच्या वेळेपासून ते आजपर्यंत देवळात निरंतर दिप पुजेचे कार्यक्रम चालू असतात. असे म्हटले जाते. की, मध्वाचार्यांनी स्वतः देवळात जे दिवे लावले होते ते आज पर्यंत जळत आहेत.





आठ मठाधिपतींनी एक ते दोन वर्षापर्यंत मठाचे दायित्व सांभाळावे त्यानंतर दुसऱ्याने त्याचे दायित्व ग्रहण करावे त्या उत्सवाला 'पर्याय' असे म्हणतात. पर्याय उत्सवाच्या सुमारास उडुपी क्षेत्री चांगला मोठा मेळा भरतो.



# दन्तकथा

कोशल देशाचा राजा शैलेन्द्र वर्मा एक दिवस संध्याकाळच्या सुमारास आपला विदूषक शकटला घेऊन उद्यानात फिरावयास निघाला. त्याचवेळी एका पहारेकऱ्यांनी येऊन राजाला सांगितले की कोणी पंडीत आपल्या भेटी करीता तिष्ठत आहे.

शैलेन्द्र वर्मांनी पहारेकऱ्याला आज्ञा करीत म्हटले की, ताबडतोब तू त्यांना माझ्यापाशी घेऊन ये. पंडीतानी प्रवेश केला व राजाला नमस्कार करीत म्हटले–"महाराज, मी वत्स देशचा रहाणारा आहे. माझे नाव शोधक आहे. आपल्या दर्शनाच्या इच्छेने आलो आहे."

शैलेन्द्र वर्माला वत्स देशाबद्दल काही एक वैर भावना नव्हती परंतु एक हलका विचार होता. राजाने पंडीताचे बोलणे ऐकून मंदहास्य करीत म्हटले–"अहो, असे वाटते की वत्स देशाचे कवी व पंडीत देशांमधे सगळयाच्या पाठीमागे पडत आहेत."

त्यावर शोधक विनयतेन म्हणाला–"महाराज, आपले म्हणणे खरे आहे. आपल्याशी बरोबरी करून तुलना केली तर आमच्या राजाला कलांबद्दल अत्यंत अभिरुची व प्रेम आहे. ह्याचा तर विशेश रूपाने उल्लेख करण्याची तर आवश्यकता नाही.

ते उत्तर ऐकताच शैलेन्द्र वर्मा अत्यंत आनंदीत झाले व म्हणाले–"असे सहज वाटते की. तुमच्या वत्स राजाचा खजिना अगदी रिकामा ठणठणीत पडला आहे आणि त्यानी त्याच्या दरबारी कवी पंडीतांना वेगवेगळया तऱ्हेने दूरदूरच्या देशांच्या राजाकडे जाऊन आपल्या पोटापाण्याकरीता भिक मागण्यास सांगितलेली आहे."



राजाच्या बोलण्यात अवहेलना व कडवेपणा दिसत होता. त्याची परवा न करता शोधक मंदहास्य करीत म्हणाला– "आपल्या कोशल राज्याची तुलना जर वत्स राज्याबरोबर केली तर त्यातील विकास संपत्ती व उन्नति कोणत्या साच्यांत बसेल. त्यामुळेंच तर आपण आमच्या राजाची संपत्ती व त्यांची आपत्ती हे मला न विचारता स्वत: चांगले समजून घेतलेत.

शोधकचे बोलणे ऐकून शैलेन्द्र वर्मा जास्तच प्रभावित झाले व आपल्या गळ्यातील कंठहार काढू लागले. त्यावर राजाचा अभिप्राय समजून विदुषक म्हणाला-

"प्रभु! आपण एक क्षणभर थांबा. आपण अजुन वत्स देशाच्या पंडीताची परिक्षा घेतली नाहीत परंतु हे दंतकथा करण्याच्या परिक्षेत उतिर्ण झाले आहेत.

विदुषकाचे बोलणे ऐकून शोधकने अपमान झाल्यासारखा चेहरा केला. व राजाकडे दृष्टी वळवून पाहीले.

राजाने नाराज होऊन विदुषकाला दटावले व म्हटले–"तू अचकट विचकट काही बरळू नकोस हि दंतकथा आहे सांग पाहू दंतकथाचा अर्थ तरी काय?"

"महाराज दंतकथाच्या पाठीमागे फार मोठा व लांब सामाजिक व साहित्यिक इतिहास आहे. हि गोष्ट मी काल रात्री आमच्या घरी आलेल्या नातेवाईकांच्या तोंडी ऐकली आहे. ते वत्स देशाचे राज दरबारी पंडीत आहेत. ह्या साऱ्या गोष्टी बहुदा शोधक पंडीतजीना ठाऊक असल्या पाहीजेत. त्यांना म्हणाव की, आपण झाडाच्या पाठीमागील असलेल्या कटघावर थोडावेळ विश्राम करावा ह्याचा सविस्तर इतिहास मी आपणास ऐकविन" विदुषक म्हणाला.

राजाच्या लक्षात आले की विदुषकाला काहीतरी महत्वपूर्ण गोष्ट सांगावयाची आहे. ह्या विचाराने त्यांनी पंडीत शोधकच्याकडे एक दृष्टीक्षेप टाकला. त्याच क्षणी शोधक त्या झाडाखालच्या पाराकडे निघाला.

त्यानंतर राजाने विदुषकाला संकेत केला–"महाराज, ज्यांना आपण पसंत करत नाही त्याच्या बाबतीत आपण त्यांना संतुष्ट करणे हेच एका अर्थी दंतकथे सारखे आहे."

"तू काय म्हणतोस ते व्यवस्थित समजेल असे सांग. त्यात जादुगिरी नको" राजा चिडून म्हणाला.

"हा शोधक ठाऊक नाही कोणत्या श्रेणीतील पंडीत आहे परंतु खोटा विनय दाखविण्यात तरी वाकबगार आहे. वत्स राज्य आपल्या राज्यातून लहान राज्य असू शकेल परंतु तेथील राजा वर्धन जेवढा म्हणून करता येईल तेवढा पंडीत व कवीचा आदर करीत असतो. हि तर गोष्ट तुम्हाला चांगली माहीतीच आहे ना!" विदुषक राजाला म्हणाला.

राजा फक्त मान डोलवून गप्प राहीला त्यावर विदुषक विनयपूर्वकतेने म्हणाला– "महाराज, हि गोष्ट साऱ्यांना माहीत आहे की, एक वेळ आपण व वत्स राजा नालन्दा मधे एकत्र शिकत होतो, काही कारणपरत्वे आपल्या मधे वैमनस्य निर्माण झाले. ही गोष्ट तर कदापी बोटावर मोजण्या इतक्या लोकांनाच ठाऊक आहे."

राजा हसून म्हणाला–"मग त्यात तू सुद्धा एक आहेस ना?"

"होय महाराज! माझा विश्वास आहे की ही गोष्ट सुद्धा शोधक पासून लपली



नाही. आपण त्याचा राजा व राज्याच्या बाबतीत जे काही, सांगत होता. त्याचे समर्थन करून तो काही दंतकथा रचून सांगत होता नां!" विदुषकने विचारले.

"अशा प्रकारची बक्षीसी प्राप्त करण्याच्या उद्देशानेच तर वत्स देशाच्या पंडीताने चाल चालवलेली आहे. हिच गोष्ट तू मला सांगणार होतास नां!" राजाने विचारले.

"महाराज, ती चाल कधीच चालवली गेली आहे. परंतु त्यात मी बाधा आणली आहे. वत्स देशाच्या राजावर टिका झालेली पाहून आपल्याला आनंद प्राप्त झाला. त्याच प्रकारे आपली अवहेलना करून बोलणाऱ्याला सुद्धा वत्स राजा अशीच बक्षीसी देतील. दंतकथाचा जन्म अशा प्रकारे करण्याकरीता मनुष्य अशा विचित्र व्यवहाराला कारणीभूत होतो" विदुषक म्हणाला.

राजा थोडा विचार करून म्हणाला— "ठिक आहे, पण तू सुद्धा आत्ता जे काय म्हणतोस ती सुद्धा एक दंतकथाचा होवू शकते. ह्याची परिक्षा घेऊ या" असे म्हणून राजाने एका नोकराला हाका मारले व आज्ञा केली की पंडीत शोधकला आपल्या समोर आणण्यात यावे.

नोकर झाडाच्या पाशी गेला व शोधकला तेथे नसलेले पाहून परत आला व त्याने ती बातमी राजाला सांगितली.

ती गोष्ट ऐकाताच राजाला अत्यंत आश्चर्य वाटले. तेव्हां विदुषक म्हणाला— "महाराज मी सांगितले होते नां! की काल रात्री माझ्या घरी एक नातेवाईक आले होते. ते वत्स देशातील दरबारी पंडीत आहेत ही गोष्ट खरी समजून शोधकने संधी साधून तेथून पलायन केले असावे. हा मौल्यवान हार त्या पंडीताच्या हाती लागू नये. ह्याची मी काळजी घेऊन त्याचे रक्षण केले.

"मग तर हा हार तुझाच आहे." असे म्हणून राजाने तो मौल्यवान कंठहार विदुषकाच्या गळयात घातला.





# शिव लीला

शंकराला किती दिवसापासून अन्नपाण्या-विना काढावे लागेल असतील कोणास ठाऊक? असा विचार करून तिन्नडु धनुष्य बाण घेऊन शिकारीस निघाला. त्याने एक रानडुक्कर मारले. त्याचे मांस काढून त्याचे बारीक बारीक तुकडे करून ते भाजले सुवर्णमुखीचे पाणी आणून शंकरा-समोर ठेवले आणि म्हणाला—"हा नैवेद्य आहे थोडे खाऊन घे.

परंतु शंकराकडून काहीच उत्तर मिळाले नाही. तेव्हां तिन्नडु रडू लागला आणि म्हणाला—"हे प्रभो! तू हे मांस खाल्ले नाहीस तर मी तुझ्यासमोर जीव देईन."

शंकराने तिन्नडुच्या भक्तीवर प्रसन्न होऊन त्याला दर्शन दिले व म्हणाला— "ऊठ बाळ! मी खातो मांस! असे सांगून शंकराने सर्व मांस खाऊन टाकले.

असेच काही दिवस गेले. एके दिवशी शिवगोचर नावाचा एक नैष्ठिक शिवभक्त ब्राह्मण त्या देवळात आला आणि म्हणाला— "प्रभो या उष्टया काडया कसल्या? आणि ही घाण कोणी करून ठेवली. तू सांगितले नाहीस तर मी अन्नपाणी त्याग करून तुझ्या चरणावरच जीव देईन."

"हे भक्ता! तुला घाबरण्याचे कारण नाही. माझा एक भक्त जंगलात रहाणारा आहे आणि तो भक्ति भावनेने मला जे देतो ते मी प्रेमाने ग्रहण करतो. तुला त्याला पहायचे असेल तर तू माझ्या पाठी-मागे लपून बस." शंकर म्हणाला.



थोड्या वेळाने तिन्नडु देवळात आला. शिवलिंगासमोर ज्या उष्टया वस्तू पडल्या होत्या त्या त्याने पायाने दूर सरकविल्या आणि आपल्या तोंडात त्याने जे पाणी आणले होते, त्याने शिवलिंगावर अभिषेक केला नंतर शिवलिंगासमोर एक पत्रावळ ठेवून त्यावर मांसाचे तुकडे वाढून ठेवले.

शंकराने तिन्नडुच्या भक्तीची परिक्षा घेण्याचे ठरविले. म्हणून त्याने त्या मांसाला हात देखिल लावला नाही. त्याच्या मिटलेल्या डोळ्यातून घळघळा पाणी वाहू लागले. ते पाहून तिन्नडु घाबरून गेला. त्याने अनेक प्रकारे डोळ्याचे दुखणे काय आहे हे पाहून इलाज केले. परंतु शंकराच्या अश्रुधारा बंद व्हायच्या ऐवजी त्यांच्या जागी रक्ताच्या धारा वाहू लागल्या.

आता काय करावे, तिन्नडुला कळेना. त्याला वाटले की डोळ्याचे दुखणे दूर करण्याचा उपाय दुसरा डोळा त्या जागी बसविणेच आहे. आपल्या सुरीने त्याने आपला डोळा काढला आणि शंकरांच्या डोळ्याच्या जागी बसविला.

त्यानंतर दुसऱ्या डोळ्यातून रक्ताच्या धारा वहात असलेल्या पाहून तो म्हणाला— "घाबरण्याचे कारण नाही प्रभो!" असे म्हणत त्याने दुसरा डोळा काढण्यासाठी सुरी डोळ्याजवळ नेली. तेव्हां शंकराने प्रगट होऊन त्याला म्हटले— "थांब!"

त्यानंतर त्याने ब्राह्मण भक्ताला हांक मारली व म्हणाला— "शिवगोचर! पाहिलीस कां या जंगली शिवभक्ताची भक्ती? नंतर शंकराने दोघांना विचारले— "तुम्हांला जो वर पाहिजे तो मागून घ्या."

"प्रभो! तुला जो द्यावासा वाटेल तोच वर दे. तुझ्याजवळ आम्ही काय मागणार?" असे म्हणत दोघांनी शंकरा समोर साष्टांग नमस्कार केला. शंकराने त्या दोघांना या जगाच्या मायाजालातून कायमचे मुक्त करून शिवलीन करून घेतले.

पुष्कळ वर्षापूर्वी वीरसंगम नावाचा एक सुंदर तरुण रहात होता. तो एक शिवभक्त होता. तो शंकराला वृषभवाहनावर बसलेल्या अवस्थेत त्यांची उपासना करीत असे.



वीरसंगमच्या काकाच्या मनांत त्याचे लग्न करून देण्याचा विचार होता. त्याकारणाकरीता तो एक दिवस ओंकारपुरला गेला. तेथे त्याचा मेहुणा रहात होता. तो खूप श्रीमंत व शिवभक्त होता.

दोघे एकमेकांना भेटले व अत्यंत प्रेमाने त्यांनी एकमेकांना आलिंगन केले. जेवणेखाणे आटोपल्यावर त्यांनी विचारले— "दादा, काय काम काढून येणे केलेत?"

"एक आनंदाची बातमी सांगण्यासाठी शुभमुहूर्तावर आलो आहे आमचा वीरसंगम लग्नायोग्य झाला आहे. मी योग्य वधुच्या शोधा करीता ओंकारपुरला आलो आहे. माझ्या अंदाजाने तुमची मुलगी चंद्रिनी देवी वीर संगमची पत्नी बनण्यायोग्य आहे. जर कां तुम्हांला काही अडचण वाटत नसेल तर त्या दोघांचा विवाह लावून द्यावा म्हणतो." काका म्हणाला.

चंद्रिनीच्या वडिलांचा आनंद गगनात मावेनासा झाला ते आनंदाने म्हणाले— "दादा, आपण खरेच सांगता आहात नां! आमच्या सारख्यांना वीर संगमहून योग्य कोण मिळणार आहे तुम्हीच चांगला मुहुर्त काढून दोन्हीं पक्षांची जबाबदारी स्वतःवर घेऊन चांगला मुहुर्त पाहून टाका.

त्याच क्षणी एक चांगला मुहुर्त ठरविला. ओंकारपुरचा राजा भास्कर एक दिवशी भटकण्याच्या उद्देशाने नगरात निघाला. परत येत असतांना त्याला एका घराच्या उंबरठ्यावर चंद्रिनी उभी असलेली दिसली. तिचे सौंदर्य पाहून तो अत्यंत मोहीत झाला व तेथेच उभा राहून तिला नखशिखांत न्याहाळू लागला. ते लक्षांत येताच चंद्रिनीं झटकन् घराच्या आत निघून गेली.

राजा त्या मुलीचा विचार करीतच आपल्या महालात परत आला त्याने मंत्र्यांना बोलावून आपला विचार सांगितला व म्हटले तुम्ही माझा विवाह त्या मुलीशी करून द्यावा."



राजा भास्करचे मंत्री चंद्रिनीच्या घरी आले व तिच्या वडिलांस म्हणाले–"अहो ! तुमचे भाग्य उजळले म्हणायचे. तिला राजाची राणी बनण्याचे भाग्य प्राप्त होत आहे."

"तुम्ही म्हणता ते खरे आहे. माझ्या मुलीला राणी बनण्याच्या भाग्याहून दुसरे भाग्य काय ? परंतु तुमचा अंदाज चुकला. मी माझ्या मुलीचे लग्न दुसऱ्याशी पक्के केले आहे." तिचे वडिल म्हणाले.

मंत्र्याने जाऊन सर्व राजाला ऐकवले तेव्हां राजाने आपल्या मित्रांना व हित-चिंतकांना बोलावून सांगितले–"तुम्ही जर कां माझे लग्न चंद्रिनी देवी बरोबर लावून दिले नाहीत तर मी जिवंत राहणार नाही.

त्यावर राजाकडून सर्वजण चंद्रिनीच्या वडिलांकडे आली व त्यांना भेटून समजा-वित म्हणू लागली–"अहो तुम्ही तर काय वेडे मूर्ख आहात ? आपले भाग्य उजळत असलेले पाहून सुद्धा ते लाथाडून लावता आहात. राजा स्वतः तुमच्या मुलीबरोबर लग्न करण्यास उत्सुक आहे. तसे असतांना तुमचा त्याला विरोध कां ? आता असा खुळे पणा सोडा व ताबडतोब आपल्या मुलीचे लग्न राजाबरोबर लावून टाका."
मला समजवण्याची काही गरज नाही. की राजा माझा जावई बनला तर, मला ते किती भाग्याचे होईल. परंतु सुख भोगांच्या लोभाने मी जर वचन भंग केला तर तुम्ही लोक माझी निंदा नाही कां करणार ?" तिचे वडिल म्हणाले.

त्यानंतर ते सर्वजण राजाच्या महालात गेले व त्यांनी ते सर्व राजाला समजावित म्हटले–"महाराज, आपण त्या मुलीला विसरून जा. सुंदर मुली कां कमी आहेत. त्या मुलीच्या वडिलांचा व्यवहार खरोखरी वाखाणण्याजोगा आहे."

राजाने आपल्या मित्रमंडळींना निरोप देऊन स्वतः चंद्रिनीदेवीच्या घरी आला.

राजाला पहाताच तिचे आईवडिल घाबरून गेले. तेव्हां तिने धीटपणे पुढे येत त्याचे स्वागत केले व म्हणाली–"भाऊ



साहेब आपला माझ्यावर अनुग्रह झाला आहे." असे म्हणतच तिने स्वागत केले.

जो व्यक्ति तुला पत्नी करून घेण्याच्या इच्छेने तुझ्या घरीं आला आहे, त्याला असे संबोधून म्हणणे अन्याय नाही कां ? माझ्याशी लग्न करून घेण्याच्या इच्छेने अनेक स्त्रियां तडफडत आहे. तरी सुद्धा माझे मन तुझ्याकडे ओढले गेले आहे. तुला ज्याक्षणी पाहिले त्याक्षणापासून विरहव्यथाचा मी अनुभव करत आहे. मला दुसऱ्या स्त्रीकडे पहावेस सुद्धा वाटत तुला मी महाराणी करेन." राजा म्हणाला.

"राजा, वीरसंगम बरोबर ज्या दिवशी माझे लग्न ठरविण्यात आले त्याक्षणापासून मी त्यांना माझा पती मानले आहे. तुम्हीच सांगा एका स्त्रीला दोन पती कसे होऊ शकतात ?" चंद्रिनीने विचारले.

"तुझ्यासाठी जो व्यथित झाला आहे त्याला कशाला हे उपदेश सांगत आहेस ?" राजा म्हणाला.

चंद्रिनी देवीला समजले आपण आपल्या निश्चयाला ढळलो तर राजा काहीही करू शकेल तेव्हां तिने देवावर भरवंसा ठेवून राजाला म्हटले—"जर कां देवाच्या मनात तसेच व्हायचे असेल तर मी आपली पत्नी बनण्यास तयार आहे विवाहांपूर्वी एक आठवडा निष्ठेने देवाची आराधना करणे हा आमच्या वंशाचा रिवाज आहे. आजच मी व्रताचा आरंभ करीन.

राजाच्या व आपल्यामधे जे संभाषण झाले ते चंद्रिनीने आपल्या आईवडिलांना सांगितले तिने तो सर्व समाचार लिहून वीरसंगमला एक पत्र पाठवले. वीरसंगम थोरामोठ्याच्या संमतीने तेथे पोहोचला व गुप्तरूपांने त्याने चंद्रिनी देवी बरोबर लग्न केले. त्यानंतर एका घोड्यावर बसून तो निघाला.

गुप्तहेरांकडून हि बातमी राजास समजली चंद्रिनीदेवीने आपल्याला धोका दिला ह्याच्या संताप येऊन त्याने आपल्या सैनिकांना आज्ञा केली—"तुम्ही ताबडतोब जाऊन वीर संगमला ठार मारा व चंद्रिनी देवीला खेचत इथे आणा.

वीरसंगमने राजाच्या सैनिकाना पाहिले परंतु एकटे त्याच्याबरोबर कसे काय लढणार ह्या विचाराने त्याने आपला आराध्य देव शरभावतारकाचे ध्यान केले.

तुरंत शरभसाकव भयंकर रूप धारण करीत प्रकटला आग्नेय अस्त्र सारखे आयुध वीरसंगमच्या हातात दिले व म्हटले—"तू ह्या शस्त्राने दुष्टांचा संहार कर."

वीर संगमला आपल्या हातात तलवार आलेली पहाताच अत्यंत आनंद वाटला. त्याने ते शस्त्र धारण करून सैनिकांना तोंड दिले सपासप सर्वांना मारू लागला. ते दृष्य उंचावरून पहात राजा आश्चर्यचकित झाला.

तितक्यात वीरसंगमने आपली तलवार एका शिवभक्तावर उगारण्यासाठी हात वर केला परंतु त्याला समजले त्याने खाली मान घालीत त्याला नमस्कार केला. ते राजाने पाहिले. त्याने शंकरभक्ताचा वेष घेतला व तो खाली उतरून आला. वीरसंगमाच्या जवळ गेला. तेव्हां वीरसंगम शिवभक्त समजुन नमस्कार करण्यासाठी खाली वांकला तेव्हां राजाने आपल्या तलवारीने त्याच्यावर वार केला. तेव्हां ती तलवार फुलांची माळ बनून त्याच्या गळ्यात पडली.

त्याचवेळी शंकर भगवान वृषभवाहनावर बसलेले प्रत्यक्ष झाले. त्यांनी वीरसंगमला वर मागण्याची अनुमती दिली. तेव्हां वीरसंगमने निवेदन केले की. आपली पत्नी व वरवधू पक्षाकडील सर्वांना मुक्ति प्रदान करावी.

"काय तुझ्यावर अपकार करण्याचा प्रयत्न करणाऱ्या पापी राजाला सुद्धा मुक्ति प्रदान करण्यास सांगत आहेस का ?"

"भगवान महादेवा, ह्या राजाने शंकर चिन्ह धारण करून आपल्या डोळ्यांनी तुला पाहीले आहे. आता त्याच्यात पाप कुठे राहीले आहे ?" वीरसंगम म्हणाला.

त्यावर शंकर प्रसन्न झाले आणि सर्वांना आपल्या बरोबर कैलासाला घेऊन गेले.

(समाप्त)










# कामाला वाघ

एका जमीदाराकडे भोलासिंह् नावाचा एक माळी होता. म्हातारपण आल्यामुळे त्याचा कामातील जोर सुद्धा कमी झाला. त्यामुळे काम सोडून देऊन घरी विश्रांती घेण्याचा त्याने विचार केला. व ती गोष्ट त्याने आपल्या मालकाला बोलून दाखविली. जमीनदाराने त्याला म्हटले–"ऐक हे पहा, तुझ्या जागी अशा एखाद्या माणसास लाव की, जो कामाला डगमगणार नाही."

ती गोष्ट समजताच गावतील तीन माणसे जमीनदाराच्या घरी नोकरी मागण्यास आली. त्यावेळी भोलासिंह् ओसरीवर मालकाबरोबर काही गप्पागोष्टी करीत होता. भोलासिंह् त्या तिघांना उद्देशुन म्हणाला–"अरे, तुमच्या पैकी कोणीतरी जाऊन त्या परसातला तो मोठा दगड उचलून बाहेर नेऊन टाका." त्यातीला दोघे दगड पाहून झटक्यात म्हणाले–"बापरे ! एवढा मोठा दगड ! तो उचलायला केवढे कष्ट पडतील. आम्हालां नाही बुवा हलवला जाणार." असे म्हणत ते दोघे तेथून निघून गेले.

तिसरा माणूस म्हणाला–"हा दगड उचलून मी त्या बाजूला गल्लीत कोपऱ्यात नेऊन टाकतो. आपण एक कुदळ तेवढी द्या. असे म्हणून त्याने त्या दगडाकडे निरखून पाहीले. व म्हटले खरे म्हटले तर हा दगड येथे दारांत कसा व कोणी आणून टाकला बाबा ? असे म्हणत त्याने तो आपल्या पायाने लाथाडायचा यत्न केला.

तो दगड पाय लागताच एक फुटभर लांब फेकला गेला. खरे तर तो दगड नव्हताचा परंतु गवत एक मोठ्या पोत्यात भरून त्या पोत्याला बाहेरून दगडासारखे दिसावे असे मातीने लाख घलेले होते. त्यामुळे तो दगडासारखाच भासत होता.

ह्यानंतर भोलासिंहाने मालकाला म्हटले–"मालक, ह्या व्यक्तिमध्ये मेहनतीने काम करून कष्ट करण्याचे गुण व चपळता आहे हाच आपला माळी बनण्यायोग्य आहे. आपण ह्याला ठेवावे." ह्यानंतर मालकाने त्याला माळयाच्या जागेवर नियुक्त केले.





# अक्कलेचा नमुना

शंकरदास नावाचा माणूस काही कामासाठी शेजारगावी गेला. काम संपवून परत यत असता रात्र उलटली. रस्त्याच्या कडेकडेने चालतांना चुकून त्याचा पाय घसरला व तो एका दलदलीच्या डबक्यात पडला. त्याने बाहेर येण्यासाठी खूप प्रयत्न केला परंतु वर न येता पाय जास्तच आत रुतत गला. शेवटी बाहेर पडण्याची आशा सोडून तो न हलता रात्रभर तेथेच डबक्यात बसून राहीला.

पहाट होताच त्याला अंधुक प्रकाशात देवासारखा एकजण त्या बाजूने येत असलेला दिसला. तो माणूस आपल्याला भूत समजुन पळुन जाऊ नये ह्याकारणाने त्याने जोरजोरात त्याला हांका मारल्या. जेव्हां तो त्याच्याजवळ आला. तेव्हां शंकरदासने आपल्याला हात देऊन बाहेर काढण्याची विनंती केली.

त्या आगंतुकाने मोठ्या मुष्किलीने शंकरदासच्या भारी वजनाच्या देहाला बाहेर खेचून काढले खरे परंतु खेचता खेचता त्याचाच पाय घसरला व तो त्या डबक्यात पडला. ते पाहून शंकरदासला भारी दुःख झाले. त्याने पुन्हां त्याला हात देऊन बाहेर खेचून काढले.

त्या भागात बऱ्याच दूरपर्यंत कोठेही पाणी नव्हते. त्यामुळे दोघे तसेच चिखलाच्या कपड्याने गावांकडे निघाले. गप्पागोष्टी करतांना शंकरदासला समजले की, त्या व्यक्तिचे नांव शेखर आहे आणि तो कोणत्यातरी दूरच्या गावातून आला आहे.

"माझ्या गावात तुझे काय काम आहे ?" शंकरदासने विचारले.

"मी शंकरदास नावांच्या एका प्रतिष्ठीत माणसाला भेटावयास जात आहे." शेखर म्हणाला.



हे उत्तर ऐकताच शंकरदासला आश्चर्य वाटले त्याने त्याला विचारले–"तुझे त्याच्याकडे असे काय काम आहे?"

"हे तुम्हाला मीं सांगणार नाही." असे म्हणत शेखरने आपल्या अंगाला लागलेला चिखल घालवण्याचा काही उपाय असल्यास सांगा. नंतर मला शंकरदासच्या घराचा पत्ता द्या म्हटले.

पण शंकरदास गप्प राहला.

ते जेव्हां गावात पोहोचले, तेव्हां गावातील माणसे त्याच्या कपड्याकडे विचित्र नजरेनी पाहू लागली. त्याचवेळी त्यांच्या ओळखीचा एक सावकार गुलाबचंद त्यांना सामोरा आला. त्यांनी त्यांना आपादमस्तक न्याहाळून पाहीले व विचारले–"अहो, ही काय भानगड आहे?"

शंकरदास शेखरकडे बोट करीत म्हणाला–"मी शेजार गावातुन परत येत होतो. तेव्हां हा बिचारा शेताकडेच्या पायवाटेने येत असता जवळच्या डबक्यात पाय घसरून पडला. त्याला चिखलातून बाहेर काढण्याच्या प्रयत्नात मी पण पाय घसरून पडलो." असे म्हणत स्वतःशीच हंसू लागले.

त्यावर सावकार गुलाबचंद सुद्धा हसत निघुन गेले.

ह्यानंतर ते गावातील गल्ली पार करून गेले नाहीत तोच एक म्हातारा समोरून येतांना दिसला. त्याने सुद्धा शंकरदासला तसेच विचारले जे गुलाबचंदने विचारले होते.

शंकरदास हळूच हसत त्यांना म्हणाला–"आजोबा, मी रात्री शेजारगावातून परत येत होतो. शेताच्या काठाकाठानें चालताना एका ठिकाणी पाय घसरून चिखलात पडलो परंतु नेंमक्या वेळी येऊन ह्या सद्‌गृहस्थाने मला वाचविले."

नंतर ते दोघे घाईघाईने दुसरे गावाचे वळण पार करून जाऊ लागले. तेव्हां त्यात पुन्हा एका माणसाने त्यांना हटकले व घडलेली गोष्ट विचारली.



तेव्हां ते म्हणाले–"अहो काय सांगू मी सकाळी गावात परत येत असताना कोण्या बिचाऱ्या गाडीवानाची गाडी चिखलात रुतली. मी व ह्या गृहस्थानीं मदत करून तीं बाहेर काढली त्यामुळे आमच्या कपड्यांची अशी अवस्था झाली." शंकरदास म्हणाले.

शेखरला त्या माणसाचे बोलणे विचित्रच वाटले त्याने शंकरदासना विचारले–"महाशय, मला एक शंका येते. माझ्या मनाचे समाधान करण्याची आपण कृपा करा. आपण प्रत्येकाला असे वेगवेगळे उत्तर कां दिलेत? ह्या पाठीमागचा आपला काय हेतू मी जाणू शकतो का?"

जेव्हां तू शंकरदासकडे काय काम आहे हे मला सांगत नाहीस. तेव्हां तुझ्या प्रश्नाचे मी उत्तर काय म्हणून देऊ!" शंकरदासने सडेतोड उत्तर देत म्हटले.

"तुम्ही माझ्या शंकाचे निरसन करा मगच मी गावात यायचे काय कारण ते तुम्हांला सांगेन." शेखर म्हणाला.

शंकरदासने स्विकृती सुचक मान हलविली आणि म्हटले–"ह्या गावांत जास्त प्रतिष्ठा मान मरातब असणाऱ्यांतील मी एक व्यक्ति आहे. तसे असतांना दलदलीमधे अडकल्यामुळे रात्रभर थंडीत मला रहावे लागले हि गोष्ट जर चारचौघां जवळ उघडी झाली. तर माझा किती अपमान होईल. वर तोंड दाबून लोक तुच्छतेने हंसतील नां?"



"अहो, तुम्ही असे काय म्हणता आहात." काय सांगता येते कोणावर काय नेमके संकट येईल." शेखर म्हणाला.

हा प्रश्न ऐकताच त्यांना खदखदून हंसू येऊ लागले. ते हळूच म्हणाले–"एक, तो तो जो म्हातारा होता. त्याला ह्या गोष्टीबद्दल काही तारतम्य नाही. त्याला कोणी कोणत्या नदींत कां बुडून मरो आपल्याला काय त्याच्याशी कर्तव्य ? त्याला जर खरी घडलेली गोष्ट सांगितली तर त्याने माझा काही फायदा किंवा नुकसान होणार नाही. इतर लोकाना मीं त्यांच्या त्यांच्या मनस्थिती प्रमाणे उत्तरे दिली.

"ओहो, म्हणजे एवढ्या छोट्या छोट्या गोष्टी सुद्धा तुम्ही अक्कल हुषारीने घेता." शेखरने आश्चर्य प्रकट करीत विचारले.

शंकरदास थोडावेळ गप्प राहीला नंतर म्हणाला–"आता तू सांगितले नाहीस की, शंकरदासकडे तुझे असे काय काम आहे ?"

"हं मला अक्कल हुषारी अजिबात माहीत नाही. मला हे सुद्धा समजत नाही कोणाशी कसे बोलावे. त्या करीता मी शंकरदास यांना सल्ला विचारण्यासाठी आलो होतो. मी त्यांच्याबद्दल पुष्कळ काही ऐकलेले आहे. परंतु त्यांच्याशी माझी प्रत्यक्ष ओळख अजून पर्यंत नव्हती." असे म्हणत तो थोडा गप्प राहला. नंतर न राहवून म्हणाला– "काय हो, ते शंकरदास तुम्ही तर नाहीत नां ?"

"नाही, पण शंकरदास माझे एक चांगले मित्र आहेत." शंकरदास म्हणाले.

"ठिक आहे, मग माझे त्यांच्यापाशी काही काम नाही. कारण मी ज्या कामासाठी आलो होतो. ते पूर्ण झाले. ठिक तर मी जातो आता." असे म्हणत शेखर वळून जाऊ लागला.

"अरे बाबा, तू हे काय म्हणतो आहेस ? आता माझ्या घरी ये. स्नान वगैरे करून कपडे बदलून मग जा." शंकरदास म्हणाले.

"नाही हो नाही, आता ह्या अवतारातच मला माझ्या गावात जायचे आहे." असे म्हणत शेखर वेगाने तेथून निघून गेला.





# सासूची करामत

फार वर्षापूर्वीची गोष्ट आहे. चीन देशात एक महावीर नावाचा योद्धा रहात होता. तो बलवान दुष्ट लोकांच्या अत्याचारांपासून निर्बल लोकांना वाचविणारा असा होता.

एक दिवस तो आपली तलवार धनुष्य व बाण घेऊन घोड्यावर स्वार होऊन राजधानीला निघाला. जाता जाता बरेच दिवस उलटले व तो एक दिवस वाट चुकला व कुठेतरी भटकू लागला. अंधार पडू लागलेला होता. परंतु पोहोचण्याचे ठिकाण अद्याप दृष्टिपथात येत नव्हते. त्यामुळे तो वाटेतील एका गावात शिरला व तेथेच रात्र काढण्याचा त्याने मनाशी विचार केला.

त्या गावात शिरताच समोरच्याच एका घराचे दार त्याला उघडे दिसले व घरात उजेड सुद्धा दिसला. त्यामुळे महावीरने आपला घोडा त्या घरासमोर उभा केला व खाली उतरला. घोड्याला स्वतः बरोबर चालवत तो दाराच्या उंबरठ्यापाशी आला. तेथे ओसरीवर एक म्हातारी बाई चरख्यावर सुत कातीत होती. ती घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकून बाहेर आली व तिने महावीरला पहात विचारले–"तू कोण आहेस बाबा ?"

"बाई, मी रस्ता चुकलो आहे. आज रात्री पुरता आश्रय दिलात तर फार बरे होईल." तो म्हणाला.

"मुला, तुला रहा किंवा नको हे सांगणे काही माझ्या हातात नाही." ती बाई काकुळतीने म्हणाली.

"काय ह्या घरात कोणी पुरुष नाही कां ? तुम्ही येथे ह्या घरात एकट्या रहाता कां ?" त्याने विचारले.

"बाळा, मी विधवा आहे. माझा एकुलता एक मुलगा नेहमी कामधंद्याच्या निमित्ताने बाहेर गावीच असतो." म्हातारी म्हणाली.

कल्पना राजे



"मग तुझी सुन असेल नां?" महावीर म्हणाला.

"अरे बाळा, तू असा प्रश्न कशाला विचारतोस ती चुकूनच बाई म्हणून जन्माला आली. ती एक पहिलवानासारखीच आहे. व नंबर एकची चिडखोर संतापी आहे. कोणत्याही गोष्टीचा रागराग करते. पाहिजे तर ती आपल्या हातातील काठीने सुद्धा मला मारू लागते. परंतु मी तिच्या समोर नमून रहाते व माझा वेळ काढते. तरी ती मला सारखी रागावीत असते चिडत असते. म्हणून मला वाटते तुला इथे रहा म्हणून सांगणे शक्य वाटत नाही." म्हातारीने एका दमात सर्व सांगितले.

ते ऐकताच त्याचा राग अनावर झाला. तो म्हणाला—"काय अन्याय आहे हा? अत्याचार आहे. सांग लवकर ती बाई कुठे आहे. लगेचच तिच्यापासून तुला मोकळीक मिळवून देतो."

एका अनाथ म्हाताऱ्या बाईला संकटातून सोडविण्याची चांगली संधी आपल्याला मिळाली. त्याने जवळच्या एका दगडाला आपल्या घोड्याला बांधले व म्यानेतून तलवार खेचून ताठ उभा राहिला.

"मुला, तू संकटात विनाकारण पडू नकोस. हे काम तुला होणे असंभव आहे. तुला माझ्या सुनेविषयी काही माहिती नाही. ती बायकांच्या कामाला विनकामी आहे. परंतु ती रोज जंगलात जाऊन कोणतीही वस्तू न वापरता प्राण्यांना सहसासहजी मारून घेऊन येते. ते विकून जो काय पैसा मिळतो. त्यावर आम्ही आनचे पोटपाणी भागवतो. म्हणून तर मी तिला दु:खी करायला खूप घाबरते." म्हातारीने सर्व खोटेच सांगत म्हटले.

म्हातारीने तिचे गुण वर्णन केले ते ऐकल्याबरोबर महावीरने तलवार म्यानेत अडकवून टाकली.

"मी माझे सारे आयुष्य दुष्टांपासून अनाथांना वाचविण्याकरीता चालवली आहे. तू म्हणतेस की तुझे आयुष्य सुनेवरच अवलंबुन आहे. त्यामुळे मी तिला मारणार नाही. परंतु तिला कायमची आठवण राहील असे काहीतरी करतो." महावीरने फुशारक्या मारीत म्हटले.





थोड्या वेळातच तिची सुन पाठमोरी येऊन उभी राहली. तीने आपल्या पाठीवर वाहून आणलेला एक वाघ अंगणात आणून टाकला आणि हांका मारीत म्हटले—"अग ए म्हातारे, दिवा दाखवून ह्याला घेऊन जा.

म्हातारी दिवा घेऊन आली. त्या दिव्याच्या प्रकाशात वाघाला पाहून घाबरून गेली. महावीरचे हृदय ते पाहून धडधडायला लागले.

"हा घोडा कुठून आला?" सुनेने घाबरून विचारले.

महावीर पुढे आला व म्हणाला—"अहो तो घोडा माझा आहे. मी राजधानीला जाता जाता वाट चुकलो व तुमच्या गावात पोहोचता पोहोचता काळोख झाला. हे आपल्या घराचे दार उघडे दिसले म्हणून विचारण्यास आत शिरलो की आजची रात्र काढण्यापुरती जागा मिळेल कां?"

"छान, म्हणजे तुम्ही पाहुणे म्हणुन आलात तरी माझ्या सासूने तुम्हांला अजून बाहेरच उभे करून ठेवले कां? दादा, हिच्या अडाणीपणाला माफ करा. आज ह्या वाघाला मारून आणताना उशिर झाला.



मला फार वाईट वाटते की, तुमचे अगत्य नीट करता आले नाहीं." सुन म्हणाली.

"तुम्ही असे काय म्हणता..." महावीर म्हणाला त्याला वाटले की हिला शिष्टाचाराविषयी काही माहीती नसावी. तिने काही वेळाने त्या वाघाच्या मांसाचे स्वादिष्ट जेवण बनवून त्याला वाढले व विनम्र होत म्हणाली. बहुदा तुम्हांला जेवण आवडले नसेल वाईट वाटून घेऊ नका."

"अरे वा, तुम्ही असे काय म्हणता जेवण तर इतके मस्त झाले होते की सांगता सोय नाही." महावीर म्हणाला.

जेवण झाल्यावर महावीर तिच्या सुनेला म्हणाला—"हे बघ, ताई, तू एवढी हुषार व

सामर्थ्यवान असुन सुद्धा मोठ्या बद्दल आदर व प्रेम भाव ठेवत नाहीस ह्याचे काय कारण आहे ?"

हा प्रश्न ऐकताच ती एकदम भडकली व जोरात आवाज काढत म्हणाली–"काय म्हणालास ? ह्या म्हाताऱ्या थेरडीने तुझे कान तेवढ्यात फुंकलेले दिसताहेत ?"

"तू अशी घाई गर्दीला येऊ नकोस त्या म्हातारीने मला तुझ्या बद्दल काही एक सांगितले नाही. तरी मला वाटले की, तू एवढी बुद्धिमान व शक्तिशाली असून तुझ्या सासु बरोबर वागायचे तसे वागत नाहीस म्हणून तर मी तुला विचारले."

ह्यानंतर त्या सुनेने एका हातात दिवा धरला व दुसऱ्या हाताने महावीरची बाही हातात पकडली व खेचत त्याला अंगणात घेऊन आली व त्याला म्हणाली–"हां, इथे उभा रहा ! तुला एक गोष्ट सांगायची आहे.

ती एका खडकावर आडवी खाली वाकली आपल्या बोटाने तो उकरीत म्हणाली–"ऐक, एक दिवस असे झाले. दुसऱ्या दिवशी तसे झाले आणि तिसऱ्या दिवशी पण तसेच. तेव्हा आता तु सांग दोष माझा कां म्हातारीचा ? तेवढ्यात सुनेने खडकावर तीन रेषा खोदल्या त्या खूपच खोलवर होत्या.

त्या पहाताच महावीरचे काळीज हबकले तो म्हणाला–"ह्यात शंका कोणती उरली, ताई, तिन्हीं वेळा दोष तुझ्या सासुचाच आहे.

"बस, मला तर हेच पाहिजे होते." असे म्हणत सुन ताडकन उठून उभी राहली व महावीरच्या झोपण्यासाठी तीने सोप्यात एक खाट घातली. नंतर तेथून ती खोलीत निघून गेली व अंथरुणावर आडवी झाली. हि वस्तुस्थिती पाहिल्यावर महावीरच्या मनांतून अनाथ लोकांवर दयाभाव दाखविण्याची भावना नष्ट झाली. त्या दिवशी तो कसाबसाच कजाग म्हातारीच्या तावडीतून सुटला होता. म्हणून त्याने देवाचे शंभारदा आभार मानले आणि सकाळ होताच घोड्यावर स्वार होऊन तेथून निघून गेला.





# बावळट

पूर्वीच्या काळी एका गावात तिघे भाऊ एकत्र रहात होते. त्याच्यापैकी तिसरा जरा अर्धवट होता. वडील वारल्यानंतर मोठ्या दोघा भावांनी वडीलांची सर्व इस्टेट आपसात वाटून घेतली व तिसऱ्याला एक बैल व पेटीत कपडे फक्त दिले.

एक दिवस दोघे मोठे भाऊ बाजारात जावयास निघाले. तिसऱ्याला वाटले, आपल्याला सुद्धा बाजारात जावयास हवे. तो बैलाला घेऊन निघाला.

तो वेडा एका रानामाळातून जात होता तेव्हा तेथील एक वाळके झाड हवेने जोरात हलले व त्यातून किर्रकिर्र असा आवाज आला. त्याच क्षणी बावरून पहात त्याने विचारले–"काय तुम्हांला बैल विकत घ्यायचा आहे कां? ह्याची किंमत वीस रुपये आहे. पाहिजे तर विकत घ्या. नाही तर सोडून द्या बस!"

पुन्हां झाडातून किर्र किर्र असा आवाज बाहेर पडला–"ओहो, बैलाचीं किंमत चुकती करण्याकरीता थोडा वेळ हवा आहे? ठिक आहे उद्या द्या! तुमचे पैसे कुठे पळून जातात." असे म्हणत बाजारात घेऊन जात असलेल्या बैलाला त्याने त्या सुकलेल्या झाडाला बांधले व आनंदाने घरी परत आला.

"ए वेड्या, तुझा बैल कुठे तो दिसत नाही? कुठे आहे?" मोठ्या दोघा भावांनी विचारले.

"वीस रूपयांना विकून टाकला." बावळटाने उत्तर दिले.

मोठ्या भावानां आश्चर्य वाटले ते म्हणाले–"मग पैसे कुठे आहेत?"

"उद्या पर्यंत सवड दिली आहे." त्यावर दोघे भाऊ त्याला खूप रागावले.

दुसऱ्या दिवशी सकाळीच बावळट घरातून बाहेर पडला व झाडापाशी येऊन पोहोचला. ते झाड किर्र किर्र आवाज करीत हालत



होते. परंतु झाडाला बांधलेला बैल कुठे दिसत नव्हता.

वेड्याने त्या झाडाला विचारले–"तू मला दिलेल्या वचनानुसार पैसा दे." झाडातून किर्र किर्र असा जोरात आवाज होवू लागला.

"बरं आणखी सवड पाहिजे? तू एक दिवस सांगितलेस मी तुला एक दिवस सवड दिली. बर आणखी एक दिवस मी थांबतो पण लक्षात ठेव. उद्या माझे पैसे दिले नाहीस तर काही तुझे ठिक नाही!" तो म्हणाला.

"काय रे पैसे घेऊन आलास का?" घरी येताच भावांनी विचारले.

"नाही, पण उद्या नक्की आणतो." वेडा म्हणाला.

"अरे मुर्खा, हे तरी सांग तू कोणाला आपला बैल विकलास?" भावाने विचारले.

"त्या रानात एक वाळके झाड आहे ना! त्याला!" झटक्यात बावळटाने उत्तर दिले.

"मूर्ख कुठचा!" भाऊ म्हणाला.

बावळट तिसऱ्या दिवशी सकाळीच उठला व खांद्यावर आपली कुऱ्हाड घेतली व तो रानात त्या झाडापाशी येऊन पोहोचला.

त्याने झाडाला विचारले–"अरे माझे पैसे देतोस ना! तू रोज पैसे द्यायला टाळतोस. मला माझ्या भावांच्या शिव्या खाव्या लागतात. झाडातून पुन्हां किर्र किर्र असा आवाज आला.

"हा फाजीलपणा आज चालणार नाही! मी आज एकक्षण सुद्धा थांबणार नाही. तू तावडतोब माझे पैसे दिले नाहीस तर आज माझ्या कुऱ्हाडीने तुझे तुकडे तुकडे करुन टाकीन! समजले." वेड्याने झाडाला धमकावणीच्या सुरात म्हटले.

त्यावर पुन्हां झाडाचा किर्र किर्र असा आवाज झाला. वेड्याच्या अंगाचा भडका उडाला संतापाने त्याने आपली कुऱ्हाड झाडावर मारली. प्रथमच वाळून हलके फुलके बनलेले तो आघात होताच काडकन् तुटून खाली जमिनीवर कोसळले.

त्या झाडाच्या पोकळीत चोरानी आपली संपत्ती लपवून ठेवण्यासाठी उपयोग केलेला होता. झाड खाली तुटून पडता क्षणीच ते सर्वत्र विखूरले गेले. थोडे फार सोने वेड्याने आपल्या खिशात भरुन घेतले व आनंदाने घराकडे धूम ठोकली.

"अरे, हे सोने तुला कुठे मिळाले रे?" मोठ्या भावांनी घाबरुन जात विचारले.

"मी त्या झाडावर कुऱ्हाड मारली तर झाडांनी मला सोने दिले! त्या झाडाच्या ढोलीत खूप सोने आहे. मी थोडेसेच घेऊन आलो." वेड्याने उत्साहानें सांगितले.

पहाटेच भावांनी बावळटाला बरोबर घेतले व त्या झाडातील सारे सोने घेऊन घरी निघाले. त्यांनी आपल्या भावाला समजावून सांगितले–"कोणाजवळ ही गोष्ट बोलू नकोस."

"मी कोणालाही सांगणार नाही." बावळटाने विश्वासाने म्हटले.

"ते सर्व थोडे चालून गेले असतील नसतील तोच गावचा पुजारी सामोरा आला. त्यांनी आश्चर्याने विचारले– "अरे तुम्ही लोक इकडे कुठे आणि पोत्यांमधून काय भरून घेऊन निघालात?"

"थोडी वाळू आहे." भावांनीं उत्तर देत म्हटले. पण बावळट झटक्यात मधे बोलला–"पहा, पहा, पुजाऱ्याला सुद्धा खोटे सांगता? भटजी, ह्यात सारे सोने आहे. पाहिजे तर पहा असे म्हणत त्याने



पोते उघडून दाखवले. सोने पहाताच त्याने मुकाट दोन मुठी सोने काढून घेतले.

बावळटाला अतिशय संताप आला त्याने त्याला रागावत म्हटले–"अरे, हे काय?" असे म्हणत त्याने आपली कुऱ्हाड त्या पुजाऱ्याच्या डोक्यात हाणली पुजारी खाली कोसळला व मरण पावला.

"अरे मुर्खा, तू हे काय केलेस? तू स्वत:ला आम्हांलाही तोंडघशी पाडलेस." असे म्हणत झटक्यात दोघां भावानी रानाच्या कडेला जाऊन एक खड्डा खणला व गुपचून त्या पुजाऱ्याला त्यात पुरुन टाकले.

परंतु मोठ्या भावानी विचार केला की, ह्याबावळटाने हे सर्व डोळ्याने पाहिले आहे.

त्यामुळे केव्हां ना केव्हां हे रहस्य तो नक्कीच उकडकीस आणले. तेव्हां ते दोघे मध्यरात्री पुन्हां त्या खड्ड्यापाशी आले. त्यांनी त्यात पुरलेले पुजाऱ्याचे प्रेत बाहेर काढले व अगदी लांब नेऊन आडवाटेला एक खड्डा खणून त्यात पुरले की, येणाऱ्या जाणाऱ्याना सुद्धा अजिबात ह्या गोष्टीची शंका येऊ नये. नंतर पहिल्या खड्यात त्यांनी एक मेलेली बकरी आणून ती पुरून टाकली.

ह्यानंतर काही दिवसानेच गावात खळ-बळ माजली की, पुजाऱ्याचा काही थांगपत्ता लागत नाही. वेड्याने सुद्धा ऐकले की, सर्वजण पुजाऱ्यासंबंधी चर्चा करीत आहेत. त्यावर वेड्याने लोकांना एकत्र करीत सांगितले– "अहो हे काय, तुम्हांला कोणाला माहीत नाही कां? मीच पुजाऱ्याला कुऱ्हाडीने मारून टाकले. माझ्या दोघा मोठ्या भावांनी त्याला रानांत एका ठिकाणी पुरून टाकले आहे. चला मी तुम्हांला दाखवतो." असे म्हणत तो वेडा त्यांना जेथं भावांनी पुजाऱ्याला पुरले होते तेथे घेऊन आला.

"पहा येथेच त्याला पुरले आहे." तो तेथे खणू लागला. त्यानी गावकऱ्यांना विचारले–"काय हो, पुजाऱ्याच्या अंगावर केस होते नां?"

"हो, हो," गांवकरी म्हणाले.

"दाढी सुद्धा होती नां?" वेड्याने पुन्हां विचारले

"हो?" गांवकरी म्हणाले.

"डोक्यावर दोन शिंगे होती नां?" वेड्याने परत विचारले.

गांवकरी आश्चर्यचकित होत म्हणाले– "अरे शिंगे कसली?"

"मग तर माझ्या सांगण्यावर विश्वास नसेल तर तुम्ही स्वतःच्या डोळ्यानेच पहा." असे म्हणत वेड्याने मेलेल्या बकरीचे डोके खड्ड्याच्या बाहेर काढून त्या सर्वांना दाखविले.

"चला ह्या वेड्याच्या नादी लागणें ठिक नाही. आपण फुकटच इतक्या लांब आलो" असे म्हणत ते सर्व लोक त्याचा नाद सोडून तेथून निघून गेले.





पक्षी आणि प्राणी :

## 'प्राणांचे' संकट

दरवर्षी जगातील ४००० लोक फक्त सापांच्या चावण्याने मृत्युमुखी पडतात. बर्मामधे अशा प्रकाराने मृत्यु होण्याची संख्या सर्वात जास्त आहे.

## आक्टोपसची शक्ति

समुद्रजलचर आक्टोपस ह्याच्या शरिरामधे जवळ जवळ २०० चुंबके आहेत. त्यांना ३१८ किलोग्राम वजनाचे ओझे ओढून घेण्याची शक्ति असते.



## मोठे हरिण



जगातील सर्वात मोठे हरिण अलास्का येथील मानले जाते. हे सात फुट आठ इंच उंच आठशे सोळ किलोग्राम वजनाचे व ह्याची शिंगाची लांबी ६५.५ इंच असते.

# इंदुमति

प्राचीन काळी तृणबिंदु नावाच्या ऋषीने बरीच वर्षे तपश्चर्या केली. ती सफल झाली तर मात्र इंद्राच्या जागेला धोका पोहोचणार ह्या विचाराने इंद्राने तृणबिंदुची तपश्चर्या भंग करण्याच्या इच्छेने हरिणी नावाच्या एका अप्सरेला तिथे पाठविले.

हरिणी तृणबिंदुच्या जवळ जाऊन पोहोचली. आणि तिने आपल्या नृत्य-गायनाने इंद्राच्या आज्ञाचे पालन केले. त्या अप्सरेचा उद्देश जाणून तृणबिंदु ऋषींनी संतापाने तिला शाप दिला–"तू तुच्छ मानव स्वभावाने मनुष्य रूप घेऊन जन्माला येशिल. त्यावर हरिणीने ऋषीना निवेदन करीत म्हटले. आपण मला क्षमा करून शाप परत घ्यावा.

थोडया वेळाने ऋषी शांत झाले. म्हणाले–"जेव्हां पारिजातकाच्या फुलांचा हार तुझ्या अंगाला स्पर्श करेल तेव्हां तू शापापासून मुक्त होशिल.

ऋषीच्या शापाने हरिणी भोजराजाच्या येथे इंदुमतिच्या रूपाने जन्माला आली. आणि स्वयंवर प्रसंगी अयोध्याचा राजा अज ह्याला तिने वरले.

एक दिवस ती बागेत हिंडत असतांना हवेतून ढगा बरोबर एक फुलांची माळ खालीं येत असतांना तिने पाहीली. आकाशमार्गाने जात असलेल्या नारदाच्या वीणेवरून ती माळ ओघळून खाली येऊन इंदुमतीच्या गळयात येऊन पडली. इंदुमतीने आश्चर्याने त्या पारिजातकाच्या फुलांच्या माळेकडे पाहीले. दुसऱ्या क्षणी बेशुद्ध होऊन खाली पडली व आपल्या मानव देहाचा त्याग करून देवलोकात जाऊन पोहोचली.





# मुलाची जबाबदारी

एक पार्वती नावाची म्हातारी बाई दारोदार वणवण भटकत भीक मागुन आपले पोट भरीत होती. एकदा हिंडत असतांना तिला एक दहा वर्षाचा अनंत नावाचा अनाथ मुलगा भेटला. त्या मुलाला जात्याच शिक्षणाची आवड पाहुन तिला त्याची दया आली. तीने त्याला आपल्या बरोबर घेतले व जे काही भीक मागून पैसे मिळत. त्यातील अर्धे ती त्याच्या शिक्षणाकरिता खर्च करून ती त्याला शिकवू लागली.

त्याचे शिक्षण संपले व त्याला चांगली नोकरी सुद्धा लागली. तेव्हां त्यांनी एक चांगले घर भाडयाने घेतले. पार्वतीला त्यामुळे भारी मुलाचे कौतुक वाटले व ती मनात विचार करू लागली की चला आता आपले कष्ट संपले.

त्याच सुमारास उपवर मुलीचे वडील वराच्या शोधात अनंतच्या घरी आले. त्यातील एक मुलगी माला पार्वतीने पसंत केली व तिच्याबरोबर अनंतचे लग्न लावून दिले.

माला लग्न होऊन सासरी आली. परंतु आपल्या नवऱ्या बरोबर अशा म्हाताऱ्या दिसणाऱ्या बाईला पाहून तिला किळस वाटली वर तिला रोज आपण जेवण करून वाढायचे हे पाहून तिला कसेसेच झाले. ती त्याचा उपटा म्हातारीवर काढू लागली. परंतु असा त्रास पार्वती पूर्वीपासूनच अनुभवीत होती. त्यामुळे मालाच्या बोलण्याचे तिला जास्त दुःख झाले नाही.

एकदा पार्वती म्हातारपणाने आजारी पडली. अनंतला तिची अत्यंत काळजी वाटू लागली. त्यानें नको नको म्हणत असतांना सुद्धा तिचे न ऐकताच तिच्यावर उपचार करण्याकरीता खूप पैसे खर्च केले. परंतु मालाला ते पहावले नाही.

दिव्यानाथ

एके दिवशी ती आपल्या नवऱ्याला म्हणाली–"एका आठवड्याने सण येत आहे. तेव्हां ह्या येत्या सणात तुम्ही मला रेशमी साडी घेऊन द्या."

बायकोने समोर ठेवलेला प्रस्ताव ऐकून तो थोडा विचारमग्न झाला व म्हणाला–"अग, सणांना काय तोटा ते येतच रहाणार तू तर पहातीसच आहेस नां! माझा किती खर्च होतो आहे."

ते ऐकून मालाला भयंकर राग आला ती चिडून बोलली–"हो, एका भिकारणी-साठी एवढा खर्च तुम्ही करणारच."

अनंतला ते बोलणे विचित्र वाटले तो चकित नजरेने तिच्याकडे पहात म्हणाला–"हे काय ग, तू आजीबद्दल असले अभद्र बोलते आहेस." असे म्हणत तो घरातून रागाने बाहेर निघून गेला.

त्या दिवसापासून मालाला म्हातारी विषयी जास्तच ईर्ष्या उत्पन्न झाली.

त्याच दिवशी रात्री मालाने जेवणाच्या-वेळी नवऱ्यास स्पष्ट बजावले–"तुम्हांला कसे कळत नाही हो! मी दिवसभर किती दुःखी असते. तुम्हांला मी हवी कां ती भिकारीण?"

अनंतला भयंकर संताप आला तो चिडून म्हणाला–"अंग तुला कितीदा सांगितले की आजींना भिकारीण म्हणू नको तुला काय कळत नाही कां? पती म्हणून तुला सुखी ठेवणे हे माझे कर्तव्य आहे. हे मला पूर्णपणे ठाऊक आहे परंतु मी लहान अनाथ असतांना त्या आजीनेच दारोदारी भिक मागुन मला खाऊपिऊ घालून शिक्षण दिले. तसे असतांना मी आजी आजारी आहे तर अजिबात लक्ष देऊ नको हे कसे? तिची सर्व जबाबदारी मलाच पार पाडायला पाहिजे तू मुकाट्याने गप्प बस!"

दुसऱ्या दिवशी रागाने तिने पहाटे आपल्या नवऱ्याला एक चिट्ठी लिहून त्याच्या उशी खाली ठेवली त्यात असे लिहिले होते–"मी माहेरी निघून जात आहे." असे लिहून निघून गेली.

अचानक आलेल्या आपल्या मुलीला पाहून तिच्या वडीलांनी विचारले–"अग तू एकटीच कशी आलीस? काय झाले?" मालाने सर्व गोष्टी आपल्या वडिलांना सांगत म्हटले–"बाबा माझ्या नवऱ्याला माझ्यापेक्षा त्या भिकारीण आजीचीच जास्त काळजी त्यामुळे मी त्या घरात क्षणभर सुद्धा राहू शकले नाही.

मालाचे वडील एकक्षण ते सर्व ऐकून गप्प राहीले व नंतर म्हणाले–"माला, "तू केलेस ते एक प्रकारे छानच झाले. ज्या दिवशी त्याला बायकोची जबाबदारी समजेल तेव्हां तो येईल."

आपल्या वडीलांचे बोलणे ऐकून तिला फार आनंद झाला. परंतु भावाने ती आल्यानंतर तीची अजिबात विचारपुस सुद्धा केली नाही ह्याचे तिला भारी दुःख झाले.

तिचे वडील कचेरीत जाताना तिला म्हणाले–"आता जे झाले ते झाले. मी







संध्याकाळी घरी आल्यावर ह्यावर सविस्तर विचार करून बोलू."

परंतु त्या दिवशी संध्याकाळ .होऊन अंधार पडू लागला तरी सुद्धा तिचे वडील कचेरीतून घरी परत आले नाहीत. तिला खूप काळजी वाटू लागली. तिने वडीलांच्या कचेरीत काम करणाऱ्या रामदासच्या घरी जाऊन त्याला विचारले.

रामदास म्हणाला–"मला तर खरी गोष्ट सांगायची लाज वाटते. परंतु आज तुझ्या वडीलांना लांच घेतांना पकडण्यात आले आहे आणि बहुदा त्यांची नोकरी सुद्धा गेल्यातच जमा आहे. ते ऐकताच तिला कसेसेच होवू लागले. वडिलांना लांच घेतल्या मुळे नोकरीतून काढले गेले तर आपल्या घराण्याची अब्रु धुळीला मिळेल. असा विचार करीत माला आपल्या घरी परत आली. तेव्हां तिला पाठीमागल्या दारी कसला तरी आवाज आला ती धाईधाईने मागल्या दारीं गेली पहाते तो काय तिचे वडील विहिरीच्या कांठावर काहीतरी कागदावर लिहून ठेऊन उडी मारण्याच्या विचारात होते. मालाने धावतच जाऊन त्यांना मागे खेचले.

"मुली, मी आता कोणालाहीं तोंड दाखविण्याच्या लायकीचा राहीलो नाही. मला मरून जाऊन दे." तिचे वडील म्हणाले,

"अहो बाबा असे काय म्हणता चला पाहू आधी घरात! तिने आपल्या अश्रुनां बांध घालीत त्यांना म्हटले.

"बाळे ह्या वयात नोकरी हातची घालून बसलो आता मला मोठी विवंचना आहे उर्वरित आयुष्य कोणाच्या जिवावर काढू?"

"बाबा, तुम्ही वाईट वाटून घेऊ नका! तुमची नोकरी गेली तर त्यात काय एवढेस बिघडले. दादाची नोकरी तर आहे नां; एकुलता एक मुलगा म्हटले म्हणजे तुम्हांला पोसण्याची जबाबदारी त्याचीच आहे नां?"

त्याच वेळी खोलीचे दार उघडून तिचा भाऊ बाहेर आला व म्हणाला–"माला मी माझी काय जबाबदारी आहे ते तुला मागावून सांगेन प्रथम मला सांग तुझ्या वडीलांचे हातपाय मजबुत असतांना प्रतिष्ठेन .काम करत असतांना घेतलेली लांच तुला घृणास्पद कां वाटत नाही?

"दादा, देवाची शपथ घेऊन सांगते. बाबांनी केलेल्या गोष्टी करीता माझ्या मनांत द्वेष भावना नाही." माला म्हणाली.

ते ऐकताच मालाचा भाऊ खदखदून हंसू लागला व म्हणाला–"लांच घेण्या-सारख्या अत्यंत वाईट कार्याबद्दल तुझ्या मनात वडिलांविषयी द्वेष भावना नाही. मग अपंग अनाथ असतांना व भिक मागण्या-शिवाय दुसरा पर्याय नसतांना पार्वती आजी विषयी तुझ्या मनात द्वेष कां? वडिलांनी कसलाही, अपराध केला तरी आपल्या वडीलांचे भरणपोषण करण्याची जबाबदारी आहे. कां नाही तुझी!" ती चिडून म्हणाली.

"तुला मला हे सांगण्याची बिलकुल आवश्यकता नाही बर पण" हे बघ. अनाथ असलेल्या अनंतवर अनेक अडचणी कष्टें सहन करून पार्वती आजीने मोठे करून शिक्षण दिले व त्याला चार पैसे कमाव-ण्याची योग्यता दिली. मग म्हातारपणात तिला सांभाळण्याची जबाबदारी काय त्याची नाहीं कां? त्यातून त्या घरातील तू सुन?" भावाने थोडे रागातच जाब विचारला.

आपल्या भावाला तिला प्रत्युत्तर करता आले नाही. तिने डोळयात पाणी आणीत म्हटले–"दादा, तू माझे चांगलेच डोळे उघडलेस उद्या पहाटे उठूनच मी माझ्या सासरी जाईन मला ह्याच गोष्टीची फक्त भीती वाटते की, बाबांना देवदयेने कसलीही शिक्षा होवू नये!"

ते सर्व ऐकून मालाचे वडिल स्मित हास्य करीत तिला थोपटत म्हणाले– "बाळे, तू चिंता करू नकोस. मी कोणा-कडूनही लांच घेतली नाही की, माझी नोकरी पण गेली नाही. तुला चांगला धडा द्यावा म्हणुन हे सर्व कारस्थान रचले होते.

"बाबा, आपण तिघांनी रचलेल्या ह्या नाटकाने मला मात्र आयुष्यात सद्बुद्धी व चांगला वाईट विचार करण्याची प्रेरणा प्राप्त झाली." असे म्हणत ती निघून गेली.






# शनैश्वराची पीडा

कनकदास नावाच्या एका गृहस्थाला काही कामानिमित्ताने शेजार गावच्या आपल्या नातेवाईकाकडे जायचे होते. पायवाट जंगलातून जाणारी होती. नातेवाईकांना भेटून तो परतमार्गे येत असतांना त्याला एक माणूस झाडापाठीमागे लपताना दिसला.

त्याला लपून बसलेले पाहून कनकदासला खात्री वाटू लागली की, तो एक चोर असावा. तो विचार येताच जवळच्या झाडापाठीमागे लपून तो त्याच्या हालचाली निरखून पाहू लागला. त्याच्या हातात टोपली होती तो जवळच्या एका मोठ्या वडाच्या बुंधापाशी गेला व तेथील ढोलीत त्याने ती टोपली ठेवली व निघून गेला.

ते सर्व दृष्य पहातच त्याची खात्री पटली की तो नक्कीच चोर आहे. त्या ढोलीतील टोपली हस्तगत करण्याच्या उद्देशाने तो घाईघाईने ढांगा टाकीत तेथे जाऊ लागला. तेवढ्यात गावांतील एक शंकरदास नावाचा वाणी त्याला समोरील वळणावरून येत असतांना दिसला.

कनकदास रागारागाने त्याच्याकडे पहात तसाच उभा राहीला. शंकरदास त्याच्या जवळ आला. तितक्यात तिसऱ्याच एका माणसाने येऊन ती टोपली काढून घेतली व तेथून तो पसार झाला.

ते सर्व पाहून कनकदासाने दिर्घ श्वास सोडला व शंकरदासला म्हटले–"शंकरदास, खरा चोर जेव्हां ती टोपली तेथे ठेवत होता तेव्हांच मी त्याला पाहिले. तो आपल्या डोळ्यात धूळ झोकून ती पळवून घेऊन जाण्याच्या विचारात होता. तितक्यात तू शनीसारखा दत्त म्हणून समोर आलास.

कनकदासचे बोलणे ऐकताच तो कावराबावरा चेहरा करीत म्हणाला–"त्या चोराला ती टोपली ढोलीत लपवून ठेवत असतांना मी दूरवरूनच पाहिले. ती पळवून नेण्याच्या विचारानेच मी ह्या झाडाशी आलो तर तूच माझ्यासमोर शनीसारखा उभा राहिलास. ज्या चोराने ते धन पळवून नेले. त्याला भाग्यदेवीची कृपाच झाली म्हणावयाची आपणमात्र एकमेकांना शनीश्वरासारखे सामोरे आलो.

ते दोघे अशा प्रकारे एकमेकांशी बोलत होते. तितक्यात ब्रह्मपुरच्या जमिनदाराचे दोन नोकर त्या ढोलीतून टोपली चोरून नेणाऱ्या माणसाला फटके मारीत तेथूनच घेऊन येतांना दिसले.

त्या दोन्ही नोकरांना कनकदास व शंकरदास पूर्वीपासूनच ओळखत होते.

कनकदासाने भोळेपणाचा आव आणित उगाचच त्यांना विचारले–"अरे हा माणूस कोण आहे? ह्याला कां बांधून आणलें?"

"हा बदमाश काल रात्री, जमिनदाराच्या घरी चोरी करून दागदागिने व पैसाअडका चोरून पळून गेला. आता चांगल्या मुद्देमालासह आमच्या तावडीत आला आहे. तरी तो स्वतःला निर्दोष समजतो आहे." नोकर म्हणाले.

शंकरदास काही बोलणार तितक्यांत तो पकडला गेलेला माणूस डोके बडवून घेत कळवळत म्हणाला–"मालक, माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवा. मी दूरच्या झाडावर बसून फांदी तोडीत होतो. तेव्हां मी पाहिले कोणी एक माणूस एक टोपली

कमलेश्वर पांडे












ह्या डोलीत आणून लपवून ठेऊन पळून जात आहे. मी लोभाने तेथे गेलो व ती टोपली उचलून पळून निघालो व तुमच्या हाती सांपडलो. माझ्या म्हणण्यावर विश्वास करा. मी शपथ घेतो, मी चोर नाही!"

ते ऐकताच एका नोकराचा राग अनावर झाला तो त्याला दरडावीत म्हणाला—"अरे चोराच्या पोरा मुकाट तोंड बंद कर. तुझ्या बोलण्यावरून तर स्पष्टच कळते की, तू व तुझ्या सोबत आणखी एक चोर नक्की आहे. त्याचा ठावठिकाणा सांगतोस कां? तुरुगांची हवा खायला पाठवू?"

ह्यानंतर नाइलाजास्तव तो माणूस गप्प बसला. ते सर्व लोक निघून गेल्यानंतर कनकदास शंकरदासला म्हणाला—"शंकर-दास तू माझ्या कर्मात शनि नाहीस, तर भाग्य देवता आहेस!"

ह्यावर शंकरदास मंद स्मित करत म्हणाले—"आपण दोघे काही क्षणापूर्वी एक दुसऱ्याचे शनी बनलो होतो. त्यामुळेच चोर रूपात पकडले न जाता सुटलो. आता तर माझ्या मनात पक्काच विश्वास बसला आहे की कोणीतरी विचित्र प्रकाराने तरी शनिदेवर आपल्या माणसावर उपकारच करतो आहे.

मला तर तसा अनुभव नाही की ह्यात नक्कीच खरेपणा आहे कां नाही. परंतु ही गोष्ट खरी आहे की खऱ्या चोराला ते धनाचे गोठाडे त्या डोलीत ठेवतांना आपण तिघांनीही पाहिले होते झाडाची फांदी कापायला जो माणूस वर चढला होता. त्याने चुकून जर आपल्या दोघांना पाहिले असते तर तो नक्कीच शनी बनून आपल्या मानगुटीस बसला असता." कनक-दास आपला विचार त्याला सांगत म्हणाला.

"कसा का होईना चोरी केलेला माल खऱ्या चोराला प्राप्त झाला नसला तरी तो एक प्रकारे नशिबावानच म्हटला पाहिजे. कारण तो तुरुगाची हवा खाण्यापासून तरी वाचला ना!" शंकरदासने म्हटले.

ह्या नंतर ते दोघे निर्धास्त मनाने गप्पा छाटीत गावाकडे निघाले.






[४]

[नागरिकांनी चित्रसेनला निवेदन केले उग्राक्ष राक्षस आपल्या प्राण्यांना माणसांना उचलून घेऊन जात आहे. चित्रसेन उग्राक्षाला भेटण्यासाठी त्याच्या किल्ल्यात गेला. उग्राक्षाने त्याला सांगितले अग्नी द्वीप मधली भयंकर माणसे उचलून घेऊन जात आहेत. त्याने चित्रसेनला वचन दिले की ती माणसे मी तुला दाखविन........पुढे]

उग्रांक्षाने चित्रसेन व त्याच्या बरोबर आलेल्या सर्व लोकांना किल्ल्याच्या आत नेले व तेथील अमुल्य वस्तु सोने चांदी इत्यादी दाखविले. निर्मिती पासून ते आता-पर्यंत राक्षसांनी ज्या ज्या विभिन्न प्रकारच्या आयुधांचा हत्यारांचा वापर केला होता. तो पाहून चित्रसेन आश्चर्य चकित झाला. त्यातूनही जास्त आश्चर्य त्याला त्या खजिन्यातील सोन्यानाण्यांच्या राशी पाहून वाटले—"ह्या राक्षसांना ह्या संपत्तीचा काय बरे उपयोग?" हे सर्व त्यांना कशाला? नंतर चित्रसेनने उग्राक्षाला विचारले—'उग्राक्षा, तुम्हाला ह्या संपत्तीचा काय, फायदा?"

हा प्रश्न ऐकतांच उग्राक्ष खळाळून हसत म्हणाला—"भविष्यात केव्हांतरी आमची जात सभ्य बनेल व त्यांना जर तुमच्या सारखा व्यापारधंदा किंवा शेतीवाडीं करा-

षीशी वाटली तर ह्या धनांचा नक्कीच उपयोग होईल नां! ह्याशिवाय पुढच्या अठरा वर्षांत होणाऱ्या घटनांमधे एक मुख्य गोष्ट मी डोळ्यासमोर ठेऊन ह्या किल्ल्यात ह्या अमुल्य वस्तु सोने नाणे ह्यांचा संग्रह केला आहे.

अठरा वर्षांने एक मुख्य गोष्ट म्हणता क्षणी चित्रसेनच्या मनांत एक दाट शंका आली की, ह्या पाठीमागे नक्कीच त्याचा प्रकार काही तरी हेतू काळाबेरा आहे. तेव्हां ह्या संबधी जास्त शंका प्रकट करणे बरोबर होणार नाही. त्यातून त्याला जर अजून खात्री वाटत असली की मी माझा अठरा वर्षांचा मुलगा त्याच्या हाती सोपवेन तर त्याला तसेच वाटू दे आपल्याला काय।

चित्रसेनने पूर्णपणे हिंडून किल्ल्याची सारी विशेषता पाहून घेतली. तेवढ्यातच संध्याकाळ झाली उग्राक्षाने आपल्या पाहुण्यांना मोठ्या आगत्याने फार मोठी मेजवानी दिली मेजवानी चालू असतांनाच एक सेवक धावत धावत तेथे आला व म्हणाला—"प्रभु, अग्नि द्वीप मधिल रहाणारे ज्या भयंकर पक्षावर बसून भ्रमण करतात त्या एका पक्षाला कुंभींनी प्रदेशा-वरून जातांना आपल्या पहारेकऱ्याने पाहिले व काटयाकुटयां जाळून ह्या गोष्टीची आपल्याला सुचना देण्यास सांगितली आहे.

त्या सेवकांचे बोलणे ऐकून उग्राक्षाला आश्चर्य वाटले तो म्हणाला—"चित्रसेन, आता आपल्याला येथून लवकरच गेले पाहिजे तुझ्या राज्यातील लोकांना उचलून घेऊन जाणारे दुष्ट मी तुला दाखवितो आपण डोळ्यात तेल घालून सावध राहीले पाहिजे."

ह्यानंतर सर्वांनी भराभर आपले जेवण उरकले व उग्राक्षाच्या पाठोपाठ सारे निघाले. उग्राक्षाने चित्रसेन व थोडे फार सैन्य स्वतः बरोबर घेऊन बाकी सैन्याला दुसऱ्या दिशेला पाठविले.

उग्राक्ष व चित्रसेन किल्ला पार करून जंगलाच्या वाटेने थोडेफारच पुढे गेले नाहीत तोच त्यांना किल्ल्याच्या बाजूने पक्षांच्या पंखाचा फडफडाट पक्षांचा किच-किचाट ऐकू आला. घाबरून सर्वजण झाडाचा अडोसा करून उभे राहीले व त्यांनी किल्ल्याकडे आपली भयभीत नजर टाकली. किल्ल्याच्या वरच्या बाजूला पंख पसरून उडणाऱ्या काही विचित्र आकृत्या त्यांच्या दृष्टीस पडल्या किल्ल्याच्या रक्षणाकरीता असलेले राक्षस आपल्या मशाली उंचाऊन आरडून ओरडून त्यांना खाली उतरण्यास सांगत होते.

"उग्राक्षा, ह्या विकृत आकृत्या हादरवून सोडणाऱ्याच वाटताहेत बुवा त्यां विशालकाय तुझ्याकिल्ल्यावर उतरून किल्ल्याचा ताबा तर मिळवणार नाहीत नां?" चित्रसेनने भयशंकेने विचारले.

ह्या अग्नी द्वीप मधल्या लोकांनी पूर्वी एकदा तसा प्रयत्न केला होता परंतु माझ्या





















अनुचरांनी आपल्या मशाली व लांब अणकुचीदार भाल्याच्या सहाय्याने त्यावर स्वार होणाऱ्या एकाला खाली पाडून साखळदंडाने कैद केले होते. परंतु त्याच्याकडून सविस्तर माहिती मिळण्यापूर्वी तो माणूस मरण पावला आता बहुदा त्याचे साथीदार माझ्या बरोबर बदला घेण्याच्या विचारात असावेत "बस, हिच एकगोष्ट आहे. परतु माझा विश्वास आहे की, ते लोक किल्ल्यात उतरू शकणार नाहीत" उग्राक्ष म्हणाला.

उग्राक्षाचे बोलणे संपते न संपते तोच चारी बाजुंची झाडे झुडपे हवेने जोरजोरात हलू लागली व दुसऱ्या क्षणी भयंकर फडफडाट करीत दोन पक्षी आकाशातून खाली उतरले. त्यांच्या पाठीवरून वाघांचे चामडे गुंडाळलेली चार माणसे पण खाली उतरली.

उग्राक्षने तत्क्षणी चित्रसेन व आपल्या साथीदारांना फाद्यांच्या आड नेले. त्या विचित्र पक्षांवर बसून आलेली माणसे जमीनीवर पालथी पडून थोडावेळ चोहोबाजूला निरखून पाहू लागली नंतर उठून त्यांनी परस्पर एकमेकांना संकेत केला की, आता पुढे निघण्यास हरकत नाही. त्यांच्या पाठीमागे ते पक्षी पण पंख फडफडत चालू लागले.

खरे तर त्यांना पंख असूनही पक्षी म्हणणें योग्य वाटत नव्हते. कारण त्यांची नाके तीन फुट लांब होती. ते जेव्हां आपले नाक वर करून तोंड उघडत तेव्हां वाघा सारखे तिक्ष्ण दांत दिसत होते. प्राण्यासारखी एक छोटी शेपटी त्यांना होती. ते पक्षांसारखे पुढच्या दोन पायांवर थोडेसे वाकून चालत होते. त्यांची उंची सुमारे सात आठफुट होती. ते विचित्र आकाराचे होते.

"खरी तर आपल्याला भीती त्या वाघाचे कातडे पांघरलेल्या माणसांपासून नाही तर ह्या पक्षांपासूनच आहे. जर कां कोणी वैरी त्यांच्यावर हल्ला करून गेला तर ते पक्षी धावून जाऊन लढत असतात. वेगवेगळ्या प्रकारचे आवाज काढून ते लोक त्यांना त्रास देऊन हुसकावत. माझ्या सेवकांपैकी काही लोकांना त्या पक्षानी आपल्या चोंची व नखांनी फाडून टाकले आहे" उग्राक्ष म्हणाला.

तिकडे त्या पक्षांवरून उतरलेली भयंकर माणसे हळूहळू त्या झाडाझुडूपांमधून पुढे सरकू लागली. दोन्ही पक्षीं आपल्या माना उंचावून त्यांच्या पाठोपाठ पंखाचा फडफडाट करीत शत्रूची चाहूल घेत चालू लागली.

"ते पहा! हे लोक त्या दरीतील तुझ्या वसाहतीकडे निघाले आहेत. म्हणजे ह्याचा अर्थ तुझ्या प्रजेतील काही माणसे आज नाहीशी होणार दिसते." उग्राक्ष म्हणाला.

"मग काय आपल्याला असे मुकाट्यानेच मुग गिळून पहावे लागणार." चित्रसेनने व्याकुळ स्वरात विचारले.

"हो हो! नाहीतर आपण काय करू शकणार? त्या लोकांसमवेत ते भयंकर पक्षी असल्यामुळे आपल्याला गप्प रहाण्याशिवाय काही गत्यंतरच नाही. तीं माणसे जर एकटीच सांपडली असती तर मात्र मी माझ्या केवळ अंगठ्याने त्यांना चेचून त्यांचे चूर्ण करून टाकले असते.



तितक्यात उग्राक्ष व चित्रसेन ज्या झाडा पाठीमागे दडलेले होते. त्या झाडावरचे घाणेरडे घुबड विचित्र आवाजात काहीतरी कुचकुचले तो कर्कश आवाज ऐकून ती वाघाचे कातडे गुंडाळलेली माणसे झटक्याने मागे वळली. तेव्हां त्यांच्या हातातील चमकते भाले अंधारात जास्तच उजळून निघाले. ते भयंकर पक्षी सुद्धा चोच उंचावून कर्कश आवाजात त्याना दुजोरा देत किंचाळ लागले.

"त्या लोकांना शंका आली वाटते येथे नक्कीच कोणी तरी माणसे आहेत." उग्राक्ष म्हणाला. त्यानंतर त्यांनी आपल्या सेवकांना जवळ बोलावून त्यांच्या कानात



काहीतरी कुजबुज केली. त्यांनी आपले दोन भाग केले व वेगवेगळ्या दिशेने निघून गेले. दुसऱ्या क्षणी ते पक्षी आवासून उग्राक्ष व चित्रसेन होते त्या बाजूला धावू लागले. त्यांच्या पाठोपाठ ते वाघाचे चामडे नेसलेले लोक सुद्धा पळू लागले.

चित्रसेनने कमरेची तलवार खेचली. उग्राक्षाने आपल्या हातातील गदा हवेत गरागर फिरली व तो त्याच्यावर तुटून पडला. तत्क्षणी तो वळून एका बाजूला कोलमडला परंतु दुसरा पक्षी उग्राक्षाच्या डोक्यावरून खांद्यावर चढून त्याच्या डोक्यावर चोचीचां प्रहार करू लागला. त्याचवेळी उग्राक्षाचे सेवक दोन्ही बाजूंनी गर्जना करीत आले व ते चर्मधारी लोकांवर तुटून पडले. संधी मिळताच चित्रसेन पुढच्या बाजुला उडी मारून आला. त्याने आपल्या तलवारीने एका माणसाचे दोन तुकडे करून टाकले.

ह्यानंतर दोघांच्या मधे युद्ध सुरू झाले. उग्राक्ष आपल्या जखमांच्या घावाकडे दुर्लक्ष करून त्या पक्षांवर हल्ला करीतच होता. ते उग्राक्षाच्या तावडीतून निसटले आणि उलट त्याच्यावर हल्ला करू लागले. त्या पक्षांच्या चोचीच्या माराला केवळ उग्राक्षच नाही तर त्याचे बरेच सैन्य सुद्धा जखमी झाले. काही लोक वेदनेने विव्हळत खाली कोसळून पडले.

चित्रसेनच्या तलवारीचा मार खाऊन एक दुष्ट खाली कोसळला. नंतर तो इतर लोकांकडे वळला. ते पाहून आपल्या भाल्यांच्या सहाय्याने स्वत:चे रक्षण करीत तोंडाने विचित्र तऱ्हेचा आवाज काढीत ते लोकपाठीमागे पळून जाऊ लागले. त्यांना वेढून घेण्याचा प्रयत्न चित्रसेन व त्यांच्या बाकीच्या अनुचरांनी केला. परंतु तेवढ्यात ते पक्षी दत्त म्हणून समोर येऊन उभे राहीले पक्षी सुद्धा आपले पाय, चोंच पंखाने त्याच्यावर हल्ला











करीत आपल्या मालकांप्रमाणे मागे मागे किचकिच करीत जाऊ लागले.

ते पाहून उग्राक्ष भयंकर आवाज काढीत गदा फिरवीत त्यांच्यावर तुटून पडला. त्यावेळी त्यांच्यातील वांचलेले तीन वाघ चर्मधारी पक्षांच्या पाठीवर उड्यामारून बसण्याचा प्रयत्न करू लागले. त्यांच्या तोंडातून येणारा विचित्र आवाज ऐकून ते उडाले. उग्राक्षाने आपली गदा जोरजोरात फिरवली व त्या पक्षांवर फेकली. त्याच्या त्या झटक्याने ते एकदम मागे सरकले व आपल्या चोचींनी त्यांनी ती गदा खाली पाडली त्या गदेच्या प्रहाराने उग्राक्षच जखमी होऊन खाली पडला. त्यांच्या जखमांमधून रक्त वाहू लागले. चित्रसेन त्याच्या जवळ येत त्याला म्हणाला– "उग्राक्षा, फार खोल घाव तर नाही नां लागला? मरणाची भीती वगैरे?" असे म्हणत उग्राक्ष जखमेच्या दुखापतीने विव्हळु लागला नंतर म्हणाला–"तशी मरणाची भीती नाही. परंतु आता दहा दिवस तसे अंथरूणाला खिळून रहाण्याशिवाय गत्यंतर नाही. पण सांग बाबा. माझे किती सेवक मरण पावले?"

"दोन जणांना त्या भयंकर पक्षाने आपल्या चोचीने फाडून टाकले. चौघेजण जखमांच्या वेदनेने कण्हत आहेत." असे म्हणून त्याने आपल्या जवळ येणाऱ्या राक्षसांना विचारले–"काय रे एकच शत्रूचा माणूस मेला नां?"

"होय, महाराज!" राक्षसांनी उत्तर दिले.

"छी: भित्रे पळपुटे कुठचे! इतके सारे राक्षस वीर असतांना सुद्धा त्या येणाऱ्या माणसांना आपण हाकलून लावू शकलो नाही. हि तर शरमेची गोष्ट आहे छी: छी:" काय ही आपण माणसे असे म्हणत उग्राक्ष उठून बसण्याचा प्रयत्न करू लागला. त्याला भयंकर वेदना होऊ लागल्या, तितक्यात त्याचे सेवक जवळ आले त्याला खांद्यात हात घालून त्यांनी उठून उभे केले.

(क्रमश:)



# दिनकरची बुद्धी

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेंहमीप्रमाणें मौन होऊन स्मशानाच्या दिशेनें चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तू श्रम करीत आहेस ते पाहून तुला कोणी अविवेकी समजेल! परंतु एखादा माणूस जिद्दीने काहीं निर्णय घेतो. तो कालक्रमाने निष्फळ म्हणून संबोधला जातो. माणसे त्याची वेगळीच अवहेलना करू लागतात. त्याचे उदाहरण म्हणुन तुला दिनकर नावाच्या एका बुद्धीवंताची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

रामानंद नावाचा एक व्यापारी होता. त्याला दोन मुलगे होते. मोठ्याचे नाव प्रभाकर तो बुद्धीने मंद पण सुंदर होता. दुसरा दिनकर कुरूप असला तरी



तल्लख बुद्धीचा होता. रामानंदाची जेव्हां चाळीशी उलटली तेव्हां त्याची पत्नी एकाएकी वारली. त्याचे आपल्या पत्नीवर अत्यंत प्रेम होते. त्याच कारणाने की काय त्यानीही ती मरताच अंथरुणास पाठ धरली. त्यामुळे त्यांच्या धाकट्या मुलानीं दिनकरने व्यापारात आपले लक्ष घातले व हळूहळू भरभराट केली.

बरेच दिवस उलटले गुणशेखर नावाच्या एका व्यापाराने रामानंदाच्या कुटूंबाची ख्यालीखुशाली ऐकली होती. त्यांनी आपल्या दोन मुलींचा विवाह् प्रभाकर व दिनकर यांच्या बरोबर लावून देण्याचा निश्चय केला. साखरपुड्याच्या वेळी गुणशेखरची मोठी मुलगी हिचे प्रभाकरावर मन बसले तिने मनानेच त्याला पतीं म्हणुन वरले. परंतु त्याची दुसरी मुलगी शोभा हिने दिनकरची बुद्धीमत्ता न पहाता त्याच्या कुरूपतेकडे पाहून त्याला स्पष्ट नकार दिला.

दिनकरला त्याचा अत्यंत राग आला. त्याने शपथ घेतलीं की, शोभा पेक्षाही अत्यंत रूपवती मुलीशी मी लग्न करून दाखविले नाही. तर मी नावाचा दिनकर नाही.

ह्यानंतर रमाचे प्रभाकर बरोबर थाटामाटाने लग्न झाले व काही दिवसाने रामानंद वारले. आपल्या सासऱ्यांच्या निधनानंतर थोड्या दिवसाने रमा आपल्या दिरापाशी जाऊन म्हणाली—"भावजी, तुम्ही खुप बुद्धिमान आहात! माझा नवरा बावळट आहे. माझ्या बहीणीनें शोभानें तुमच्याशी लग्न करण्यास नकार दिला. त्या कारणामुळे तुम्ही एखादे वेळेस माझ्यावर सुद्धा रागावला असाल. आमच्यावर जो काय अन्याय होत आहे तो डोळ्यांनी पहायला सासरे सुद्धा जिवंत राहीले नाहीत. मला तर एकाच गोष्टीची भीती वाटते की पुढे माझ्या भविष्याचे काय होणार?" ती कळवळीनें म्हणाली.

"वहिनी हे काय हो? तुमची काळजी नाहीशी होण्यासाठी मी काय करावे म्हणता?" दिनकर म्हणाला.

"तुम्ही इस्टेटीचा अर्धा वाटा ह्यांच्या नावानें लिहून द्या." रमा म्हणाली.

"अर्धाच कां हो! पूर्णच लिहून देतो मग तर झाले!" असे म्हणत दिनकरने आपल्या भावाच्या नावाने सर्व इस्टेट लिहून दिली व तो स्वत: कफल्लक होऊन व्यापार पाहू लागला.

सर्व इस्टेट आपल्या नवऱ्याच्या नावाने झाल्या बरोबर रमाचे मन दिराविषयी बदलले ती दिराची उपेक्षा करू लागली. ते पाहून नोकर चाकर सुद्धा त्याच्या बरोबर गैरव्यवहार करू लागले. परंतु दिनकरला मनांपासून माहीत होते की, मनुष्य स्वभावच असा असतो की, संपत्ती नाही म्हणजे कोणीही त्याकडे पाठ फिरवतो. त्यामुळे त्याने घर सोडून निघून जाण्याचा निश्चय केला व तो भाऊ भावजयेचा निरोप घेण्यासाठी आला.

"आता हो! आम्हांला आधीच लोक नावे ठेवतात तुम्ही निघून गेलात तर म्हणतील आम्हीच तुम्हांला घरातून हाकलवून लावले. मग आमची अब्रु चव्हाटयावर येईल." रमा कळवळत म्हणाली.

"वहिनी, मी असमर्थ दुबळा नाही. माझ्या शक्तिपरत्वे मी तुमच्याहून सुद्धा जास्त श्रीमंत होवून दाखविन आणि मगच घरात पाऊल ठेवीन. तुम्ही सर्वांना खुशाल



सांगा की, माझा भाऊ घमेंडी होता व पैसा कमावत नव्हता म्हणून तो रागारागाने घर सोडून निघून गेला." असे म्हणत दिनकर घराबाहेर पडला.

परंतु दिनकरला समजेना कुठे जावे. तो तसाच दुपार पर्यंत चालत राहला. डोक्यावर उन्ह टळटळीत होती अत्यंत श्रमा मुळे तो एका झाडाखाली दोन क्षण टेकला. त्याला तेथे दोन माणसे झोपलेली दिसली एक आंब्याचे झाड होते जवळच त्याला बरेच आंबे लागले होते. त्याने तेथे जाऊन आंबे काढले व ती माणसे होती तेथे आला त्या दोघांनी त्याला नमस्कार करीत म्हटले—"कसा रे बाबा देवासारखा धावून आलास



चोरांनी आम्हाला मारले व लुबाडले. आमची सर्व संपत्ती घेऊन पसार झाले. आम्हांला अत्यंत भुक लागली आहे. जर तुझ्यापाशी काही खायला असले तर दे. आम्ही तुझे उपकार जन्मभरात विसरणार नाही. आम्हांला काही खायला प्यायला मिळाले नाही तर आम्ही हलूही शकणार नाही.

दिनकरने स्वतःच्या धोतराच्या सोग्या-तून आणलेले आंबे त्याच्यापुढे टाकले व म्हटले–"महाशय, आपण ही फळे खा मागाहून जी काय उरतील ती मी खाईन.

दोघांनी हावरटासारखी भराभर ती फळे खाल्ली शेवटी काहीच त्याच्यासाठी उरली नाहीत ते पाहून त्यांना अत्यंत वाईट वाटले.

ते पाहून दिनकर म्हणाला वाईट वाटून घेऊ नका. अजून पर्यंत तरी माझ्या अंगात बळ आहे. पुढे जाता जाता मी खायला काही मिळते का पाहिन.

तेव्हां त्यातील एकजण म्हणाला–" माझे नाव रत्नस्वामी आहे. मी एका शहरातील प्रसिद्ध व्यापारी आहे. हा माझा नोकर कुमुद आहे. तुला आमच्याकडून काही मदत हवी असेल तर सांग. मी यथाशक्ति करण्याचा प्रयत्न करेन.

ह्यानंतर दिनकरने रत्नस्वामींना घडलेली सर्व हकिकत सांगितली. तेव्हां त्याचे बोलणे ऐकून त्याला अतिशय आनंद झाला. तो उत्साहानें म्हणाला–"मला काही मुलबाळ नाही. माझ्या व्यापारात मला मदतीला कोणी नाही. त्यामुळे मी अत्यंत काळजीत आहे. मी तुला चांगला पगार देईन. माझ्या बरोबर चल.

कामधंदा नसल्याने दिनकरने त्याचे म्हणणें मान्य केले व तो त्याचा बरोबर त्याच्या गांवी गेला. तेथे कुमुदने त्याला आपल्या घरात आश्रय देऊन त्याचे ऋण फेडले व रत्नस्वामीने त्याला नोकरी देऊन.

थोडया फार दिवसातच दिनकरने स्वतःच्या हुषारीने रत्नस्वामीच्या धंद्यात भरभराट घडवून आणली व त्याला अफाट पैसा मिळाला त्यामुळे खुष होऊन तो रत्नस्वामी कडून जे काय पैसे मिळत त्यातील अर्धे कुमुदला देत असे.

कुमुदला मनोहारी नावाची एक सुस्वरूप मुलगी होती. तिनें दिनकरची बुद्धिमता पाहिली व ती मनापासून त्याच्यावर मोहित झाली. रत्नस्वामीलासुद्धा रजनी नावाची एक मुलगी होती. परंतु ती दिसावयास अगदी बेताची होती. तिचे सुद्धा त्याच्यावर प्रेम होते. मनोहारीला समजेना की आपले त्याच्यावरील प्रेम त्याच्यापाशी कसे काय उघड करावे त्यामुळे दोघींनी एकमेकींची सहाय्यता घेण्याचे ठरवले परंतु जेव्हां एकी-वरच त्यांचे प्रेम आहे हे त्यांना कळले तेव्हां त्यांनी दिनकरचे त्याबाबतींत काय मत आहे हे जाणण्याचे ठरविले.

त्या एकमेकींना म्हणाल्या–"मी अतिशय सुंदर आहे. दिनकर तर कुरूप आहे. तेव्हां माझ्यासारख्या सौंदर्यवान मुलीला तो नाकारणे शक्यच नाही. त्यातुन त्याने अशी सुद्धा शपथ घेतली आहे की अत्यंत सुंदर मुलीशीच आपण विवाह करणार त्यामुळे तो नक्कीच माझ्याशी लग्न करेल." मनो-हारींने स्वतःच्या मनाची समजुत केली.

मी तर श्रीमंत दिनकर गरीब माझ्या सारख्या श्रीमंत मुलीला तो नकार देऊ शकणारच नाही. त्यातुन त्यांनी शपथ घेतली आहे की, माझ्या भावापेक्षां जास्त सपत्ती मी कमावून दाखविन. त्या कारणा-मुळे दिनकर नक्कीच माझ्याशी लग्न करेल.



त्या दोघींना आपापल्या मनातील गोष्टी दिनकर समोर बोलून दाखवता आल्या नाहीत. त्यामुळे त्यांनी आपापल्या वडिलांना सांगितल्या ह्या गोष्टी ऐकून रत्नस्वामी व कुमुद अतिशय आनंदून गेले. व त्यांनी ही गोष्ट दिनकरच्या कानावर घातली. तेव्हां तावडतोब दिनकरनें रजनीच्या बरोबर लग्न करण्याचा आपला निर्णय सांगितला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, सौंदर्यवती मनोहारीचा तिरस्कार करून श्रीमंत घरातील कुरूप रजनी हिच्याशी लग्न करण्यापाठीमागे दिनकरचा काय हेतू

असावा ? केवळ धन हेच सर्वांत मोठें मानणे हेच नां ! कारण तो आपल्या भावांपेक्षा जास्त श्रीमंत बनू शकतो. परंतु त्याचा तिरस्कार करणाऱ्या शोभापेक्षा सुंदर अशा मुली बरोबर लग्न करू शकला नाही. ह्या-मागचे कारण काय ? या शंकाचे समाधान कारक उत्तर दिले नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला–" दिनकरने कुरूप असलेल्या रजनी बरोबर विवाह करण्याचे कारण संपत्तीला प्राधान्य देणे हे कदापी नाही. कारण ते प्रथमच स्पष्ट झालेले आहे. की तो अत्यंत इमानदार व सचरित्र आहे म्हणुनच त्याने भावाला संपत्तीतील स्वतःचा हिस्सा सुद्धा देऊन टाकला व दारोदार वणवण कामाकरीता भटकत राहला. वाटेतील रत्नस्वामी व कुमुद अशा परक्या माणसांना त्यांनी प्रथम खायला घालून त्यांची भूक भागवली. त्याच बरोबर रजनीच्या बरोबर लग्न करण्याच्या निश्चयाबरोबर त्याने नैतिक मूल्ये दाखवून दिली आहेत. मनोहारी सुंदर मुलगी आहे कोणताही श्रीमंत मुलगा तिच्या रूपलावण्याकडे पाहून तिच्याशी लग्नास तयार होईल. परंतु रजनी सारख्या कुरूप मुलीशी तोच प्रेम करू शकतो कारण तो फक्त धनालाच महत्व देतो तसा तो सुद्धा कुरूप आहे त्याने सुद्धा नकार दर्शविला तर तिला योग्य पती मिळणे अत्यंत दुर्लभ आता राहीली त्याने घेतलेली शपथ की शोभापेक्षा सुंदर मुलीशी लग्न करून दाखविन. जर का त्याला त्याने म्हटल्यासारखे प्रतिज्ञेचे पालन करावयाचे झाले तर त्याला आपला धर्ममार्गाचा त्याग केला पाहिजे. हि गोष्ट दिनकरने लपवलेली नाही. त्यामुळेच त्यांनी नीती धर्माचा त्याग केला नाही. परंतु त्याने तात्कालीक आवेशात येऊन जी प्रतिज्ञा केली होती त्याला फेटाळून लावले.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# उपाय

ताश्कंद नगरात एक मीरकमल नावाचा व्यापारी रहात होता. तो व्यापाराला निघे तेव्हां त्याची बायको जमीरा शेजार-पाजारी भीक मागत फिरत असे त्यांना काही मुलबाळ झाले नाही. त्याना एकच विवचना असे की पैसा खर्च केल्याशिवाय आपण आपले पोट भरले पाहीजे मीरकमल कामधंद्या निमित्ताने आठवड्याचे सहा दिवस बाहेर व बुधवारी घरात राही.

एके दिवशी मीरकमलने दोन वर्षाची एक मरतुकडी बकरी रस्त्यामधे एका कडून विकत घेतली व घरी आणली.

त्यामुळे जमीरा अगदी वैतागून गेली. तीने दिवसभर ओरबाडून आजुबाजुचे गवत खाऊन आवार साफ करून टाकले होते.

बुधवारी जेव्हां मीरकमल घरी आला तेव्हां तिने डोळ्यात पाणी काढत म्हटले "काय हो तुम्ही, माझा जीव घ्यायला माझ्या उरावर ही बकरी आणून ठेवली नाहीत नां ? तुम्हाला काय मी जगू नाही असे वाटते का ?, तुम्ही तिला तरी घालवून लावा नाहीतर मी माहेरी निघून जाते ?"

"अग, अग एवढी घाईगर्दीला काय येतेस मी बकरीचे पहातो." मीरकमल आपल्या बायकोला समजावीत म्हणाला.

त्याच दिवशी तो आपल्या आईच्या थडग्यापाशी स्मशानात गेला. तेथे चोहो-बाजूला खूप गवत उगवले होते ते उंच वाढून वाऱ्यावर डोलत होते. मीरकमलने विचार केला की, आपल्या बकरीला ह्यापेक्षा सुंदर मेजवानी दुसरी कोणती मिळणार.

तो भराभर पावले उचलीत घराकडे आला व आपल्या बकरीला घेऊन स्मशानात आला. त्याच्या राखणदाराला म्हणाला– "अरे बाबा, मी तर खूप थकलो आहे.